# संस्थेचे प्रारंभीचे दोन शब्द

विदर्भ संशोधन मंडळाच्या बहुविध कार्यापैकी एक महत्त्वाचें कार्य म्हणजे संशोधनपर किंवा संशोधनास साहाय्यभूत होईल असें साहित्य प्रकाशणे हे होय. संस्था स्थापन झाल्यापासून दोनच वर्षात म्हणजे १९३६ साली या कार्याकडे मडळ वळले. प्रथम १९३६ साली गुप्तेकृत नागपूरची बखर पुनर्मुद्रित करण्यात आली व ती ख्यातनाम साहित्यिक व संशोधक प्रा. कृ. पा. कुळकर्णी यांच्या हस्ते १९३७ साली प्रकाशित करण्यांत आली. त्याच वेळीं कै. नी. ब. भवाळकर व कै. ह. ना. नेने या सुप्रसिद्ध महानुभाव वाङ्मयसंशोधकांनी संपादिलेल्या 'दृष्टान्तपाठ' या पुस्तकाचा पुरस्कारहि करण्यांत आला. तेव्हापासून सुमारे एक तप रिकामेंच गेलें. परंतु १९४९ साली 'निबडक निबंध' म्हणून एक लहानशा संस्थेच्या सभासदांनी संस्थेंत वाचलेल्या निबंधाचा संग्रह प्रसिद्ध करण्यात आला. पुनः मध्यंतरीं ४ वर्षे गेलीं आणि १९५४ सालीं संशोधन मुक्तावली सर पहिला हा डॉ. मिराशी यांच्या लेखांचा संग्रह व श्री. दे. गो. लाडगे याचा नागपूरचा सांस्कृतिक इतिहास हीं दोन पुस्तकें प्रसिद्ध करण्यात आलीं व तेव्हापासूनच हें कार्य अव्याहत चालू आहे.

यंदा महानुभाव वाङ्मयातील निरुक्तशेष नांवाचा ग्रंथ डॉ. य. खु. देशपांडे या अधिकारी पुरुषाने मंडळाच्या वतीने संपादिला व तो मुद्रितहि झाला. आता हा त्याच साहित्यातील तिसरा ग्रंथ या संस्थेतर्फे जनतेपुढे येत आहे. त्या ग्रंथाचे नाव मूर्तिप्रकाश हें असून त्याचे स्थान महानुभावीय वाङ्मयांत श्रेष्ठ आहे. तो संकलित ग्रंथ नसून स्वतंत्र आहे. एवढेंच नव्हे तर

तें ग्रंथकर्ते केसोबास याच्या "काव्यवैजयंतीमधील अत्यंत प्रकाशमान असे रत्न होय" असे या ग्रंथाचे विद्वान् संपादक डॉ. वि. भि. कोलते याचें म्हणणें आहे. मूर्तिप्रकाश या ग्रंथाला प्रथम १९५८ सालीं मध्यप्रदेश शासन साहित्य परिषदेकडून मान्यता मिळाल्यामुळे संपादकाला योग्य तो पुरस्कारहि प्राप्त झाला, परंतु ग्रंथाच्या मुद्रणाचा मात्र योग घडून आला नाही. संशोधन मंडळाचा ग्रंथप्रकाशनाचा नित्य कार्यक्रम चालू असतो त्यास अनुसरून डॉ. कोलते यांचे जवळ ग्रंथप्रकाशनाचे बोलणें काढलें असता त्यांनी त्यांच्या संस्थेवरील प्रेमामुळे मूर्तिप्रकाशाच्या प्रकाशनाविषयी अनुकूलता दर्शविली. हे पाहून संस्थेचे कार्याध्यक्ष डॉ. वा. वि. मिराशी यांनी हा विषय महाराष्ट्र राज्याच्या साहित्य व संस्कृति मंडळाच्या नजरेस आणला व तिने मोठ्या आनंदाने आर्थिक साहाय्य देण्याचे कबूल केले. एवढेच नव्हे तर योग्य वेळीं रक्कमहि संस्थेच्या स्वाधीन केली. त्यांच्याच बळावर हा ग्रंथ प्रसिद्ध होत आहे, हें येथे कृतज्ञतापूर्वक नमूद करावेसे वाटतें. ज्या सर्वांग सुंदर पद्धतीनें डॉ. कोलते यांनी ग्रंथाचे संपादन केले तिचा विचार करता हें कार्य उत्कृष्ट रीतीनें पार पडल्याबद्दल संस्थेस समाधान होत आहे. या ग्रंथाच्या प्रकाशनानें १९५४ पासून गेल्या आठ वर्षांत १४ ग्रंथ प्रकाशित करण्याचे श्रेय मंडळास लाभणार असून एकूण संख्या २१ झाल्याचा आनंद लाभणार आहे.

तात्पर्य हा ग्रंथ प्रकाशित होण्यात "संसारभास्तण्डुला प्रथमूला" या नात्यानें महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति मंडळाविषयी ही संस्था आपली हार्दिक कृतज्ञता व्यक्त करते. त्याचप्रमाणें महानुभावीय वाङ्मयाचे सुविख्यात संशोधक म्हणून अखिल महाराष्ट्रातच नव्हे तर बृहन्महाराष्ट्रातहि सुपरिचित असलेले आमचे विद्वान् मित्र व संस्थेचे उपाध्यक्ष प्राचार्य डॉ. वि. भि. कोलते यांनी मुद्रणप्रत तयार करण्यापासून तर मुद्रण तपासण्यापर्यंत संस्थेची जी निरपेक्ष सेवा केली याबद्दल संस्था त्यांची अत्यंत ऋणी आहे. विशेषत या

ग्रंथाची विस्तृत प्रस्तावना, पाठभेदांच्या तळटीपा, अर्थनिर्णायक टीपा व शब्दार्थकोश हीं सर्व अंगें अधिकारी लेखणीतून बाहेर पडली असल्याकारणाने व शिवाय 'सकळ' म्हणून प्रसिद्ध असलेल्या महानुभावीय सांकेतिक लिपीच्या उद्घाटनाचें कोष्टक व पोथीच्या पानाचे छाप दिल्यामुळे ग्रंथाच्या उपयुक्ततेंत भरीव भर पडली आहे, असे नम्रपणें म्हणावसें वाटतें. शेवटीं या ग्रंथाचे मुद्रक श्री पा. ना. ननहट्टी यांनी जो नियोजित कालावधींत हा एवढा मोठा ग्रंथ सुबक रीतीने मुद्रित करून दिला त्याबद्दल त्यांचे मनापासून आभार मानतों. आतापावेतों सस्थेचे बहुतेक सर्वच ग्रंथ नारायण मुद्रणालयाने मुद्रित केले आहेत व त्यांतच या ग्रंथाचीहि भर पडत आहे हें येथे व्यक्त करावेसें वाटते

माघ वा॥ ५ शके १८८३
नागपूर
दि. २४-२-१९६२

**दे. गो. लांडगे,**
कार्यवाह,
विदर्भ संशोधन मंडळ

# कृतज्ञतेचे दोन शब्द

इ. स. १९५५ मध्ये 'मध्यप्रदेश शासन साहित्य परिषदे'तर्फे प्राचीन अप्रकाशित ग्रंथ–संपादन विभागातील प्रथम पुरस्कार प्राप्त झालेल्या प्रस्तुत काव्याची संपादणी आज 'महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृति मंडळा'च्या कृपेने 'विदर्भ संशोधन मंडळा'कडून प्रकाशित होत आहे. हा योग मला अत्यंत आनंददायक वाटतो. या तिन्ही संस्थांच्या त्रिवेणी संगमात सुस्नात होण्याचे भाग्य मला लाभले. त्याबद्दल या तिन्ही संस्थांचा मी कृतज्ञ आहे.

मुनि केशिराजविरचित मूर्तिप्रकाशाची प्रस्तुत संपादणी मी १९५५ मधे तयार केली. त्यासाठी आवश्यक ती हस्तलिखिते महंत श्रीगोपीराज महानुभाव व कै. हरीन्द्र जीतेन्द्र व्यास यांच्याकडून मला मिळाली होती. सकळा लिपीतील पोथी बाळबोधीत रूपांतरित करण्यासाठी विशेषेकरून सौ. कोलते यांचे साह्य झाले. प्रा. भाऊ मांडवकर यांनी शब्दकोशाची स्वच्छ प्रत तयार करून दिली. या सर्वांचा मी अत्यंत आभारी आहे. ग्रंथाच्या सुबक मुद्रणाबद्दल नारायण मुद्रणालयाचेही मी आभार मानतो.

संपादनाचा हा प्रयत्न प्राचीन मराठीच्या अभ्यासकांना आणि महानुभावांना मान्य होवो हीच इच्छा आणि अपेक्षा आहे.

नागपूर महाविद्यालय,<br>नागपूर<br>१५–२–१९६२

वि. भि. कोलते

# अनुक्रमणिका

# संक्षेप सूची

क मूर्तिप्रकाश हस्तलिखित क
ख " " ख
ग " " ग
घ " " घ
उगी. उद्धवगीता, सपा. कोलते; आवृत्ति २. (अरुण प्रकाशन, मलकापूर.)
उह उपाहरण; सपा. राजवाडे, (भारत इतिहास संशोधक मंडळ अहवाल शके १८३३)
ऋव ऋद्धिपुर वर्णन; सपा. य. खु. देशपांडे; (शारदाश्रम, यवतमाळ)
एभा. एकनाथी भागवत, सपा. ल. रा. पांगारकर; (निर्णयसागर, मुंबई)
गोप्रच. श्रीगोविंदप्रभु चरित्र; सपा. कोलते; आवृत्ति २. (अरुण प्रकाशन, मलकापूर)
घेसं. घेरण्डसंहिता (लक्ष्मीवेंकटेश्वर प्रेस, कल्याण)
दृपा. दृष्टांतपाठ, सपा. नेने–भवाळकर.
दृस्तो दृष्टांत स्तोत्र; दृष्टांत पाठाच्या आवृत्तीतील.
धउ. धवळे उत्तरार्ध } सपा वा. ना. देशपांडे, आवृत्ति २.
धपू. " पूर्वार्ध } कॉन्टिनेन्टल : पुणे
नरुस्व नरेंद्रकृत रुक्मिणी–स्वयंवर; सपा. कोलते; (अरुण प्रकाशन, मलकापूर)
प्रव. प्रतिष्ठान वर्णन, सपा. भुसारी—मर्ढेकर, (मराठवाडा साहित्य परिषद, औरंगाबाद)
भारा. भावार्थ रामायण (निर्णयसागर, मुंबई)
महा तत्त्व महानुभाव तत्त्वज्ञान; ले. कोलते; आवृत्ति २. (अरुण प्रकाशन, मलकापूर)

महा आच महानुभावाचा आचारधर्म; ले. कोलते; (अरुण प्रकाशन, मलकापूर)

रकौ रसकौमोदि; संपा. श्रीधर कुळकर्णी; (मराठवाडा साहित्य परिषद, औरंगाबाद)

रघु रघुवंश (निर्णयसागर)

लीच. ए. लीळाचरित्र एकांक; संपा. ह. ना. नेने.

लीच उत्त. ,, उत्तरार्ध ,, ,,

लीच. पू. भा ,, पूर्वार्ध, भाग ,,

वछा. वछाहरण; संपा. कोलते; (अरुण प्रकाशन, मलकापूर)

शिशु शिशुपाळवध; संपा. कोलते; (अरुण प्रकाशन, मलकापूर)

सव. सह्याद्रिवर्णन; संपा. कोलते; (पुणे विद्यापीठ, पुणे)

सिसू. सिद्धांतसूत्रपाठ. संपा. ह ना. नेने.

सिसू आ. ,, आचार प्रकरण

सिसू. आमा. ,, आचारमाळिका ,,

सिसू उद्ध. ,, उद्धरण ,,

सिसू. मवा. ,, महावाक्य ,,

सिसू निर्व ,, निर्वचन ,,

सिसू. वि. ,, विचार ,,

सिसू. विमा. ,, विचारमाळिका ,,

स्मृस्थ. स्मृतिस्थळ; संपा. वा. ना. देशपांडे; आवृत्ति २. (व्हीनस प्रकाशन, पुणे)

ज्ञा. ज्ञानेश्वरी (मुंबई राज्य शिक्षण खाते, मुंबई)

ज्ञाप्र. ज्ञानप्रबोध; संपा. श्री. दत्तलक्षराज कवीश्वर.

# शुद्धिपत्र

## प्रस्तावना

| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
| --- | --- | --- | --- |
| ३ | २३ | श्रीपरेशायम्म | श्री परेशायनमः |
| ४ | ३ | चतंदसे | चतर्दसे |
| १० | २१ | ह्य | ह्या |
| १३ | १२ | तो योग्य | योग्य तो |
| २१ | २७ | | ( हे कसचिन्ह नको |
| २९ | २२ | याच | याचे |
| ३० | २१ | माइभटाच्या | म्हाइभटाच्या |
| ३२ | २४ | तात | जात |
| ३५ | ११ | वसली | बसली |
| ३५ | २१ | मात्यापित्याच्या | मातापित्याच्या |
| ३७ | ११ | घेईल | घेई |
| ३८ | १६ | 'करून' नंतर पुढील शब्द गळाले | करून सूत्रपाठ तयार केला. तसेच स्वामींनी वेळोवेळी... |
| ४२ | १० | ? | ? हे प्रश्नचिन्ह नको. |
| ४२ | २५ | मोती | मोत्ये |
| ४३ | १५ | श्रीचक्रधरापुढे | श्रीचक्रधरामुळे |
| ४६ | १५ | आचारण | आचरण |
| ४९ | २० | १९५८ | १८५८ |
| ४९ | २३ | वर्णंत | वर्णने |
| ५२ | ९ | विरहावस्या | विरहावस्था |
| ५३ | ६ | तव्हा | तेव्हा |
| ५६ | ३ | नागापिका | नागाबिका |
| ५६ | २५ | तराव्या | तेराव्या |
| ५८ | ११ | ओपरूले | ओपसळे |

## मूर्तिप्रकाश मूळ

| ओवी | चरण | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| २७ | तळटीप | ग. व्यया. | ग. व्यथा |
| ७८ | ३ | अतु तुज्ञीय | अतु : तुज्ञीय |
| १२२ | ३ | चक्घरू | चक्रघरू |
| २५९ | २ | कौवल्य | कैवल्य |
| ३७९ | ३ | वोलौनि : | योलौनि प्रीएवगते : |
| ४४१ | ओ. क्रमाक | ४२१ | ४४१ |
| पा. ६० | ओळ ९. | त्याकरील | त्यावरील |
| ५७१ | ४ | काळावीदें | कळावीदें |
| ६५७ | १ | दादुगी | दाटुगी |
| ८५८ | १ | मनुस्यदहा- | मनुस्यदेहा- |
| ९९३ | ओ. क्रमाक | १९३ | ९९३ |
| ७०५ | २ | वाणिता | वणिता |
| १३५२ | ओ. क्रमाक | १३४२ | १३५२ |
| १३५३ | ,, | १३३५ | १३५३ |
| १३५४ | ,, | १२५४ | १३५४ |
| १३८५ | ,, | १८८५ | १३८५ |
| १३९६ | ३ | सदासर्वातीतु | सदा सर्वातीतु |
| १४६० | ३ | माया कृपावाचौनि | मायाकृपावाचौनि |
| १४८० | ओ. क्रमाक | १८०० | १४८० |
| १५०६ | चरण ३ | वममाळी | वनमाळी |
| १५१४ | ३ | ज्ञानप्रमा | ज्ञानप्रेमा |
| १७४५ | २ | चुघळीला | चुभळीला |
| १७५९ | ३ | वीवुडे | बी वुडे |
| १८४३ | ३ | सुष्टरमण | सुष्ट रमण |
| १८६० | ३ | लोबत | लोपत |
| १८८१ | ३ | वम्हाड- | व्रम्हाड |

| ओवी | चरण | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १८९१ | १ | माहादोखु | माहादोख |
| | २ | धनुखु | धनुख |
| १९०२ | ३ | भरिलासे सपाटु | भरिला सेसपाटु |
| १९८२ | २ | मोखेयाचे | मोरुवेंयाचे |
| १९९४ | २ | मळकर्मांची | मळकर्मांची |
| १९९६ | ४ | भेदारला | भेदावला |
| २०६१ | ३ | नाच | नाचु |
| २१५० | २ | थ्रघा | श्रघा |
| २१५५ | ओ. क्रमांक | २१५६ | २१५५ |
| २२२७ | ३ | आवतरण | अवतरण |
| २२४३ | ओ. क्रमांक | २२४ | २२४३ |
| २२५३ | ,, | २५५३ | २२५३ |
| २२५४ | ,, | २५५४ | २२५४ |
| २२६३ | १ | कुडी | वुडी |
| २३५६ | ओ. क्रमांक | २३६५ | २३५६ |
| २३९३ | ,, | ३३९३ | २३९३ |
| २४६३ | ,, | २५६३ | २४६३ |
| २५२३ | ,, | २५५३ | २५२३ |

## अर्थनिर्णायक टीपा

| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ३२३ | ३ | मुजीजे | मुचीजे |
| | १२ | ब्रह्माडस्थाना | ब्रह्माडस्थांना |
| ३२८ | ६ | २९८ | १९८ |
| | २५ | नसल्योमुळ | नसल्यामुळे |
| ३३१ | ७ | तप्तदशकळा | सप्तदशकळा |
| | २० | हस्व | नहस्व |
| ३३३ | ५ | प्रवृत्तीला : इच्छेला | प्रवृत्तीला = इच्छेला |
| | ६ | विखो : इच्छा | विखो = इच्छा |
| ३३३ | १६ | हस्व. | नहस्व. |
| ३३६ | ११ | प्रवूत्ति | प्रवृत्ति |
| | २७ | वीकारण्याच्या | स्वीकारण्याच्या |
| ३४९ | ६ | सूष्टि | सृष्टि |
| ३५१ | ४ | घउनि | घेउनि |
| ३५२ | २५ | गामक | नामक |
| ३५९ | ६ | दाब्द | शाब्द |
| ३६८ | २७ | ४ | ४ |
| ३७८ | २५ | त्वामीविण | स्वामीविण |
| ३७९ | २३ | १३१७ | २३१७ |
| ३८५ | २५ | २५४१ | २५४२ |
| ३८५ | १४ | (ओ. वरील-) | (ओ. २१४५ वरील-) |
| ३८७ | १६ | विगोवा | विगोवा |
| ३९९ | १७ | आबोलणया | अबोलणया |
| ४१३ | ओ (वो)डवणे ३४५ -शेवटची ओळ | | २४५ |

# प्रस्तावना

## प्रास्ताविक

'मूर्तिप्रकाश' या काव्याची माहिती महाराष्ट्राला प्रथम कै. वि. ल. भावे यांच्या 'महाराष्ट्र सारस्वत' (भाग १) या ग्रंथाच्या द्वारा झाली. त्यानंतर श्री. य. खु. देशपांडे यांनी लिहिलेल्या 'महानुभावीय मराठी वाङ्मय' या ग्रंथात व कै. ल. रा. पांगारकर यांच्या 'मराठी वाङ्मयाचा इतिहास' (खंड १) या ग्रंथात त्याविषयी थोडी माहिती आली. पण या दोन्ही ग्रंथकारांनी आपली माहिती 'महाराष्ट्र सारस्वता'तून घेतलेली असल्यामुळे तीत नवीन असे काहीच नाही. त्यानंतर 'मूर्ति-प्रकाशा'चे स्वतंत्र आणि सविस्तर विवेचन कोणीहि केलेले आढळत नाही. ग्रंथहि अद्याप कोणी प्रसिद्ध केलेला नाही. कै. भावे यांनी दिलेल्या उताऱ्यावरून त्याच्या रसाळपणाची कल्पना सर्वांना आलेली असल्यामुळे मूळ काव्य संपूर्णपणे प्रसिद्ध होण्याची आवश्यक्ता व उत्सुकता सर्वांना वाटत होती. ती उत्सुकता पूर्ण करण्याचे भाग्य मला आज लाभत आहे ही अत्यंत आनंदाची गोष्ट होय.

## साधनसामुग्री

संपादनासाठी प्रस्तुत काव्याच्या मला एकूण चार प्रती उपलब्ध झाल्या. त्यांचा तपशील पुढीलप्रमाणेः—

### क प्रत

प्रस्तुत पोथी कै. हरींद्र जिनेंद्र व्यास, नागपूर यांच्या जवळून मला मिळाली. पोथीचा कागद जाड, त्यावर लिहिलेले अक्षर जाड आणि म्हणून

पोथीहि जाड झालेली आहे. प्रत्येक पानावर साधारणपणे १० किंवा ११ ओळी लिहिलेल्या असून अक्षर सुवाच्य आहे. पोथीत मूर्तिप्रकाश काव्य, व काही फुटकळ पद्यरचना आहे. 'मूर्तिप्रकाशा'च्या आरंभीच्या ३३॥ ओव्या नाहीत. ३४ व्या ओवीच्या उत्तरार्धापासून पुढे 'मूर्तिप्रकाश' संपूर्ण आहे. काव्याच्या शेवटी असलेला समाप्तिलेख पुढीलप्रमाणे—

"इती मूर्तीप्रकास संपूर्न शूभंमंगळमस्तु ॥ सके १२१० ॥ विजए नावं सवत्सरे : फाल्गुन सूद्ध दसमी : गुरुवारी : नक्षत्र अनराधा : सोभाग नाम योगु बाळव नामकरण तद्दीनीं केसोबासाते वेव्हारासी धरूनि नेले : तें मूर्तिप्रकाश ग्रथु अवस्ताभुत गितु : आणि रत्नमाळा : हें तीन्ही ते दीसी केले : ॥ एव मूर्तिप्रकाश पपूर्नमगळ : ॥ छ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥

या पोथीच्या लेखनाचा निर्देश पोथीच्या शेवटी पुढीलप्रमाणे—

"शके ॥ १५३५ ॥ काळयुक्त नाम सवत्सरे चैत्र मासे कृष्णपक्षे : तीथि नवमी : रवीवासरे : सर्पली ग्रामे : मुर्त्तिप्रकास ग्रथ लीखण शूभ भवतू : ॥ छ ॥ छ ॥ यादृश पुस्तक दृष्ट्वा स्तादृश .." वगैरे.

### ख प्रत

ही पोथी मला एका महात्म्याकडून मिळाली. तिचा कागद साधारण जाड असून जुना आहे. पहिल्या १९९ पानावर सपूर्ण मूर्तिप्रकाश व १९९ ते २०१ या पानावर 'अवस्थाभूत गीत' लिहिले असून नतर सकळ व बाळबोध लिप्यात काही फुटकळ ओव्या, श्लोक व आरत्या लिहिलेल्या आहेत. 'मूर्तिप्रकाश' सकळ लिपीत लिहिलेला असून त्याचा प्रारभ 'श्रीपरेशाय नमः ॥०॥ जयजय केवळा सूखवेधा .' या ओवीपासून झालेला आहे. काव्याचा समाप्तिलेख पुढीलप्रमाणे—

"इती मूर्तीप्रकास सपु...सके १२१०* ॥ : वीजए नाम सवत्सरे : ॥ ० ॥ फाल्गुन सूध दसमीं : ॥ १० ॥ वार ब्रहसति : नक्षेत्र अनुराधा :

---

* लाल व काळया पेन्सिलीनी हा आकडा पुढील उभ्या रेषेच्या साह्याने ५ असा करण्याचा कोणीतरी प्रयत्न केलेला आहे. पण तेथे ० स्पष्ट दिसते

सोभाग्य नाम योग : वाळन नामकरण : तदीनी केमोवासाते वेन्हारासि धरूनि नेले : तें मूर्तिप्रकास ग्रंथ आणि अवस्थाभुत गीत : आणि रत्नमाळा हे तीन्ही ठाए ते दीसी केले : ॥ ० ॥ ० ॥ ० ॥ ० ॥ ० ॥

यानंतर अवस्थाभूत गीत लिहिलेले असून मग पोथीच्या लेखनशकाचा निर्देश पुढीलप्रमाणे केलेला आहे—

" शके ॥ १५४६ ॥ रगताक्ष ना(म) सवत्सरे : आस्वीनि मासे : कृष्णपक्षे : तीथि सप्टी वार बुधि तदीनी पुस्तक समाप्ता : भग्निपृष्टीकटीग्रीवा अधोदृष्टि अधोमुख : कष्टेनि लिखि ते शास्त्र यत्नेनि प्रतिपाळयत् : एव कोठी गोमराजसुत कमळाकर मुणीचें हस्ताक्षेर : एथामति ली(लि)ते मम दोष न लींप्येत : एव पुस्तक सपूर्ण समाप्ता ॥ ० ॥ ० ॥ ० ॥

क आणि ख या दोन्ही पोथ्यात प्रत्येक पानावर डाव्या उजव्या बाजूना लाल शाईने दोन दोन उभ्या मर्यादा रेषा आखलेल्या आहेत. क प्रतीच्या पहिल्या ६५० ओव्यांचे आकडेहि लाल शाईने लिहिले आहेत तर ख प्रतीत शतकाचे आकडे लिहिण्यासाठी व क्वचित् त्यापुढील ओवीची पहिली ओळ लिहिण्यासाठी लाल शाईचा उपयोग केलेला आहे.

## ग प्रत

इ. स. १९५५ च्या मे महिन्यात मिरापूर येथे भरलेल्या अखिल भारतीय अस्पृश्य महानुभाव परिषदेसाठी मी गेलो असताना तेथील हस्तलिखिताच्या प्रदर्शनात मला ही तिसरी पोथी मिळाली. चांदा जिल्ह्यातील एक अस्पृश्य महानुभाव महंताच्या मालकीची ही असून ती सकळ लिपीत सुंदर अक्षरानी लिहिलेली आहे. दोन्ही बाजूना लाल शाईने दोन दोन उभ्या रेषा आखलेल्या असून साधारणपणे प्रत्येक पानावर ११ ते १२ ओळी लिहिलेल्या आहेत. पोथीचा प्रारंभ "श्रीपरेशायनमः जय जय केवळा सुघनेघा . " असा असून हा भाग व पहिली पूर्ण ओवी लाल शाईने लिहिलेली आहे. 'मूर्तिप्रकाश' काव्याच्या शेवटी पुढीलप्रमाणे समाप्तिलेख आहे.

" इती मुर्तिप्रकास संपुर्न शुभं मस्तु :॥: सके १२१०॥ विजये नाम संवत्सरे :॥ छ॥ वैसाख मासे गुरुवारे : पुर्णीमिसि आ॥ छ॥ सके १५८४॥ शुभकृ संवत्सरे : बुद्धिवारे : कृष्णपक्ष चर्तदसे : जेष्ट मासे : पींगळी-ग्रामे लीखितं :॥ येथाप्रत लीपीत मम दोस न लीपीत : इति मुर्तिप्रकास संपुर्ण समाप्तं ॥ छ॥ फाल्गुन शुद्धि द(श)मी गुरुवारीं नक्षेत्र अनुराधा : सोभाग नामयोग बाळव नामकरण : तद्दीनीं केशराजव्यासातें वेव्हारासि धरूनि नेलें : तें मुर्तिप्रकास ग्रंथ अवस्थाभुत गीत : आणि रत्नमाळा : हे तीन्ही टायें ते दीसीं केले :॥ एवं सपुर्ण ॥ छ॥ ( यातील 'वैसाख मासे गुरुवारे पुर्णीमिमि आ...' हा मधेच चुकीचा म्हणून सोडून दिलेला उल्लेख कशाचा असावा हे कळत नाही ).

यानंतर अवस्थाभूतगीत लिहिलेले असून त्याच्या शेवटी पुढील समाप्तिलेख आहे:—

" इति अवस्थाभुत गीत सपुर्न शुभं मंगळ मस्तु ॥ : एव गुरुवारीं अवस्थाभुतगीत मुर्त्तिप्रकास सपुर्न समाप्तः ॥ छ॥ छ॥ छ॥

यातील मूर्तिप्रकाशाच्या समाप्तिलेखात व पोथीलेखनाच्या समाप्ति-लेखात घोटाळा झाल्याचे दिसून येईल. तथापि 'विजये नाम संवत्सरे ॥छा॥' यातील 'छ' वर काकपद देऊन काही भाग सुटला आहे हे सूचित केलेले आहे. त्यासमोर वाचावयाचा हा सुटलेला भाग म्हणजे "फाल्गुन शुद्धि द(श)मी...' इत्यादि आहे हे स्पष्ट दिसते. मूर्ति–प्रकाशाचे लेखन बुधवारी व अवस्थाभूत गीताचे लेखन गुरुवारी समाप्त झाले हेहि त्यावरून दिसून येते.

यानंतर या पोथीत हरि ईश्वरदास या कवीचा चतुष्पदार्थवर्णन नावाचा ६४० ओव्यांचा काव्यग्रंथ साध्या बाळबोध लिपीत लिहिलेला आहे. या कवीचा किंवा त्याच्या या ग्रंथाचा उल्लेख के. भावे यांच्या महानुभाव कविकाव्यसूचीत नाही. तेव्हा हा नवीन कवीचा व काव्याचा आविष्कार म्हणावयाला हरकत नाही.

## घ प्रत

ही पोथी महंत श्रीगोविंदराज दयाळराज ऊर्फ भास्करबुवा महानुभाव (पुणेकर दादा) यांची असून रितपूर येथील महंत श्रीगोपीराजदादा महानुभाव यांच्याकडून ती मला मिळाली. ही पोथीमुद्धा सकळ लिपीत लिहिलेली आहे. प्रत्येक पानावर दोन्ही बाजूंनी उभ्या मर्यादारेषा लाल शाईने आखलेल्या असून साधारणपणे आरंभी आरंभी १३–१४ व नंतर १५–१६ ओळी लिहिलेल्या आहेत. हस्ताक्षर सुंदर व स्वच्छ आहे. पोथीच्या आरंभीच्या काही पानांची डावी बाजू कसरीच्या मध्यस्थानी पडलेली आहे. पण त्यामुळे मूळ काव्याला फारसा धक्का लागलेला नाही. पोथीला आरंभ "श्रीपरेशायनमा ॥०॥ जय जय केवळा शुद्धवेधा ..." असा केलेला असून मूर्तिप्रकाश काव्याच्या शेवटी पुढील समाप्तिलेख आहे.

"इती मुर्तीप्रकाश समाप्त : ॥ ० ॥ ० ॥ ० ॥ ० ॥ ० ॥ शके ॥ १२१० ॥ विजयनाम संवत्सर : फाल्गुन मास दसमी वार ब्रह्हस्पति : नक्षेत्र अनराधा : सोभाग नाम योग : बाळव नामकरण : तदीनी केशोबासाते वेव्हारासि धरुनि नेले : तै मूर्तिप्रकाश ग्रंथ आणि अवस्थाभूत गीत आणि रत्नमाळा हे तीन्ही ठाए ते देसी केले : ॥ ० ॥ ० ॥ ० ॥ ० ॥ ० ॥

यानंतर अवस्थाभूतगीत लिहिलेले असून त्याच्या शेवटी पोथीलेखनाचा निर्देश पुढीलप्रमाणे केलेला आहे.

॥ शके ॥ १५ ॥ ४७ ॥ क्रोधननाम संवत्सरे भाद्रपद मा(स) शुद्ध चौथि वार शुक्र तदीनी मूर्तिप्रकाश ग्रंथ अवस्थाभूत गीत ग्राम पींपळउर तत्र स्थळीं समाप्त ॥ शुभं भवतु ॥ हस्ताक्षेर रामदमुनि कोठी गोमेराज शूत तयाचे ॥ भग्निपुष्टि कटिग्रीवा तांब्रपुष्टीरधोमुखं कष्टेनि लीख्यते शास्त्रं यत्नेन प्रतिपाळिते ॥ ० ॥ ० ॥ ० ॥ ० ॥

यानंतर सकळ लिपीतच काही पदे व सुमारे १७६ अभंगात्मक चरणांची एक नाममाळा लिहिलेली आहे.

## पोथ्यांचे लेखन-काल

वरील सर्व पोथ्यात काव्याचा लेखनकाल व पोथ्यांचा लेखनकाल याचे निर्देश आलेले आहेत. या काव्याच्या लेखनकालाचा विचार यथावकाश नंतर करू. प्रथम पोथ्यांचे लेखनशक तपासून पाहू या.

### क प्रत

या पोथीचा लेखनकाल शके १५३५ काल्युक्त नाम संवत्सर, चैत्र वद्य ९, रविवार असा आहे. यात शक-संवत्सरांचा मेळ अगदी बसत नाही. दि. व. पिल्ले यांच्या जंत्रीप्रमाणे शके १५३५ ला प्रमादी संवत्सर ( औत्तरीय पद्धतीप्रमाणे 'दुंदुभि') येतो. कालयुक्त संवत्सर शके १५४० ला येतो. तेव्हा शकसंवत्सर एकमेकांना जुळत नाहीत यात शंका नाही. १५३५ च्या चैत्र वद्य ९ मीला रविवार नसून शनिवार आहे. ( १५४० च्या चैत्र वद्य ९ मीला गुरुवार येतो. ) हा एक दिवसाचा फरक दुर्लक्षिण्याजोगा आहे.

### ख प्रत

या पोथीचा लेखनकाल श. १५४६, रक्ताक्ष संवत्सर आश्विन वद्य ६, बुधवार असा असून तो जंत्रीप्रमाणे बरोबर आहे. श. १५४६ ला रक्ताक्ष संवत्सर असून आश्विन वद्य ६ ला बरोबर बुधवार येतो. तेव्हां हा कालनिर्देश बरोबर आहे.

### ग प्रत

या पोथीचा लेखनकाल श. १५८४ शुभकृत संवत्सर ज्येष्ठ वद्य १४ बुधवार असा असून तो स्थूलमानानें बरोबर आहे. फक्त ज्येष्ठ वद्य १४ ला जंत्रीप्रमाणे बुधवार नसून गुरुवार आहे, इतकेंच. हा फरकहि दुर्लक्षिण्या-जोगा आहे

### घ प्रत

या पोथीचा लेखनकाल श. १५४७ क्रोधन संवत्सर भाद्रपद शुद्ध ४, शुक्रवार हाहि जंत्रीप्रमाणे स्थूलमानानें बरोबर आहे. फक्त भाद्र. शु. ४ ला गुरुवार येतो, शुक्रवार नाही. हा फरकहि दुर्लक्षिण्याजोगा आहे.

तेव्हा क प्रतीतील शकसंवत्सराचा मेळ सोडला तर सामान्यतः या पोथ्यांचे लेखनकाल बरोबर आहेत असे मानायला हरकत नाही. यांपैकी क प्रतीचा लेखनकाल निर्दोष नसल्यामुळे आणि शिवाय तिच्या आरंभीच्या अध्यायाची पाने गेलेली असल्यामुळे संपादनासाठी मूळ आधारभूत प्रत म्हणून मला तिचा स्वीकार करता आला नाही. ग प्रत ही काळाच्या दृष्टीने इतर पोथ्यांहून सुमारे ४० वर्षांनी अलीकडची असल्यामुळे तीहि स्वीकारता आली नाही. ख आणि घ ह्या दोन्ही पोथ्या एका वर्षाच्या अंतराने लिहिलेल्या आहेत. आणि त्या दोन्ही कोणात्या तरी एकाच मूळ पोथीवरून नक्कलेल्या आहेत असे माझे मत झाल्यामुळे त्यांपैकी कोणतीहि पोथी मूळ म्हणून घ्यावयास हरकत नव्हती. ख प्रतीपेक्षा घ प्रत मला अधिक बरी वाटली म्हणून मी घ प्रत हीच प्रस्तुत काव्याच्या संपादनाला मूळ आधारभूत प्रत म्हणून निवडली आहे.

## पोथ्यांचा परस्पर-संबंध

या पोथ्यांचा परस्पर-संबंध लावणे मोठे उद्बोधक होईल. या चारहि पोथ्यांचे मुख्यतः दोन गट पडतात. पहिल्या गटात क आणि ग या प्रतींचा समावेश होतो, तर राहिलेल्या ख आणि घ प्रतींचा अंतर्भाव दुसऱ्या गटात होतो. या दोन्ही गटांतील प्रती आपल्याला कोणत्या तरी एकेका मूळ पोथी वरून नक्कलेल्या असाव्यात असे स्पष्ट दिसते. ख आणि घ प्रतींसंबधाने तर हे समाप्तिलेखावरून सुद्धा निश्चितपणे सिद्ध करता येते. ख प्रतीचा लेखक ( = नक्कलकार ) कोणी कोठी गोमराजसुत कमळाकर मुनि आहे; तर घ प्रतीचा लेखक रामदमुनि कोठी गोमराजसुत हा आहे. अर्थात् कोठी घराण्या तील कोणा एका गोमराज नावाच्या महानुभाव महंताचे हे दोघेहि शिष्य दिसतात. त्यांनी साधारणपणे एकाच सुमारास आपापल्या नकला तयार केलेल्या आहेत. कारण ख प्रत ही शके १५४६ मध्ये नक्कलेली आहे, तर घ प्रत ही १५४७ मध्ये नक्कलेली आहे. घ प्रत पेशावर येथे नक्कली गेली त्याप्रमाणे ख प्रत कोठे नक्कली गेली याचा निर्देश नाही. तथापि तीहि

| | | |
|---|---|---|
| श्रींगाराचा | श्रृंगाराचा | (ओ. २४५) |
| व्रीक्ष | वृक्ष | (ओ. २६०) |
| सीधांत | सीद्धांत | (ओ. ७७७) |
| त्रुपीत | तृप्त | (ओ. ७७२) |
| कींवीर | कींकर | (ओ. ७४९) |
| ग्रीती | क्षीती | (ओ. ६४८) |
| अद्रीष्ट | अदृष्ट | (ओ. ९४७) |
| सुहुर्द | सुहृद | (ओ. १३६८) |

या उदाहरणावरून कग प्रतीतील पाठ संस्कृतनिष्ठ तर खघ प्रतीतील पाठ मराठीला अधिक जवळचे आहेत हे दिसून येईल. पण याचा अर्थ खघ प्रतीत संस्कृतनिष्ठ पाठ अगदीच नाहीत असे नाही. उदा. भक्ती (ओ. ८४); वृक्ष (ओ. २१०); शुद्ध (ओ. ८३१) वगैरे; पण ते अपवाद समजले पाहिजेत. उलट कग प्रतीत मराठीला जवळ असलेले पाठ नाहीत असेहि नाही. तेव्हा या दोन गटातील पोथ्यात प्रामुख्याने आढळणारा जो एक महत्त्वाचा विशेष म्हणून नमूद केलेला आहे तो 'प्राधान्येन व्यपदेशाः भवन्ति' या न्यायाने, हे विसरू नये.

या दोन गटातील पाठभेदांचे स्वरूप लक्ष्यात येण्यासाठी आणखी काही वैशिष्ट्ये पुढे नमूद करीत आहे.

(१) शब्दारंभीची अ व आ ही अक्षरे.

| खघ | कग | |
|---|---|---|
| अवेवा | आवेवा | (ओ. ५१५) |
| अळीउळ | आळीउळ | (ओ. ५२४) |
| अखर्वारें | आखवारें | (ओ. ५३५) |
| अमरा | आमरा | (ओ. ४९६) |
| अरुढ | आरुढ | (ओ. ९०६) |

पेशावर येथेच नक्कली गेली असावी असे वाटते. आणि ह्या दोन्ही प्रती एकाच पोथीवरून नकलल्या गेल्या असाव्यात. असे म्हणण्याचे अंतर्गत कारण असे की या दोन्ही प्रतींच्या पाठात विलक्षण साम्य आहे. तसेच क व **ग** या प्रतींच्या पाठातहि साम्य आहे.

## पाठभेदांचे तुलनात्मक निरीक्षण

प्रत्येक गटातील दोन्ही पोथ्यातील पाठात जसे साम्य आहे तसे दोन्ही गटातील पाठामध्ये स्थूल मानाने काही वैषम्यहि आहे. वैषम्याचा पहिला आणि अत्यंत महत्त्वाचा मुद्दा असा की **खघ** प्रती जेथे विकसित तद्‌भव रूपे (ह्यानाच कोणी अपभ्रष्ट रूपे म्हणतात) देतात तेथे **कग** प्रतीत ती सामान्यतः तत्सम स्वरूपात लिहिलेली आढळतात. पुढील कोष्टकावरून ही गोष्ट स्पष्ट होईल.

| खघ | कग | |
|---|---|---|
| सब्द | शब्द | (ओ. १७८) |
| भगती | भक्ति | (ओ. १७७) |
| भगता | भक्ता | (ओ. २९९) |
| वगते | वक्ते | (ओ. ३७९) |
| सुध | शुद्ध | (ओ. ३८९) |
| सुधबुध | शुद्धबुद्ध | (ओ. १०३२) |
| व्यावर्त्तिक | व्यावृत्ति | (ओ. ४७) |
| वर्मसपरीस | वर्मस्पर्शू | (ओ. ४६) |
| परावर्ण | प्रावर्ण | (ओ. ७०) |
| बीरद | ब्रीद्रें | (ओ. ९९) |
| आसीनीय | आस्वीनीए | (ओ. १९९) |
| दुर्ती | द्र्ती | (ओ. २१०) |
| उतकंठा | उत्कंठा | (ओ. २०६) |

| | | |
|---|---|---|
| श्रीधाराचा | श्रृधाराचा | (ओ. २४५) |
| ग्रीक्ष | वृक्ष | (ओ. २६०) |
| सीधात | सीद्धात | (ओ. ७७७) |
| तुपीत | तृप्त | (ओ. ७७२) |
| कींकीर | कींकर | (ओ. ७४९) |
| ग्रीती | क्षीती | (ओ. ६४८) |
| अद्रीष्ट | अदृष्ट | (ओ. ९४७) |
| मुदुर्द | मुद्दद | (ओ. १३६८) |

या उदाहरणावरून कग प्रतीतील पाठ संस्कृतनिष्ठ तर खघ प्रतीतील पाठ मराठीला अधिक जवळचे आहेत हे दिसून येईल. पण याचा अर्थ खघ प्रतीत संस्कृतनिष्ठ पाठ अगदीच नाहीत असे नाही. उदा. भक्ती (ओ. ८४), वृत्र (ओ. २१०), शुद्ध (ओ. ८३१) वगैरे; पण ते अपवाद समजले पाहिजेत. उलट कग प्रतीत मराठीला जवळ असलेले पाठ नाहीत असेहि नाही. तेव्हा या दोन गटातील पोथ्यात प्रामुख्याने आढळणारा जो एक महत्त्वाचा विशेष म्हणून नमूद केलेला आहे तो 'प्राधान्येन व्यपदेशा भवन्ति' या न्यायाने, हे विसरू नये.

या दोन गटातील पाठभेदाचे स्वरूप लक्ष्यात येण्यासाठी आणखी काही वैशिष्ट्ये पुढे नमूद करीत आहे.

(१) शब्दारंभीची अ व आ ही अक्षरे.

| खघ | कग | |
|---|---|---|
| अवेवा | आवेवा | (ओ. ५१५) |
| अळीउळ | आळीउळ | (ओ. ५२४) |
| अरुवारें | आरुवारें | (ओ. ५३५) |
| अमरा | आमरी | (ओ. ४९६) |
| अरुढ | आरुढ | (ओ. ९०६) |

( २ ) काही धातुरूपे : उदा०—

| | | |
|---|---|---|
| उपनली | उपनली | (ओ. ४७९) |
| पाळताति | पळताति | (ओ. ५७०) |
| वाहाती | वाताति | (ओ. ५७६) |
| लाघला | लागला | (ओ. ५९८) |
| आळवती | आळगीती | (ओ. ९११) |
| मुंचीजे | मुचीजे | (ओ. ५७८) |
| फडटैले | फटतैले | (ओ. ६९१) |

( ३ ) सर्वस्वी भिन्न पाठ : उदा:—

| | | |
|---|---|---|
| आंकुर | आकार | (ओ. ६२४) |
| आगनणा | आंगना | (ओ. ६७३) |
| भक्तिचकोर | शक्तिचक्र | (ओ. ७१०) |
| जगदेश्वरीं | परमेश्वरीं | (ओ. ४५७) |
| असड | (हा शब्द नाही) | (ओ. २१२०) |
| विधि | ,, | (ओ. २१३७) |
| फुले | ,, | (ओ. १३९०) |
| एकी | ,, | (ओ. १५१०) |
| लोवस | ,, | (ओ. ६५१) |

मला असे वाटते की दिली इतकी उदाहरणे पुरी आहेत. यावरून प्रत्येक गटातील पोथ्यामधले साम्य आणि भिन्न गटातील पोथ्यातील वैषम्य सहज लक्ष्यात येईल. ख व घ याच्या समाप्तिलेखातील निर्देशावरून ह्या दोन्ही पोथ्या एकाच पोथीवरून नकललेल्या असाव्या असे जसे म्हणता येते तसा पुरावा क व ग प्रतींच्या समाप्तिलेखात नाही. तथापि या दोन्ही पोथ्यातील पाठात अनेक ठिकाणी असलेल्या साम्यावरून ह्याहि दोन्ही पोथ्या एकाच किंवा एकाच वंशातील भिन्न पोथ्यावरून नकलेल्या असल्या पाहिजेत हे स्पष्ट होते. वरील विवेचन लक्ष्यात घेता संपादनासाठी घेतलेल्या निरनिराळ्या पोथ्यांचा वंशवृक्ष काढावयाचा झाल्यास तो पुढीलप्रमाणे काढता येईल.




यावरून प्रस्तुत काव्याच्या मूळ प्रतीवरून, कल्पित अ, आ व **पेशावर प्रत** ह्या नक्कलेल्या असतील असे समजण्याचे कारण नाही. मूळ प्रत व ह्या प्रती ह्यांच्यामध्ये नकलांच्या अनेक पिढ्या झालेल्या असल्या पाहिजेत यात शंका नाही. पण त्या किती व कोणकोणत्या हे ठरविण्याला आपल्याजवळ पुरेशी साधनसामुग्री नाही, त्याला इलाज नाही.

## संहिता-संपादनाचे धोरण

वरील चार पोथ्यांच्या आधारे प्रस्तुत काव्याची संहिता या ठिकाणी संपादून तयार केलेली आहे. तिला मुख्य आधार घ प्रतीचा घेतलेला आहे, याचा निर्देश वर केलेलाच आहे. **कग** गटातील पोथ्यांचे पाठ संस्कृतनिष्ठ असताहि त्यातील एखाद्या पोथीची मूळ आधारासाठी निवड न करता **खघ** गटातील **घ** प्रत निवडली याचे कारण उघड आहे. यादवकालीन मराठीचे वळण लक्षात घेता त्यावेळी संस्कृतनिष्ठ पाठ प्रचारात असण्याऐवजी तद्भव पाठ प्रचारात असणे अधिक संभवते. हे पाठ, संस्कृतसापेक्ष दृष्टीने विचार केल्यास अशुद्ध वाटतील. पण तसे ते नाहीत. कारण त्यावेळी असे पाठ प्रचलित होते हे उपलब्ध ग्रंथांच्या आधारे सहज दिसून येईल. उदा. पहिला 'सबद' हाच शब्द घ्या. 'शब्द' या तत्सम शब्दाचे हे विकसित (किंवा अपभ्रष्ट) रूप असून ते यादवकालीन अनेक पोथ्यांतून आढळते. उदा.—'असो हे **शबद**-रचना' (वछा. १६७); 'तेया **सबदा** सवे उठीली' (उदाहरण पा. ११–३३), 'सक्तीवाक्य ल्हीकें नव्हे। या **सबदां** करी पां जतन' (उदाहरण पा. १४–४५) वगैरे. दुसरे उदाहरण भगती, भगत या शब्दांचे.

संस्कृत भक्ति, भक्त या शब्दांची ही रूपेहि यादवकाळात सर्रास चालू होती. उदा.—'आणि माझां ठाइं **भगति** । फलालागि जेया आथि' (ज्ञा. १३–८०६); 'जेया भजता भजन भजावें। हे **भगति** साधन आघवें' (ज्ञा. ६–४८१); 'परि **भगति** एकि सुल्लभ मुरारी' (वछा. ३०२); 'तू नेदितासि कैवल्यपती । आपुली नित्य **भगति**' (वछा. ३९९); 'ह्मणौनि आपुलल्रेया हिताचेनि लोभें। मज आवडे तोही **भगतु** शोभे' (ज्ञा. ७–११६); '**भगत** उधरावेया अपार' (वछा ४); '**भगतु** देखौनि गोविंदा' (उषाहरण. पा. ५५–८३) वगैरे. अशी इतर शब्दांचीहि उदाहरणे देता येतील. ही रूपे मराठी वळणाला अधिक जवळची आहेत आणि म्हणूनच ती ज्यात आढळतात असा **ख** गटातील पोथी संहितेला आधारभूत म्हणून निवडली आहे.

## घ प्रतीतील अनुस्वारप्रचुरत्व

संहितेसाठी मूळ म्हणून निवडलेल्या **घ** प्रतीचा एक विशेष या ठिकाणी नमूद करण्याजोगा आहे. तो असा की या पोथीत अनुस्वाराची रेलचेल आहे. **ख** आणि **घ** ह्या पोथ्या एकाच प्रतीवरून नकललेल्या असतील तर मग **घ** प्रतीत **ख** प्रतीपेक्षा (व इतर प्रतींपेक्षा) अधिक अनुस्वार का असावे हा विचार करण्यासारखा प्रश्न आहे. मला असे वाटते की लेखकाच्या उच्चारपद्धतीचा हा परिणाम असावा. उदा : नाहीं; जगंन्नाथ; परमपुरुंष, परमेंश्वरु इत्यादि रूपें या पोथीत अनेक ठिकाणी आहेत. यात अनुनासिक व त्यापूर्वीचेहि अक्षर सानुस्वार उच्चारण्याची लेखकाची लकब दिसते. जुन्या काही पोथ्यात अशी रूपे आढळतातहि, नाही असे नाही. उदा : शके १४५७ च्या 'वछाहरणा'च्या हस्तलिखितातील पुढील रूपे पहा. आत्मारांम (१); रत्नां (७); नाहिं (१२); अमृंत (२३); आत्मांराम (३६); नांमें (४१); सांगितलें (७१) वगैरे. अशी काही रूपे 'उषाहरण' काव्यातहि आढळतात. उदा : कुमरींसी (१४–४०); कानाडी (३७–१४०४); कार्पीनली (४१–१६०४) वगैरे; तथापि तेथे त्याचे प्रमाण **घ** पोथीतील रूपाइतके नाही. या पोथीचा हा विशेष या ठिकाणी निर्दिष्ट करण्याचे एक कारण असे की असे अनुस्वार संहितेत मी सर्वत्र ठेवलेले

नाहीत. त्याची उदाहरणे लक्ष्यात यावी या हेतूने काही ठिकाणी ते जसेचे तसे ठेवले आहेत. अन्यत्र ते काढून टाकलेले आहेत. याचे कारण हे की याच पोथीत तशी सानुस्वार रूपे अगदी सर्वत्र आहेत असे नाही. 'नाहीं' मधील 'ना' वर सरास अनुस्वार नाही तो काही ठिकाणी आहे, काही ठिकाणी नाही. तीच गोष्ट इतर शब्दासंबंधीहि सांगता येईल. मूळ पोथीचे स्वरूप असे समिश्र असल्यामुळे भाषावैशिष्ट्य या दृष्टीने आवश्यक अशा ठिकाणी अनुस्वार ठेवून इतरत्र ते नष्ट केले आहेत.

## सांकेतिक लिपीतील पोथ्या

ही एक गोष्ट सोडून दिली तर एरवी मूळ संहिता सर्व ठिकाणी जशीची तशी कायम ठेवलेली आहे काही ठिकाणी सर्व दृष्टींनी योग्य असा पाठ मला इतर तीन पोथ्यामध्ये आढळला, तेथे घ प्रतीतील पाठ तळटीपेत देऊन तिन्ही पोथ्यातील तो योग्य पाठ स्वीकारलेला आहे क्वचित लेखनाच्या उघड उघड चुका होत्या, उदा एखाद्या शब्दातील एखादे अक्षरच लिहावयाचे राहून गेले—त्या दुरुस्त करून घेतल्या आहेत.

संपादनासाठी घेतलेल्या चारहि पोथ्या महानुभावांच्या सांकेतिक लिपीमध्ये लिहिलेल्या आहेत याचा निर्देश त्या पोथ्यांचा परिचय करून देताना केलेला आहेच. या सांकेतिक लिपीचे नाव 'सकळ' लिपी. 'सह्याद्रि माहात्म्य'कार रवळोव्यास ह्यानं ती तयार केलेली असून महानुभावात तीच लिपी फार मोठ्या प्रमाणात प्रचलित होती. हा उल्लेख मुद्दाम करण्याचे कारण असे की 'सकळ' व्यतिरिक्त इतर अनेक लिप्या महानुभावानी तयार केल्या. त्यात सुंदरी, कवीश्वरी, अंक, सुभद्रा, मनोहरा वगैरेंचा समावेश होतो. सुंदरी लिपी ही बाइदेशकरानी व अंकलिपी तळेगावकरानी वापरलेली आहे. त्याचे थोडेफार वाङ्मय या लिप्यांतून तयार झालेले आहे. पण एरवी रवळोव्यासाच्या 'सकळ' लिपीचाच प्रचार जास्त हल्ली उपलब्ध झालेल्या बहुतेक पोथ्या या लिपीमधेच लिहिलेल्या आढळतात. या लिपीची संपूर्ण किल्ली म्हणजे सांकेतिक अक्षरे व त्या ठिकाणी वाचावयाची बाळबोध अक्षरे पुढे देत आहे—

# सकळ लिपीचा संकेत

## स्वर

स सा प ह ए ऐ सो सौ सं सः
अ आ इ उ ए ऐ ओ औ अं अः

## व्यंजनें

प र ळ व   प फ व भ
क ख ग घ   च छ ज झ

त थ द ध न ट ठ ड ढ ण
ट ठ ड ढ ण त थ द ध न

च छ ज झ ञ क ञ ग घ श
प फ ब भ म य र ल व श

ध म ह ळ ड ज्ञ
ष स ह ळ क्ष ज्ञ

## बाराखडी

प पा पि पी पु पू पे पै पो पौ पं पः
क का कि की कु कू के कै को कौ कं कः

## अंक

१ २ ३ ४ ५ ६ ७ ८ ९ १०

# शब्दांची सांकेतिक चिन्हे

| चिन्ह | अर्थ | चिन्ह | अर्थ | चिन्ह | अर्थ |
|---|---|---|---|---|---|
| :G: | श्रीगोविंदप्रभु | :9: | असे | :2: | मग |
| :3: | सर्वज्ञें भणितलें | :७: | पदार्थु | :θ: | हो |
| ० | प | :o: | लक्षण | :oı: | आसन |
| :ण: | ठाइं | ....... | अक्षर सोडण्याचे चिन्ह | :॥: | भ |
| :श्री: | श्रीचरण | :श्रील: | श्रीचांगदेव राउळ | :अ: | अवतार |
| :ह: | चक्रधर, सर्वज्ञ | :3: | अपरोक्ष | :ऐ: | ऐसें |
| :के: | बीजें केलें | :ति: | भवित | :ऋ: | आरोगण |
| :ग्य. | विकल्प | :व्ये: | वैराग्य | :ध: | जीव |
| :धे: | जीवें | :धी: | जीवास | :धों: | जीवातें |
| :धि: | वरि | :चि: | परि | :ध्द: | फळ |
| :अ: | मग | :आ: | माया | :ट: | तवं |
| :ट: | तरि | :टा. | देवता | :ठ: | नाहीं |
| :ठ: | पदार्थ | :कृण: | कृष्ण | :ठे: | संबंध |
| :ए: | एकों | :र्ती: | श्रीकृष्ण चक्रवती | :थ्ये: | सामर्थ्य |

# शब्दांची सांकेतिक चिन्हे

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| :द्या: | विद्या | :ध:ध: | वाई वाई | :ध्ये | साध्ये |
| :न: | आन | :नं: | काई, किंवा नतर | :ना: | भक्तिजना |
| :नु: | चरणु | :न्य: | चैतन्य | :न्नि: | संनिधान |
| :न: | ईश्वर | :प्र: | प्रपंच | :प्ति: | प्राप्ति |
| :बं: | जयं | :बि: | जरि | :बों: | जो जो |
| :ष्णी: | कव्हणी | :ब्र: | ब्रह्म, ब्राह्मण | :ब्रा: | ब्रह्मविद्या |
| :भिं: | भणिजेति | :भे: | भणिजे | :भे: | भणितले |
| :भि: | भणति | :भो: | भणौनि | :मे: | माणसे |
| :र्थु: | करौनि | :र: | ईश्वर | :फ: | परमेश्वर |
| :ल: | सकळ | :ळै: | सकळै | :वृ: | प्रवृत्ति |
| :शे: | विशेष | :र्शि: | दर्शन | :ष: | पुरुष |
| :र्ध: | काई | :ष्ट: | दृष्टांत | :स्व. | स्वरूप |
| :स्टि: | सृष्टि | :स्द्या: | अविद्या | :हष्ट: | उपविष्ट |
| :ज्ञा: | ज्ञान | :सौ: | भणौनि | | |

## ण : न : भणितलें : म्हणितलें

वरील किल्लीप्रमाणे लिप्यंतर करताना एक अडचण येते, ती **ण** आणि **न** या अक्षरासंबंधी. स्थूल मानाने **ण** साठी **न** हा संकेत आहे. तथापि पोथी लेखक तो नेहमीच पाळतात असे नाही. क्वचित ते **ण** साठी आणि **न** साठी **न** हेच अक्षर ठेवीत असतात. म्हणजे काही ठिकाणी 'सकळ' लिपीचा या अक्षरासंबंधीचा संकेत ते पाळतात तर काही ठिकाणी पाळत नाहीत, असे दिसते. उदा : संकेताप्रमाणे पोथीचे वाचन केले तर १५ व्या ओवीतील दुसरी व तिसरी ओळ पुढीलप्रमाणे वाचावी लागेल : "जय नी प्रपंचा नीराकारा · जय णीर्वीकल्पा नीराधारा" वगैरे. आता यातील चारहि मुख्य शब्दात आलेला 'नी' हा उपसर्ग सर्वत्र सारखाच असला पाहिजे असेच कोणीहि म्हणेल. पण संकेतानुसार वाचन केले तर एका ठिकाणी 'णीर्वीकल्पा' असा शब्द वाचावा लागतो. याचेहि 'नीर्वीकल्पा' असेच रूप असले पाहिजे हे स्पष्ट दिसते. अर्थात् मुळात 'णी' चा जो 'नी' संकेत आहे तो संकेत म्हणून न वाचता जसाचा तसा वाचला पाहिजे. हा ण व **न** चा घोटाळा पुष्कळ ठिकाणी आढळतो. त्यामुळे त्याचे वाचन करताना त्या शब्दाचे यादवकालातील रूढ रूप लक्षात घेतले आहे आणि त्याप्रमाणे ते या ठिकाणी लिहिले आहे, हा खुलासा करणे अवश्य आहे. कोणत्याहि सांकेतिक (सकळा) लिपीतील पोथीचे संपादन करीत असताना असेच करावे लागते. तसेच 'म्हणीतलें' या शब्दाचा जो संकेत आहे त्याचे वाचन 'म्हणीतलें' असे करावे की 'भणीतले' असे करावे हाहि एक नेहमी उद्‌भवणारा प्रश्न आहे. पण त्याचे विस्तरश: विवेचन मी अन्यत्र केलेले असल्यामुळे येथे पुन्हा करीत नाही. प्रस्तुत संहितेत 'भणी (णि) तलें' असे रूप सर्वत्र वापरले आहे एवढेच येथे नमूद करतो.

## पाठभेद कोणते नमूद केले आहेत ?

निरनिराळ्या पोथ्यातील पाठभेद नमूद करताना 'पाठभेद' कशाला म्हणावे हा प्रश्न समोर येतो. अ आ चा किंवा ऱ्हस्वदीर्घांचा समावेश पाठभेदात करता येईल काय ? विशेषतः प्राचीन लिपिकाचा या बाबतीतील

हलगर्जीपणा लक्षात घेतला तर या गोष्टींना फारसे महत्त्व देण्याचे कारण राहत नाही. देखिल्या, देखिलेया आणि देखिलिया ही रूपे, तसेच मागुती–मागौती देखुनि–देखौनि ही रूपे पाठभेद म्हणून द्यावी की नाही ? कारण जुन्या भाषेत दोन्ही प्रकारची रूपे विपुल प्रमाणात आढळतात. मी या बाबतीत असे धोरण स्वीकारलेले आहे की आरंभीच्या १ हजार ओव्यापर्यंत अशा प्रकारची रूपेहि भिन्न मानून ती नमूद केली आहेत. हेतु हा की त्यावरून त्या त्या पोथीमध्ये कोणत्या प्रकारची रूपे विशेष येतात हे कोणाला अभ्यासावयाचे असले तर अभ्यासता यावे. येक, एक व यक हीहि रूपे आरंभी नमूद केली आहेत. उच्चारप्रवृत्ति लक्ष्यात घेण्याच्या दृष्टीने मला तसे करणे उपयुक्त वाटले तथापि पहिल्या हजाराची मर्यादा ओलांडल्यावर अशी रूपे पाठभेद समजून मी ती दिलेली नाहीत फक्त ओवीचा अर्थ तात्काळ लक्ष्यात येण्यासाठी ही भिन्न रूपे नमूद करणे मला जेथे आवश्यक वाटले तेथेच ती नमूद केलेली आहेत.

## काव्याचा लेखक कोण ?

प्रस्तुत काव्याचा लेखक कोण, हा एक महत्त्वाचा प्रश्न उपस्थित झालेला आहे. कै. नि. ल. भावे यांनी मूर्ति प्रकाश काव्य 'केशवराजसूरी 'ने लिहिल्याचा उल्लेख केलेला आहे. ( महा. सार., पृ. ११८–११९, ७७२ ) तथापि पृ. ७७२ वरील तळटीपेत त्यांनीच " कोणी कोणी हा ग्रंथ केशवाचार्यांचा आहे असे समजतात. 'केशवराज' व 'केशवाचार्य' हे भिन्न पुरुष होते " असा निर्देश करून ठेवलेला आहे. श्री. य. खु. देशपांडे यांनी आपल्या ' महानुभावीय मराठी वाङ्मय ' या ग्रंथात मूर्ति प्रकाशाचे कर्तृत्व 'केशव व्यास ' ( सिद्धांत सूत्रपाठकार ) यांच्याकडेच दिले आहे. (पृ. २७) कै. ह. भ. प. ल. रा. पांगारकर यांनीहि कै. भावे यांच्याप्रमाणे या काव्याचे कर्तृत्व केशवराज सूरीकडे दिलेले आहे. ( म. वा. इ. खंड. १. पृ ४६६ ) श्री. य. खु देशपांडे आणि पांगारकर यांनी केशवाचार्यांचा मात्र उल्लेख केलेला आढळत नाही. तो फक्त भावे यांनीच केलेला आहे. त्यावरून प्रश्न उपस्थित होतो की हे दोन कवि कोणते आणि त्यांपैकी हा ग्रंथ खरोखर कोणी लिहिलेला आहे ?

## काव्यांतर्गत पुरावा

प्रथम प्रस्तुत काव्यात कवीने स्वतःचा नामनिर्देश कसा केलेला आहे ते पाहू. कविनामनिर्देशाच्या ओव्या पुढीलप्रमाणे आहेत.

(१) जे सवीय सन्नीज सकारण : नागार्जुनें केलें नीरूपण
तयाचेनि प्रसादे वानु वस्तु सगुण : म्हणे **मुनि केसिराजु** ॥८२॥

(२) ते साधैन बोलीं प्राकृती . म्हणे **मुनि केशिराजु** (७०२)

(३) तो आनदु सानतु असे मूर्तंगानी : म्हणे **मुनि केशिराजु** (७२१)

(४) प्रेम होए ज्ञानीया डोळसा : म्हणे **मुनि केशिराजु** (१७१३)

(५) ओळविन कथाप्रसगी : म्हणे **मुनि केशिराजू** (१८२७)

(६) तया सायोज्यता होय परब्रह्मेसीं . म्हणे **मुनि केशिराजु** (१९४८)

(७) तो सुभ मगळाकारु सबीजु : नागाबीकेंचा आत्मा नीजू
मीया वर्णिला म्हणे **मुनी केशिराजू** : प्रभू स्वामि माझा (२०५१)

वरील सर्व उताऱ्यात 'मुनि केशिराज' असा उल्लेख आलेला आहे. तथापि पुढील ओवीत केवळ 'केशउ' असे नाव आलेले आहे

**केशउ** म्हणे तया सुखा : अनवादु नाहीं (५८४).

याबरोबर विचाराला पोषक होतील असे दोन उल्लेख वाचकासमोर मांडतो—

(१) तैसे सपोल भाव दावीन ओष्ठपुटी . म्हणे **कवी रसाळु** (७४८)

(२) *आठे सात्विक प्रसरती : ते सांगे* **कवी रसाळा** (१९७०)

तेव्हा 'मुनि केशिराज', 'केशउ' आणि 'रसाळु' अशी ही तीन नावे मूळ ग्रंथातच आलेली असल्याचे दिसून येईल. यापैकी 'केशिराज' आणि 'केशउ' ही एकाच व्यक्तीची नावे आहेत असे मानायला काहीहि हरकत नाही कारण दोन्ही नावातील मुख्य नाव 'केशव' हेच आहे. तथापि या कवीने आपलाच उल्लेख 'कवी रसाळ' असा का केला असावा? हा प्रश्न

आहे. याचे एक उत्तर असे देता येईल की कवीने आपणाला स्वतःला हे 'विशेषण' लावून घेतलेले असावे. आणि असे असणे अगदीच अशक्य नाही. शिवाय ग्रंथकार म्हणून आरंभापासून तो अखेरपर्यंत 'मुनिराजा'चे इतके उल्लेख आलेले आहेत की त्याविषयी शंका घेण्याचे कारण नाही. तेव्हा ग्रंथांतर्गत पुराव्याच्या आधाराने पाहिले असता मूर्तिप्रकाशाचा लेखक 'मुनि केशिराज' होय असे स्पष्टपणे दिसून येते

## केशवराजसूरी आणि केशवाचार्य

कै. भावे यांनी उल्लेखिलेले 'केशवराजसूरी' आणि 'केशवाचार्य' यापैकी 'मुनि केशिराज' कोण, हा प्रश्न उपस्थित होणे स्वाभाविक आहे. त्याचा विचार केल्यावाचून प्रस्तुत काव्याचे कर्तृत्व कोणाचे आहे याचा निर्णय करता येणार नाही. केवळ नामसादृश्यावरून पाहिले तर केशवराजसूरी हाच केशिराज होय असे दिसते. कारण दोन्हीकडे 'राज' या शब्दाचा उपयोग केलेला आहे. आता, ५८४ व्या ओवीत ज्या 'केशउ'चा उल्लेख आहे तो या दुसऱ्या केशवाचार्यांचा कशावरून नसेल अशी शंका कोणी काढली तर ती अगदीच चुकीची आहे असे म्हणता येणार नाही. तथापि एकाच काव्यात आलेले 'केशिराज' आणि 'केशउ' हे उल्लेख एकाच कवीचे असले पाहिजेत हे आपण मागेच निश्चित केले आहे. तशात 'केशउ'चा उल्लेख एकाच ओवीत काय तो आढळतो तसे अनेक उल्लेख असते तर तो स्वतंत्र रीतीने विचार करण्यायोग्य असा प्रश्न झाला असता सध्याच्या स्थितीत मात्र तो तसा नाही. तेव्हा केशिराज आणि केशउ म्हणजेच केशवराजसूरी असे ठरवावयाला हरकत नाही. पण मग 'मूर्तिप्रकाशा'चा कर्ता म्हणून भावे यांनी निर्देशिलेल्या 'केशवाचार्यां'चे काय? केशिराज अथवा केशिराज सूरी म्हणजे चक्रधरनिरूपित सूत्रपाठ, दृष्टान्तपाठ इत्यादि ग्रंथांचा संकलनकार कवीश्वर हा होय. आणि केशवाचार्य म्हणजे भास्करभट्ट बोरीकर यांचा पूर्वाश्रमीचा गुरु होय तेव्हा या दोघांपैकी मूर्तिप्रकाशाचा कर्ता कोण? किंबहुना केशिराज अथवा केशवराज सूरींचा हा ग्रंथ होय असे दिसत असताना तो केशवाचार्यांने लिहिलेला आहे असा प्रश्न निर्माण होण्याचे

कारण तरी काय ? या प्रश्नाचा प्रथम विचार केला पाहिजे. म्हणजे पुढील निर्णयाचा मार्ग सोपा होईल.

## स्मृति वृद्धाचार . वृद्धान्वय .

मूर्तिप्रकाश ग्रंथ केशिराजाचा अथवा केसोबासाचा नसून तो केशवाचार्यांचा आहे अशी समजूत व्हावयाला तशीच सबळ कारणे आहेत यात शंका नाही. महानुभावीय ग्रंथकारांची माहिती नमूद करून ठेवणारे स्मृतिस्थळ, वृद्धाचार व वृद्धान्वय असे तीन फार महत्त्वाचे ग्रंथ आज उपलब्ध आहेत. चक्रधरांच्या प्रयाणानंतर नागदेवाचार्य हे गोविंदप्रभूंजवळ होते. त्यानंतर म्हणजे गोविंदप्रभूंच्या मृत्यूनंतर ते निंबा येथे येऊन राहिले. या काळापासून तो त्यांच्या मृत्यूपर्यंत त्यांच्या सान्निध्यात आलेल्या व्यक्तींची व त्यांच्या कर्तृत्वाची नोंद आपणाला 'स्मृतिस्थळा'त सापडते. नागदेवाच्या मृत्यूपासून तो परशरामबासांच्या मृत्यूपर्यंत होऊन गेलेल्या ठळक व्यक्तींची व प्रसंगाची नोंद वृद्धाचारात सापडते आणि सामान्यतः सर्वच प्रमुख महानुभावांनी लिहिलेल्या ग्रंथांची नोंद वृद्धान्वयामध्ये आढळते. निरनिराळ्या आम्नायांचे निरनिराळे वृद्धाचार व वृद्धान्वय असतात हे खरे असले तरी वरील काळ मर्यादा व उल्लेख यांत फारसा फरक पडत नाही.

सूत्रपाठ-संकलक केसोबास (=केशिराज) यांच्या विषयी अनेक आख्यायिका या तिन्ही ग्रंथांत आहेत. त्यांनी लिहिलेल्या किंवा संपादिलेल्या ग्रंथांचीहि नोंद त्यात आहे. तथापि त्यात त्यांनी 'मूर्तिप्रकाश' काव्य लिहिल्याचा कोठेहि उल्लेख नाही, ही आश्चर्याची गोष्ट आहे. वस्तुत सूत्रपाठ काय किंवा दृष्टांतपाठ काय हे संकलित ग्रंथ आहेत, तर 'मूर्तिप्रकाशा'ची रचना स्वतंत्र रीतीने केलेली आहे. त्याचे कर्तृत्व खुद्द केशिराजाचे स्वतःचे आहे, आणि म्हणून त्या ग्रंथाच्या रचनेचे महत्त्व व मोल अधिक आहे. असे असताना या ग्रंथाचा, केसोबासांच्या कर्तृत्वात नुसता नामनिर्देशहि असू नये ही आश्चर्याची गोष्ट नाही काय ? त्यावरून एकच अनुमान निघू शकते की हा ग्रंथ केसोबासाचा (=केशिराजाचा) नाही. तो दुसऱ्या कोणी तरी लिहिला असला पाहिजे. ( यासंबंधी आणखी एक महत्त्वाची गोष्ट या ठिकाणी

नमूद करणे अवश्य आहे. ती अशी की १९२४ मध्ये कै. वि. ल. भावे यानी ( श्रीदत्तराज कवीश्वर महानुभाव याच्या मदतीने ) जी महानुभाव कविकाव्यसूचि प्रसिद्ध केली त्यात मात्र केशीराजाच्या नावावर (पा. ४) या ग्रंथाची नोंद आहे.)

## वृद्धान्वयातील आख्यायिका

वरील तीन ग्रंथात केसोबासाच्या नावावर मूर्तिप्रकाशाची नोंद नाही, इतकेच नाही तर तो या ग्रंथाचा कर्ता नसून भास्करभट्टाचा पूर्वाश्रमीचा गुरु केशवाचार्य याने तो ग्रंथ लिहिला आहे असा स्पष्ट उल्लेख आहे. ही आख्यायिका पुढीलप्रमाणे—

"आता जुनेचि अप्रमाण पथ जाले : तेचि कवण : कवीश्वरबासाचे व्येव्हाराचे गुरु केशवाचार्ये : ते नदीसी स्नान करीत होते : तवं कवीश्वरबासीं मेघकरापासी बोरीचे त्यागिए अनुसरले : अटण करीता नदीसी उदकासी गेले : उदकपान करिलं : मग केशवाचार्यी म्हणितलें : बोरीकर भानु मज नमस्कारु न करीसी तरी काइ तुज लिंग निगालें : मग कवीश्वरीं म्हणीतलें व्हो नितिय लिंग निगालें की नाहीं ते आनुभवें जाणावें : मग दोघा चर्चा प्रवर्तली : कवीश्वरीं निरुत्तर केलें : मग केशवाचार्यी म्हणितलें : भानु तरी मज काही आपूर्व सार पा : कवीश्वरीं म्हणितलें : आमुचिया गुरुपासी चाला पा : भटाजवळि आणीलें : भटाते कवीश्वरीं विनवीलें : भटीं म्हणीतलें : कवीश्वरा श्रीचक्रधरारायाचें दारवठे नुघडतिचि गा : कवीश्वरीं निगुढीं ममतेतव भटातें विनवीलें जें भगो मजलागि इतुकें करावेंचि : मग भटीं कवीश्वराचीया भीडाचि काही एक बोलिलें : आनुसरलें : परि मग जें निरुपण ते आपुलिया वेदातासी मेळवीति : म्हणति भटान आमचा वेदीं वेदातिकीहि ऐसेचि असे : संकराचार्याचा पचकरण महावाक्यींहि ऐसेचि बोलिलें असे : भटीं म्हणितलें : जळो जळो तुझें ज्ञान सर्वज्ञ तव मजप्रति ऐसे बोलिले असे म्हणौनि सिष्यानिति : भटीं बाहीरि घातलें : मग तिहीं सिस्य केलीं : **मुर्ती प्रकाश ग्रंथ केला** : आन व्यापरना ईश्वर मावरूपा ज्ञा शक्ति : अपर १ : अवर २ : पर ३ : परावर : ४ : ऐसे च्यारि भेद केले : ऐसा एकउप

प्रमए केले : मग तचि दुसरेनि शोधिल . ऐसे दोन्ही प्रमयाचे बध तयाचे वडील शिष्ये कान्होबा : ते केशवाचार्य म्हणवीति ' त्यापाशी होते : मग केसवाचार्या अविद्यमान मागे सिक्यापिले : मग मार्गासी मिळुन होते : परि ते आपुलिया गुरूच म्हणितले टाकिलें नाही . . " ( सिद्धाते हरिबास आणि धाकुटे सोंगोरास याचे अन्वयस्थळ )

## हरिवास – सोंगोवास आणि दुतोंडे दत्तोवास यांचें वृद्धान्वय

तेव्हा हरिबास आणि सोंगोबास याच्या मते मूर्तिप्रकाश ग्रथ भास्कर भट्टाचे पूर्वाश्रमीचे गुरु केशवाचार्य यानी लिहिला असे दिसून येते. वृद्धान्वयात दिलेल्या या माहितीचा पूर्वार्ध स्मृतिस्थळात आहे. (पहा. ११६–११८). तथापि पूजा-विशेष घेऊन केशवाचार्याला बाहेर घालवून दिल्यानतर त्याने काय केले हे मात्र तेथे सांगितलेले नाही. ते वृद्धान्वयाच्या या आख्यायिकेत असून त्यातच मूर्तिप्रकाशाच्या लेखनाचा महत्त्वाचा निर्देश आहे. यावरून मूर्तिप्रकाश काव्याचा लेखक केशवाचार्य असावा असे म्हणण्याला जागा होते यात शका नाही.

तथापि याला विरुद्ध जाणारा दुसरा एक निर्देश मला आढळला. दुतोंडे दत्तोबास अथवा दत्तोमुनीबास यानी एक वृद्धान्वय लिहिलेला आहे. त्यात मला पुढील निर्देश सापडला—

"उभया सरळि प्रसगा प्रसग केशवबासी मूर्तिप्रकाश ग्रथ करणे । एकवेळ बाइदेवबासीं म्हणितलें "केशवदेया सस्कृती सरळी आन पडितासि मऱ्हाटिये बोधीग्रथी आन गीति सरळी : हे आइकिलिया नतरें केशोबासीं मूर्तिप्रकाश एणें नामें ग्रथ केला आन एक गीत केला : तयाचें नाव नेणिजे : मग केशोबासीं मूर्तिप्रकाश ग्रथ बाइदेवबासापासी वाचिले : बाइदेवबासीं म्हणितल : भलें केले केशवदया : हा ग्रथ स्मरणशीळा योग्य जाला : इतुकेनि मार्गी प्रवर्तला"

त्याच वृद्धान्वयात पुढे हाच उल्लेख पुढीलप्रमाणे आहे—

"भट्टामागा बाइदेवबासीं म्हणितलें : जे केशवदेयासि सस्कृत सरळी परि माहाराठी नाही . तेणे निमित्यें मूर्तिप्रकाश ग्रथ बोलिला आन एक गीत केलें : त्याचें नाव नेणिजे"

या परस्परविरुद्ध असणाऱ्या आख्यायिकांपैकी कोणती विश्वसनीय मानावी, याचा निर्णय करणे कठीण आहे. यावरून एवढेच म्हणता येईल की 'मूर्तिप्रकाश' हा केशवाचार्यांनी लिहिला असे जसे हरिदास आणि सांगोनाथ याना वाटते तसे तो केसोबासनेच लिहिला असे टुताडे दत्तोबासाना वाटते. तेव्हा तो खरोखर कोणाचा असावा याविषयी इतर साधनांच्या साह्याने विचार करणे आवश्यक आहे.

## समाप्तिलेख काय दर्शवितो ?

मूर्तिप्रकाशाच्या ज्या पोथ्या मिळालेल्या आहेत त्या सर्वांच्या शेवटी मूर्तिप्रकाश, अवस्थाभूतगीत आणि रत्नमाळा या तिन्ही ग्रंथाना सुरवात केसोबासानी त्याना 'वेव्हारासि धरूनि नेले' त्या दिवशी म्ह० फाल्गुन शुद्ध १०, शके १२१० रोजी केली असा निर्देश आहे.[3] हा निर्देश सर्व पोथ्यात आहे हे विशेष होय. सुमारे २०-२२ वर्षांपूर्वी 'मूर्तिप्रकाशा'ची आणखी एक (म्ह० सध्या मिळाल्ल्या पोथ्याहून वेगळी) पोथी मला ई. श्री. कृष्णराव दादा पारिमाइल्य याच्याकडून मिळाली होती. त्यातहि हा उल्लेख होताच (सवत्सराचे नाव मात्र त्या पोथीत सर्वधारी होते) यातील सर्वात जुनी पोथी म्हणजे शके १५३५ मध्ये लिहिलेली आणि तीहि (इतर पोथ्या प्रमाणे) तत्पूर्वीच्या कोणत्या तरी पोथीवरून नक्कलेली त्या पोथीचा काळ साधारणपणे शके १५०० धरला तरी तेव्हापासून म्हणजे सुमारे पावणेचारशे वर्षांपूर्वीपासून 'मूर्तिप्रकाश' हा ग्रथ 'रत्नमाळा'कार केसोबासाच्या नावाने महानुभावपथात प्रचलित आहे असे अनुमान काढावयाला हरकत नाही मूर्तिप्रकाशाच्या कोणत्याहि उपलब्ध पोथीवर 'केशवाचार्या'च्या कर्तृत्वाचा नामनिर्देशदेखील नसल्यामुळे वरील अनुमानाला बळकटीच येत.

## 'वेव्हारासी धरूनि नेले'

दुसरे असे की या समाप्तिलेखात 'वेव्हारासि धरूनि नेले' या प्रसंगाचा जो उल्लेख आहे तो केसोबासाचा होय यात शका नाही. महानु भावपथात प्रविष्ट झाल्यानंतर त्याना पुन्हा ससारात खेचण्याच्या इच्छेने

त्याची नातेवाईक मंडळी केसोबासाना घेऊन गेली होती याचा निर्देश 'स्मृतिस्थळा'तील 'तथा सबधी-सजबु-प्रदानि माझा केसव सुक्योगिंद्र म्हणणे' या १३ व्या आख्यायिकेत आलेला आहे. केसोबासाना व त्याच्या पूर्वाश्रमीच्या पत्नीला एकातांत निजविले. तरी ते त्यातून यशस्वीपणे पार पडले. आपल्या या अनुभवाचा उल्लेख 'मूर्तिप्रकाश'त कवीने स्वत च केलेला आहे असे मला वाटते. उदा —

> मी प्रवर्तला परमार्थमार्गीं
> तव माहात्मीच्या केली लागी
> मग लेउनि वीचाराची वज्रागी
> प्रबोधु-फरस पराभविलें (८०)
> तिय अभग अटटें अती असुरें
> भगावया स्मरण वाचौनि नाहीं दुसरें
> तो अनुभो सांघेन सविस्तरें
> श्रोतयांप्रती (८१)

कवीवर आलेल्या या माहात्मीच्याचे प्रसग म्हणजे 'वेन्हारी धरून नेल्या' नंतरचे प्रसंग होत असे वाटते. या निर्देशावरून प्रस्तुत काव्य 'ज्याला वेन्हारी धरुनि नेले होते' त्या केसोबासाचे असले पाहिजे असे अतर्गत पुराव्यावरून दिसून येते.

तथापि समाप्तिलेखात रत्नमाळा, मूर्तिप्रकाश व अवस्थाभूत गीत ही तिन्ही काव्ये एका दिवशी केल्याचा जो उल्लेख आहे तो वाच्यार्थाने मात्र घेता कामा नये. त्याचा अर्थ इतकाच, त्या दिवसात या काव्याची रचना करण्याला केसोबासान सुरवात केली असावी, आणि नतर सवडीप्रमाणे त्याने ती पूर्ण केली असावी.

## मुनि केशिराज म्हणजे केसोबास

तिसरी गोष्ट अशी की 'मूर्तिप्रकाश'च्या अतर्गत पुराव्यावरून या ग्रथाचा लेखक 'मुनि केशिराज' असल्याचे आपण पाहिले हा 'मुनि केशिराज' म्हणजे 'केसोबासच' होय हे तर बाह्य पुराव्यावरून स्पष्ट होते. दामोदर पंडिताने

लिहिलेल्या 'वछाहरण' काव्यात मौजयाने म्हणन व आपल्या मित्रप्रमाचे चिन्ह म्हणून त्याने केसोबासाचे नाव घातले ही गोष्ट प्रसिद्ध आहे (स्मृस्थ ८२) हा नामनिर्देश कसा केलेला आहे? वछाहरणातील पुढील अवतरणे पाहा—

(१) श्रीकृष्ण कथा अति प्रबंध। म्हणे **मुनि केसिराजु** (६)
(२) म्हणौनि न करावा अतिप्रसंगु। म्हणे **मुनि केशिराजु** (६२)
(३) जे जिव्हन उद्धवाचिकाच। म्हणे **मुनि केशिराजु** (१२३)
(४) साउमील चारका कथा अनुसधान। म्हणे **मुनी केशिराजु** (११७)
(५) म्हणे **केसीराजु मुनी**। श्रोतेयात (३७०)
(६) जनु पावो परममंगल। म्हणे **मुनी केशिराजु** (५०२)

'केसोबासां'चे 'मुनी केशिराज' म्हणून वछाहरणातील उल्लेख आणि 'मूर्तिप्रकाशा'तील 'मुनी केशिराजा'चे उल्लेख काय दाखवितात? वछाहरणातील 'मुनि केशिराज' म्हणजे जसा केसोबास तसाच मूर्तिप्रकाशातील 'मुनी केशिराज' म्हणजेहि केसोबासच होय यात संशय बाळगण्याचे काही कारण नाही

वरील मीमांसेवरून 'मूर्तिप्रकाश' हा ग्रंथ केसोबासाने लिहिला असला पाहिजे असे स्वच्छ दिसून येते ही गोष्ट खरी असली तरी एवढ्या महत्त्वाच्या ग्रंथाचा नामनिर्देशहि स्मृतिस्थळात असू नये याचे आश्चर्य वाटते या अनुल्लेखाचे स्पष्टीकरण सध्याच्या परिस्थितीत मला करता येणे शक्य दिसत नाही

## मूर्तिप्रकाशाचा लेखनकाल

मूर्तिप्रकाशाचे लेखनकर्तृत्व कोणाचे हा जसा विचारप्रश्न आहे, तसाच या काव्याचा लेखनकाळ कोणता हाहि विचारप्रश्न आहे पै भावे यांनी मूर्तिप्रकाशाच्या शकटी पुढील कालनिर्देश ओव्या असल्याचे नमूद करून ठेवले आहे

ऐसा श्री मूर्तिप्रकाश ग्रंथु । पुसी माथा अनू
निथी शुद्ध पक्ष बीजे अनू । सपूर्ण जाला ॥
वृषभ नाम सवत्सरीं । श्रवण नक्षत्र हरिण योगू गुरुवारीं
सपूर्ण झाला चौथा प्रहरीं । हनुमत ग्रामीं ॥
(महाराष्ट्र सारस्वत, पा. ११९)

ह्या ओंव्या देऊन कै. भावे आणखी नमूद करतात की "दुसरे ठिकाणी '१२०६ (१२१० खोडून कोणी १२०६ केले आहे) शक विजय सवत्सर, फाल्गुन दशमी (शुद्ध की वद्य ते दिले नाही)" गुरुवार, अनुराधा नक्षत्र, सौभाग योग, नाल्व नाम करण ते दिवशी केमोनासाते व्यवहारा धरौनि नेल.' असा लेख आढळतो." कै. भावे यांनी हे दोन्ही उल्लेख उद्धृत करून हा काळाचा प्रश्न तसाच सोडून दिला आहे. या उल्लेखाचा विचार करून काव्याचा काळ त्यांनी या ठिकाणी निश्चित केलेला नाही. श्री. (डॉ) य. खु. देशपांडे यांनी मात्र "हा ग्रंथ शके १२०६ मध्ये सपूर्ण झाला" असे स्पष्ट लिहिले आहे. (महा. मराठी वाङ्मय, पृ. २७). कै. पांगारकर यांनीहि १२०६ हाच लेखनकाल नमूद करून ठेवलेला आहे. (म. वा. इ., पा. ४५६)

## प्रक्षेप आणि खोडाखोड

कै. भावे यांनी दिलेल्या कालनिदर्शक ओव्या मला मिळालेल्या चार पोथ्यांपैकी एकाहि पोथीत नाहीत. मला जी पाचवी पोथी पाहण्याला मिळाली होती म्हणून मी मागे उल्लेख केलेला आहे, तिच्यातहि ह्या ओव्या मुळीच नव्हत्या. तेव्हा ह्या ओव्या प्रक्षिप्त आहेत असे स्वच्छ दिसते. शिशुपाळ वधादि काही काव्यांच्या शेवटी कालनिदर्शक ओव्या असल्याचे जे बंड पूर्वी उभारले गेले होते त्याचाच हा एक भाग होय याविषयी माझ्या मनात यत्किंचितहि शंका नाही.

कै. भावे यांनी १२०६ म्हणून जो शक निर्देशिलेला आहे तोहि अशा प्रक्षेपाचे आणि खोडाखोडीचे उदाहरण आहे. खुद्द कै. भावे यांनीच '१२१० खोडून कोणी १२०६ केले आहे' असे लिहिलेले असल्यामुळे ही 'खोड'हि स्पष्टच आहे; आणि ती, ग्रंथाचा काळ मागे नेण्याच्या दृष्टीने केलेली आहे

यात शका नाही. कारण, असे करीत असताना शकसंवत्सराचा मेळ राख ण्याची काळजी ' खोडी 'काराने घेतलेली दिसत नाही, हे पुढील विवेचनावरून लक्ष्यात येऊ शकेल.

## समाप्तिलेखातील कालनिर्देश

डॉ. देशपांडे व कै. पागारकर यानी १२०६ हा काळ कै. भावे याच्या उपरोक्त उल्लेखावरूनच घेतलेला असावा असे वाटते. त्यासाठी स्वतंत्र असा कोणताच पुरावा त्यानी दिलेला नाही. तेव्हा त्याचा विचार करण्याचेहि कारण नाही. तर मग ' मूर्तिप्रकाशा 'चा काळ ठरवायचा कसा ? त्यासाठी एक साधन आपणाला उपलब्ध आहे, ते या काव्याच्या शेवटी ' सर्वत्र ' आढळणाऱ्या समाप्तिलेखाचे. सुमारे पावणेचारशे वर्षांपूर्वीपासून चालत आलेला हा समाप्तिलेख अन्य साधनाच्या आणि विरोधी पुराव्याच्या अभावी विश्वसनीय मानायला हरकत नाही. यासंबंधीचे विवेचन यापूर्वी केलेलेच आहे. तेव्हा ' मूर्तिप्रकाशा 'चा काळ निश्चित करण्याच्या दृष्टीने या समाप्तिलेखाचा विचार करू.

## शक-संवत्सराचा मेळ पडतो काय ?

केसोबासानी अनुसरण केल्यानंतर त्याचे नातेवाइक त्याना संसारात पुन्हा ओढून नेण्याच्या दृष्टीने घरी घेऊन गेले. हा दिवस अगदी काटेकोर पणाने या समाप्तिलेखात लिहून ठेवलेला आहे तो सूक्ष्म रीतीने तपासून पाहण्यासाठी योग्य ती साधने सध्या माझ्या हाताशी उपलब्ध नाहीत. म्हणून त्यातील ठळक गोष्टीचा तेवढा या ठिकाणी विचार करू.

हा काळ स्थूल मानाने पाहता ' शके १२१०, विजय संवत्सर, फाल्गुन शुद्ध १०, गुरुवार ' असा आहे पहिली गोष्ट अशी की दाक्षिणात्य पद्धतीप्रमाणे पाहता शक १२१० ला विजय संवत्सर येत नाही, सर्वधारी येतो. विजय संवत्सर शके १२१५ ला येतो. ख प्रतीतील समाप्तिलेखात मुळात ' सर्वधारी ' संवत्सराचा उल्लेख असावा असे दिसते, ही जी शंका मी प्रदर्शित केली तिचे या ठिकाणी स्मरण होते. ' सर्वधारी ' पुसून तेथे

नार 'विजय' संवत्सराचे नाव लिहिलेले आढळते. ते इतर प्रतीतील संवत्सराच्या उल्लेखाला धरुनच आहे. तथापि, मला येथे एवढेच सुचवावयाचे आहे की त्या ठिकाणी मुळात असलेला 'सर्वधारी' संवत्सराचा उल्लेख हा दाक्षिणात्य पद्धतीला धरून बरोबर आहे.

मग या कालनिर्देशात शकसंवत्सराचा मेळ जमत नाही असे म्हणावयाचे की काय? दाक्षिणात्य पद्धतीनुसार हा मेळ जमत नाही हे खरे आहे. शक संवत्सराचा निर्देश करण्याच्या दोन पद्धती आहेत. एक दक्षिणेकडे प्रचलित असलेली आणि दुसरी उत्तरेकडे प्रचलित असलेली. १३ व्या शतकात महाराष्ट्रात सामान्यतः दाक्षिणात्य पद्धतीनुसार शकसंवत्सराचे निर्देश केलेले आढळतात. त्या दृष्टीने पाहिले तर मूर्तिप्रकाशाच्या समाप्तिलग्नातील हे निर्देश चुकीचे मानिले पाहिजेत. उत्तरेकडे प्रचलित असलेल्या पद्धतीप्रमाणे मात्र शके १२१० ला बरोबर विजय संवत्सर येतो, इतकेच नाही तर त्या वर्षीच्या फाल्गुन शुद्ध दशमीला गुरुवार येतो. तेव्हा कदाचित असे असणे शक्य आहे की ज्याने ही तिथी काढून दिली असेल त्याने, तो उत्तरेकडील राहणारा असल्यामुळे, संवत्सराचा निर्देश उत्तरेकडे प्रचलित असलेल्या पद्धतीला अनुसरून केलेला असेल. एरवी या विसंगतीचे निराळ्या रीतीने स्पष्टीकरण करता येणे शक्य दिसत नाही. तेव्हा स्थूल मानाने १२१० हा शक बरोबर धरून चालावयास हरकत नाही.

पण मी हे केवळ 'सोयीस्कर' म्हणून धरून चालतो असे मात्र समजू नये. १३ व्या शतकात शकसंवत्सराचा निर्देश दाक्षिणात्य पद्धतीप्रमाणे होत असे हे जसे खरे आहे तसेच हा उल्लेख क्वचित् उत्तरेकडील पद्धतीनुसारहि होत असे हेहि खरे आहे. याच, सध्या हाताशी असलेले एकच उदाहरण या ठिकाणी देतो. महानुभावीय पोथ्यात नागदेवाचार्यांचा निधन शक १२२४ म्हणून दिलेला असतो हे प्रसिद्धच आहे. श्री. वा. ना. देशपांडे यांना मिळालेल्या 'अज्ञात स्मृति' २२८ मध्ये 'नागदेव निधनाचे फक्त प्लवग संवत्सर' आणि त्यांनाच मिळालेल्या स्मृतिसमुच्चयातील ३५६ व्या आख्यायिकेत 'शके १२२४ प्लवग संवत्सर, भाद्रपद व॥ ११ ही मिति येते'.

यावरून या दोन्ही पोथ्यात नागदेवाचार्यांचा निधन काळ 'शके १२२४ प्लवग संवत्सर ' असा असल्याचे स्पष्ट दिसते. श्री या. ना. देशपांडे यांनी या प्लवग संवत्सराच्या उल्लेखावरील तळटीपेत असे नमूद केले आहे की 'हें संवत्सर शके १२२९ त येते.' ( स्मृतिस्थळ, प्रस्तावना, पा. ९ पाहा ). दाक्षिणात्य पद्धतीप्रमाणे प्लवग संवत्सर १२२४ मध्ये न येता १२२९ मध्ये येते हे बरोबर आहे पण उत्तरेकडील पद्धतीप्रमाणे मात्र ( पिल्ले यांच्या जंत्रीनुसार ) १२२४ मध्ये प्लवग संवत्सरच येतो. तेव्हा 'अज्ञात स्मृति' आणि 'स्मृति समुच्चय' या दोन्ही ग्रंथात नागदेवाचार्यांच्या निधनशकाचा *निर्देश करताना शकसंवत्सर उत्तरेकडील पद्धतीप्रमाणे दिलेले आहेत हे स्पष्ट* दिसते. यावरून काही ठिकाणी, अपवादात्मक का होईना, पण या पद्धतीचा अवलंब केला जात होता हे दिसून येईल. तीच पद्धत केसोबासाला 'व्यंकारा' धरून नेण्याच्या या कालनिर्देशात आहे असे मला वाटते. तेव्हा तो काळ शके १२१० हा धरून चालण्याला हरकत नाही.

## स्मृतिस्थळातील कालानुक्रमाचा पुरावा

याला आणखी एक उपोद्बलक पुरावा मिळू शकतो. 'स्मृतिस्थळा'त *दिलेल्या आख्यायिका स्थूल मानाने कालानुक्रमाने दिलेल्या* असतात हे प्रसिद्ध आहे श्रीगोविंदप्रभूंच्या मृत्यूनंतर म्हणजे शके १२०८ नंतर तीर्थे नमस्कारीत नमस्कारीत नागदेवाचार्य निंबा येथे येऊन पोचले. ईश्वरनायकाने निर्माण केलेली *व्यवहाराची भानगड मिटविण्यासाठी म्हाइंभट माग राहिले* होते तेहि लौकरच येऊन पोचले एवढी हकीकत स्मृ.स्थ.तील ११ व्या आख्यायिकेत आली आहे. नागदेवाचार्यांच्या व मागाहून म्हाइंभटांच्या येण्याला ७।८ महिने लागले असतील असे धरून चालले तरी १२०९ मध्ये ते निंबा येथे येऊन स्थिर झाले होते असे म्हणायास हरकत नाही त्यानंतरचा पहिला महत्त्वाचा प्रसंग स्मृतिस्थळातील पुढच्याच म्हणजे १२ व्या आख्यायिकेत नमूद केलेला आहे तो 'कवीश्वरांचा भक्ति अनुसरण' आणि त्यांच्या नालनाइकानी धरून घरी नेण्याचे वर्णन आले आहे. तेव्हा हा प्रसंग १२०९ नंतर लौकरच म्हणजे १२१० मध्ये घडून येण्याला हरकत नाही आपण ज्याचा विचार

करतो त्या समाप्तिलेखात तो प्रसंग १२१० फाल्गुन महिन्यात म्हणजे जवळजवळ त्याहि वर्षाच्या शेवटीच घडून आल्याचे सांगितलेले आहे. तेव्हा हा काल विश्वसनीय मानायला हरकत नाही हे स्मृतिस्थळाच्या पुराव्यावरून ध्यानी दिसून येते.

## 'ते दीसी' आणि 'ते देसी'

आता प्रश्न इतकाच उरतो की रत्नमाला, मूर्तिप्रकाश आणि अवस्था भूत गीत ह्या तीन्ही रचना एकाच दिवशी केल्या काय ? त्याला, नाही हे स्पष्ट उत्तर आहे. त्या दिवसात या रचनांना केसोबासाने सुरवात केलेली असावी एवढेच त्यावरून म्हणता येते. या दृष्टीने क, ख आणि ग प्रतीच्या समाप्तिलेखातील 'ते दीसी' या पाठाऐवजी घ प्रतीतील 'ते देसी' हा पाठ मला अधिक बरोबर वाटतो. त्यावरून या तिन्ही ग्रंथाच्या रचनेला सुरवात 'त्या दिवशी' केली असे न म्हणता 'त्या देशात' म्हणजे आपल्या आप्तेष्टाच्या गावी असताना केली असे अनुमान करता येते. अर्थात् मूर्तिप्रकाशाच्या रचनेला प्रारंभ शके १२१० फाल्गुन शुद्ध दशमीला अथवा त्यानंतर लगलाच केव्हा तरी आपल्या स्वतःच्या किंवा श्वशुराच्या घरी असताना केसोबाने केला असावा असे दिसते. तेव्हा १२११ हा मूर्तिप्रकाशाचा लेखनकाल निश्चित करण्याला हरकत नाही.

## केसोबासाचे चरित्र

केसोबास हे कोणाचे कोण आणि मूळचे कोणत्या गावचे राहणार हे निश्चित सांगता येत नाही. 'पैठण शहराजवळील वरखेड–बाटेगाव' येथील चक्रपाणीभट्टाचा मुलगा गोपाळ पंडित (उर्फ आनेराजबास) याचा केसोबास हा धाकटा भाऊ होय. अशी माहिती 'महाराष्ट्र सारस्वता'त (पृ –) दिलेली आहे. पण तिला आधार नाही. याच माहितीचा अनुवाद श्री. य. खु. देशपांडे (महा. म. वा. पृ २७), श्री. ह. ना. नेने (दृष्टांतपाठ, प्रस्ता. लक्षणरत्नाकर, प्रस्ता. पा. १८) इत्यादींनी केलेला आहे, असे वाटते. स्मृतिस्थळात केसोबासाचा भाऊ 'गोपाळ देव' असल्याचा उल्लेख आलेला

आहे. पण हा गोपाळदेव म्हणजे गोपाळ पंडित ऊर्फ आनेराजास असे म्हणण्याला काहीच आधार नाही. उलट गोपाळ पंडित हा मूळचा 'वररेड-वाडेगाव' येथील राहणारा तर केसोबास हा नक्की कोठला हे ठाऊक नसल्याचे स्मृतिस्थळकार लिहितो. काहींच्या मते तो 'पापदंडी रामपुरी' येथील राहणारा होता. तेव्हा या दोघांचा बादरायण संबंध देखील जुळू शकत नाही.

केसोबास हे अतिशय विद्वान पुराणिक होते. (स्मृस्थ. १२) एके दिवशी ते नागदेवाचार्यांजवळ आले आणि त्यांनी त्यांच्याजवळ महानुभाव पंथाची दीक्षा घेतली. अर्थात्, यापूर्वी काही दिवस अगोदर त्यांना पंथाची माहिती झालेली असली पाहिजे. याशिवाय त्यांच्या पूर्वाश्रमीची माहिती उपलब्ध नाही ही खेदाची गोष्ट आहे.

## पंथप्रवेशानंतर

विरक्ति उत्पन्न होऊन महानुभावपंथात शिरण्यापूर्वीच केसोबासाचे लग्न झालेले होते. अजून मूल्याळमात्र काहीच नव्हते. अशा स्थितीत केसोबासाने सन्यास स्वीकारल्यामुळे त्यांच्या तरुण पत्नीला केवढे दुःख झाले असेल याची कल्पनाच करणे बरे. वडील बंधु गोपाळदेव व केसोबासाचे सासरे हे तर नागदेवाचार्यांपाशी येऊन त्यांच्याजवळून केसोबासाला बलात्काराने घेऊन गेले. त्याला त्यांनी नाना प्रकारांनी उपदेश करून 'भीक्षा माडउ आदरीली तर त काही केल्याही भीक्षा न सांडितीचि' केसोबासा बरोबर चर्चा करण्यासाठी अनेक विद्वानांना बोलावण्यात आले, पण त्या सर्वांना त्याने निरुत्तर केले. तेव्हा विद्वानांनी शेवटचा रामबाण उपाय सुचविला. त्याप्रमाणे रात्री केसोबासाला व त्याच्या तरुण पत्नीला एका घरात कोंडले. केसोबासाला आपल्या नादी लावण्याचा त्यांच्या पत्नीने आटोकाट प्रयत्न केला. पण तो तिला मुळीच वश झाला नाही' दिवसा केसोबास गंगेवर जात, तेथे एकांतात राहून रत्नमाला-स्तोत्राची रचना करीत. रात्री पुन्हा आपल्या तरुण पत्नीच्या मनोमनांनी तोंड देत असत. अशा रीतीने त्यांनी सात रात्री तिच्याबरोबर घालविल्या, पण आपले सन्यासव्रत भ्रष्ट होऊ दिले नाही.

शेवटी तिने सर्वांना सांगितले की "आता यासि जावो द्या : आता हे योगीये जाले : याचे मज पाप लागत असे :" तेव्हा सर्वांनी केसोबासाना जाऊ देण्याला परवानगी दिली. पथात प्रवेश करण्याच्या प्रसंगी आपणावर आलेल्या या आपत्तींचाच उल्लेख केसोबासाने 'मूर्तिप्रकाशा'च्या प्रारंभी

मीं प्रवर्त्तला परमार्थमार्गी
तव माहारीच्नीं केली लागी
मग लेउनि वीचारांची वज्रांगी
प्रबोधु–परसें पराभविली (८०)

या ओवीत केलेला आहे हे पूर्वी सांगितलेच आहे. नागदेवाचार्यांकडे परत आल्यावर केसोबासाने हा सगळा वृत्तांत त्यांना सांगितला. तो ऐकून आचार्यांनी प्रशंसोद्गार काढले की 'माझा केशव शुक्रयोगींद्र कि गा" (स्मृस्थ. १३).

## केसोबासाचे खडतर वैराग्य

केसोबासाला संसारापासून केवढी तीव्र विरक्ति उत्पन्न झाली होती हे वरील कथेवरून लक्ष्यात येईल. त्याचे हे वैराग्य क्षणिक नव्हते. नागदेवाचार्यांनी प्रशंसिल्याप्रमाणे तो खरोखरच शुक्रयोगींद्र होता. त्याच्या खडतर वैराग्याच्या आणखी एकदोन आख्यायिका प्रसिद्ध आहेत. केसोबास अटणाला गेला असताना अकाल पर्जन्यवृष्टीमुळे मधेच एका गावात गेला. तेथे भिक्षाप्रीत्यर्थ फिरत असता एका व्यापाऱ्याच्या सुंदर कन्येची त्याच्यावर सहज दृष्टी गेली. केसोबास स्वरूपसुंदर असल्यामुळे त्या तरुणीच्या अंत:करणात त्याच्याविषयी अभिलाषा उत्पन्न झाली. ती स्वत: भिक्षा घेऊन बाहेर आली आणि भिक्षा वाढताना तिने हळूच प्रश्न केला "कोठे असणे?" केसोबासाने तिचा भावार्थ ओळखून मानेने नकार दर्शवीत तो उदासीनतेने पुढे निघून गेला. त्या तरुणीने केसोबासाच्या हालचालींवर संध्याकाळपर्यंत नजर ठेवली. रात्री केसोबास एका लिंगाच्या देवळात निद्रेसाठी गेला. तेव्हा रात्री बुरखा घेऊन ती तरुणी तेथे गेली आणि एकदम त्याच्या माडीवर

जाऊन बसली. त्या मोहपाशातून सुटका करून घेण्यासाठी केसोबास म्हणाला : "उठा, तुम्ही म्हणाल ते ऐकतो" असे म्हणून त्याने तिला खाली बसविले आणि पुन्हा म्हटले "आम्ही लघ्वीला जाऊन येतो. तुम्ही येथेच थांबा" केसोबासाने आपला फुटा वगैरे वस्त्रे तिच्या स्वाधीन केली. त्यामुळे त्या तरुणीला विश्वास वाटला. आणि केसोबास जो बाहेर पडला तो 'श्रीचक्रधरू'-चे चिंतन करीत करीत करीत नागदेवाचार्यांपाशी जाऊन पोचला. त्याची सर्व हकीकत ऐकून सर्व महात्म्याना त्याच्याविषयी फार अभिमान वाटला हे सांगावयास नकोच. (स्मृस्थ. १०५)

पुढे आचार्यांच्याच सांगण्यावरून केसोबास पुन्हा त्या गावात त्याच बाईच्या घरी भिक्षेसाठी गेला. मार्गी अटण करीत असताना उपासतापासाने त्याचे शरीर इतके रुगले होते की त्याला पाहून तीच तरुणी जणु कटाळून पचकन थुकली. "स्वाभाविक भणंग" म्हणून ती एकदम घरात गेली. हा आपला एक प्रकारे विजयच होय असे मानून "हा नव्हे मी श्रीचक्रधराचा केशवद्या" असे म्हणत केसोबासाने आपले दंड थोपटले व तेथून प्रयाण केले. (स्मृस्थ. १०६).

## मठात वैराग्याचे वातावरण ठेवण्याची दक्षता

केसोबासाच्या खडतर वैराग्याविषयी वरील गोष्ट साक्ष देईलच, पण यापेक्षाहि दुसरी एक मनोरजक आख्यायिका आहे. एकदा एका दांपत्याने संन्यास स्वीकारला आणि ते आचार्यांजवळ मठात राहिले. पण हे दांपत्य विकारवश होते. त्याचे विलक्षण वर्तन पाहून दामोदर पंडित, आणि केसोबास यानी आचार्यांना सांगितले, की हे दांपत्य सविकार आहे, याना घालवून द्या. नागदेवाचार्य म्हणाले की, "ते हळुहळू सुधरतील अथवा आपल्या दुर्गुणामुळे आपणच निघून जातील. तुम्ही कशाला कारण होता ?" तेव्हा केसोबासादिकांनी आग्रहाने सांगितले की, एकतर याना घालवून द्या नाहीतर आम्ही सगळे येथून निघून जातो. नागदेवाचार्यांनी, त्याना त्या दंपतीच्या सविकारित्वाविषयी शंका न आल्यामुळे त्यांना घालवून देण्याचे नाकारले. तेव्हा खरोखरच केसोबासादि पंडित आचार्यांना सोडून गेले. पुढे त्या

दापत्याचा, सन्यासधर्माला अयोग्य अशा प्रकारचा व्यवहार पाहून नागदेवा चार्यांनीच त्याना हाकून लावले. मग केसोबास वगैरे परत आले. आणि म्हणू लागले, "भटो, आम्ही पापीयें : तुमते साडुनि गेलो" असे म्हणून ते पश्चात्ताप करू लागले. तेव्हा आचार्यांनी त्याना प्रेमाने उठवून म्हटले, "पडिता : केशवया ' सर्वांगीं काइ देखण असे : देखणे ते डोळेचिचि कीं : तैसे तुम्हीं माझे डोळे कीं गा पडिता केशवया '" ( स्मृस्थ. ९४, ९५).

यावरून वैराग्याच्या भरात आचार्यांचीहि पर्वा न करणाऱ्या केसोबासाची धन्यता वाटते. स्त्रीसबंधविषयक नुसता अपवाद देखील आपल्यावर येऊ नये म्हणून तो फार काळजी घेत असे. केसोबासाची एक बहीण त्याजजवळ नेहमी येऊन बसत असे. एकवेळ केसोबास अरण्यात असताना तेथे सुद्धा ती त्याजजवळ जाऊन बसली. त्यावेळी केसोबासानी तिला स्पष्ट सांगितले की, "कामाए : आजिचिया गुनि ऐसे नैइजे की : लोकु अपवादु बोलेल . यातव लोका पाप घडेल :" तेव्हा कामाइसाने म्हटले, "भावडावरि कैसा अपवादु बोलेल गा ?" केसोबासानी यावर दिलेले उत्तर लक्षात ठेवण्यासारखे आहे. तो म्हणाला, "भावडे ऐसे गुरुकुळ जाणे : परि लोकु नेणे की :" ( अज्ञातस्मृति ४३, स्मृस्थ. पा. १०० ).

## शास्त्रचर्चेची आवड

केसोबासाला पहिल्यापासूनच धर्मविषयावर चर्चा करण्याची आवड होती. महानुभाव पथाचा स्वीकार केल्यानतर, प्रवृत्तिमार्गातून मन निवृत्त झाल्यामुळे तर त्याला दुसरा विषय सुचणेच शक्य नव्हते. गृहस्थाश्रमात राहून मात्यापित्याच्या शुश्रूषेने मोक्ष मिळू शकतो की नाही या प्रश्नावर एका विद्वानाबरोबर चर्चा करीत असताना केसोबासानी स्पष्ट सांगितले की, "एकु देहपति तो मातापीता साडीलेया वाचुनि नव्हे : तैसा जीवपति तो सबधीये वर्णाश्रम ' स्वदेसु : ज्ञाति : गोत्राचा त्यागु केल्यावाचुनी नव्हे" हे उत्तर त्याच्यासारख्या विरक्त धर्मनिष्ठाला शोभण्यासारखेच आहे. (स्मृ. समुच्चय, ११९ ) दिवसेंदिवस अशा वादविवादाला व शास्त्रचर्चेला बहर येऊ लागला. केसोबास आपले जीवश्चकंठश्च मित्र दामोदर पडित व रामदेव याच्यासह

अरण्यातील निवांतस्थळी व मठातहि नेहमीच शास्त्रसंवाद करू लागले. त्याविषयी बोलताना नागदेवाचार्य एक वेळ असे म्हणाले की, "या तिघांना शास्त्रसंवादेवीण जो उठता बसता रीकामयां दाखविल"–त्याच्याशी मी होड लावायला तयार आहे." (स्मृस्थ. २५३) यावरून हे तिघेहि विद्वान एकमेकांच्या बुद्धीशी टक्करा देण्यातच कसे रंगून जात असत हे दिसून येते. पण शास्त्रचर्चा कितीहि चांगली असली तरी तिचा अतिरेक हा वाईटच. नागदेवाचार्यांनी आरंभी आरंभी त्यांच्या शास्त्रचर्चात्मक बुद्धीचे व उद्योगाचे कौतुक केले हे खरे; पण त्या विद्वानांचा तो हव्यास एकसारखा वाढत जाऊन शेवटी परमावधीला पोचलेला पाहताच आचार्यांनी त्यांना अगदी स्पष्ट शब्दात बजावले, "हां गा : तुम्ही सर्वकाळी एकमेका ऐसा वादवेवादु करीता : तुम्ही काइ एकाधे बहुरूपी गा : हां गा : सर्व काळीं जरि चर्चा कराल तरि देवाते केधवा स्मराल ?" असा उपदेश करून आणखी सांगितले, "श्रवण : मनन : नीदीध्यासन : जो कां संशयो तो अधिकरणाते पुसावा : कां आपणाहुनि ज्ञात तयाते पुसावा :" नागदेवाचार्यांनी दिलेल्या या मात्रेच्या वळशाचा इष्ट तोच परिणाम झाला. केसोबासाच्या अंगी भरलेला शास्त्रचर्चेच्या हव्यासाचा ज्वर खाडकन उतरला. यापुढे शास्त्रचर्चेच्या भानगडीत न पडता आलेल्या शंकेचे निरसन तो आचार्यांकडूनच करून घेऊ लागला. इतकेच नव्हे तर त्यांच्यापाशी देखील तो तर्कट न लढवता त्यांच्या मुखातून बाहेर पडलेल्या प्रत्येक शब्दावर श्रुतिवाक्याप्रमाणे विश्वास ठेवू लागला. याचे प्रत्यंतर, भास्करभट्ट बोरीकराशी संबंध असलेल्या एका आख्यायिकेत फार चांगल्या रीतीने दिसून येते. एक वेळा नागदेवाचार्य काही धर्मवार्ता करीत होते. त्या धर्मवार्तेत आचार्यांशी प्रामुख्याने भास्करभट्ट बोरीकरच बोलत होते. आक्षेपपरिहारपूर्वक मोठ्या खडाजंगीचा वादविवाद बोरीकराने आरंभिला. ते पाहून केसोबास भास्करभट्टाला एकदम म्हणाला, "भटो, अधीकरणेंसीं इतुके तर्क वाटवीतां दूषण असे : अधीष्टानिंची प्रसन्नता जाये : यैसीयापरी काद अर्धर्मीधी होइल : भटोबासाचें बोलणें ईश्वरवाणी कीं : तें आइकीलें तेंचि सिरसा नमस्करुनि घेयावें : न परीतें तरि आपणचि विमर्शावें : मग अनधिकार निवर्तलेयां काळेंकरुनि उमटैल"

( स्मृस्थ. २३७ ) यावरून नागदेवाचार्यांच्या उपदेशाचा केसोबासाच्या अंत करणावर केवढा परिणाम झाला होता ते दिसून येते. त्याच्या धर्मज्ञाना संबंधी मात्र नागदेवाचार्यांना फार आदर होता. आपल्या मार्गाचे शास्त्र केसोबास व दामोदरपंडित यानाच चांगले समजले आहे असे त्यांचे मत झाले होते. ( स्मृस. २९६. स्मृस्थ. पा. ११६ ) इतकेच न हे तर यथार्थ शास्त्रनिर्णय करण्यात केसोबास कुशल असल्यामुळे आपल्यामागे मार्गाची भाडणे तोच चागली सोडवू शकेल असा त्याना विश्वास होता. आचार्यांनी "पंडिता केसवदेया भटमार्गा वेधले जीव तुमचेया गळेया बांधतील गा" असे जे उद्गार वरील दोघाना संबोधून काढले होते ते वरील विश्वासामुळेच !

## पंथासंबंधी कळकळ

स्वत च्या वैयक्तिक आचरणासंबधाने केसोबास जितकी काळजी घेईल तितकीच किंबहुना त्याहिपेक्षा अधिक काळजी आपल्या पंथाच्या निष्कलंकत्वासंबधी तो घेत असे. भटमार्गाला दूषण लागेल असे कोणतेच आचरण तो आपल्याकडून होऊ देत नसे. एकदा दामोदर पंडित भास्करभट्ट बोरीकर इत्यादिकाबरोबर अंगणाला गेला असताना फक्त त्याच्याच पायात वहाणा होत्या. ते पाहून एका वाग्मराने म्हटले, "हे अवघे भटमार्गीचे माहात्मे होति . हा एकु नव्हे याचा पाद वाहाना आहाति त केशोबासीं आइकील यसा येहीं वाहानि मी भटमार्गीचा माहात्मा नव्हें म्हणोनि तेथचि ताइनि साडीलीया . मग यऊनि भटोबासापुढ सांगितलं : तयावरि भटोबासीं म्हणितलं केशवया माझीये मार्गाचा महात्मा यैसा तूंचि की" ( स्मृस्थ. २१८ )

या प्रसगावरुन केसोबासाला पंथाबद्दल केवढा आदर वाटत असे व स्वत ला पंथीय म्हणवून घेण्यात केवढा अभिमान वाटत असे हे सहज दिसून येईल. पण याहीपेक्षा दुसऱ्या एका आख्यायिकेवरून मार्गाच्या विशुद्धत्वाविषयी त्याला वाटणारी काळजी अधिक दिसून येते. निंबा येथील चक्रतीर्थाच्या काठावर एक माहात्मा झोळीत भोजन करीत होता. ते केसोबासाने दुरून पाहिले. निद्राडी आल्यानंतर आचार्यांच्या समोर

त्याने त्या महात्म्याला स्पष्टीकरण विचारलें. "हां हो : तुम्ही झोळियेसि कैसे जेविलेति ?" या प्रश्नावर तो महात्मा ल्पवाल्पवीचे उत्तर देऊ लागला. त्याने म्हटले : "मज काही कोण्हे देखील : तेव्हा केसोबास अतिशय रागावून म्हणाला. "म्या वैसे देखिले : येसेचि आणीक देखतील तेव्हेळि मार्गा दूषण ठेवीतील :" (स्मृस्थ. १५९) याचप्रमाणे पंक्तीत बसले असताना वैराग्यवृद्धत्वानुक्रमाने बसणे, भोजनासाठी यांदा न शिजवणे इत्यादि गोष्टीविषयीहि तो फार काळजी घेत असे.

## केसोबासाचे ग्रंथकर्तृत्व

या सर्व गोष्टींपेक्षा आपल्या दृष्टीने केसोबासाचे महत्त्व त्याने केलेल्या महानुभाव वाङ्मयाच्या व मराठी भाषेच्या सेवेमुळे वाढले आहे. केसोबासाला श्रीचक्रधरस्वामींचे शास्त्र उत्तम रीतीने अवगत झालेले होते. याचा उपयोग त्याने आचार्यांच्या अनुमतीने त्या शास्त्राची व्यवस्था लावण्यात उत्तम रीतीने केला. ही शास्त्रव्यवस्था लावण्याच्या प्रयत्नातूनच सूत्रपाठाची व दृष्टांतपाठाची रचना झाली. म्हाइंभटाने संकलित केलेल्या लीळाचरित्रातून श्रीचक्रधरस्वामींची वचने त्याने निराळी काढली आणि त्यांची विषयवारीने विभागणी करून वेळोवेळी सांगितलेले दृष्टांत वेगळे काढून आणि प्रत्येक दृष्टांतावर स्पष्टीकरणात्मक दार्ष्टांतिक लिहून त्याने दृष्टांतपाठ तयार केला हे त्याचे महत्त्वाचे कार्य होय. ह्याच ग्रंथांच्या आधारावर पुढे प्रमेय ग्रंथ, स्थळग्रंथ, बंद वगैरे निर्माण झाले. या संकलनात्मक कार्यावरोबर त्याने स्वतंत्र रचनाहि केलेली आहे. रत्नमालास्तोत्र या संस्कृत ग्रंथाचा आणि मूर्ति-प्रकाशाचा उल्लेख पूर्वी आलेलाच आहे. रत्नमालास्तोत्राप्रमाणेच दृष्टांतस्तोत्र व ज्ञानकलानिधिस्तोत्र अशी आणखी दोन संस्कृत स्तोत्रे केसोबासाने रचली आहेत. त्याच्या मराठी रचनेत दृष्टांताचे लापणिक आणि अवस्थाभूत गीत यांचा उल्लेख अवश्य केला पाहिजे.

## केसोबासाचे देहावसान

वर निर्दिष्ट केलेल्या अनेक आख्यायिकावरून केसोबास आणि दामोदर पंडित यांची दृढमैत्री असल्याचे दिसून येईल. या मैत्रीचे एक सुंदर उदाहरण

केसोबासाच्या मृत्युसंबंधीच्या आख्यायिकेत दिसून येते. त्याचे असे झाले की, एक वेळ पंडित दामोदर आणि केसोबास रस्त्याने जात असताना समोरून एक रजपूत येत होता. तो मद्य पिऊन तर्र झालेला होता. त्या नशेत त्याने केलेले वेडेचार काय वर्णन करावे? काही मर्कटचेष्टा केल्यानंतर त्याने म्यानातून तल्वार उपसली आणि मस्तीच्या भरात पंडित दामोदरावर तो चालून गेला. त्याच्या तरवारीचा वार आपल्या मित्रावर पडणार हे पाहून केसोबास एकदम मधे पडले तो तरवारीचा वार त्याना लागला आणि त्यामुळे त्याचे देहावसान झाले, अशी एक परंपरागत आख्यायिका आहे. आपल्यासाठी प्राणत्याग करणाऱ्या केसोबासामुळे दामोदर पंडिताला केवढे दु:ख झाले असेल याची कल्पनाच करावी. असे म्हणतात की, या वियोगाने दु:खित झालेल्या दामोदराने 'वछाहरण' काव्य लिहिले आणि त्यात कवि म्हणून आपल्या या मित्राचे नाव सर्वत्र घातले. वछाहरण काव्यात " म्हणे मुनि केशिराजु " असे ग्रंथकर्त्याचे उल्लेख अनेक ठिकाणी येतात याचे कारण हे होय. सारांश, केसोबासाचे देहावसान त्याच्या महात्मावृत्तीला शोभेल असेच झाले.

## केसोबासाचा मृत्युशक

केसोबासाचा निर्याणशक १२३८ म्हणून 'वृद्धाचार अन्वयस्थळा'त दिलेला असल्याचे कै. ह. ना. नेने यानी दृष्टांतपाठाच्या प्रस्तावनेत नमूद करून ठेवलेले आहे. तथापि महानुभावाचे चरित्रग्रंथ या लेखात डॉ. य. खु. देशपांडे यानी इतिहासप्रकरणातील जो उतारा दिलेला आहे त्यातील माहितीशी याचा विरोध येतो. इतिहासप्रकरणावरून असे दिसते की नागदेवाचार्यांच्या नंतर तीन वर्षांनी बाइदेवबासाचा मृत्यु झाला व पुढे दीड वर्षाने दामोदरपंडित वारले. सांप्रदायिक दृष्ट्या पाहिल्यास नागदेवाचार्यांचा मृत्युशक १२२४ आहे. त्यानंतर ३ वर्षांनी म्हणजे १२२७ मध्ये बाइदेवबासाचा मृत्यु आणि त्यानंतर १॥ वर्षाने म्हणजे १२२९ पूर्वी दामोदरपंडिताचा मृत्यु यतो अर्थात त्याच्याहि पूर्वी केसोबासाचा मृत्यु झालला असला पाहिजे. स्थूलमानाने हा शक सांप्रदायिक दृष्टीने विचार केला तर १२२८ मानायला हरकत नाही. श्री. वा. ना. देशपांडे यानी आचार्यांचा मृत्युशक १२३१ ते १२३४ च्या दरम्यान ठरवलेला आहे. स्थूल मानाने तो १२३२ घेतला आणि

तदनुयगानें केसोव्रासाचा मृत्युशक ठरविला तर तो १२३६ च्या जवळपास येईल. ह्या पद्धतीने मान के. नेने यांनी नमूद केलेला १२३८ हा शक विश्वसनीय असावा असे वाटते.

## केसोबासांचा ' मूर्तिप्रकाश '

केसोबासांची मूर्ति दिवगत होऊन आज सातशे–साडेसातशे वर्षे लोटली असली तरी त्यांचा 'मूर्तिप्रकाश' अजून दैदीप्यमान आहे. केसोबास असे सडेतर निरक्त होते, शास्त्राचे जाणकार होते तसेच ते उत्तम कवीहि होते. मूर्तिप्रकाश हे त्यांच्या काव्यवैजयंतीमधील अत्यंत प्रकाशमान असे रत्न होय. या काव्यात त्यांची विद्वत्ता आणि सहृदयता, काव्यशक्ति आणि परमेश्वर–भक्ति यांचे मोठे मनोहर मिश्रण झालेले आहे. परमेश्वराविषयीच्या आत्यंतिक भक्तिभावनेने भरून आलेल्या कवीच्या अतःकरणाचाच हा उद्‌गार आहे. हे आपले अतःकरण काव्याच्या आरंभापासून कवीने मोकळे केले आहे. त्यात, आतापर्यंत ईश्वरसेवा योग्य रीतीने न घडल्याबद्दलची त्यांची आर्त उत्तम रीतीने व्यक्त झालेली आहे. तो म्हणतो,

> मी आंधळे अज्ञान : परीसावेया नाहीं श्रवणमन
> तया केवि आतुटे नीरुपण : तया भक्तिरसाच (४३)
> मी अपराधी अमगळु : नाहीं अनुतापु अळुमाळु
> कहीं न मनी वीटाळु : रज–वासनेचा (४५)
> . .. . .
> ऐसा मी अधम पापीया : जे जे दोस केले मीया
> ते उपसाहावे जी स्वामीया : कृपाळुवा (७७)
> ऐसा सर्व दोसीं आळहतु : वरी ज्ञान–प्रेम–रहीतु
> तया मज केवि लाभे अतु : तुझीय भक्तिश्रीयचा (७८)

आपली आध्यात्मिक हीनता कवीने जशी नम्रतापूर्वक वर्णिली आहे तशी आपली कवित्वाची रक्तृत्तीहि त्याने वर्णिली आहे. नागार्जुनाचा गोसावी जो *श्रीचक्रधर त्यांच्या सालंकृत श्रीमूर्तीचे आपणाला वर्णन तर करावयाचे* आहे पण—

मज नाहीं मतीची प्रगळता : तुत वर्णावया चैतन्यनाथा
परी जीवा होतसे आर्ति . स्तुति करावया (८५)

नाही ज्ञानाच पुरतेपण : वर्णावया श्रीमूर्तीचे गुण
परी अल्हादु होतसे मना . स्तवनालागि (८६)

जैसे बाळकाचे बोल बोबडे . आईकौनि माएबापा तोखु पडे
मग उसंगीय घेउनि कोडे . लाडवीताती (८७)

तैसा मी अबोधु अज्ञानु ' नव्हे जाणता सज्ञानु
परी झळक्ला लेचतु : गुरुस्नेहा (८८)

आणि या गुरूच्या आशीर्वादाने मला जे ज्ञान झाले त्यामुळे, बोधवताला जसे समाधान होते तसे माझ्या अंतःकरणाला समाधान झाले. त्या समाधानाचा, त्या आनंदाचा ढेकर या ओव्यांच्या रूपाने बाहेर पडलेला आहे.

### कवीचा आत्मविश्वास

अर्थात् प्रस्तुत काव्य म्हणजे कवीच्या अंतःकरणाचा उद्गार होय. यात जसे वास्तवाचे निवेदन झालेले आहे तसेच काव्यनिर्मितीचे एक महत्त्वाचे लक्षणहि व्यक्त झालेले आहे. जीवनातील आपल्या नानाविध अनुभूतींचे संस्कार बरोबर घेऊन खरे काव्य हे नेहमीच अंतःकरणातून बाहेर पडत असते. 'श्रीकृष्णाचा गुणीं जीविनलं . माझा जिउ श्रीचक्रधरा विनटला : तो आतुल आनंदु वोसंडला : कवितेचेनि मिसें ' ह्या कवि नरेंद्राच्या उद्गाराचे यावेळी स्मरण होणे अपरिहार्य आहे ! अंतःकरणाची अशी भूमिका तयार झाल्यानंतर बाहेर पडणाऱ्या काव्याच्या श्रेष्ठत्वाविषयी मग शंकाच बाळगायला नको. 'म्हणौनि माझें नित्य नवें । श्वासोच्छ्वासहि प्रबंध होआवे' असा संत ज्ञानेश्वरासारखा आत्मविश्वास कवीच्या अंगी बाणतो. केशिराजाच्या ठिकाणीहि तो तसा बाणलेला आहे. आणि म्हणूनच, श्रीचक्रधराच्या मूर्तीचे वर्णन करणारे आपले हे काव्य वाचण्याविषयी वाचकांना विशेष विनवणी करण्याची आवश्यकताच नाही असे तो आत्मविश्वासाने सांगतो. सर्व जनतेला वेधून घेणाऱ्या सुगंधाने दरवळणाऱ्या चंदनाने, या माझा उपभोग घ्या, अशी कधी कुणाची प्रार्थना केली आहे काय ? कमळ, पाडळ आणि पारिजातक याच्या

परिमळयहळ पुष्पानी आणि केतकीच्या दळानी कधी भ्रमरसमूहाला मूळ पाठविले आहे काय ? कस्तुरीमृगाने चक्रवर्तीला, चद्रकिरणानी चकोराला, जाई-जुई-मालती-मोगऱ्यानी भुंग्याना त्याच्या पाया पडून अशी याचना कधी केली आहे काय ? मग मला असे करण्याची काय गरज आहे ?

> तेवि मधु होइल गोडीसा : तरी कवणु नव्हे प्रेमपींसा
> सचाड धावे सनदासरिसा . न बोलावीता (१५७)

कारण माझी, परमेश्वर-गुणवर्णनाने ओथबलेली कविताच तशी मधुर आहे. तिच्यात काव्य आणि ब्रह्मविद्या याचे गोड मिश्रण झालेले आहे. मग तिचे सेवन करण्याचे डोहळे कोणाला लागणार नाहीत ?

> ऐसीये कवीतेल्ते रसाळे : लगलीं दीसतीं ब्रह्मवीद्येचीं फळे ?
> तरी कवणासि नव्हेति डोहळे ' मुखीं घालवेयाचे (१५८)

सोनकेतकीच्या गाभ्यातील पाण्याचा आस्वाद घेऊन कोणाला धन्य वाटणार नाही ? साहित्याच्या सजेवर मूर्तिमती लावण्यलतिकेबरोबर जर विचार विहार करायला लागला तर त्या सुखाविषयी कोणाच्या मनात प्रेम निर्माण होणार नाही ? अशा आत्मविश्वासाने कवि काव्यरचनेला सुरुवात करतो आपल्या या काव्याचा गौरवहि त्याने यथार्थ शब्दात गाइला आहे

**काव्यगौरव**

आपले हे काव्य कसे आहे ? कवीच्या शब्दात सागायचे तर—

> जो ज्ञानगगनमडळी सुधाकरू
> उदैला मुक्तिप्रकाशकु मुक्तिचद्र
> तें चादिणें वीसरेपीता नासे अधकारू
> अज्ञानतमाचा (१८०)

अशा या आपल्या काव्यात, श्रीचक्रधराच्या मूर्तिचद्राचे वर्णन करून आपण त्रैलोक्याला डोलवू अशी त्याला खात्री आहे. पाणीदार व डौलदार मोती जशी ओवावी त्याप्रमाणे, किंबहुना त्याहून अधिक चागली अशी अक्षरे या काव्यात ओवलेली आहेत. माणिकाच्या रगापेक्षा या अक्षराचा रग अधिक

चांगला आहे. माझ्या या कवितेतील रसाचे वर्णन ऐकून देखील कोकिळा कूजन करावयाला लागतील. अशा रसाळ शब्दांनी भरलेले माझे काव्य दुर्जनांना कदाचित आवडणार नाही, पण रस्या रसिकांना ते निश्चित आवडेल. तेव्हा

यानितां परब्रह्म केवळ
ग्रोल होती सकुमार सुपरीमळ
ते आद्रक्तु मुनीजन सकळ
श्रांतदर्शे ( २१३ )

अशी श्रोत्यांना विनंती करून मग कवीने काव्यविषयाला सुरवात केलेली आहे.

## मूर्तिप्रकाशाचे अंतरंग

मूर्तिप्रकाशाचा हा काव्यविषय कोणता आहे ? अर्थात्, श्रीचक्रधराच्या मूर्तीचे वर्णन. या मूर्तिवर्णनासाठी कवीने डोमेग्राम येथील पूजावसराचा प्रसंग आधाराला घेतलेला आहे. आणि म्हणून प्रथम डोमेग्रामाचे वर्णन केलेले आहे. प्रत्यक्ष परब्रह्म परमेश्वरावतार श्रीचक्रधरापुढे डोमेग्रामाला आलेले महत्त्व काय वर्णन करावे ? त्यामुळे कला, संगीत, ज्ञान, विज्ञान, विवेकविकार, सौभाग्य-शृंगार इत्यादींना गौरव प्राप्त झाला. त्याचे वर्णन करता येणे शक्य नाही, तरी मी ते करीन असे सांगून इतर सर्व नगरापेक्षा, फार काय पण चक्रधरांच्या संबंधाने पवित्र झालेल्या प्रतिष्ठान, एळापूर, वेलापूर आदि नगरांपेक्षा, इतकेच नव्हे तर श्रीप्रभूच्या परमेश्वरपुरापेक्षाहि डोमेग्राम अधिक श्रेष्ठ असल्याचे कवीने आरंभी अत्यंत रसाळ पण समर्पक शब्दात सांगितले आहे. (ओ. २१४–३८० ) आणि नंतर डोमेग्राम येथील चक्रधराच्या अनेक अलौकिक लीळांचे स्मरण केले आहे. तेथील राजमठात रात्री निद्रा करून ' पस्यात पाहारीं पूर्णकांमु : दोन्ही दारसंका धरनि आत्मारामु : एक श्रीचरण ठेवी पुरुखोत्तमु : उंबरवटावरी ' (४८८) आणि दुसऱ्या चरणाने नागदेवाला उठविल्यानंतर प्रातःकर्मे आटोपून, नागांबिकेने ओट्यावर रचलेल्या शयनासनावर

परिमळवहळ पुष्पानी आणि केतकीच्या दळानी कधी भ्रमरसमूहाला मूळ पाठविले आहे काय ? कस्तुरीमृगाने चक्रवर्तीला, चद्रकिरणानी चकोराला, जाई–जुई–मालती–मोगऱ्यानी भुग्यांना त्यांच्या पाया पडून अशी याचना कधी केली आहे काय ? मग मला असे करण्याची काय गरज आहे ?

तेवि प्रबंधु होइल गोडीसा : तरी क्वणु नव्हे प्रेमपीसा
सचाड धावे सब्दासरिसा : न बोलावीता (१५७)

कारण माझी, परमेश्वर–गुणवर्णनाने ओथबलेली कविताच तशी मधुर आहे. तिच्यात काव्य आणि ब्रह्मविद्या याचे गोड मिश्रण झालेले आहे. मग तिचे सेवन करण्याचे डोहळे कोणाला लागणार नाहीत ?

ऐसीये कवीतेल्ले रसाळे : लागलीं दीसतीं ब्रह्मवीयेचीं फळें !
तरी क्वणासि नव्हेति डोहळे : मुखीं घालावेयाचे (१५८)

सोनकेतकीच्या गाभ्यातील पाण्याचा आस्वाद घेऊन कोणाला धन्य वाटणार नाही ! साहित्याच्या सजेवर मूर्तिमती लावण्यलतिकेबरोबर जर विचार विहार करायला लागला तर त्या सुखाविषयी कोणाच्या मनात प्रेम निर्माण होणार नाही ? अशा आत्मविश्वासाने कवि काव्यरचनेला सुरुवात करतो आपल्या *या काव्याचा गौरवहि त्याने यथार्थ शब्दात गाइला आहे.*

## काव्यगौरव

*आपले हे काव्य कसे आहे ? कवीच्या शब्दात सागायचे तर—*

जो ज्ञानगगनमडळी सुधाकरू
उदैला मुक्तिप्रकाशु मुक्तिचद्रु
ते चांदिणे वीसेखीता नासे अधकारू
अज्ञानतमाचा (१८०).

*अशा या आपल्या काव्यात,* श्रीचक्रधराच्या मूर्तिचद्राचे वर्णन करून आपण त्रैलोक्याला डोलवू अशी त्याला खात्री आहे. पाणीदार व डौलदार मोती जशी ओवावी त्याप्रमाणे, किंबहुना त्याहून अधिक चागली अशी अक्षरे *या काव्यात ओवलेली आहेत. माणिकाच्या रगापेक्षा या अक्षराचा रग अधिक*

चागला आहे. माझ्या या कवितेतील रसाचे वर्णन ऐकून देखील कोकिळा कूजन करावयाला लागतील. अशा रसाळ शब्दानी भरलेले माझे काव्य दुर्जनाना कदाचित आवडणार नाही, पण सऱ्या रसिकाना ते निश्चित आवडेल. तेव्हा

वानिता परब्रह्म केवळ
जोल होती सकुमार सुपरीमळ
ते आइकतु मुनीजन सकळ
सातदर्शे ( २१३ )

अशी श्रोत्याना विनती करून मग कवीने काव्यविषयाला सुरवात केलेली आहे.

## मूर्तिप्रकाशाचे अंतरंग

मूर्तिप्रकाशाचा हा काव्यविषय कोणता आहे ? अर्थात्, श्रीचक्रधराच्या मूर्तीचे वर्णन. या मूर्तिवर्णनासाठी कवीने डोमेग्राम येथील पूजावसराचा प्रसग आधाराला घेतलेला आहे. आणि म्हणून प्रथम डोमेग्रामाचे वर्णन केलेले आहे. प्रत्यक्ष परब्रह्म परमेश्वरावतार श्रीचक्रधरापुढे डोमेग्रामाला आलेले महत्त्व काय वर्णन करावे ? त्यामुळे कला, सगीत, ज्ञान, विज्ञान, विवेकविकार, सौभाग्य-शृगार इत्यादींना गौरव प्राप्त झाला. त्याचे वर्णन करता येणे शक्य नाही, तरी मी ते करीन असे सागून इतर सर्व नगरापेक्षा, फार काय पण चक्रधराच्या सबधाने पवित्र झालेल्या प्रतिष्टान, एळापुर, वेलापूर आदि नगरापेक्षा, इतकेच नव्हे तर श्रीप्रभूच्या परमेश्वरपुरापेक्षाहि डोमेग्राम अधिक श्रेष्ठ असल्याचे कवीने आरभी अत्यत रसाळ पण समर्पक शब्दात सागितले आहे. (ओ. २१४–३८०) आणि नतर डोमेग्राम येथील चक्रधराच्या अनेक अलौकिक लीळाचे स्मरण केले आहे. तेथील राजमठात रात्री निद्रा करून ' पस्यात पाहारीं पूर्णकामु : दोन्ही दारसका धरुनि आत्मारामु : एक श्रीचरण ठेवी पुरुसोत्तमु : उत्तरवटावरी ' (४८८) आणि दुसऱ्या चरणाने नागदेवाला उठविल्यानतर प्रात कर्मे आटोपून, नागासिंने ओम्यावर रचलेल्या शयनासनावर

तीय आसनीं लावण्यसागरू : अरुढला श्रीचक्रधरु
रूपें सौभाग्यें सुंदरु : मीरवत दिसे (५००).

अशा त्या शयनासनावर बसलेली ती श्रीमूर्ति 'तया श्रीचक्रधराची श्रीमूर्ति : देखिली नीअर्कांकरीं महंतीं : ते सांघेन बोलीं प्राकृतीं : म्हणे मुनि केशिराजु" (५०२) अशी प्रस्तावना करुन नंतर कवीने प्रत्यक्ष मूर्तिवर्णनाला प्रारंभ केलेला आहे.

## श्रीमूर्तिवर्णन

प्रथम 'आदि पुरुषाचे रूपस अवेव' त्याचप्रमाणे 'चापेगौर मूर्ति' श्रोत्यांच्या डोळ्यासमोर उभी करुन (५०३–५३३) नंतर 'चरणकमळे', त्यावरील सामुद्रिक चिन्हे, बोटांची नखे, चरणाच्या टाका, व चरणात घातलेले उपानह यांचे वर्णन केलेले आहे (५३४–५८४). आणि मग क्रमाने पोटऱ्या (५८५–६०१); गुप्त अवेयव (६०२–६०७); कटि (६०८–६१६); नाभिकमळ (६१७–६२३); वळिनय (६२४–६२९); रोमावळी (६३०–६३६); वक्षस्थळ (६३७-६४१); हात व त्यावरील पुष्पमालादिकांचे अलंकार (६४२–७१०); हनवटी (७११–७२१), मुख आणि घाचा (७२२–७२९) यांचे वर्णन कवीने केलेले आहे. आणि मग

आतां अन्मोदुं अधरांचें वीसेखण : श्रोतया करुं शास्त्रश्रवण
जेणे ज्ञानाचे कार्यकारण : नाशौनि जाये (७३०)

असा अधरांच्या वर्णनाला जो आरंभ केला आहे तो थेट

ऐसें अधरांचें वीत्पादन : मियां वीसेखलें अती गहन
साउमें असे कथाअनुसंधान : तें जाण अवधारीतु (१७३१)

या ओवीपर्यंत. म्हणजे या अधरवर्णनासाठी कवीने एक हजार ओव्या खर्ची घातल्या आहे. इतक्या या ओव्यात त्याने असे वर्णन केले तरी कोणते? असा प्रश्न साहजिक आपणाला पडतो त्याचे उत्तर असे की या ओव्यात कवीने कृपा व करुणा यांचा परावाचेबरोबर झालेला संवाद, वर्णन केला आहे.

## परा-करुणा संवाद

या संवादाला कवीने कशी कुशलतेने सुरुवात केलेली आहे ते पाहण्या सारखे आहे. श्रीचक्रधराच्या अधरावर अनेक कल्पना लढवीत असता एक कल्पना अशी केली, 'की कृपाकारुण्य दोन्ही परा वाचेसी करिती उपाणी' म्हणजे स्वामीचे दोन ओठ म्हणजे कृपा आणि करुणा या शक्ति, त्यांची जणु परा वाणीबरोबर चर्चा चाललेली आहे. चर्चेचा विषय कोणता ? तर 'आम्हा जडामध्ये कवण सीहाणी ? '—आम्हा जडा शक्तीमध्ये सर्वात शहाणी आणि म्हणून श्रेष्ठ कोण ? त्याला परा वाणीने उत्तर दिले की "तुम्ही सगळ्याच जणी थोर आहात. पण सर्वश्रेष्ठत्वाच्या मानाचे पान कृपेलाच द्यावे लागेल. कारण, कृपेने विनती केल्यामुळेच परमेश्वर अवतार धारण करून ज्ञान व भक्ति या मार्गांनी जीवाचे उद्धरण करतो. शिवाय परमेश्वर ज्ञानिया-भक्ताला विशेषज्ञानात सर्वशक्तिदान देतो, पण 'कृपा' दान म्हणून देत नाही. तिला तो कधी विसरत नाही. परमेश्वर आणि कृपा भिन्न नाहीत. ते एकरूप आहेत."

कृपा आणि ईश्वर एकरूप आहेत हे म्हणताच करुणेला ते पटले नाही. तिने उत्तर दिले, "कृपा आणि ईश्वर एक असूच शकत नाही. बरे, तू अतिशय शहाणी असून ईश्वर कृपेला वश झाले असे कसे म्हणतेस ? पहिली गोष्ट अशी की ईश्वराला दुर्जपणाचा वारा मुळी सहनच होत नाही. अशा स्थितीत कृपेला वश होऊन त्याने अवतार घेतला व जीवोद्धरण केले असे म्हटले, तर त्याच्या 'सर्वकर्ते'पणाला बाध येतो."

यावर परा म्हणाली, "मी शहाणी व ज्ञानी आहे, हे तुझे म्हणणे खरे आहे. म्हणून तू घेतलेल्या आक्षेपाला मीच उत्तर देऊ शकेन. तुझ्या म्हणण्यावर एक मुद्दा असा मांडता येईल की, परमेश्वर 'उदास' असतो, मग त्याला सर्वकर्ता का म्हणावे ? पण त्या निष्काम ईश्वराला सर्वकर्ता का म्हणावे ते ऐक. परमेश्वर अवतार घेऊन उद्धरण करतो या अर्थाने तो सर्वकर्ता हे खरेच. तथापि जीवाची कर्मे साक्षीभूत होऊन तो पाहत असतानाहि त्याचे 'आत्मरमण' मात्र कधीच भंगत नाही. म्हणूनच तर 'सर्वसाक्ष तो' असे म्हटलेले आहे."

करुणेने पुन्हा आक्षेप घेतला, " पण ' निरभिमान ' ईश्वर कृपेला वश होणे कसे शक्य आहे ? असे होणे म्हणजे विरुद्धधर्म अंगी असणे होय. "

यावर परेने आवेशून उत्तर दिले, " होय, आणि असे विरुद्धधर्मित्व ईश्वराच्या ठिकाणी आहे. त्याचे वर्णन माझ्याशिवाय कोण करू शकणार ? आत्मरमण परमेश्वर विकरत नाही असे म्हटले तर श्रीचक्रधरांना तरी परमेश्वरावतार म्हणता येईल काय ? त्या आत्मरमणाने मायावेष धारण केला नाही तर मग जीवांना ज्ञान व प्रेम कोण देईल ? यासाठी आत्मरमणत्व मंगू न देताहि तो विकरतो, अवतार धारण करतो आणि ज्ञानप्रेमाने जीवोद्धरण-कार्य करतो. हे सर्व विरुद्धधर्मित्वामुळे ! " " हे विरुद्धधर्म कोणते " असे करुणेने विचारल्यावर परा म्हणते, " वस्तुतः परमेश्वर इतका श्रेष्ठ आहे की त्याला विकरण्याचे कारण नाही. तथापि आपल्या भक्तासाठी मात्र तो विकरतो. मी स्वतः निरभिमान असूनहि भक्तासाठी मात्र अभिमानी बनतो. हेच त्याचे विरुद्धधर्मित्व होय. विशेष हे की हे विरुद्धधर्म त्याच्याच अंगी असतात असे नाही तर त्याचे ज्ञानी व भक्तहि त्याचे आचरण करतात." असे म्हणून शाब्द ज्ञानात व अपरोक्ष ज्ञानात ज्ञानिये विरुद्धधर्मांचे आचारण कसे करतात ते विस्ताराने परा वर्णन करते, आणि आपला निर्णय सांगते की ' भणौनि जया ज्ञान दे जगजीवनु : तो मीशु नीर्वीकारु नीराभिमानु : मा तो परमेश्वरु आनंदघनु : तेथ काइ म्हणावे असे ? ' (११४२) अशा या विलक्षण विरुद्धधर्मांना कृपाच मुख्य कारण आहे. ती कृपा अव्यक्तात काय किंवा व्यक्तावतारात काय, नेहमी ईश्वराजवळ असते. त्याच्या स्वरूपाहून ती कधी वेगळी होत नाही.

या उत्तराने करुणेचे समाधान झाले नाही. तिने पुन्हा शंका काढली की ' कृपेवेगळा कैवल्यपती : नाहीं म्हणसी तुं जांणती : तरी सर्वातीतु हे श्रुती : न घटे म्हणा ? ' (११५९) " कृपा आणि ईश्वर वेगळे नाहीत तर मग ईश्वर ' सर्वातीत ' कसा ? " यावर करुणेला अडवण्यासाठी परेने मुद्दामच उलट प्रश्न विचारला की, " जे ईश्वरस्वरूप चराचरात नेहमी आत्मत्वाने असते, सर्व भूतात आत्मत्वाने राहून त्यांना उपकारभूत होते त्याला 'सर्वातीत' कसे म्हणता येईल ? " करुणेने लागलीच परेला अडवून म्हटले, " मग,

जे ईश्वरस्वरूप सर्वशून्य आणि गुणधर्मरहित आहे ते जीवाना उपकारभूत होते असे तरी तू कसे म्हणतेस ? " या आक्षेपावर सतुष्ट होऊन परा उत्तर देऊ लागली, " एका दृष्टीने पाहिले तर आपल्याच स्वरूपात नित्यव्यापकत्वाने असलेला परमेश्वर पिडब्रह्माडातहि सर्वात्मकतेने असतो, तेव्हा त्याला खरोखरच सर्वातीत म्हणता येणार नाही. पण तो सर्वातीत असतो तो त्याच्या ठिकाणी असलेल्या विरुद्धगुणधर्मित्वामुळे ! परमेश्वर 'सर्वात्मक' आहे यात शका नाही. कारण त्याच्याच इच्छेने त्याची आद्या शक्ति माया 'घटघटाभिमानी अनुस्यूत' आहे, सर्व भूतमानात व्यापलेली आहे. चैतन्यमायेच्या द्वारा कृपादृष्टीने जीवाकडे पाहून परमेश्वर त्याना वाढवितो हेहि त्याचे आत्मत्वाचेच वर्तन होय. व्यक्त असणार व्यक्त जीवाशीच आत्मत्वाने वागतो असे नाही तर अव्यक्ताचेहि वर्तन आत्मत्वाचेच असते. म्हणूनच अव्यक्त जीवाना निरानद स्थितीत पडलेले पाहून अव्यक्त ईश्वरस्वरूप कृपेने द्रवते, हे अव्यक्ताचे 'आत्मत्व' नव्हे काय ? साराश, 'तो व्यक्तीं अव्यक्तीं : निरनाथु निरपती : निरात्मनु आदिअर्ती : अनादिसीवु ' (१२९१)."

ईश्वराच्या 'आत्मत्वा'चे ( सर्वात्मकत्वाचे ) अशा रीतीने प्रतिपादन केल्यानतर मग त्याच्या 'अतीत्वा'चे (सर्वातीत्वाचे ) वर्णन परा वाणी करते. तिच्या म्हणण्याचा आशय असा की, ईश्वर जीवाच्या गुणात तादात्म्य पावतो तो सर्वात्मकत्वामुळे; पण त्याचे दोष तो पाहत नाही, त्या दोषापासून तो अलिप्त राहतो, हे त्याच्या 'अतीत्वा'चे कार्य होय. यावर कदाचित् असा आक्षेप घेतला जाईल की " सर्व भूतात नेहमीच आत्मत्वाने असलेला परमेश्वर जीवाच्या दु.खभोगाच्या वेळीच तेवढा 'अतीत' कसा असू शकेल ? अर्थात् त्यावेळी 'आत्मक'त्वामुळे त्यालाहि दु ख होत असले पाहिजे. " या आक्षेपावर उत्तर असे की " जो शुद्ध बुद्ध परमेश्वर आनद स्वरूप आहे, त्याला दु ख कसे होणार ? जो स्वतः जीवदेवताचा दुःखभोग नासतो त्यालाच स्वतःला—सर्वात्मकतेमुळे का होईना—पण दुःख होते हे म्हणणे बरोबर नाही. 'तैसे परब्रह्म परीपुर्ण : सर्वभुतीं असे सनातन : सुखदुखा नातळे आपण : अलीप्त अनादिचें' (१२९३). तेव्हा परमे-

श्वराचे हे विरुद्धधर्मित्व होय यात शंका नाही. " हे पटवून दिल्यानंतर मग परेने परमेश्वराच्या सर्वव्यापकत्वाचे सविस्तर वर्णन केले, आणि पुन्हा सांगितले की परमेश्वराप्रमाणेच परमेश्वराचे ज्ञानी भक्तहि सर्वात्मकत्वाने आणि सर्वातीतत्वाने आचरण करीत असतात.

आपण निरुत्तर होत आहोत हे पाहूनच की काय आता करुणेने निराळाच प्रश्न उपस्थित केला. परेचे मुख्य म्हणणे असे की ईश्वर व कृपा एकरूप आहेत. कृपेला वश होऊनच ईश्वर अवतरतो व उद्धरणकार्य करतो. यावर मूळे कुठार असा आघात करण्यासाठी करुणा म्हणते की 'चैतन्याचाचौनि परमपुरुषा ' व्यापारते नाहीं ॥ ऐश्वर्ये आदि करुनि मायासंबंध : सकळ धर्म निरुपीले परमानंदें : या वचना मानु देउनि कैवल्य पद : अवतारु धरीला ॥ मायेचेनि योगें मज पाता : सकळ धर्म दीसती उत्रमता : परी कृपेचें कार्ये सर्वथा : देखिजे ना ' (१५१८-१५१७) म्हणजे परमेश्वराची जी सर्व उद्धरणकार्ये होतात ती मायेमुळे, तेथे कृपेचे कार्य काहीच नाही. मग उगीच तिची प्रौढी काय सांगतेस ? "

•

करुणेच्या या आक्षेपातील बुद्धिमत्ता पाहून परा आनंदित झाली. तिने आक्षेपाबद्दल करुणेचे कौतुक केले आणि म्हटले, " या आक्षेपाचा परिहार मीच करू शकेन. हा परिहार असा ' परमेश्वराचे सगळे धर्म मायेमुळे असतात व कार्य करतात असे म्हणशील तर मी तुला विचारते की जीवाला कैवल्यपद प्राप्त झाल्यानंतर मग मायेचे काय शिल्लक राहाते ? खरे म्हणजे परमेश्वराने जीवाला प्राप्तीचे साधन दिल्यानंतर, म्हणजे ज्ञान दिल्या नंतर जीवाविषयी माया एकदम उदासीन होते. त्याच्या साध्याकडे तर ती पाहातहि नाही, पाहू शकतहि नाही. परमेश्वराच्या सान्निध्यात जीव ब्रह्मानंद भोगतात तेथे मायेचं कार्य असते असे म्हणणे चुकीचे आहे. आणि जीव ज्या ईश्वरस्वरूपात मिसळतात तेथे तर मायेचा प्रवेशहि नसतो. असे म्हणण्याला आधार काय म्हणून विचारशील तर सांगते. '*माया सबराते पातली तेथवि न पवे* ' हे परमेश्वराचेच वचन आहे ना ? सारांश, माया ही केवळ व्यापारती आहे. तिला स्वत ला तर ईश्वराचे दर्शनहि होत नाही. तेव्हा तिचा पाड काय ? ईश्वराचे जीवोद्धरणाचे जे कार्य दिसते ते सर्व कृपेचे

कार्य आहे याला प्रमाण असे की " तोचि परमेश्वरु निर्वेवो निराकारु असे : परि कृपावशें सावेवो साकारु होए : अवतरे : आपुलें सन्निधान दे : तें दास्य मोचक ".

हे ऐकून करुणेने परेला परमेश्वराच्या विरुद्धधर्मांचे स्वरूपलक्षण सांगण्याविषयी विनंती केली. परेने त्याचे सविस्तर वर्णन केले. ते ऐकून करुणा अतिशय संतुष्ट झाली. तिचे पूर्ण समाधान झाले. परेच्या ज्ञानाबद्दल व चातुर्याबद्दल करुणेने तिची खूप खूप प्रशंसा केली. " कृपा कारुण्य दोन्ही जगन्निवासें : स्वीकरीलीया ओष्टपुटांचिनि मीषें : जीव्हेचां ठाइं निरंतर असे : परा वाचा " म्हणून ओष्ठपुटांच्या ठिकाणी असलेल्या कृपा आणि करुणा यांचा, जिव्हेच्या ठिकाणी असलेल्या परा वाचेबरोबर झालेला काल्पनिक संवाद कवीने वर्णन केला; आणि नंतर पुन्हा श्रीमूर्तिवर्णनाचा धागा हातात घेतला.

## श्रीमूर्तीच्या इतर अवयवांचे वर्णन

श्रीचक्रधरांच्या ओठावर झळकणारे मंदहास्य, जिव्हा, मुखातील तांबूल आणि त्याची पीक यांचे वर्णन करून ( १७३६–१७४६ ) वरच्या ओठावर शोभून दिसणाऱ्या मिशांचे वर्णन केले आहे. ( १७४७–१७५१ ) नासापुटांचे भाव वर्णन करतांना कवीला श्रोत्यांचे स्मरण झाले. म्हणून श्रोता व वक्ता यांचे वर्णन त्याने १७५२ ते १८२७ या ओव्यात केले. आणि नंतर नासावंशवर्णनाला सुरवात केली. ते संपल्यावर कपोलद्वय ( १९५८–१८६४ ), नेत्रकमळे ( १८६५–१८८५ ), भिवया, डाव्या भिवईवरील कांटी ( १८८६–१८९९ ), भालप्रदेश, त्यावरील पत्रवेली व श्रीमुगुट (१९००–१९२० ), पुष्टिविभाग ( १९२१–२३ ), कर्णद्वय ( १९२४–३१ ) आणि अगावरील बाहिरवास, फुटा व टोपरे यांची वर्णने कवीने केली ( १९३२–१९४८ ). अशा रीतीने आसनावर उपविष्ट झालेल्या सालंकृत चक्रधराचा पूजावसर करण्याला नागाम्बिकेने आरंभ केला. पाल्मांड्यात पाच वाती उजळून 'जयजय परममंगळा परमनिधाना' ही आरती म्हणत

म्हणत तिने चक्रधराना ओवाळले (१९४९–१९७०). त्यावेळी नागाम्बिकेच्या शरीरावर प्रगट झालेल्या आठहि सात्त्विक भावाचे वर्णन कवीने फारच बहारीने केलेले आहे (१९७१–२०२४). पूजाप्रसंग आटोपल्यानंतर बाइसाने म्हणजे नागाम्बिकेने स्वामींना करून दिलेल्या फोडींचे व विड्याचे वर्णन आलेले आहे. (२०२५–२०३१). यानतर कवीने चक्रधराच्या आरोगणेचा प्रसंग वर्णिला आहे (२०३२–२०३९). ही आरोगणा अर्थात् सायंकाळची होय. कारण त्यानंतर शयनासनावर शयन करून त्यानी निद्रा केली तो 'पस्यात् पाहारु जाला' (२०४३). आणि येथे कवीने पुन्हा फार मोठे विषयांतर केलेले आहे. हा 'पस्यात् पाहार' म्हणजे जणु ईश्वराला झालेली सृष्टिरचनेची प्रवृत्ति असे सागून कवीने सृष्टिरचनेचे, विशेषतः जीवाने केलेल्या मळरचनेचे वर्णन केलेले आहे (२०४३–२०६७). अशा सकाळच्या वेळी श्रीचक्रधर जागे होऊन व प्रातर्विधि आटोपून आसनावर उपविष्ट होतात तोच त्यांच्या समोर भक्तजन येऊन बसले. त्यानी स्वामींना निरूपण करण्याची विनती केली. नागदेवाने विचारले 'जी तूतें अनुभवावे कवणे द्वारें : ते मजप्रति सवीस्तरें : गोसावीं निरूपावे' (२०७७).

## चक्रधराचे निरूपण : असतीपरीचा आचारधर्म

भक्तजनाची ही विनंती ऐकून चक्रधरस्वामी निरूपण करू लागले. या निरूपणाचा भावार्थ असा की ईश्वराला म्हणजे मला, माझ्याच ज्ञानाने व भक्तीने प्राप्त करून घेता येईल. त्यासाठी सर्वस्वाने मला अनुसरून माझे वचन परिपालण करावे, असतिपरी आचरावी, दृढ वैराग्य करून सतत माझे चिंतन करावे. 'ऐसा भक्ति पुरस्करु : तोचि माते पावे नरु : मग मी उदारदेवदीक्षागुरू : त्या आपणपें दे' (२०७८–२१३६). वैराग्य मार्गात विकाराचा त्याग फार महत्त्वाचा आहे. हे विकार आणि विषयोपभोग जीवाना मोहवितात (२१३७–२२४३). त्यांची सेवा केली तर जीवाना नाना प्रकारचे नरक भोगावे लागतात. स्त्रीभोगामुळे, सुखदायनामुळे, (२२४४–२२६९), स्वार्थपर सुरसभोजनामुळे (२२७०–२२८८) सुगंध-सेवनामुळे (२२८९–२३०५), वस्त्रप्रावर्णामुळे (२३०६–२३१६),

राज्यसुखोपभोगामुळे (२३१७–२३४५) आणि इंद्रियोपभोगामुळे (२३४६–२३५०) कोणकोणते नरक प्राप्त होतात आणि तेथे कशी कशी दु खे भोगावी लागतात याचे अगावर शहारा आणणारे वर्णन चक्रधरानी भक्तासमोर केले. *आणि हे टाळायचे म्हणजे असतीपरी आचरली* पाहिजे असे सागितले. हा असतीपरीचा आचारधर्म (२३५१–२४६५) सविस्तर निरूपण करून विषयवैऱ्यावरोवर साधकाने कसे युद्ध करावे याचे रूपकाच्या साह्याने त्यानी अतिशय सुदर वर्णन केले (२४६६–२५०५).

## देवताफळे अनित्य : हंसावतार ब्राह्मणमृतपुत्रआख्यान ·

यानतर चक्रधराचा एक महत्त्वाचा सिद्धात, की देवताफळे अनित्य आहेत, नित्यफळ काय ते एका परब्रह्म परमेश्वराचेच, याचे निरूपण सुरू झाले. ब्रह्मा देवतेचे अनधिकारित्व स्पष्ट करण्यासाठी त्यानी हसावताराची हकीकत सागितली आणि शेषशायी देवतेचे हीनत्व दाखविण्यासाठी ब्राह्मण मृतपुत्राचे आख्यान सागितले. (२५०६–२६५५). श्रीकृष्णाने अवतार धारण केल्यानतर त्याची अतिशय सुदर मूर्ति पाहून शेषशायी भगवानाला फार आनद वाटला. त्याने आपली पत्नी जी लक्ष्मी, तिच्याजवळ श्रीकृष्णाच्या सौंदर्याचे वर्णन केले. त्यामुळे तिला वेध सचरला. श्रीकृष्णाचे दर्शन मला घडवा म्हणून तिने पतीजवळ आग्रह धरला तेव्हा शेषशायीने एक युक्ति *केली. द्वारकेतील एका ब्राह्मणाची मुले जन्मताक्षणीच तो घेऊन येऊ लागला.* अर्थात ती बालके मरू लागली. यामुळे शोकविव्हळ झालेल्या ब्राह्मणाच्या बालकाचे रक्षण करण्याची प्रतिज्ञा अर्जुनाने केली. पण त्याला ती पाळता आली नाही. म्हणून तो अग्निकाष्ठे भक्षण करण्याच्या तयारीला लागला. पण श्रीकृष्णाने त्याला थोपवून धरले. मग श्रीकृष्ण अर्जुनाला घेऊन क्षीराब्धीला गेले. तेथे शेषशायीने त्याची षोडशोपचारे पूजा करून ब्राह्मणाची बाळके परत दिली. आपण हे सर्व, लक्ष्मीला आपले दर्शन घडावे म्हणून *केल्याचे त्याने निवेदन केले. साराश, असे हे अचिंत्य ब्रह्म म्हणजे* क्षीराब्धीचा शेषशायी भगवान, पण त्यालाहि परमेश्वराच्या सुखाचा शोध लागला नाही.

## माझे ज्ञान व प्रेम देणारा मीच

याचप्रमाणे अष्टभैरव, निरुरूप देवता व चैतन्यमाया ह्या सर्व देवता कैवल्य प्राप्त करून देऊ शकत नाहीत असे सांगून (२६५६–२६६४) शेवटी माझे ज्ञान व प्रेम देणारा मीच, अर्थात्, ईश्वराचे ज्ञान व प्रेम देणारा परमेश्वरच हा मुख्य सिद्धांत त्यांनी निरूपण केला. (२६६५–२७१०). आणि आपले ज्ञानरहस्य अपात्राना न देण्याचे वारवार बजावून सांगितले. (२७०२–२७५८) याप्रमाणे निरूपण करून "ऐसे बोलौनि जगन्नाथें : बीजें केलें उत्तरापथें : उद्धरावया आर्त जनातें : सनध देउनिया :"

## नागार्जुनाची विरहावस्था व शोक

चक्रधरस्वामींनी उत्तरापथे बीजे केल्यानंतर नागार्जुनाची जी विरहावस्था झाली व त्याने जो शोक केला त्याचे वर्णन हा या काव्यातील शेवटचा आणि फार बहारीचा प्रसंग आहे.

> बीजें केल्या श्रीचक्रधरा : डोळया सुटलीया धाग :
> आत्मयाची गजबज थोर : तें सांघों नेणिजे
> आसुइं शुद्दीजले लोचन : दाही दीसा धावे मन :
> वाचेसि न ए आन : श्री चक्रधरवाचौनिया
> इद्री ठायें सांडिले : श्रवण आइको विसरले :
> सर्वांगी वीकळ गेले : देवेंवीण

*अशी नागदेवाचार्यांची अवस्था झाली. भिक्षा मागायला गेल्यानंतर देखील* "श्री चक्रधरु दया" असेच उद्‌गार त्यांच्या मुखातून बाहेर पडू लागले. आपल्याला परमेश्वराने का सोडले म्हणून तो शोक करू लागला आणि अशा विरहावस्थेत भटका तो कुठे जाऊन पडला हे कोणालाच कळले नाही. त्याचा शोध करीत करीत म्हातारी महदंबा "दरे दरकुटें डोंगर : सीळातळें वाळुवटें गीरीवर : कपाटें कोल्हेके अपार : रमौनि" रिद्धपूरला जाऊन पोचली. तिने श्रीप्रभूंना विचारले तेव्हा त्यांनी मानसेंड्याजवळ चौकशी करण्यासाठी तिला पाठवले. महदंबा तिकडे निघाली.

मार्गी चाल्ता उल्हासे : ग्रामज्नातें पुसे बहुते आवेशे :
आल्या कन्हणी वेटपीसे : देखिल नाही

तिला गवळ्याच्या काही मुलानी सांगितले की, 'आई तुम्ही सांगता तसा एक पुरुष पलीकडील दरडीजवळ पडलेला आहे. आम्ही नेहमी त्याच्या तोंडात कुरुधने पिळीत असतो. तो मधूनच आपला आपल्याशी बोल्तो तव्हा श्रीचक्रधरु असे शब्द त्याच्या मुखातून बाहेर पडतात' हे ऐकून महदंबा तिकडे लगबगीने गेली. 'तव पुढा देखिलें पुण्य शरीर : अवधुतांचें'

देवाचेनि सनिधानेंवीण : जीवज्योति झिळमिळीत दीसे क्षीण :
हृदइ एकवटले पचप्राण : बाहीर नीगावेया
अर्धांगीं बोळवे लागले : ते हातेंकरुनि माहादाइसीं झाडिले :
मग उचलुनी पोटेंसी धरीलं : नागार्जुनातें

आणि गद्गद वाणीने म्हटले, 'नागदेया नागदेया : तुज गोसावी पाचारिताती :' हे ऐकताच नागदेवाने डोळे उघडले आणि विचारले, 'गोसावी ते कवण' महदंबेने सांगितले 'श्रीप्रभु ब्रह्म नीर्गुण' हे ऐकून नागदेवाने म्हटले, "काद परिखील पद्धीस्य अवतारु : माझा होआवा श्रीचक्रधरु : जो सकळ गुणभरीत" आणि असे म्हणून नागदेव पुन्हा मूर्छित झाला. म्हातारीने त्याला उचलून एका गावी आणले, त्याला दूध पाजून सावध केले आणि मग दोघेहि हळूहळू रिद्धपुरला येऊन पोचले आणि श्रीप्रभूना भेटले. 'तया साष्टांगीं घालुनी दंडवतें : दास्य करीति सेवकजने समस्तें : परि नागार्जुन श्रीचक्रधरातें : वीसरेचि ना' अशा नागदेवाचार्यांचे वर्णन करून आपल्या काव्याचा कवीने उपसंहार लिहिला.

ऐसा साळांकृत सर्वेश्वरू : नागार्जुनाचा दातारू :
हृदइ ध्याइला श्रीचक्रधरु : जो जीवन सतांचें
तो सुभमगळाकारू सनीजु : नागांबेचा आत्मा नीजु :
मीया वर्णिला म्हणे मुनी केशिराजु : प्रभू स्वामी माझा

(२०५१)

## समालोचन : कथानकाचा स्थूल देह

मूर्तिप्रकाशातील विषयाचा आराखडा थोडक्यात असा आहे. त्यावरून लक्षात येईल की प्रस्तुत काव्य हे काही कथाकाव्य नाही, तर केवळ वर्णनपर काव्य आहे. तथापि कवीने ते एखाद्या कथाकाव्याप्रमाणे वर्णन केले आहे. 'ऐसें अधराचें वीत्पान्न : मिया वीसेखलें अती गहन : साउमें असे कथा–अनुसंधान : ते जाण अवधारीतु' (१७३१), 'हे सांघतां सवीस्तारें : कथा चालैल पसरें' (१३१५) हे व असे जे अनेक उल्लेख कवीने ठिकठिकाणी केलेले आहेत त्यावरून हे दिसून येईल. याचा अर्थ मूर्तिप्रकाश हे कथाकाव्य आहे असा नव्हे, तर कथाकाव्याची गोडी त्यात त्याने आणण्याचा प्रयत्न केलेला आहे, एवढेच. हा प्रयत्न पूर्णपणे यशस्वी झालेला नाही, असे मला वाटते. याचे एक मुख्य कारण हे आहे की कवीने आपले लक्ष केवळ काव्यविषयावर केंद्रित केलेले नाही. मधून मधून त्याने विषयांतर केले आहे. आणि ते देखील काव्याच्या दृष्टीने कंटाळवाणे होईल असे विषयांतर आहे. याचे उत्कृष्ट उदाहरण म्हणजे आपल्या काव्यात त्याने घातलेला परा–करुणा संवाद. दोन ओठ म्हणजे कृपा आणि करुणाशक्ती, व जिव्हा म्हणजे परा वाणी एवढेच वर्णन करण्याच्या निमित्ताने कवीने शास्त्रचर्चेचा केवढा अनावश्यक पसारा घातला आहे. या संवादाने काही नाही तरी सुमारे १ हजार ओव्यांचा प्रांत व्यापलेला आहे. श्रीमूर्तीचे वर्णन करीत असताना या शास्त्रचर्चेची काहीहि गरज नव्हती. हा सगळाच भाग कवीने जबरदस्तीने घुसडलेला आहे. शास्त्र-पुरुषाने कविताकामिनीवर केलेला हा बलात्कार होय असे मला वाटते. हा प्रसंग घातला नसता तर प्रस्तुत काव्य सुटसुटीत झाले असते.

शास्त्रचर्चेची आत्यंतिक आवड हा केसोबासाच्या स्वभावाचा एक विशेष असल्याचे आपण त्याच्या चरित्रात पाहिले आहे. त्याच्या ह्या आवडीमुळे हा प्रसंग येथे ओढवला असे म्हटले तर ते चुकणार नाही. बरें केसोबासाला ही शास्त्रचर्चा येथे घालावयाचीच होती तर ती थोडक्यात घालता आली नसती काय ? मला असे वाटते की कवीने विवेकपूर्ण संयम राखला असता तर दोनदोनशे ओव्यात ही सगळी चर्चा त्याला सहज व

सुलभ रीतीने मांडता आली असती. परेने केलेली आत्मप्रशंसा आणि करुणेने केलेली परेच्या शास्त्रज्ञानाची व सामर्थ्याची प्रशंसा ही या संवादात अनेकदा पुनरुक्त झालेली आहे. ज्ञान व भक्ति या मार्गांच्या आचारधर्मांच्या वर्णनाचीहि पुनरुक्ति झालेली आहे. हे सर्व टाळणे आवश्यक होते.

ब्राह्मण–मृत–पुत्राच्या आख्यानासंबंधीहि असेच म्हणता येईल. ते आख्यान मुळातच सरस आहे ही गोष्ट खरी. पण शेषशायी देवतेची किंवा तिच्या फळाची अनित्यता दाखवण्यासाठी त्याचा फारसा उपयोग होत नाही. त्यामुळे फार झाले तर श्रीकृष्णाच्या अलौकिक सौंदर्याचे वर्णन होऊ शकेल. पण शेषशायी देवतेला ब्रह्मसुखाचे ज्ञानहि नाही हा आशय त्या कथेतून काढणे फार कठीण होईल. त्या ठिकाणचा मुख्य विषय देवताफळाची अनित्यता हा होय. तो त्या कथेच्या योजनेमुळे पोसला जाऊ शकत नाही. आणि म्हणून मला ते आख्यान अनावश्यक वाटते. हे दोन्ही प्रसंग (परा–करुणा संवाद आणि ब्राह्मणमृतपुत्र आख्यान) वगळले असते तर काव्याच्या कथानकाला नीटसपणा आला असता.

## काव्यात्मकता : भावनाशीलता

कथानकाच्या या वेढबपणाकडे दुर्लक्ष केले तर 'मूर्तिप्रकाश' हे एक कल्पनाप्रचुर व भावमधुर काव्य आहे असे म्हणता येईल. हे चक्रधराच्या मूर्तीचे, त्याच्या अवयवाचे वर्णन आहे हे खरे आहे. पण ते भावनेच्या बैठकीवरून केलेले आहे. भक्त भगवताकडे नेहमीच भावनेच्या डोळ्यातून पाहत असतो. ते भावनेने भरलेले डोळे व अंतःकरण कवीच्या जवळ आहे. त्याचा स्वाभाविक उद्गार म्हणजे प्रस्तुत काव्य होय. 'बोलौनि **भगती** प्रेमा आगळी आवडी आणीन मनाजवळी' (१७७); 'सबदसुर्याचेनि प्रकासें फेडीन अज्ञानाचें कडवसें : पदीं **भावो** दावीन गोडिसे : सीधात मुद्रेचे' (२५८); 'तेसें सखोल **भाव** दावीन ओटपुटीं : म्हणे कवी रसाळु' (७४८). यावरून कवीच्या भावनाशीलतेची कल्पना येईल.

कवीच्या ठिकाणी असलेल्या या विशिष्ट गुणामुळेच काही प्रसंगांना अवीट गोडी आलेली आहे. याची दोन अतिशय सुंदर उदाहरणे या ठिकाणी

देता येतील.१ पहिला प्रसंग म्हणजे चक्रधरांच्या पूजावसराचा आणि दुसरा प्रसंग, चक्रधरांनी बीजे केल्यानंतर नागदेवाला भरलेल्या विरहावस्थेचा. नागांबिका ही स्वामींची भक्त होती. त्यामुळे आधीच तिचे अंतःकरण स्वामीविषयीच्या भक्तिभावाने भारावलेले होते. तशात केसोबासासारख्या भावकवीने तो प्रसंग शब्दचित्रित केलेला असल्यामुळे त्यातील ओवीओवीतून उत्कटता ओसंडून वाहत असलेली दिसते. जी गोष्ट नागांबिकेची तीच नागदेवाचार्यांची. त्याच्या विरहावस्थेचे, आणि विशेषतः महाराष्ट्रसेने केलेल्या त्याच्या शोधाचे व त्याप्रसंगी नागदेवाकडून व्यक्त झालेल्या आत्यंतिक चक्रधरनिष्ठेचे दर्शन कवीने उत्तम रीतीने घडविलेले आहे. अशी भावमधुर स्थळे या काव्यात अन्यत्रहि सापडतील. त्यासाठी डोमेग्रामच्या वर्णनाकडे अंगुलिनिर्देश करणे पुरेसे होईल.

## कल्पनाशालित्व

केसोबासाचा दुसरा महत्त्वाचा गुण म्हणजे त्याचे कल्पनाशालित्व. कल्पनाशालित्व हे नवनवोन्मेषशालिनी प्रतिभेचे प्रधान अंग होय. त्यावरून कवीचे अंतरंग, त्याचे सूक्ष्मावलोकन, जीवनानुभूति, बहुश्रुतता आणि चपल बुद्धिमत्ता याची उत्तम ओळख पटते. केसोबासाच्या ठिकाणी हा गुण विशेष प्रकर्षाने नांदत आहे. प्रस्तुत काव्याचा कोणताहि प्रसंग पाहिला तरी त्यात कवीच्या कल्पनांचे विलोल नर्तन पाहावयास सापडेल. कोणताहि एखादा साधा प्रसंग कवी आपल्या प्रतिभेतून स्फुरलेल्या नवीन नवीन कल्पनांनी कसा हृद्य व रमणीय करून सोडतो याची उदाहरणे या काव्याच्या पानोपानी विखुरलेली आहेत. उपमा, उत्प्रेक्षा आणि रूपक हे कवीचे आवडते अलंकार होत आणि यांच्याच द्वारा त्याचे कल्पनावैभव प्रगट झालेले आहे.

## उपमा-उत्प्रेक्षा

पैकी उपमा ह्या तर सर्वत्र विखुरलेल्या आहेत. त्या वाचतांना आपण तराव्या शतकातील काव्य वाचीत आहो हे मात्र अवश्य लक्षात ठेवले पाहिजे. उदाः—

> जेमे बाळकाचे बोल बोबडे : आइकौनि माएबापा तोखु पडे
> मग उगमीय घेउनि कोडे : लाडवीताती
> तैसा मी अबोधु अज्ञानु : न हे जाणता सज्ञानु
> परी झळकला लेचनु : गुरुकृपेचा (८७-८८)

ही सुंदर उपमा अनेकांनी वापरली असली तरी केमोबासाच्या काळात व काव्यात ती नवीनच होती हे विसरता कामा नये.

> ना तरि आपुलाला ठायि थोरु : दीपदीवटीया बोल्ती बडीवारू
> जव नुदैजे दीनकरू : प्रकाशसहळ
> तैसे चातुर्य सामर्थ्यातव : सकळ ग्रंथ भोगीती गर्व
> जव मूर्तिप्रकाशाचे भाव : डोळा न देखती. (१९२, १९३)

ही सुद्धा अशीच एक सहजसुंदर पण समर्पक उपमा आहे. 'परीसा सात्वीकाची मुद्रा : जैसे भरिते चढे प्रेमरत्नाकरा : तैसी आसुवे येती नेत्रा : आरद्र म्हणौनिया (१९७१); "जैसा आनंदाचा घन वरीखला : तैसा स्वेद ये कपोल" (१९७४); "जेसे प्रबोधवसंताचीया सीतळता : आसुरलेया प्रेमलता : तैसे रोमाच दीसती मज्ञ पाता : सर्वांगी जे" (१९७७). अशी किती तरी उदाहरणे देता येतील.

पण उपमेपेक्षा उत्प्रेक्षावर कवीचा जोर अधिक आहे. उत्प्रेक्षाचा ठिकठिकाणी त्याने नुसता पाऊस पाडलेला आहे. उदा:—डोमेग्राम नगराचे वर्णन करताना कवि सागतो.

> जैसे लावण्याचे नीनद उतरले : कीं श्रींगारें उपेंणें केले
> तैस नगर देखिलें : भक्तवृंदीं (३८२).

(येथे जैसे = जणु) असा आरंभ करून पुढे कवीने उत्प्रेक्षाची एक माळच तयार केलेली आहे. कवी सागतो—

> कीं आनंदाचीया सगती : मदनें मळयानीळेसी केली वस्ती
> कीं सुखचि आले व्यक्ती : दु:ख नाशावेया
> कीं तें प्रेमाचें पुर : मोक्षाचें माहेर
> कि मुक्तीचें मंदिर : प्रतक्ष जालें

असे काहींचे म्हणणे आहे. तथापि त्याबाबतीत केसोबास आधी आणि नंतर भास्करभट्ट होऊन गेला याविषयी माझ्या मनात शंका नाही. ते कसेहि असले तरी मूर्तिप्रकाश आणि भास्कराची उद्धवगीता व शिशुपाळवध ही काव्ये यात अनेक ठिकाणी असलेले विलक्षण साम्य पाहण्यासारखे आहे. त्यावरून काय ते वाचकांनी स्वतः ठरवावे —

| मूर्तिप्रकाश | शिशुपाळ-वध |
|---|---|
| १ कृपावसें सुद्ध चेतन्याची अवगणी<br>जीवाकारणें अंगीकरी<br>श्रीचक्रपाणी ॥१६७९॥ | घेउनि चैतन्याची गवसणी<br>द्वारका केली माहातीर्थ चरणीं<br>तया नमो श्रीचक्रपाणी<br>कैवल्यनाथा ॥३॥ |
| २ मज नाहीं मतीची प्रबळता<br>तुतें वर्णावया चैतन्यनाथा<br>परी जीवा होतसे आर्ति<br>स्तुति करावया ॥८५॥<br><br>नाही ज्ञानाच पुरतेपण<br>वर्णावया श्रीमूर्तीचे गुण<br>परी अल्हादु होतसे मना<br>स्तवनालागी ॥८६॥ | मज नाही मतीचा प्रकाशू<br>केवि वर्णु राणा परेशू<br>परी जीवा होत असे उल्हासू<br>स्तुतीलागी ॥१३॥ |
| ३ आता साहित्याचेनि रसें<br>श्रींगाराचेनि घुमुकुसें<br>प्रबंध नाचवीन उल्हासें<br>कवीजनाचे ॥१८४॥ | साहित्याचेनि परिमळें<br>शृंगाराचेनि मेळें<br>प्रबंध होती माताबळे<br>कविजनाचे ॥१५॥ |
| ४ सरिसीं सुढाळें<br>वोवीजती मुक्ताफळ<br>तऱ्ही ग्रथींचीं अक्षरें सोहळ<br>तयापासौनि ॥१८५॥ | मोतियाचे घोसें<br>राविलें कुंकुम-रसें<br>तऱ्हीं न एति करू सरिसें<br>प्रबंधेंसीं ॥१७॥ |

कीं ते विचाराचें वेलाउळ · वीवेकाची पग्साळ
कीं ज्ञानाच गौळ · सनादले ( ३८३–३८५ )

इत्यादि. अशा १५–२० उत्प्रेक्षा मागोमाग आलेल्या आहेत. मूर्छित पडलेल्या नागदेवाचेहि वर्णन असेच बहारीने कवीने केलेले आहे. उदा —

माहादाइसीं नार्गीद्रात देखिलें : त मज कैसें गमले
आदरें साधैन भाव सरोलें विन्हया पुरुखासी (३००५)

असा आरंभ करून कवी सांगतो

*जैसी ब्रह्मवीयेचा यत्री वोढुनि काढिजे वैराग्याची सरी*
तैसे भाव दीसती देहावरी योगींद्राचया
कीं प्रबोधाचया आगिटा सयमे माहातपा ताव दीधला विराम
अवस्था ओपरूले लावुनि आणिला महिमे · जीव जावुनढु

वगैरे. अशा अनेक सुंदर उत्प्रेक्षा या काव्यात आहेत.

## रूपकालंकार

उपमा–उत्प्रेक्षाप्रमाणेच सुंदरसुंदर रूपकेहि कवीने सर्वत्र योजिली आहेत. त्याची उदाहरणे किती द्यावयाची? दोन तीन देतो. भक्तिवत्सल श्रीचक्रधरावर 'तो त्रिलय-व्याधी-वीनाशनु सनिपात भैरउ भवभजनु *भवरोगातें निमातु आणीक नेणे*' (१२४) हे व *याप्रमाणे अनेक औषधी* रसाची रूपके कवीने केलेली आहेत ती पहावी विषयवैऱ्यांबरोबर ज्ञानियाने करावयाचे युद्ध वर्णन करीत असताना एक लांबच लांब साग रूपक कवीने वापरलेले आहे. एखाद दुसरी फुटकळ रूपके तर कोठेहि आढळतील. ती मुद्दाम दिग्दर्शित करण्याची गरज नाही

## इतर कवींवर परिणाम

केसोबासाचे हे अलंकारवैभव पाहिले म्हणजे मनाला आनंद वाटतो. कित्येक ठिकाणी त्याचा अतिरेक झाला आहे हे खरे. आपल्या उत्तरकालीन कवीवर, विशेषत भास्करभट्ट बोरीकरावर या सर्वांची फार छाप पडलेली दिसते. भास्करभट्ट आधी होऊन गेल्यामुळे त्याचीच छाप केसोबासावर पडली

असे काहींचे म्हणणे आहे. तथापि त्याबाबतीत केसोबास आधी आणि नंतर भास्करभट्ट होऊन गेला याविषयी माझ्या मनात शंका नाही. ते कसेहि असले तरी मूर्तिप्रकाश आणि भास्कराची उद्धवगीता व शिशुपाळवध ही काव्ये यात अनेक ठिकाणी असलेले विलक्षण साम्य पाहण्यासारखे आहे. त्यावरून काय ते वाचकांनी स्वत ठरवावे —

| मूर्तिप्रकाश | शिशुपाळ-वध |
|---|---|
| १ कृपावसें सुद्ध चैतन्याची अवगणी<br>जीवाकारणें अंगीकरी<br>श्रीचक्रपाणी ॥१६७९॥ | घेउनि चैतन्याची गवसणी<br>द्वारका केली माहातीर्थ चरणीं<br>तया नमो श्रीचक्रपाणी<br>कैवल्यनाथा ॥३॥ |
| २ मज नाहीं मतीची प्रबळता<br>तुतें वर्णावया चैतन्यनाथा<br>परी जीवा होतसे आर्त्ति<br>स्तुति करावया ॥८५॥<br><br>नाही ज्ञानाचे पुरतेपण<br>वर्णावया श्रीमूर्तीचे गुण<br>परी अल्हादु होतसे मना<br>स्तवनालागी ॥८६॥ | मज नाही मतीचा प्रकाशू<br>केवि वर्णु राणा परेशू<br>परी जीवा होत असे उल्हासू<br>स्तुतीलागी ॥१३॥ |
| ३ आता साहित्याचेनि रस<br>श्रींगाराचेनि घुमुकुसें<br>प्रबध नाचवीन उल्हासें<br>कवीजनाचे ॥१८४॥ | साहित्याचेनि परिमळ<br>श्रृंगाराचेनि मेळे<br>प्रबध होती माताचळे<br>कविजनाचे ॥१५॥ |
| ४ सरिसीं सुढाळें<br>वोवीजती मुक्ताफळ<br>तऱ्ही ग्रथींचीं अक्षरें सोहजळे<br>तयापासौनि ॥१८५॥ | मोतियाचे घोस<br>राविलें कुकुम-रसे<br>तऱ्हीं न एति करू सरिसें<br>प्रबधेंसीं ॥१७॥ |

| | |
|---|---|
| ५ वर्णिता लावण्यनीधी लक्ष्मींमातु<br>बोल नोलाचा धरुनि हातु<br>आनंदें दादील चाले मलपतु<br>सीधातमार्गों ॥५०६॥ | वर्णिता कान्ह चौहात मल्लु<br>योडव होत असे नवलु<br>बोल रसें टाटिलु<br>नाचतु दीसे ॥२१॥ |
| ६ तीय कवीतिची रसवृती<br>आकौनि कोकीळा कुजा लागती<br>देखौनि पारुखे गती<br>राजहसाची ॥१८९॥ | पुण वाचा रसाळा<br>गर्वू साडवीन कोकिळा<br>कळहसा अवकळा<br>करीन मा ॥२७॥ |
| ७ कीं तया स्वर्गी करीता अवस्थान<br>न पीरेचि कळकपण<br>भणौनि टाकौनि आला श्रीचरण<br>देवरायाचे ॥५५७॥<br>कीं दीनकरू राहोभेण<br>श्रीचरणीं रीगाला शरण<br>म्हणे नीवारिं जी जन्ममरण<br>देवसीरोमणी ॥५५८॥<br>का ते उग्रेत्त करीता श्रमले<br>सूर्यान्कि सेन्यहीन जाले<br>ते फळ साडौनि सीण सागों आले<br>कर्णाजवळीं ॥१९३१॥ | तो सीणू साराँ एक्षाए हृषीकेंची<br>सर्व जैसा ॥३९॥<br>कि राहोभेण चद<br>टाकूनि एताए यादवनरेंद<br>तैसा वीतकिला मुनींद<br>सकळ जनीं ॥४०॥ |
| ८ तेथ मुनीजन मधुकर<br>पीउनि मकरदाची मदिरा<br>धुमाडि करीताति नीरतर<br>रुक्षि घाल्तिाति ॥१९१७॥ | मग्नमोगरेयाचा धाब्रा<br>पीउनि मकरदाची मन्रिा<br>धुमाडु करीति मधुकर<br>रुक्षि घालीति ॥९८७॥ |
| ९ तया नीरुपमा नीराकारा<br>उपमा देइजैल श्रीचन्घरा<br>तरी कोपतील अनुचर<br>ब्रह्मवीद ॥१४६॥ | तया नीरुपमा परब्रह्मा<br>जरि दीजैल उपमा<br>तरि कोपतील आम्हा<br>वेदानिद ॥३६ |

१० रुपाचा आकारु
देखोनि लक्ष्मीये सचरला निकारु
मग चाळिला घराचारु
प्रभुरायाचा ॥५१२॥

जया देवाची श्रीमूर्ति
देखौनि पाठीं धावे वेधवती
ते अव्हेरिता कैवल्यपती
वळिया घर रीगाली ॥५१८॥

रुपाचिया भुली
जेआ लक्ष्मी वालभैली
वळिया घर रीगाली
१अव्हेरिता ॥३६९॥

११ तया देवाचा जाघोवा
लाहावया साधैजे अनगु बरवा
जयाचेया यकाही अवेवा
उपमा नाहीं ॥५१५॥

श्रीकृष्णाचा जानिवा होइजे
तरि लावण्याचे पडप लाहिजे
म्हणौनि मदनू साधैजे
लेकरुपणालागि ॥३७०॥

१२ देखौनि मूर्ति चापेगौर
वैराग्य जालें कामातुर
ब्रह्मवीद्या नीरतर
जवळिचि असे ॥५१३॥

देखौनि रुप सावळे
वेराग्य कामकळा पाल्हैले
पुरुषा उपजति डोहळे
कामिनीपणाचे ॥३७१॥

देखौनि मूर्ति उघडी
ब्रह्मविद्या डोळे मोडी
मुक्ति वावे उघडी
पाठोवाटीं ॥३७२॥

मूर्तिप्रकाश व शिशुपाळवध यातील ही साम्य स्थळे झाली. मूर्तिप्रकाश व उद्धवगीता यात तर याहून कितीतरी अधिक साम्यस्थळे आहेत. ती पाहा—

| मूर्तिप्रकाश | उद्धव-गीता |
| --- | --- |
| १ ब्रह्मवीद्येची पुरवी तवणी<br>आर्त जनासीं ॥१०९७॥ | पडिलेया ससाराचीए अडणीं<br>जो पुरवी ब्रह्मवीद्येची तवनी ॥४॥ |

| | |
|---|---|
| ५ वर्णिता लावण्यनीधी लक्ष्मीकांतु<br>नोल बोलाचा धरुनि हातु<br>आनंदें दादील चाले मलपतु<br>सीधातमार्गें ॥५०६॥ | वर्णिता कान्ह चौहात मल्लु<br>घोड्र होत अस नवलु<br>बोल रसें टाद्दिलु<br>नाचतु टीसे ॥२१॥ |
| ६ तीय कवीतेची रसवृती<br>आइकौनि कोकीळा कुजा लागती<br>दखौनि पान्ये गती<br>राजहसाची ॥१८९॥ | पुण वाचा रसाळा<br>गर्वू सान्वीन कोकिळा<br>कळहसा नवकळा<br>करीन मा ॥२७॥ |
| ७ की तया स्वर्गीं करीता अवस्थान<br>न फीटेचि कळवपण<br>भणौनि टाकौनि आला श्रीचरण<br>दवरायाचे ॥५५७॥<br>कीं दीनकरू राहोभेण<br>श्रीचरणीं रीगाला शरण<br>म्हणे नीवारिं जी जन्ममरण<br>देवसीरोमणी ॥५५८॥<br>का त उदोस्त करीता श्रमले<br>सूर्यान्कि सेदपीन जाले<br>त फळ सानौनि सीण सागा चाले | तो सीणू साधां एताए ह्रषीकेशी<br>सूर्य जैसा ॥३९॥<br>किं राहोभेण चद्द<br>टाकूनि एताए यादवनरेंद्र<br>तैसा वीतर्किला मुनींद्र<br>सकळ ननीं ॥४०॥ |

| | |
|---|---|
| १० रूपाचा आकारु<br>देखौनि लक्ष्मीये संचरला विकारू<br>मग चालिला घराचारु<br>प्रभुरायाचा ॥५१२॥ | रूपाचिया मुली<br>जेआ लक्ष्मी वालभैली<br>वळिया घर रीगाली<br>अव्हेरितां ॥३६९॥ |
| जया देवाची श्रीमूर्ति<br>देखौनि पाठीं धावे वेधवंती<br>ते अव्हेरितां कैवल्यपती<br>वळिया घर रीगाली ॥५१८॥ | |
| ११ तया देवाचा जाघोवा<br>लाहावया साँजे अनंगु वरवा<br>जयाचेया यकाही अंवेवा<br>उपमा नाहीं ॥५१५॥ | श्रीकृष्णाचां जांरिवा होइजे<br>तरि लावण्याचे पडप लाहिजे<br>म्हणौनि मदनू सादैजे<br>लेंकरुंपणालागि ॥३७०॥ |
| १२ देखौनि मूर्ति चांपेगौर<br>वैराग्य जालें कामातुर<br>ब्रंह्मवीद्या नीरंतर<br>जवळिचि असे ॥५१३॥ | देखौनि रूप सावळे<br>वैराग्य कामकळा पाल्हेले<br>पुरुषा उपजति डोहळे<br>कामिनीपणाचे ॥३७१॥ |
| | देखौनि मूर्ति उघडी<br>ब्रह्मविद्या डोळे मोडी<br>मुक्ति धावे उघडी<br>पाठीवाडीं ॥३७२॥ |

मूर्तिप्रकाश व शिशुपाळवध यातील ही साम्य स्थळे झाली. मूर्तिप्रकाश व उद्धवगीता यात तर याहून कितीतरी अधिक साम्यस्थळे आहेत. ती पाहा—

| मूर्तिप्रकाश | उद्धव-गीता |
|---|---|
| १ ब्रह्मनीयेची पुरवी तवणी<br>आर्त्त जनासीं ॥१०९७॥ | पडिलेयां संसाराचीए अडणीं<br>जो पुरवी ब्रह्मनीयेची तवनी ॥४॥ |

| | | |
|---|---|---|
| २ | बोल नव्हती रसें आगळे<br>परी वाणीता परब्रह्म गोरें सांवळे<br>हाते झेलीजति फळें<br>सुखरसाचीं ॥१८३॥ | वाणितां वेचिजति फळे<br>मुक्तिलतेचीं ॥८॥ |
| ३ | तिए श्रीकंठीं कंठमाळ<br>वर्णितां लंपट होती कर्णयुगुळ<br>जाणाचीया मनोनासिका सुपरिमळ<br>करीन मीं ॥७०५॥ | आता श्रीकृष्णाचिया कीर्तिचंद्रिका<br>विकासली उन्मेखकळिका<br>तर जाणाचीया मनोनासिका<br>सुपरिमळ करीन ॥१०॥ |
| ४ | वानितां देवो लावण्यसागरू<br>नामीं वेधबोधाचा पडीभरू<br>भणौनि श्रोतयां अति आदरू<br>करावा न लगे ॥१४८॥ | वर्णितां यदुपती<br>बोलीं सहज वेधवती<br>म्हणौनि श्रोतेयां विनती<br>सुभावी न लगे ॥१३॥ |
| ५ | ना तरि सुगंधीं सुपरिमळी<br>सतपत्र पर्यांतकें पाटळी<br>काइ अळिउळासीं केतकीदळीं<br>मुळ पाठवीलें? ॥१५०॥<br>कीं कुरंगा नाभिकमळीं कस्तुरी<br>ते काइ चक्रवर्तीतें पाचारी<br>कीं चकोरवर्गासीं चंदकरीं<br>कांही मानु दीधला? ॥१५१॥<br>कीं मेघीं आपेन्नि कवतीकें<br>काइ बापय केले अती बोलीकें<br>कीं नवरसीं रसाळासि मातुकें<br>देउनि लाचाविलें? ॥१५४॥ | काइ भवंरासि कमळीं<br>काहीं मानिलें हातातळीं<br>कि कोकिळां रसाळीं<br>नेसों दीधले ॥१४॥<br>नां तरि मेघमंडळें<br>काई चातक लांचाविलें<br>कि चंद्रे मुळ पाटविलें<br>चकोरासि ॥१५॥ |
| ६ | आतां सांगेन ग्रंथीचा वीदारू<br>जया नांव मूर्त्तिप्रकारू<br>तो आदकैल श्रोतयाचा देशकु<br>आदर करूनिया ॥९४॥ | म्हणौनि प्रबंधु होइल रसिकु<br>तरि आदकैउ श्रोतेयाचा<br>देशकु ॥१६॥ |

| | | |
|---|---|---|
| ७ | जैसे चंद्राचा चंद्रकीर्णीं<br>सोमकांता द्रवे पाणी<br>तेयि वक्त्याचां मीळणीं<br>श्रोतेयां सुख होए ॥१७८३॥ | भेटति द्रावक गोटे<br>*तरि लोहासि झरा फुटे*<br>सोमकांता गळति थेंबटें<br>चंद्रकातव ॥१७॥ |
| | ना तरि द्रावकाचीया संगती<br>लोखंडा पाझर सुटती<br>तैसे वगतेयाचे बोल नीववीति<br>श्रोतेयांते ॥१७८४॥ | नातरि देखौनि रविमंडळ<br>विकासे कमळांचे बांबळ<br>कौंमेंजे केतकी - जौळ<br>मेघीं करुनि ॥१८॥ |
| | सुर्यकरांचेनि प्रकासें<br>कमळाचें बांवळ विकासे<br>तेवि श्रोतेयाचें मन उल्हासे<br>वगतेयाचीए भेटी ॥१७८५॥ | तैसा सुवर्म जोडे श्रोता<br>तरि रसभावीं फुले कविता<br>तोवर येति सारस्वता<br>नवरसांचे ॥१९॥ |
| ८ | तैसे चातुर्यसामर्थ्यातव<br>सकळ ग्रंथ भोगिती गर्व<br>जंव मूर्तिप्रसादाचे भाव<br>डोळां न देखती ॥१९३॥ | तैसे पदांचिया पदरां<br>*भितरि भाव डोळा दीसति ॥२९॥* |
| ९ | ऐसीय कवीतेल्हे रसाळे<br>लागलीं दीसतीं ब्रह्मवीयेचीं फळे<br>तरी कवणासि नव्हेती डोहळे<br>*मुखीं घालवेयाचे ? ॥१५८॥* | ऐसीए कविता-ल्हे<br>ब्रह्मविद्येचीं फुलें दीसति फांके<br>तरि पसरतेनि हातें<br>कवण न तोडी ? ॥३१॥ |
| १० | ना तरी चींतीलें दे चींतामणी<br>कामधेनु खडुरसीं पुरवी आणी<br>तैसी माझी पवीत्र वाणी<br>कवण नाइके ? ॥१७६॥ | तैसें साहित्याचां राहाणीं<br>शांतीरसा अवतरण आणी<br>तरि माझी पवीत्र वाणी<br>कवण नाइके ? ॥३५॥ |
| ११ | जो कैवल्य कुसुमाचा परिमळ<br>॥१४१२॥ | जो कैवल्य कुसुमाचा<br>आमोदु ॥३७॥ |

| | | |
|---|---|---|
| १२ | राज्य करीतां कैवल्यपाळा<br>तराय आली सकळकळां<br>संगती भोगी सोहळा<br>सब्दमुखाचा ॥२१८॥ | विवेका तराये जाली<br>प्रबोधा दशा उदैली<br>नवल जीणि जाली<br>वैराग्यासि ॥४४॥ |
| | अध्यात्म जालें रसाळ<br>अवेसी लागलें शांति फळ<br>ध्यान चींतनेसीं होये गोडिवेल्हाळ<br>उठों न सके ॥२२६॥ | तपासि वीक चढलें<br>अध्यात्म चांग पद्मासि आलें<br>मांडवल जोडलें<br>उपनीखदांसी ॥४६॥ |
| १३ | क्षेमे नीवृत्तीचां मुळीं<br>पडे क्रोधाग्नीची इंगळी<br>॥२४१६॥ | पुणु तुजचि हे इछा जाली<br>जें एदुवंसवेलिचां मुळीं<br>घालावी इंगळी<br>ब्रह्मशापाची ॥६१॥ |
| १४ | कीं तो करुणारस मुराला<br>भाओ भगतीसी योग जाला<br>॥२९८२॥ | तो जैसा करुणारसीं वीराला<br>किं विरहवीलें घारैला ॥७२॥ |
| १५ | आतां आवडीचें आउख पुरलें<br>साहित्य संगितासि मुंचलें ॥२८०२॥ | आजि धर्माचें आयुष्य पुरलें<br>वीवेकाचें भांडार फुटलें ॥८४॥ |
| १६ | विलासवन आहाळलें<br>कळाकौसल्य भीतरि पोळलें<br>॥२८२२॥ | सेजार आहाळलें<br>दीव्य भोगांचें ॥८९॥ |
| १७ | जगत्रोळ जाहला नवरसा<br>कव्हणीं आपुलें न म्हणे<br>॥२८११॥ | मोक्षाचा ग्राह्या गेला<br>त्यागा जगत्रोळ जाला ॥९१॥ |
| १८ | स्वयंप्रकाशाची दीवटी वीझाली<br>सत्त्वाची गगनगंगा आटली<br>॥२८४५॥ | स्वयंप्रकाशाची दीप्ति<br>आजि माल्हवली ॥९२॥<br>सत्त्वाची गगनगंगा<br>आजि आटली ॥९५॥ |

| | | |
|---|---|---|
| १९ | अवचीतें आकाश आंदोळले<br>सनकांदीकांवरी ॥२८५४॥ | अवचीतें जगजुग पडिलें<br>सनकादीकांवरि ॥१०१॥ |
| २० | आहा वज्रकठीणा जीवा<br>का वीर्संचलासि सदाघीना<br>॥२९७४॥ | हरी ! हरी !! देवा !<br>काइ कीजे या वज्रकठीना जीवा ?<br>॥१३५॥ |
| २१ | तुं सपांती मजवीण<br>कहीं न करीसी आरोगण<br>आतां का केलें कठीण<br>मातें न बोलवीसी ॥२९०१॥ | माझेनि हायेवीन<br>देओ न करीति आरोगण<br>तें कां विसरलेति आपुलेपण<br>प्रभू एकें वेळें ॥१३७॥ |
| २२ | क्षेमालींगन देतां वेळीं<br>मासीं संन्निधानाची मास केली<br>जे आतां एथुनि तुज कव्हणीं<br>काळीं<br>कहीं पाठीवीजे ना ॥२७७६॥ | प्रेम देता वेळीं<br>मासीं सन्यधानाची माप केली<br>ते कां हो जी सांडिली<br>वेळु न लगतां ॥१४२॥ |
| | तो पुढारु सांडिला<br>का माझा अव्हेरू केला ॥२७७७ | तरि तो पुढारू आठवावा<br>आता साचु करावा ॥१४५॥ |
| २३ | नवां नाडीची येरझार न कुंटे<br>का सडुचकाची माळ न तुटे<br>कां चोळासा न फुटे<br>प्रपंचाचा ॥२९५१॥ | का अझुई हृदय न फुटे<br>प्राण-तंतु न तुटे<br>चोळासा न फीटे<br>या कळेवराचा ॥१४७॥ |
| | | सडुचकाची उत्तरडी<br>आझुइं कां न गडबडी<br>मेरुसिखरें केवि न फोडी<br>इडा पिंगळा ते ॥१४८॥ |
| २४ | इंद्रीयांचीये सेजे आझुनी<br>का नुज्रमे वज्राग्नी<br>कां ग्राहानी कोंडे जळोनि<br>आमावो नव्हती ॥२९५२॥ | ब्रह्मरंध्रींचां संपुटीं<br>आझुइं का वज्राग्नि नुठि<br>कां न जळे कोठी<br>या इंद्रियांची ॥१४९॥ |

२५ कीं माझी वाचीतां जन्मपत्रीका
काळाग्नि टाइ न पटेचि देखा
कीं तुझीया आज्ञा परमपुरुखा
मातें आठवीचि ना ॥२९५८॥
कीं तुझेनि वीरहें दुचीता
तोही जाला ॥२९५४॥

कीं काळाची देशवही
वाचितां माझें नावं नाहीं
कीं पंचत्व पातला तोही
तुझेनि वीरहें ! ॥१५१॥

२६ तुझें अनुल्पेन लावीं ल्लाटीं
तरी वीध्नजाति नये दृष्टी ॥२९७२॥

अनुलेपनाचीया मोरी
मीं अहंकारातें घोणारीं ॥१५९॥

२७ तुझीं आंगसीकें करीं प्रावर्ण
तरी मायामोहो जीवीं शंके आपण
कामक्रोध दोन्हीं पावती मरण
आपेंआप ॥२९६७॥

तुझीं आंगसीकी वेढीं
तरि कामक्रोधाची खाल काढि
दाढा उपडीं मदमत्स-
राचीया ॥१६०॥

२८ जैसे वीरहीणी पतीचां वीयोगीं
अष्टभोग डाजती आंगीं
नवरसांचा भावो-भुजंगीं

जैसी अवस्थामरें वीरहीणी
करीतां न मनी धावनी
॥१७३॥

| | |
|---|---|
| ३० असावे सीळातळीं सीखरीं<br>कपाटीं कोहर्की गीरीवरी<br>झाडाचां पाल्वीं नीरंतरी<br>ध्यान करावे ॥२३७८॥ | असावें गीरीकपाटीं<br>सीळातळीं वाळुवंटीं<br>ना तरि झाडाचां तळवटीं<br>बहुत करुनि ॥१८३॥ |
| ३१ ऐसा जो गोप्य पदार्थु<br>तो मीयां तुज केला श्रुतु<br>परी अधीकारेंवीण वीदीतु<br>कव्हणासीं न करावा ॥२७७५॥ | तवं श्रीकृष्णराओ म्हणे उद्धवदेवा<br>हा ज्ञानरत्नांचा ठेवा<br>मल्लेया हातीं नेदावा<br>अधिकारेंवीण ॥८१८॥ |
| ३२ तया सायोज्यता होय पत्रव्रंहेमीं<br>म्हणे मुनि केशिराजु ॥१९४८ | परब्रह्मेंसीं होये सायूज्यता<br>म्हणे कवि भास्करू ॥८२७॥ |

मला असे वाटते की केसोबासाचे भास्करभट्टावर असलेले ऋण सिद्ध करण्यासाठी ही एवढी उदाहरणे पुरे आहेत. काही असले तरी ही साम्यस्थळे या दोन्ही कवींच्या पौर्वापर्याचा विचार करण्याला लावणारी आहेत हे नाकारता येणार नाही.

## काही भाषाविशेष

'मूर्तिप्रकाशा'तील भाषेचे सविस्तर वर्णन करण्याला आता अवकाश नाही. यादवकालीन मराठी भाषेचे जे वळण इतर ग्रंथावरून दिसून येते तेच 'मूर्तिप्रकाशा'तहि आहे, एवढे सांगितले म्हणजे पुरे होईल. यादवकाळात प्रचलित असलेल्या काही वाक्प्रचाराकडे मात्र या ठिकाणी लक्ष्य वेधतो. आज त्याऐवजी प्रचारात असलेले वाक्प्रचार पाहिले म्हणजे काळामुळे भाषेच्या शब्द-संपत्तीत व वाक्प्रचार-वैभवात कशी स्थित्यंतरे होत जातात ते दिसून येईल. पुढील वाक्प्रचार पहा—आविदा करणे, कणवा करणे (=कीव करणे); सिद्धान निवडणे; सेवा जाणवणे; धाडी रचणे; उदास धरणे; पंती चाळणे; वैर चाळणे; अंत पुरवणे; जन्म देणे (=जीवित अर्पण करणे) इत्यादि.

## भाषेत पुनरुक्तिदोष

केसोबासाच्या भाषेत एक दोष आढळतो त्याचा उल्लेख येथे करणे अवश्य आहे. समानार्थक शब्द वापरल्याने होणारी पुनरुक्ति तो फार करतो.

उदा : 'चरणी चरणांकित' (३८१; २७८५); 'चक्राचा चक्रकीर्णी' (१७८३); 'क्षीराब्धि क्षीरसागरू' (१९३६), 'मस्त-मीतु-मासे' (१८७२), 'नामाच नामचक्र' (२४७०); 'प्रश्ना प्रश्नोत्तर' (९४०); 'मार्गी मार्गदीळा' (२०३५), 'दुजें आन नोलें नासहे' (९२२), 'जनळि नीहीटी' (११५०); 'अपुल नीजयपु' (८२२), 'मुकुटीं मुकुटमाळ' (१९११), 'आतु माजी न दीसे' (१२५१) इत्यादि. यादव कालीन इतर काव्यातहि अशी उदाहरणे आढळतात; पण ती थोडी. तुलनात्मक दृष्टीने पाहता 'मूर्तिप्रकाश'त ती अधिक आहेत. या काव्याचा मोठा आकार हेहि कदाचित् त्याचे कारण असू शकेल. पुढे हा दोष मराठी रचनेत पुष्कळ आला. विशेषत एकनाथाच्या भाषेत तर त्याला जवळ जवळ प्रतिष्ठाच प्राप्त झालेली दिसते. हा एक विशेष जाणवणारा दोष सोडला तर, केसोबासाची भाषा सुबोध, सुदर व डौलदार आहे यात शका नाही.

## समारोप

मूर्तिप्रकाश या काव्याचे समालोचन आणखी इतर अनेक दृष्टींनी करता येईल. पण तो स्वतत्र अभ्यासाचा विषय आहे. प्रस्तावनेच्या मर्यादा सांभाळण्याच्या दृष्टीने येथेच लेखणी आटोपणे बरे. तेराव्या शतकातील, काव्यरसाने ओथबलेले हे भावमधुर काव्य मराठी भाविकाच्या आणि काव्यरसिकाच्या प्रीतीला प्राप्त होईल असा विश्वास व्यक्त करून ही प्रस्तावना सपविती.

# मूर्ति-प्रकाश

## १

## पंचकृष्ण आणि भक्त यांना नमन

### श्रीकृष्ण वंदन

जय जय केवळा शुद्धबोधा[1] : जय पुरुषोत्तमा[2] पुराणप्रसीधा
जय परब्रह्म[3] परानंद बुधा[4] . परमात्मेया १

जय नीर्वैरा नीराकारा . जय नी:कामा कामातुरा
जय नीर्गुणा गुणसागरा : रुखुमीणीपती[5] २

जय अनामेया[6] अमृतव्रता : जय गोपवल्लभा गोपिनाथा
जय वीनटलेया जीवा मोक्षदाता : ससारमोचका ३

साडौनि सकळै व्यापार · श्रीकृष्णचरणीं मन करावें स्थीर
तैथं[7] नर्क चुकती घोरादर : ससारिचे ४

तो यदु घननीळ सावळा : जो येव-जोव-परिपुर्ण प्रेमपुतळा
त्या श्रीकृष्णाचीया चरणकमळा : नमन माझें ५

---

१ खग बुध'. २ ख पुरुषोत्तमा ३ ग 'ब्रह्मा. ४ ग बुद्धा. ५ ग रुक्मिणी'. ६ खग अनामया. ७ खग तैचि.

## श्रीदत्तात्रेय वंदन

जय निरुपमा नीभ्रांता : जय नीराभिमानिया नीरुता
जय निसंगा नीत्यमुक्ता : श्रीदत्तात्रया ६

जो सह्याचळ पर्वताचां सीखरीं : नीरंतर सर्वशक्तीसीं राज्य करी
तो क्रीडे मातापुर नगरीं : लीळावर्से ७

करौनि नाना रूपांचा पालटु : स्वीकरी अभिनव अनसारीखा नटु
घालुनि कुचीळपणाचा घुंगटु : चेष्टे मान देती ८

तयाचें अमोघ दर्शन : जालयां जीवांसी होयें चोखाळपण
तापपापाचें होय परिसारण : द्रीष्टिपातें ९

तया अद्रीष्टा आदिपुरुखा : नमो मायापती मातांगवेखा
जो कारण केवळा कैवल्यसुखा : ब्रह्मवीद्येसी १०

जय जय अवीक्रीया अच्युता : जय अप्रतिरूपा अद्वीता
जय बाह्याभ्यांतरीं* आदिनाथा : तुंचि असती ११

## श्रीचक्रपाणी वंदन

जो अनादीचा अद्रीस्यमानु : नव्हे गोचर न देखे सकळै जनु
तो स्वयं आपणपें अवतार स्वीकरूनु : प्रकट जाला १२

---

१ खग. निरो. २ खग होए.

* मूळात प्रथम हा शब्द 'बाहातरी' असा लिहिला आहे. नतर 'बा' व 'हा' याच्या मध्ये काकपद घालून खालच्या ओळींत 'ह्याम्या' अशी अक्षरे लिहिली आहेत त्यावरून 'बाह्याम्याहातरी' हा शब्द होतो. तथापि 'ह्या' ऐवजी प्रथम 'हा' लिहिला गेला असावा हे लक्षात घेता हा शब्दये थे 'बाह्याम्यातरी' म्हणजे 'बाह्याभ्यतरी' असा अभिप्रेत असावा.

जो अवरद्रीस्या अर्चीत्या अनंतशक्ती :
जयाचा चरणीं चरणांकित पवित्र जाली गोमती
बावना पुरुखां बीद्यादान देती : पशू फळानंदु १३

जो सकळकळ्ां सकळ्ो सामुग्रीया संपनु : वीयाचेता वीसेखें वीतपनु
तो साकारपणाची कुपरी साहुनु : विहरे महीमंडळीं १४

घेउनि मनुक्षवेखाँची अवगणी : केली अवधुत-धर्माची संपादणी
द्वारके क्रीडले श्रीचक्रपाणी : तया नमन माझें १५

श्रीगोविंदप्रभु वंदन

जय जय अव्यक्ता अपरीं परा : जय नी:प्रपंचा नीराकारा
जय नीर्वीकल्पा नीराधारा : आधारस्तंभा १६

जयाचीये लीळेचा महिमा थोरु : आपणपें वाणी सर्वेस्वरू
तया नीर्गुणा ब्रह्मा नमस्कारू : केला मीयां १७

ते अबोलैणी अगाध श्रीमूर्त्ती : घेतली वेडेपणाची बुंथी
जाणौनि सकळै नेणती : स्वइछावशें १८

जे प्रभुचर्यां चरणासिं योगु पातले : ते ब्रह्मादीका वंद्य जाले
संशृती वेगळे केले : समर्थपणें १९

तो आत्मरमणु अनंतु : नीर्लेपा जीवांतें उद्धरी अनाथनाथु
तया साष्टांगी प्रणिपातु : श्रीप्रभुराया २०

---

१ खग. सकळ. २ ग संपुर्ण. ३ ग. मनुष्यवेषाची आवगणी ४ ख. अपर'. ग. अपरा'. ५ ग. आवोलणी आगाध. ६ ग. श्रीप्रभुचेया.

### श्रीचक्रधर वदन

जय जय परब्रह्मा श्रीपरेशा  जय परात्पर महेशा[1]
जय पवीत्र स्वयप्रकाशा  सकळसमाना  २१

जो सकळ वेद आगमाचार्या एज्ञाधीपती
स्वीकरीली आर्यनागर मानवी मुर्त्ति
ते देखौनि डोहळे उपजती  कामीनीपणाचे  २२

जयाचीय कटाक्षचाकोरा[2]  पडीलैया नीगारा नाहीं योगीस्वेरा
जेणें वेधु लाविला सकळ अवतारा  एर काइ वानु  २३

तया श्रीचक्रधराचा चरणकमळीं  दीसे नीत्यानदसुखाची नव्हाळी
म्हणौनि लुटतुसें[3] वेव्होनेळीं  लाचावलेंपणें  २४

तया देवाचे चरण मानसीं  जन्में न वीसवे अहर्नीशीं
हृदै[4] द्रीढँ[5] धरीन जीवेंसी  सर्वस्व भणौनिया  २५

यापरी पाचै अवतार  मीया नमीले प्रतक्षाकार
तें मुद्रीत साधैन सारोधार  एकी[6] वोवीयमाजी  २६

जय जय श्रीक्रीष्णा श्रीदत्ता  जय श्रीचक्रपाणी श्रीप्रभु केवल्यनाथा
जयाचेनि दरिसनें[7] नीवार ससारेथें[8]  तया नमो श्रीचक्रधरा  २७

### ज्ञानी-भक्त वदन

आता नमीन ज्ञानीयें[11] भगतें[12]  जे उद्धवार्जुनासारिखे महत
काळु आकणा घालुनि जाले जीवनमुक्त  ईश्वरसन्निधानें  २८

---

१ ख परमहंसा ग परमहंसा(सा) २ ग चकोरा ३ खग 'लेया ४ ग योगें' ५ खग लुटतु असे ६ ग हृदइ ७ ग दृढ. ८ ग यवे ९ ग दशन १० ग व्यथा ११ खग ज्ञानीए(य) १२ ग भक्त

जेहीं अहंते ममतेतें सांडीले : सकळ वासनेपासौनि मन काढीलें
 परत्र भणौनि देवा वालभैले : तयां नमन माझें २९

तया भगतांची[1] थोरी : मी वाणुं तेणें अती कुसरीं
 हे जाणीत्र एकी ईश्वरीं : वांचौनि नाहीं ३०

जया ईश्वरें वेधुनि दीधली बोधशक्ती :
 ते जाणौनि वचनाचें दास्य करीती
 आपुलें अनुसरण सोधी नेती : ज्ञानाचेनि बळें ३१

जे संसारधर्मापासौनि नीवर्तले : वीरामे वीखयावरी पाठिमोरे केले[2]
 ते वीतराग अभिवंदिले : हात जोडुनि ३२

## नागार्जुन वंदन

भयाहुरे संसारवनीं : पडीलेयैं[3] अज्ञानतमाची मेल्हनी[4]
 ते फेडावया उदेला ज्ञानतरणी : नमीन नागार्जुन ३३

तो वीवेकें वीत्पंनु[5] : आचारें नोपुणु
 वीचारे संपुर्ण : जाणे कळाकौसल्य ३४

तो वैराग्याचा वेळाइतु : ब्रह्मवीद्येचा बैसणाइतु :
 जेणें पुरविला अंतु : संसारसत्रुचा[6] ३५

तो प्रेमाचा लाह्याणा : भणौनि देवें केला अधीकरणु
 तो वंदुं आचार्यांचा राणा : वर मुनी नागार्जुनु ३६

---

१ ग. भक्ताची. २ खग ठेले. ३ ख. पीडीलेयां. ४ ग. मेहलणी. ५ ख वीत्पन्नू. ६ ग. शत्रुचा.

## नागांबिका नमन

आता नमीन नागांबिका : जे भगतीची[1] प्रेम-कळीका
तीयचा महीमा सांघैन आइका : अनुरागपुर्वक ३७

ते आवडीची अलोहीत : उत्कंठेची उन्नत
कीं आर्त्तीची मुर्त्त : देवता ते ३८

की ते प्रेमाची सप्रेमळ . भगतीची वेलि सांसीनली बहळ
कीं आनंदाचें आभाळ : वोळली[3] ते ३९

कीं ते अनुरागाची आंगवण : ब्रह्मवीचेची सांटवण
भणौनि जोडलें नीधान : कैवल्याचें ४०

कीं ते स्वस्ततेची खाणी . परसुखाची घाणी
भणौनि वेधिली श्रीचक्रपाणी : भ्रूभंगमात्रें[4] ४१

तीयें नागांबिकेचें स्तवन : करीतां द्रवे साद्रवाचें मन
आइकतां नीव्रे अंतःकरण : संतजनाचें ४२

## आत्मनिवेदन : रंकवृत्ति

मीं आधळें[6] अज्ञान : परीसावेया नाहीं श्रवणमन
तया केवि आंतुडे नीरुपण : तया भक्तिरसाचें ४३

माझें मानस कठीण : वरी आयटी उतकंठाहीनँ
भणौनि अंतरले श्रीचरण : जगद्बधुचे ४४

मी अपराधी अमगळु : नाहीं अनुतापु अळुमाळुं
कहीं न मनी वीटाळु रज-वासनेचा ४५

---

१ ग भक्तीचीं. २ खग, तीएचा. ३ कग ओळली ४ कखग. भ्रूभग°. ५ कग तीयें. ख तीए ६ ख. अंधळें ७ क उत्कंठा°. ८ कग. आळु°.

मी अपवीत्र अनादीचा : वर्मस्परीसें[1] बोलीलां वाचा
परी अनुवादु[2] तुझया नांमाचा : कहीं न करीचि देवा ४६

मी दोखज नींदकु : व्यावर्त्तिकें[3] करावया एकु
श्रुष्टीमध्यें[4] आणिकु : दुजा नाहीं ४७

मीं अधस्तें[5] माहांपातकी : जालां आपणयां[6] आपण घातकी
विखय-वीख सुदलें मुखीं : सांडौनि ज्ञानअमृतें[7] ४८

कैसी घ्रर्णा[8] इद्रियें दैवहतें : जियें द्रुगंधीलागि उकठिलें
परी तुझयां[9] चरणकमळातें : अवघ्रहण न करीतीचि ४९

नीरयाचीयें साळे : मानें वोढुनि नेति डोळे
परी तुझयां रुपाचे सोहळे : भुंजतीचि ना ५०

जीवदेवतांचेया पायासीं खेळूं[10] : करीतां अपवीत्र जालें कपाळ
परी तुझे चरणयुगळ : वदीचि ना ५१

येहीं[11] मोकळ्यां केंसीं : निरयदायकीं[12] देवतांचे पाय पुसीं
परी तुझया चरणाचें दास्य रुशीकेसी[13] : होववेचि ना ५२

मीं अधीन जालें[14] कर्णपुटां : आइकें दुरवार्त्ता दुष्टा
परी तुझयां नामलीळाचेष्टा : पात्र नव्हेंचि[15] ५३

कर्मे करीतां सुष्टदुष्टें[16] : हस्त-इंद्रीयें जालीं नष्टें
परी ईश्वरसेवा अवचटें : घडेचि ना ५४

---

१ कग. °स्पर्शू. २ कग. अनुतापवादु. ३ कग. व्यावृति. ४ ख. श्रीष्टी°. ५ कग. अधस्त. ६ कग. °णेया. ७ कखग. ज्ञानामृत. ८ कग, घ्राण. ९ कखग. तुझेया. १० ग. खेळ. ११ ख. एही. १२ कग. निरयें°. १३ ख. रीखीकेसी. ग. ऋषिकेशी. १४ कग. जालो. १५ ख. न्हवेचि. १६ ग. सुष्टे°.

कैसे पायें दुराचारी : जें जें मन कल्पना करी
तेथ घेउनि जाति वैरी : मज विखयात्मकातें ५५

करीता पृथ्वीपर्लेटनें : न विचारीती जन्ममरण
परी आइकौनि तुझें दरीसनें[3] : घेववेचि ना ५६

या देहाचेनि बळें : मी आचरलां सप्त वेसनें स्थळें[4]
भणौनि चतुर्विधें कर्मफळें : मज भोगावीं लागलीं ५७

तुं प्रतिश्रृष्टीं अवतरल्यांसी : ज्ञानप्रेम देयावयां जीवांसी
परी मीयां तोंड सुदलें नासीं : अधोमुखें ५८

तुवां कृपावसें[6] कृपावंतें : उद्धरुं[7] आदरीलें मातें
परी मीयां लावीलें डोळयाचें पातें: तुझी वास न पाहेंचि ५९

तुज प्रेम देयावेयाचां हेतु : परी मी अल्पचि मार्गे दैवहतु
जैसा काग-सुक्र अमेध्या आंतु : सार नीवडी ६०

तुं जालासि भगतीवळ्ळुं : केला ज्ञानें-अमृताचा सुकाळु
परी मी जाणौनि कर्मचांडाळु : अनुसरेंचि नां ६१

तुं जालासि व्यक्तिमंतु[12] : जीवातें उद्धरावयां[13] अनंतु
परी माझा न पुरेचि अंतु : कव्हणी काळीं ६२

तुं जालासि प्रसन्नवदनु : कृपादृष्टी पांसी[14] कमळनयनु
तें मी विसरौनि जायें कृतघ्नु[15] : आठवींचि ना ६३

---

१ कग. पाए. २ ख. प्रीथ्वी°. ३ क. दर्शन. ग दर्शन. ४ कग. स्थळे. ५ क. द्यावया. ख. देयावेया. ग. द्यावेया ६ कखग. कृपाळुवें. ७ ख. उधरुं. ८ क. द्यावयाचा. ग द्यावेयाचा. ९ क. काक सूकरू. १० क. भक्ति°. ग. भक्त°. ११ कखग. ज्ञानामृताचा. १२ कख. वेक्ति°. १३ कग. °वेया. ख. उधरावेया. १४ क. पाहासी. १५ कग. कृतघ्न.

मज सोय्यातें केलें दाता : आपणपें जालासि मागता
जन्म दयों म्हणसी अनंता : परी मी देंचि ना ६४

ऐसा तुं उदारु आदिपुरुखु : आणि मी अभीळाखी लोभिया वंचकु
भणौनि माझा न फीटेचि कळंकु : अनादि-अवीधेचा ६५

तुं देवा[1] मजलागी : राज्य सांडौनि[2] जालासि योगी
आणि मी घरीं वीखो भोगीं : अमेध्यतुल्य ६६

तुं हींडसी वनें उपवनें : आणि मी सेवीं पुरें पाटणें
ऐसा स्वामिद्रुन्हा जाणौनि मज कोणें : आपुलें म्हणावें ६७

तु आरोगीसी भीक्षाअन्नें[3] : आणि मी अखंड सेवीं पचन
भणौनि सीधी न वचे साधन : तुसीं[4] अंतर पडलें[5] ६८

तुं आरोगीसी पाणिभातु : आनि मी सेवीं इंद्रीयार्थु
भणौनि दुरावला अनंतु : ह्रदया न ये ६९

तुं सूडा करिसी परावर्ण[6] : आणि मज पासवडा आंथुरण
कहीं नतुईचि तुझें वचन : वारिलेंचिं[7] केलें ७०

तुं देउळीं करिसी पहुडु : आणि मज माळवधीं सुखाडु
भणौनि ठेवा नांतुडेच्चि गुढु : तुझर्या[8] सन्निधानाचा ७१

तुझें न करींचि भणितलें : आपात्रां[9] जन्म दीधलें
भणौनि तुवां मातें अव्हेरिलें : मुखं न पाहासीचि[10] ७२

तुं मजलागि लोंवसु : आणि मी कठीण उदासु
भणौनि न चुकेचि गर्भवासु : यातायातें[11] ७३

---

१ क. देया. ग. दे २ ग. साडुनि. ३ कखग. भिक्षान्न. ४ कग. तुजसी. ५ कखग. पडीले. ६ कग. प्रावर्ण. ७ कग. वारिले तेंचि. ८ क. तुझीया. खग. तुझेया. ९ क. कुपात्रा. ख. अपात्रा. १० कग. न पाहासीचि मुख. ११ कखग. 'यातु.

तुं देसी आपुलें सन्निधान : तें सांडौनि[1] जाये[2] वीखया सरण
भणौनि नीरयाचें दरीसनें[3] : चुकेचि ना ७४

तुवां नित्यें अनीत्यें[4] दोन्हीं : मज शृत केलीं कैवल्यदानी
परी तुझयां[5] चरणा श्रीचक्रपाणी : सरण[6] न रीगेंचि ७५

तुवां साकारपणाची कुपरी : मजलागि साहीली थोरी
परी मीयां रीगौनि श्रीष्टीचां जोहरीं
आपुलें भस्म केलें ७६

ऐसा मी अधमें[7] पापीया : जे जे दोख केले मीयां
ते उपसाहावे जी स्वामीया : कृपाळुवा ७७

ऐसा सर्व दोखीं आळकृतु : वरी ज्ञान-प्रेम-रहीतु
तया मज केवि लाभे अंतु तुझीय भक्तिश्रीयर्चा ७८

परी पांतु श्रोते सुजाण : बोल कैसे सुरस सघन
ते वीचारीतुं वीचक्षण . वीरहे[10] पुरुख ७९

मीं प्रवर्त्तलां परमार्थमार्गी : तवं माहावीघ्नीं केली लागी
मग लेउनि वीचाराची वज्रांगी
प्रबोधु-फरसें पराभविलीं ८०

तियें अभंगें अदटें अती असुरे
भंगावया स्मरण [वांचौनि] नाहीं दुसरे
तो अनुभौ[11] सांघैन सविस्तरे : श्रोतयाप्रती[12] ८१

---

१ ग. साडुनि. २ क. जाए खग. जाये. ३ क दर्सन. ग. दर्शन. ४ क. नित्यानित्य. ५ कखग. तुझेया. ६ खग. शरण. ७ कखग. अधमु. ८ कग. श्रीयेचा. ख. श्रीएचा. ९ कखघ. 'रीती. १० कग. वीरहीये. ११ क. अनुभऊ. ग. अनुभव. १२ कखग. श्रोतेया

जें सवीर्य सवीज सकारण : नागार्जुनें केलें नीरूपण
तयाचेनि प्रसादें वानुं वस्तु सगुण
म्हणे मुनि केसिराजु ८२

## २

## गुरुकृपा वर्णन

तया नागार्जुनाचा गोसावी : मीं वर्णीन सकरुणीं भात्री[2]
ते सीघात वाणि नीहाळावी[3] : नीकीयापरी ८३

जे ज्ञान-भक्ती-वैराग्यें पुरते : सारासार-वस्तु-वीचारु जाणते
तेहीं वाणावें श्रीचक्रधरातें : नागार्जुनादीकीं ८४

मज नाहीं मतीची प्रवळता : तुतें वर्णावयाॅं चैतन्यनाथा
परी जीवा होतसे[5] आर्त्ति[6] : स्तूति[7] करावया ८५

नाही ज्ञानाचें पुरतेपण : वर्णावयाॅं श्रीमूर्तीचे गुण
परी अल्हादु होतसे[8] मना : स्तवनालागि ८६

जैसे बाळकाचे बोल बोबडे : आइकौनि माएबापा तोखुं पडे
मग उसंगीय घेउनि कोडें : लाडवीताती ८७

तैसा मी अबोधु अज्ञानु : नव्हें जाणता सज्ञानु
परी झळकला लोचनु : गुरुकृपेचा ८८

---

१ कखग. सवीया. २ कग. सकरुणा. ३ ग नेहाळावी. ४ कखग. 'वेया ५ कग. होति असे. ख. होत असे. ६ कग. आर्त. ७ क. अस्तुति ८ क. होतु असे. ख. होत असे. ९ खग. सतोखु.

तया गुरूची प्रसन्नता : जया जोडली सर्वथा
ते पात्र होती ज्ञानपथां[1] : ब्रह्मविचेसी ८९

मज नांही शास्त्रश्रवण · वरी बोधदातृत्वें[2] मोल्हीन
परी अनुशरावयां[3] कारण : मज नीमीत्य वेधु ९०

तया अनुशरणासि आदि : जे मीयां[4] नागींद्रीं धरीली भावबुधी[5]
परिमार्गी[6] प्रसीधी · पावला जो ९१

तया गुरूचें वचन : हृदें[7] जालें प्रवेसन
अंतरीं होये समाधान : जैसें[8] बोधवंता ९२

तेया स्वस्तता धाला : सुखेंसीं योगु पातला
तो भीतरौनि आनंदाचा दैंकरू आला . दोवीयेचेनि मीशें[9] ९३

## ग्रंथ महत्त्व

आतां सांघैन यें[10] ग्रंथीचा वीशेखू : जया नांव मुक्तिप्रकाशूं[11]
तो आइकैल श्रोतयाचां[12] देशकु : आदरू करूनिया ९४

तीहीं तापांचां उष्णकाळीं : भवदग्धां जीवां नीम्हाळे माळीं
मीया पव्हें मांडीली[13] सुसीतळी : आनंदरसाची ९५

कीं ते उन्मेखाची मूर्ति : वीवेकाची उत्पती[14]
भक्तिभावातें उन्नभीती : श्रवणमात्रें ९६

---

१ कग पथा २ कग °दातृत्व ३ कखग °वेया. ४ क. म्या. ५ कख. भावो°. ग. भाओबुद्धी. ६ घ परि°. ७. कखग हृदइ. ८ कग * ९ क मीखें. १० कग * ११ कखग. प्रकाशकू. १२ खग श्रोते°. १३ ख पाडिली. १४ कखग. वीत्पती.

कीं ते कैवल्यपदासी परमार्गु : साधकजनाचा संघु
स्मरतां पाविजे योगु : परब्रम्हेंसी ९७

कीं ते ब्रह्मश्रीयेची कसवटी : पांहातां सकळ शास्त्रांतें दळवटी
कीं ज्ञानरत्नांची उघडली पेटी : सारग्राहीकालागी ९८

कीं ते प्रबोधनेत्रीची दृष्टी सुहावी : कैवल्यरत्नाचे खूतले रंग दावी[1]
देखलेपणाचीं बीरदें[2] पटवी : तिहीं लोकीं ९९

कीं ते परब्रम्हाची निजकीर्ती : जीव उद्धरावयाँ आलि व्यक्ती
कीं परा वाचा ईश्वरप्रवृत्ती : मूर्त्ति[3] जाली १००

कीं भरूनि नीत्य-सुखाचां तार्टी : मीयां ठेवीली ब्रम्हरसाची वाटी
ते सुमन लाउनि वोठीं[4] . पान करीतु १०१

कीं कारुण्य-शक्ती आपण : नीफजवीलें प्रेमाचें पक्वान्न
ते आर्त्ती करावें भोजन : आवडीपूर्वक १०२

कीं ते कृपेची कांमधेनु : सर्व सुखें जीयपासौनि[5]
ते ग्रंथ-वेखें अवतरौनु : श्रवे खडुरसातें[6] १०३

कीं ममतेचें कृपाळुं मर्न : भणौनि पडीताळुं आली भक्तजन
ते उसंगीये घेउनि पाजी स्तनें : आपल्यासी[7] १०४

कीं लीळा-वसें अच्युता : तुजपासौनि उत्तरली प्रसंन्नता
जे आधार आर्तभुतां : अनुचरांसीं १०५

कीं देवासी दातृचार्चे वेसन : भणौनि दया केली प्रधान
ते सपार्दु आली कैवल्यदान : भुमंडळासी १०६

---

१ कग. दाखवी. २ कग. व्रोदें. ३ कखग. °वेया. ४ कग. मूर्त्तें. ५ कखग. ओठी. ६ कग. जीये. ख. जीए. ७ ग. पडु°. ८ कखग. कृपाळुपन. ९ क. स्यन. खग. स्यान. १० कखग. अप°.

कीं वरवीदां जीयेची आस : ते भक्तश्री नीन्हां डोळस
पुरवावयां जाणाची भडस : जगीं प्रकट जाली १०७

कीं ते आदिलक्ष्मी आद्याशक्ती : जियची सांघातीणी वेधवंती
ते रसफळाचा घडु घेउनि हातीं . क्रवतीकें क्रीडा करी १०८

कीं वीकारांचें दळ देखौनि दाटलें . वीरामें वीखयांवरि कासिलें
कीं वैराग्य आपणयां आपण वेठलें : आमोलेपणें १०९

कीं अनुराग आंगें आकारला : उतकठेसीं योगु पातला
तो कवीतामीसें प्रवर्तला : माझां हृदइं ११०

कीं ते श्रद्धा साधैली[२] : प्रीती सौजन्यां भेटी आली
कीं भक्तिसुखाची दावी नव्हाळी : योगीयांसि १११

कीं लावण्यलतेसी रसाळें : लागलीं सांति-क्षेमेचीं फळें
कीं श्रींगारू[३] फुलला परिमळें : साहीत्याचेनि ११२

कीं सौंदर्य संगीत उल्हासलें उदार्य तुळा-पुरखीं बैसलें
कीं सौभाग्यें सौरम्य हातवसीलें : श्रोतयांलागी[४] ११३

कीं ते सर्वे[५]दव्रह्मीची देवता अधिष्ठात्री
जे आनादीसीधु असे नीराकारीं
ते संदेहो तोडाव[६]यां माहाखेचरी : प्रतक्ष जाली* ११४

कीं नेणीवेचा मेळा देखौनि : विचारें बुधिसीं केली धांवणी
माहांपापाचीं सीरे छेदुनी : स्यापावयां जाणिवेतें ११५

---

१ कखग 'वेया. २ क साधैली ३ कग. श्रुघारू ४ खग. श्रोते'. ५ ग. शब्द'. *ही ओवी क. प्रतीत गळालेली आहे. ६ कखग. 'वेया.

कीं द्रीढावयां[1] कोंमळाची स्वस्तता
देवें बोधशक्ति पाठवीली मज पांतां[2]
कीं साधनीं होआवया दक्षता : आचरतयासीं १११६

कीं कुशळता आपुली सकळ कळा : दाउं[3] आली भुमंडळा
ते नवरसांचा पुरवी सोहळा : सुखियां श्रीमंतांसीं ११७

कीं संसार-सत्रूंनि धर्मु गांजिला :
मणौनि नीरामिमाना अभिमानु चढीनला
तो कुढावा करूं देवो आंगें[4] आला : आपणें श्रीचक्रधरू ११८

कीं ते आर्त्तजना अमृत-संजीवनी : जीवातें चोखाळीती जननी
तैसी कथा माझां मनीं : पढीयासली[5] ११९

जैसा ज्ञानरवीचा प्रकाशु : अज्ञानारी करी अंविशु
तैसा कथासंगती[6] होय नाशु : अवीयेचा १२०

## संसाररोगावरील ईश्वररसायन

आतां आसो[7] हा प्रसंगु : वानुं भक्तिवछळु श्रीरंगु
आइकतां होये भगु : माहा-पातकांसीं[8] १२१

संसार-त्रसीतांचें दुख : विसरावयां नाहीं आणिक
एक चक्रधरू वांचौनि मोचक : कव्हणीं नव्हे १२२

तो सकळ मंगळांचें निधान : कीं आनंदें[9] अंमृतांचें[10] रसायेंनें
करुनि अनुरागाचें अनुपान : योगियें[11] रस सेविते जाले १२३

१ फग. दृढावेया. २ कखग. पाहाता. ३ फग. दातुणे. ४ फखग ० ५ क ० ६ खगघ. सगीतीं. ७ फखग. असो. ८ घ. प्रतीत यापूर्वी ईश्वर शब्द चुकून आलेला आहे. ९ क. आनंदाचे. ग. आनदामृताचे. १० कख. "एन. ग. "येन. ११ फखग. योगियें.

तो वीखय-व्यांदी-त्रीनाशनु : सानिपातें[2]–भैरवु भयभंजनु
भवरोगातें नीमानु : आणीक नेणे १२४

तो त्रीलोक्य-चींतामणी : त्रीभुवन-कीर्त्ति श्रीचक्रपाणी
सर्व रोगांची तोडी तवनी : माहा-मृगांकु[3] तो १२५

की तो वनमाळीनी-वसंतु कैवल्यकेसरी
प्रताप-लंकेस्वर क्षयगजातें[4] वीदारी
की ज्वरांकुश वीरहज्वरीं · वीरहीणीसीं १२६

की तो ज्ञानगर्भ-पोटळी उदे-भास्करू[5] · फेडी अज्ञान-त्रीमीराचा आंधारू
सेवितां तुष्टि पुष्टि सुख श्रींधारू : ग्यान्ही होती १२७

की तो कामीनी-मदन-पंचबाणु · कंदर्प-कामदर्प-हरणु
सेवितां नुपजे सीणु · सर्वकाळीं १२८

की तो वासना-वात वडवानळु : अगस्तीसमी अन्यथाज्ञानांचा सळु
माहाव्यादी[6] काढीती पळु · द्रीष्टी देखौनियां १२९

की तो कल्पतरु कल्पना पुरवुनि नीपुण
बाळसुर्य[7] माहाकाळु विध्वंसन
सुखरेख सीधी सुखसंपादन · सुखिर्य[8] करीता १३०

कीं तो पीउख सीधं[9] घुर्जेटी : त्रीदोख सांम्य सदा सुटी
जयातें आ(इ)कौनि कर्णपुटीं : रोगां रीगावा नाहीं १३१

---

१ कग व्याधी°. २ क. सांनि° ग. सन्निपात°. ३ कखग थीरंगु ४ क. क्षयातें. खग[illegible]. [illegible]. ५ ग. उदये° ६ कखग °नदी. ७ कख. सुर्यो. ८ कखग. सुखियें. ९ क. सीधु. ख. सीधु. ग. सीध.

की तो भूत-भैरवं प्रताप-रुद्र : उदय-मार्तंड संकोदरु
व्यादी-गजकेशरी[1] बोले वडीवारु : सैत्या वीखमावरी १३२

तो दीव्यलोचनु नेत्रवीळासु : दावी आनद-नीधानाचा मोसु
जरी जोडे सब्रदवेधीयां[2] रसु : तरी दैवां दैव १३३

की तो रससीरोमणी[3] गुणनीधी : रसपूजे ठेवांवें मन चीत्त वुधी[4]
वाल यक घेतलयां वामसंदी[5] : समाधान होए १३४

की तो धनंजयो काळ-कृदांतु : असुरां[6] व्याधीवरी तपे अदभुतु
की वीवेक-समुंद्र उजरी वागपंथुं[7] : प्रियं[8] बोलणयांचा १३५

की तो देवदत्त रसायनु : द्रीष्टीपातें[9] पोखी जीवाची तनु
रोगरायासि करिं अपीमानु : नीमीक्षमात्रें[10] १३६

की आमृतघन वरिखावो : ज्वर-निवृति करावया हाचि उपावो
जैं मीळे रसादिपती[11] रसरावो : रसइंद्रु १३७

की ती श्रीथ्यंजयो[12] ममता-भ्रांति-नीवारणु : ह्रदइ दीपकु सुचिराभरणु
मेलें जीवनी ऐसा गुणु : नांही आणिके रसीं १३८

की तो पूर्णकांमेस्वरू नीजानदुमूर्ति : धातुसाम्य सर्वांथी
जयाचां नामींचि वेधवंती : पर काइ सांघों १३९

की तो सर्वगुणसंपंन्नं[13] : रसरंगु जोती मंदाग्निउथापनु
असाध्य रोगीयें[14] उजरी पाचाहनि : वेळु न लगतां १४०

---

१ फग व्याधी.° २ फग. शब्द°. ३ ग शिरो° ४ फग. वुद्धी. ५ क वामु°. ग. वामुसुदी. ६ फ. असुरी ७ फ °पयु. ८ फखग. प्रिये. ९ फग. दृष्टी°. १० फ. निमीष्ये° ग. निमिप. स. नीमीक्षा° ११ फ. रसाद्धी°. ग. रसाधि° १२ फखग. श्रोत्यजयो. १३ फखग °गुणी° १४ फखग. योगीये.

कीं तो हीरण्यगर्भ हीतकारकु : अपकार न करी जालया[1] अधीकु
दिव्य देह करानेया यकु . आजरामरूचि होऐं १४१

कीं तो अनदभैरउ अनादीचा : फळश्रुती बोलों नेणिजे वाचा
जेणें व्याधि जाय अनतां जन्माचा : सप्तमात्रीं १४२

कीं तो पूर्णचंद्र उदयोवसंतु कुसमाकरू
मात्रसंचारें पडे माहारोगाचा वींसरू
वातपीतुस्लम्मा उछेदुनि आनदसागरू : आरोग्य करीता १४३

कीं तो मळयानीळु रीतुपती[5] · मनसतोखें[6] सेविजे आर्त्तभुतीं
सर्व रसाचीं कार्यें दीसती : एकी ब्रह्मरसीं १४४

तो बहुतीं भावनी नागरू : नीफजवीला सर्वांगसुंदरू
लखमीवीळासुं सर्वेस्वरू : वर्णीन आतां १४५

## श्रोत्यांना विनंती

तया नीरूपर्मा नीराकारा उपमा देईजैलें श्रीचक्रधरा
तरी कोपतील अनुचर ब्रह्मवीद १४६

परी जाणतां दयावें[10] अवधान वर्णिता श्रीमूर्त्तीचें महीमान
सुखाचा सोहळा करीन : आर्त्तांसी[11] १४७

वानितां देवो लावण्यसागरू : नामीं वेधबोधाचा पडीभरू
भणौनि श्रोतया अति आदरू करावा न लगे १४८

---

१ क. जो घेतलेया. २ कखग अजरा अमरूचि ३ कखग. आनद॑. ४ क # ५ घ. रीतपथी. ६ कग सतोषें ख. सतोखू. ७ कखग लक्ष्मी॑. ८ कग नीरो॑ ९ कग दीजैल. १० कग. दीजे. देयावे. ११ कग. आर्त्तजनासी.

चंदन परीमळें फुल्ला : तो कवणातें प्रार्थु गेला
जेणें सकळ जनु वेधीं लावीला : आपुलां गुणीं १४९

ना तरि सुगंधी सुपरीमळी : शतपत्र पायीतळें पाडळी
काइ अळीउळासीं केतकीदळीं : मुळ पाठवीलें १५०

की कुरंगों[1] नाभिकमळीं कस्तुरी : ते काइ चक्रवर्तीतें पाचारी
कीं चकोरवर्गासीं चंद्रकरीं : कांहीं मानु दीधला १५१

कीं जाइजुइ मोगरे मालती : जे मांदार मनातें आखखिती
ते काइ पायां लागौनि मानवीती : खटुपदातें १५२

कीं वृक्षाची[2] साउली[3] उष्णकाळीं
तातलयातें बोलावी आपणया जवळीं
कीं भवरासी कमळीं : हातें खूणावीलें १५३

कीं मेघीं[5] आपुलेनि कवतीकें . काइ बापय केलें अती बोलीके
की नवरसीं रसाळासीं भातुकें : देउनि लांचाविलें १५४

जैसें त्रीखवंता[6] लागलयां ताहान : तयाचा पांगु न करी जीवन
नां तरि भुकैलयातें आदरें अन्न : प्रार्थु न वचे १५५

अथवा मधुकरें केला सुरसकंदु : तो कव्हणातें न म्हणे या अस्वादु
ना तरी अमृता न लगे संदु : अमरपणाचा १५६

तेवि प्रबंधु होइल गोडीसा : तरी कवणु नव्हे प्रेमपीसा
सचाड धावे सर्वदासरिसा : न वोलावीतां[10] १५७

---

१ क कुरग. २ ख. व्रीक्षाची. ३ ग साइली. ४ कखग कनक° ५ क. मेघें कवतीके. ६ क. तृसा° ग. तृपा° ७ क.° वदु ८ कग. छदु ९ कग शब्दा°. १० क. वोलता. ग. वोलाविला.

ऐसीय कवीतेल्ते रसाळे : लागलीं दीसतीं ब्रह्मरीघेचीं फळें
तरी कवणासि नव्हेति डोहळे : मुखीं घालवेयाचे १५८

सोने-केतकीचां गाभेवनीं : जरी दीसे[1] सुधरसाचें पाणी
तरी कवणाची न पुरे आणी[2] : आस्वादीतां १५९

कापुरकेळीचां घडीं अमृताची चवी लागे फुडी
तरी कवणासि नुपजे[3] आवडी : सेवने अर्थी[4] १६०

विळासाचीय वेलि ढळमळे : दीसती वीवेकाचे घड रसाळे
तरी हातें तोडौनि हृदय-खोळे : कवण न भरी १६१

साहीयाचीय सेजे ; विचार लावण्यासीं करी वीजें
तरी कवणासि वालभु नुपजे : तया सुखाचों[5] १६२

नातरि कामतत्त्वें[6] वीकारवशें : जरी घोळिलें होय ब्रह्मरसें
तरी कवणाचें मन आपैसें . अभिळाखू न करी १६३

नवरसांचीये गाभारां · झळके प्रबोधवसंतीचा वारा
तरी तया सुखाचीए साम्रां · कवणु न रीगे १६४

वेधवतीयची मुर्त्ति डोळस वरी हावभावीं पाहे वास
तरी कव्हणाचें मन नव्हे राजस नीहाळ्वीतां[7] १६५

अष्टभोगाचीय राणिवे · सौभाग्य बोलैल प्रभावें
तरी तें नीरुपण नीन्हां नीचनवें . कवण नाइके १६६

नवां नीधीचां भांडारीं : उदार्य बैसौनि वेचु करी
तरी कवणु हात न पसरी : तया दानासी १६७

---

१. क. दीजे. २ कग आइणी. ३ ग नपुजे. ४ क बीसी.
५ कग. सुखाचे. ६ क. °तत्वे. ७ क. नेहाळीता.

सौंदर्य[1] आंगें आपण : अन्मोदी अच्यूताचे गुण
तरी तादात्म नव्हे कवण : परीसा‍‍स्था १६८

सीहाणीव आपुला गुणी : से घेउनि[2] पुरवी अन्येत्राची आणी[3]
ते जरी देवाचा महीमा वाखाणी : तरी कवणासि न मने १६९

वेधीं लाउनि आपुलां पर्थी · जगा उपदेशु दे श्रुती
ते जरि पढे परब्रह्मांची कीर्त्ती : तरी कवण परीसे ना १७०

परा बोलौनि सवीर्यो सुगरणी : जे मानीजे वेदीं पुराणीं
जे ब्रह्मवीयेची पुरवी तरणी : तरी कवण नेघे १७१

कळाकौसल्य कदर्पकथा : नीरोपुं जाणे कुशळता
तयामाजि दीसे धर्मवार्त्ता : ते जगा दुर्ळभे[5] १७२

तैसें जाणिवेचेनि रसें सुरंगें : श्रींगारूं[6] सांति-क्षेमेचेनि योगें
जळकेळि खेळवीन ज्ञानगंगे मनें महंतांचीं १७३

चातुर्याचेनि सौरसें फेडीन माहामुर्खाचें पीसें
कवीता-ल्ते लावीन घोंसें . सारस्वत-फळाचे १७४

जयाची जैसी वासना : तया तैसाची भावो[7] आणिन मना
जेवि कल्पतरु पुरवी कल्पना : आपुलेनि आंगें १७५

ना तरी चींतीलें दे चींतामणी . कांमधेनु खडुरसी[8] पुरवी आणी[9]
तैसी माझी पवीत्र वाणी . कवण नाइके १७६

---

१ क. सुदर्य ग. सुदर्ये २ क. सेउनि ३ कग. आइणी.
४ कखग. सवीया ५ क. दुल्म. ग. दुर्ल्लंभ. ६ कग श्रृंघारू.
७ कग भाओ. ८ क. सडु॑. ग. पडु॑. ९ कग. आइणी.

बोलौनि भगतीप्रेमाआगळी[१] : आवडी आणीन मनाजवळी
अनुरागु आत्मयातें कवणी[२] काळीं : सांडुनि न वचे १७७

ऐसे सबदें[३] सप्रेमळ : आइकतां येति[४] आनंदाचे कल्लोळ
साधुंचें मन होए नीर्मळ : तरी वीनती काइसी १७८

भणौनि वाखाणीतां श्रीरंगु : न पडे श्रोतयांचा पांगु
साउमा सांधैन कथाप्रसंगु : मुर्त्ति-ज्ञानाचा १७९

## काव्य-गौरव

जो ज्ञानगगनमंडळीं सुधांकरू[५] : उदैला मुर्त्तिप्रकाशकु मुर्त्तिचंद्र
ते चांदिणें वीसेखीतां नासे अंधकारू : अज्ञानतमाचा १८०

वर्णीतां श्रीमुर्त्तीचीं ल्क्षणें : श्रोतां परीसावीं सावधें अंत:करणें
आइकतां चमतकरतीलें[६] मनें : कळावीदांचीं १८१

वाणितां श्रीचक्रधराचा मुर्त्तिमयंकु : आनंदें ढुल्वीन त्रीभुवनीचा लोकु
सुमनां करीन संतोखु : सभेचीया १८२

बोल नव्हती[७] रसें आगळें : परी वाणीतां परब्रंह्म गोरें सांवळें
हातें झेलीजति[८] फळें : सुखरसाचीं १८३

आतां साहीत्याचेनि रसें : श्रींघाराचेनि[९] घुमुकुसें
प्रबंध नाचवीन उल्हासें : कवीजनाचे १८४

सरिसीं सुढाळें : वोवीजती[१०] मुक्ताफळें
तन्ही ग्रंथींचीं अक्षेरें सोइजळें : तयापासौनि १८५

---

१ कग. भवित'. २ कग. कव्हणी. ३ कग. शब्द. ४ खघ. यति. ख. एति. ५ कग. श्रोते'. ६ कग. सुद्वा'. ७ कग. चमत्करतील. ८ कग. नव्हेति. ९ क. 'जेति. १० खग. शृंघारा'. ११ ग. ओविजति.

माणिकांचा रंगु : करी अक्षेरांचा पांगु
कुंकुमां उपजे अनुरागु : प्रबंधलतेचा १८६

पद्मप्रमयाची चद्रावणी : आ(इ)कौनि संचरली नवरत्नाची खाणी
उर्णे मानीलें चद्रकीर्णी[1] : ते मात्र देखौनियां १८७

ते आपुलेनि गोडिसेपणें : अमृतातें करी ठेंगणें
साकरेचीं उतरीजति नीवळोणें[2] : कवीतालतेसी १८८

तीय कवीतेची रसवृती : आ(इ)कौनि कोकीळा कुंजों लागती
देखौनि पारुखे गती : राजहंसाची १८९

जैसे वसुंधरेवरि बहुतां रत्नाचें लेणें : परी चींतामणीसीं येकही नुमाणे
तैसें माझें अर्थदायक बोलणें : सकळ ग्रंथावरी १९०

वेदांत तर्क नीगमागमाचीं मतें : पुजा करीती ग्रंथदेवतें
जैसीं त्रल्वीचेसी बोळगतें : सकळ शास्त्रें १९१

नातरि आपुलालां ठायिं[3] थोरु : दीपदीवटीया बोलती[4] बडीवारू
जवं नुदैजे दीनकरू : प्रकाशबहळ १९२

तैसें चातुर्यसांमर्थ्यातव : सकळ ग्रथ भोगीती गर्व
जव मुर्त्तिप्रकाशाचे भाव : डोळां न देखती १९३

तवंचि सरितांचें गडगर्जन : जवं समुद्रेसि न्हेवे[5] दरीसनं[6]
तैसें सकळ सीधांताचें वीचारण : माझीया कवीते पुढें १९४

ऐसी कवीता सबदरचनां : दोख यइल क्षुद्रजना
जैसी वीरहीणी चंदना : देखों न शके १९५

---

१ कसग. चद्र°. कग. °कीरणी. २ वख. नीव°. ३ कग. ठाइ. ४ ग वोलेति. ५ कग. नव्हे. ६ कग. दर्शन. ७ कग. शब्द°.

काळकुटाचें जाळ भुजंग वमी मुखें हळाहळ
तें चदनें समे सकळ स्परीशें जालया १९६

तया चदनातें देखौनि दृष्टी वीरहीणी भीतरीं भडका उठी
तैसे सब्द आ(इ)कौनि कर्णपुटीं दुर्जना दुख होए १९७

ना तरी पुर्णचंद्राची सीतळ्ता · द्रावो[2] उपजवी सोंमकांता
परी वीरहीणीसि सर्वथा सुख नाहीं १९८

आसीनीयै[3] पुणिवेचां दीसीं[4] : मयंकु कुमोदातें वीकासी
परी वीरहीणीचां मानसीं . धडाडी सुटे १९९

अथवा चोरा न सोहे चांदीणें नावडे उबगवाणें
परी चकोरां होय पारणें अमृत-करांचें[5] २००

तीर्थ[6] चांदीणीयैं रातीं · कामिनी प्रियातें आळगीती
परी चक्रवाकें वीयोग पावती चंद्रें सुख नाहीं २०१

तैसीं पदें होती रसाळें आइकतां सुमना पुरती सुखाचे सोहळे
परी दुर्जनाचें मानस जळे चुनखडयाचीया परी २०२

जीवन तरी होए सुसीतळ · परी सबधें खडयां उपजे सळ
मग आतुचेयां आतु करी जळजळ तैसे क्षुद्र जन २०३

परी तयावरी न घली लक्ष जे सत नीरंतर स्मरणीं दक्ष
ते होतील सापेक्ष या बोलालागीं २०४

---

१ कग स्पर्श २ क द्राव खग. द्रावो. ३ कग. आस्वीनोए. ४ कग दीवसीं ५ घ 'कराचे ६ कग तीये. ख. तीए. ७ कख. चादीणीए ग चादिणीये. ८. स. सहेया. ९ घ. 'चया.

जैसा भवरुं[1] परीमळातें : टाकौनि[2] जाय जेथें तेथें
तैसीं संत जनाचीं चीत्तें : गुणग्राहीकें २०५

ना तरी मेघांलागि चातकांसी : उतकंठा[3] बहुं[4] मानसीं
तेवि आर्त्त या बोलासी : संतोखती[5] २०६

अथवा उदैलेनि रविमंडळें : वीकासति कनककमळें
तैसीं श्रोतयाचीं[6] मनें उतावेळें : कथेलागी २०७

ना तरी दीनकरा दोसें : सविर्या श्राधाळुवें[7] सारसें
तेवि महंताचें[8] मनें उल्हासे : आइकावया प्रभु-चरीत्रें २०८

कीं चंद्राकारणें चकोरू : अंतरीं उन्नत अपारू
तैसा मानु देती योगेश्वरू : काव्यमुद्रेसी २०९

जैसे चंदनाचीया दुर्त्ती[9] : वेळु वांचौनि सकळवृक्ष वेधती
तेवि सुजाण घेती : बोल माझे २१०

जे सकळ सांमग्रीया प्रवीण : तेजुनि देवा रीगाले शरण
ते अवधारीतु वीत्तराग वीचक्षण : कवीत्व माझें २११

येथें[10] नाहीं नवलावो : वाणीता सर्वज्ञरावो
आइकतां उपजे द्रावो : सांभव सुखासीं २१२

वानितां परब्रह्म केवळ : बोल होती सकुमार सुपरीमळ
ते आइकतु मुनीजन सकळ : क्रांतदर्शे[11] २१३

---

१ ग. भवरू २. क आइकुनि. ग. टाकुनि. ३ खग उत्कठा. ४ कखग. बहुत. ५. क. संतोपती. ग संतोपती. ६ खग श्रोते. ७ कग. श्रधाळुवे. ८ कग. महताची मने ९ कग. दृती. १० घ. यथ. ११ क. 'दर्शी.

## डोमेग्राम वर्णन

आधीं जानु डोमेग्रामु जेथ श्रीचरणीं विहेरे आत्मारामु
जेणें हरीला भवश्रमु संसारतप्ताचा २१४

धन्य धन्य तें नगर जेथें[1] परब्रह्म क्रीडे साकार
धन्य धन्य तें गंगातीर जें श्रीमंत पावन जालें २१५

धन्य धन्य तो लोकु जेहीं देखीला परम-पुरूखु
धन्य धन्य तो वीवेकु जें देओ जाणीजे २१६

जें सौभाग्य सौंदरी महिमानों[2] आगोचरी
ते वेल्हाळ श्रीमूर्ति मनोहरी स्वय राज्य करी २१७

राज्य करीता कैवल्यपाळा तराय आली सकळ कळा
सगती भोगी सोहळा सवदसुखाचौं[3] २१८

परज्ञान दसे आलें वीज्ञान महीमा पावलें
अष्टभोगी सुख मानीलें ईश्वरसवधाचें २१९

ओळगता[4] जगजीवनु वाढीनला वीवेको[5] मानु
प्रबोधु होए प्रधानु परेसाचा २२०

वीकार[6] दोंदील जाला भावो भगतीसि[7] आला
अनुरागु आवडी सचर्ला[8] सरिसाचि असे २२१

सौभाग्य सुरंग रंगलें सौंदर्य तारुण्यासि आलें
साहीत्य सीहासनीं बैसलें पांडीत्य करावया २२२

---

१ ग जेय २ कलग महिमा मना ३ कग शब्द ४ कग वोळ॰ ५ ग वीवेकाचा ६ कग वीचार ७ कग भवनीसि ८ कग सचरला

श्रींगारी सीहाणीव बाणली : चातुर्या चाड उजरंभली[2]
कुसलता काम करूं सीकली : कांडारीवं २२३

ब्रह्मत्रीया जाली जाणती : प्रेमा संचरली आर्त्ती
लावण्य करी परमप्रीती : उतकंठेसीं २२४

आनंदा चटलें बीक : रतीसीं संवाद करी सुख
म्हणे आम्हीं देखीलें मुख : अनुभूतीचें २२५

अध्यात्मं[3] जालें रसाळ : श्रधेसि लागलें शांतिफळ
ध्यान चींतनेंसीं होये गोठिवेऌहाळ : उठों न सके २२६

गांभीर्यासि आलें घणवटपन : दातृत्वें हातवसीलें उदारलक्षण
क्षेमा नीवृत्तीचें मीरवी भूषण : तीहीं लोकीं २२७

वीकाराचीये सेजे : वीळासु चाळवीला रजें :
वीखो रीतुरायासीं वाय भोजें : नवरसांचीं २२८

सकळ धर्मा जाली उजेरी : सत्रीजता दीसे सर्वशास्त्रीं
प्रमय वीत्पतीतें वीस्तारी : वीत्पनतेसहीत २२९

रूपासि बाणलें भारण : कंदर्पा दुणावलें ताराण
वेधवंतीया घेतलें आवरण : सखोल्तेचें २३०

उन्मेखु जाला डोळसु : मती मनेंसीं मांडी सौरसु
सविया उजळला प्रकाशु : देखौं[4] लागे २३१

स्वस्ततेसिं होए तुष्टी : बुधीसि आली अती पुष्टी
सीधांत सरता जाला श्रृष्टि : नीकोयापरी[5] २३२

---

१ कग श्रृघारा. २ कग. उच्चमली. ३ ग. आध्यात्म. ४ कखग. देखो ५ कग. निकया॰. ख. निवेया॰.

इसाळें परीमळु पवनातें लोटी नादु सवदेंसी[1] करी हातपीटी
तेज प्रभेतें आगें दळवटी अतुरपणें २३३

गोडीयेसि[2] आली गौल्यता चदनें अगीकरीली सीतळता
रगु श्रीरगा देखता सराउ धरी २३४

वरवेपणा पुट चडिलें[3] दैवें आपणयातें दाविलें
अळकारीं आग सेविलें अच्युताचें २३५

महीमेसि जोडली टेव ल्क्षमीएसि[4] आली हवाव
मुगुती भुजे राणिव योगमडळीची २३६

पुराणें जालीं प्रसीधें काव्यें मातलीं मदें
प्रतीष्ठा केली वेदें उपनीषेदाची[5] २३७

तप सामर्थ्यासीं सौजन्य करी चर्येसि[6] आचाराची आली थोरी
सत्व सयमातें हातीं धरी परस्परे २३८

वैराग्य वीरमातें घेउनि चाले मोक्षपथें
त्याग सयासें केलें आंपैतें कळासंन्यासी २३९

भूमडळाचीये मध्यप्रदेसीं राणिव केली ऋपिकेशी[7]
तें नगर वाणिता मानसीं आनदु साटे ना २४०

तयां नगराचें बरवेपण वाखाणु जाणे कवण
जेय आदिपुरखु आपण राणीव करी २४१

तऱ्हीं प्राकृतीं सवदीं[8] रसाळीं दावीन परशास्त्राची नव्हाळी
सुमना करीन दीवाळी परमानदाची २४२

---

१ कग शब्दसीं २ घ 'मसि ३ कग चढले ४ कग ल्क्षमीये ख लखमीय ५ ख उपनीखदाची ६ ग चर्य ७ ख रीसीकेसीं ८ ग तेया ९ कग शब्दी

पुरवीन योगीयांचे सोहळे : संतांचीं[1] मनें करीन सप्रेमळें
हातीं देइन दीव्य फळें : ज्ञानामृताचीं २४३

सवियां सुहावा सुखरूपु : उघळीन प्रबोधाचा धुपु
प्रमयाचा घालीन मंडपु : जाणालागी २४४

अनुचरां आध्यात्माचा आदरू : देउनि करीन सुखाचा पाहुणरु
ओडउ वोडवीनें[2] थोरु : श्रींघाराचा[2] २४५

दावीन देसीएचें वीक : प्रबधीं तादात्में[3] होती रसिक
जैसें परीमळें घोळीलें पीयूखें[4] : जगा दुर्लभें[5] २४६

जीवा आधींचि पढीयें[6] श्रींघारुँ[7] : वरी वाणीतां देवो नेटका नागरु
तरी कवणासि नुपजे वीकारु : तया सुखाचा २४७

तैसे श्रोतयाचें मन आधींचि सचाड : वरी मऱ्हाटीया पुरवीन कोड
तरि कवणासि न वटे[8] गोड : चरीत्र देवाचें २४८

उजळुनि[9] प्रबोधाची दीवटी : मायामोहाचें काळवखें लोटी
कैवल्यपथ दावीन दृष्टी : मार्गप्रवृतिकांसी[10] २४९

सगुणा भक्तिदुर्मांसि नीचनवा : देइन ब्रह्मवीयेचा वोलावा[11]
तो भावो[12] प्रेमगर्भु परीसावा : ब्रह्मवीदीं २५०

सुरंगा वोलांचें पुंटें[13] वहळ : चढउनी साधुचें मनें[14] करीन नीर्मळ
आइकतां लांचावती कर्णयुगळ : आर्तजनाचें २५१

---

१ कखग. ओडवीन. २ कग. थूंघा°. ३ क. तादात्मव.
४ कखग पोउख. ५ क दुर्लभ. ६ घ. पडीय. ७ कग. धृघारु.
८ ग वाटे. ९ ख. °ळौनि. १० ग. °प्रवर्तिवामी. ११ ग ओल्हावा.
१२ कखग. भाओ. १३ कग. पुठ. १४ कग. हृदयें. ख. हृदए.

साधैन मोक्षाचें नीजवर्णे प्रेमा पात्र होइजे जेणें
तें ज्ञानभक्तिवैराग्य लक्षणें : शृत करीन २५२

विचाराचेनि सुरवाडें : फेडीन नेणीवेचें सांकडें
आइकतां सत्व चटे : वीतरागांसि[1] २५३

घालीन ज्ञानाची गवांदी मना उपजे भावोबुधी[2]
परमार्गाची साधैन सुधी[3] : साधकजनासीं २५४

बोधाचें रोप सकोमळ तें नीरुपणें[4] करीन सबळ
वैराग्या लावीन फळ जाणिवेचें २५५

नवरसाचेनि काल्ठणें . कल्पावीदां वाटीन कथेचें बोणें
रसीं रसकेळि खेळती मनें सुखीयां श्रीमत्तांचीं २५६

जया जैसा मनोरथु : तो तैसाचि पुरविन हेतु
कां जें कथानायक कैवल्यनाथु सकळ यज्ञाधिपती २५७

स्वर्दे[5] सुर्याचेनि प्रकासें फेडीन अज्ञानाचें कडवसें
पदीं भावो दावीन गोडिसे . सीधांत मुद्रेचे २५८

एक काइ बोलुं[6] आवेशू वाणिता कौवल्य–मल्लु ऋषीकेशु[7]
त्रीयंचां[8] भरीन आवडी रसु . अनुरागाचा २५९

पढतां श्रीप्रभूचे पवाडे · पशु फल्रानदु जोडे
भोजें नांचवीन कोडें श्रीर्षें[9] लतावळी २६०

---

१ खग. वित्त°. २ वग. भावोनुद्धी ३ फग. बुद्धी.
४ क. निरो°. ५ फग. शब्द°. ६ फखग. बोलो ७ ग हृपी°.
व. हृर्षी°. ८ ग. त्रीयेंचा. घ. त्रीयंचा परी. ९ फग वृक्ष.

वाखाणितां कैवल्यकंदु : जहां संचरे[३] वेधु
ऐसा गुण स्वतंत्र सीधु : नामींचि वर्त्ते २६१

तो जीये स्थानीं वर्तत असे : तें वाणितां नव्हे अनारीसें
नामापासौनि होए जैसें : श्रवणमात्रें २६२

तया नगराची थोरी महंत : आ(इ)कौनि सुखीये[२] होती संत
योगीये[२] परम सीधी पावत : दास्य करीतां २६३

देवो स्वर्गी करीती अमृतपान : परी न चुके संश्रुती आयागमन
तैसें हें नव्हे अच्युताचें क्रीडास्थान : जें पावलयाँ नीत्यमुक्त २६४

आणिकें पुरें पाटणें : होती सोभायमान सलक्षणें
परी डोंब्रग्रामासी पटीत्रपणें : सरीसी नै पवती[४] २६५

अन्य नगरांची व्यावृत्ति : प्रतिष्ठान व्यावृत्ति

जरी म्हणो अमरावती : तरी तेथ नाहीं ब्रम्हवीद्येची नीस्पती
पाताळीं भोगें उत्तम वाखाणती : परी परत्र नाही २६६

ना तरी कैळास वैकुंठ सत्यलोक : तेथ नेणिजे परमार्थसुख
कव्हणि[६] काळीं नेदखती[७] मुख : परमानंदाचें २६७

ना तरी वाराणसीसमान : नगर होए प्रतीष्ठान
परी नीत्य-नरकांचें[८] अनुसंधान : तुटेचि ना २६८

एकाची[९] वोखटी[१०] वासना : एक पात्र जाले उत्तम साधना
एक प्रवर्त्तले ईश्वरहनना : तयाचें नांव नेघिजे[११] २६९

---

१ कग सचरीत. २ घ 'य. ३ कखग. 'लेया. ४ ग नवती.
५ क.# ६ कग. कव्हणे. ७ कग. न देखतो. ८ कग 'काचे.
९ कख. एकाची. १० कखग. ओखटी. ११ क न घेइजे.

एकां उपजे बुधि प्रतीती : एकां होय आनंद रितती
एक माहासामर्थ्यें देखती : परी रोखें न वचे २७०

एक अनकुळ उदास : एकाचें[3] कोवळें मानस
एक कठीण कर्केश : भयानक २७१

एक सत्रीयों सप्रेमळ : एक पापीय प्रतीकुळ
एक कखाय समळ : दुराचारी २७२

एक श्रद्धालु चाडार्थी : एक प्रवर्तले सेवाप्रवृत्ती[5]
एक विपरीत भोगीती : सदासर्वदा २७३

एक रसाळ राजस : एक श्रोते सुरस
एक द्वेखीय तांमस : डोळां देखती ना २७४

एक लटिके नीष्ठुर लावक : एक दुष्ट दुमनं[6] चुंबक
एक अज्ञान वेडे मुर्ख : कांहीं जाणति[7] ना २७५

एक अधीकार्य[8] भावाळु : एक हींसक इसाळु
एक कोरडे कणवाळु : वीस्वासघातकी २७६

एक अंन्येयाज्ञानीयें[9] नींदक : एक एकावरी बोलती दोख
एकांचें पाहुं[10] नये मुख . कव्हणी[11] काळीं २७७

एक सर्वदोखीं सबळ : एक हत्यारे चांडाळ
एक न वीचारीनी फळ : पुण्यपापाचें २७८

---

१ कख एवा. २ कग. रोखु ३ खग. एकाचे. ४ कखग. सवीयां. ५ कखग वृत्ती. ६ कखग. 'दमन. ७ जाणेति. ८ कखग 'कार्यें. ९ कग ज्ञानीए. १० कखग. पाहों. ११ कग. कव्हणे.

एकां गुणाचा वीसरु : एकां दोखींचि आदरू
एक करीती व्यापारू : नीरयसाधनाचा २७९

एक अनधीकार्ये[1] अधोमुख : देतां नेघती[2] कैवल्यसुख
एक लोभिये माहावंचक : जन्म देवों न सकती २८०

एक अनादीचे अधर्मसीळ : सन्निधानें नव्हेति नीर्मळ
एकां देवोवांचौनि केवळ : आन नावडे २८१

एक सुखीय श्रीमंत : एक वीत्पन्न वीद्यावंत
एक दुखदानी[3] दुखें भोगीत : दैन्यवदन २८२

एकां जन्माचा उपेखा : जाणौनि न भजती परमपुरुखा
ते नेइजती कुंभिपाका : नीरयसाळेसी २८३

ऐसा प्रतीष्टानीं[4] श्रीवीध जनु : भणौनि महीमा बोलुं[5] नये गहनु
ना वृधासंगमीं तरी जगजीवनु : श्रमु पातला २८४

## वृधासंगम व्यावृत्ति

जो अहीर्नेसीं स्वयें आत्मारामु : तेय केवि बोलावा पीडाश्रमु
परी भक्तांकारणें पुरुषोत्तमु : चींता स्वीकरी २८५

जे चांडाळ दुष्ट दुराचारी दुष्ट दुर्जन : पापीये करूं आले ईस्वरहनन
तया नीत्यनर्कावांचौन : दुजें आनु साध्य नाही २८६

---

१ कग अना°. २ लग नेघेती. ३ ग. दुःख°. ४ क. प्रते°.
५ कखग. बोलों. ६ कखग. ताप°. ७ ख. पुरुषो°.

ते नीर्वाण-पापीय हत्यारे : ईश्वरघातकी स्वामिद्रोहे
तयाचें नांव नेघावें सर्वप्रकारे : ध्यान-पराएणीं २८७

तवं नागार्जुनें प्रतापमल्लें : वोडण-खांडें हातवसिलें
मग आवेसें पाठिमोरे केले : पराभौनि[1] २८८

परी देवो निराभिमान श्रीचक्रपाणी : अन्यथा नव्हे कैवल्यदानी
नागींद्रा आपुली आण देउनी : शस्त्र साडवीलें २८९

तीयें काळीं नागार्जुन कैसा मीरवला :
जैसा कोपें प्रतापरुद्र खवळला
तो अनुवादु आपण देवें श्रीमुखें केला : श्रीचक्रधरें २९०

ना तरि कोपलया काळ कृतांतु पुरवील सृष्टिरचनेचा अंतु
ऐसें बोलिला कैवल्यनाथु भटातें दृष्टी[2] सुनि २९१

परि न धरेचि[3] भटांचा आवेमू : मानिला श्रीचक्रधराचा त्रासु
मग म्हणति श्रीकृष्णवांचौनि भडसु · पुरउं न सके २९२

तव बोलिला आगाध चक्रवर्ती वानरेयाँ एथ नाहीं तैसी प्रवृती
एऱ्हवीं हे आपेंआप जूझौनि मरती . ऐसें न कीजे २९३

प्रल्हादाचेनि[4] कैवारें : नरसींह भूत एक अवतरे
तयाचेया कोपा न पुरे[6] : चराचर वीश्व २९४

जरी देवता आवेशा भरे : तरी परमाणुची व्यक्ति नुरे
मग तयाही नीपुठारें[7] काइ ईश्वरसामर्थ्य २९५

---

१ कग पराभउनि. २ ल द्रीष्टी. ३ घ. पुरेचि.
४ कलग. ॅरया. ५ लघ प्रारयाचेनि. ६ घ नुरे.
७ कग. नीपोटारें.

परी देवो नीर्विकारु निराभिमानु : अन्यथा नव्हे आनंदघनु
मग सांतु जाला नागार्जुनु : नीजकींकिरूं २९६

जेहीं कैवल्यनाथाकारणें : देह वेंचिलें थोरें मानें
तया प्रेमवांचौनि आन देणें : ईश्वरीं बोलो नये २९७

परी पापियाचें ओल्टें[1] मन . करूं आले ईश्वरहनन
ल्टकें[2] बोलौनि अन्यथाज्ञान : बाइसां दुख संपादिलें २९८

सांघौनि नव्हती दुर्वार्त्ता : घतलें सुप्रेमळा भगतां[3]
तयां नीर्वाळलेयां[4] सर्वथा : नीत्यनरक २९९

यावरि भक्तीचीया प्रेमकळिका : देहत्यागु केला नागांबिका
मग चींता वर्त्तली परमपूरूखा : परमात्मयासी ३००

स्नेहें झळवौनि बोलिला सर्वज्ञराओ :
बाइसीं कां गा केला वेगीं[5] लवलाहो[6]
ऐसा ईश्वरीं भक्ताचा पढीयाओ : आत्मयांरामासी ३०१

मादणयांचां प्रसंगीं कैवल्यनाथा : बाइसावीण सुख नाहीं सर्वथा
वीसरू स्वीकरीला हे श्रुति समस्तां : श्रीमुखें निरूपिली ३०२

भणौनि वृधासंगमीचें महींमान : प्रसंसू नए अती गहन
भक्ता इश्वरा उभयां हनन : जेथ जालें ३०३

## एळापूर व्यावृत्ति

दृष्टी नीहाळिनां नागर : नेटकें होए एळापूर[7]
परी आदिअंतीं सत्रीवर : सारिखें नव्हे ३०४

---

१ ख. वोलटें. २ कग. लटिके. ३ कग भक्ता. ४ क. निर्वाळया. ग. निर्वाळेया. ५ क.० ६ लाहो. ७ कखग. येळापुर.

भगतेंसीं[1] जगदबंधु : क्रीडा करी कैवल्यकंदु
जो आत्माराम आगाधु : अहीर्नीसीं[2] ३०५

नानाबीधें वीचीत्रें : केलीं लीळाचरीत्रें
सवियां गोडिसीं पवित्रें : अनुचरांसी ३०६

कृपावसें कैवल्याचा पुतळा : एकां दाखवी सुखसोहळा
एकांतरी चद्राची सतरावीं कळा : अमृत वरीखे ३०७

एकां लीळावसें देवो आपण : करीति श्रीप्रभूचें दरीसन
एक अंब्रफळ अवग्रहण : करुन फळा नेले ३०८

एकां स्वयंप्रकासाचेनि बळें : आपणपें द्रीष्टी केलें कैवल्यपाळें
एकांसी देवो बाळग्रीला खेळे : आगाध चक्रवर्ती ३०९

एक तापपापा वेगळे अतीत : केले नीजानंदें नीत्यमुक्त[3]
एक परब्रह्मातें उपासीत : अहिर्नेसीं[4] ३१०

एक परदैवाचीय संगती : नीरंतर परमानंद भोगिती
एकां अच्युतेंसी परम प्रीती : करूं आवडे ३११

एकां भगतीचेनि भांडवलें . केवळ नीत्यसुख प्राप्तें[5] जालें
सुध वेधांतर जोडलें : कैवल्यरत्न ३१२

एकां परमात्मा परमपुरुखु : यांचौनि सेउं नावडे आणिकु
एकां सन्निधानिं होए संतोखु . दास्य करितां ३१३

एकीं अनुरागाचें आंजन : डोळां सुदलें आनंदघन
तया प्रत्यक्ष जालें नीधान : कैवल्यसुखाचें ३१४

---

१ कग भक्तजनेंसी. २ ग अहिर्नेसी. ३ ख. °मुगत. ४ क. अहीर्नीसी. ५ कग. °प्राप्ति.

तैसा भक्तजनासहीत परेशु : राज्य करी लक्ष्मीवीळासु
तें देखौनि उपजे आवेशु : दुष्टा दुर्जनासी ३१५

तो जगदात्मा जगदेश्वरु : जीवां चींतु नेणे वोखटें वीरु
परी पापीय भोगीती ज्वरू : परश्रीसंतापाचा ३१६

ऐसी आदिपुरुखाचीये दैवी ऐतारें : सौभाग्यें वेधलें चराचर
लावण्य उधाय मनोहर : श्रीमूर्तीवरी ३१७

ऐसा श्रींधारलो परमपुरुखु : देखौनि पापीय करीति रागद्वेखु
वाढउनि मानमान्यतेचा अभिलाखु : ओखटया प्रवर्त्तले ३१८

वीखें घोळुनि दातारा : फोडी वोळगवीलीया श्रीचक्रधरा
जो आधारु चराचरा : त्रीभुवनासी ३१९

परी तो दयाळु दयावंतु : ओखटें नेघे लक्ष्मीकांतु
अनमीत्तबंधु अनाथनाथु : सकळ जीवांसी ३२०

तो जगदात्मे जगद्बंधु : कारुण्यनीधी कृपासींधु
तयावांचौनि जगीं सुहृदु : आणीकु नाहीं ३२१

तो सर्वज्ञरावो सर्वेश्वरु : सर्वात्मा भणौनि नेघे वीकरु
कामक्रोधाअधीन श्रीचक्रधरु : कहीं नव्हे ३२२

रागद्वेखाचा वारा : कहीं न लगे करुणाकरा
रजस्तमाचीया मोहरा : उभा न ठके ३२३

---

१ क दैवी एकतार. गघ. दैवी येतार. २ कग. श्रृधा°. ३ ख. लक्षुमी.° ४ कग. अन्मीत.° ख. अनमीत्य.° ५ कखग. जगदात्मा. ६ कग. म्हणितला.

तो कखायाचेनि स्पर्सें[1] : घेपवेना मनें मानसें
अन्यथा नव्हीजे जगनीवासें[2] : मदमछरीं ३२४

तो आत्मारामु आगाधु . अवक्रीयू अनादिसीधु
विकरु[3] नेणे कैवल्यकंदु . कव्हणी काळीं ३२५

दोख वीसरौनि कैवल्यनाथें नीर्दोख केलें द्रीष्टीपातें
परी पापीय न्हाती माघौते[4] . वासना उपमर्देना ३२६

आंधारीं रचुनि आसन वरी उपवीष्ट होए मुर्त्ति आनंदघन
पुजा पुरस्कार करुनि नीरेसाधन : चरीतार्थ केलें ३२७

आपुलेनि हातें मुखकमळीं : फोडी वोळगवीलीया चांडाळीं
ओखटें घडलें अवतारीं केवळीं . नीत्यनर्क पुर्ण जालें ३२८

मग[5] श्रीमुर्ति वेल्हाळी . पीडा स्वीकरीली तीये[6] काळीं
खेदु पातले वीखयप्रळीं विश्रांतचैतन्य ३२९

ल्हानल्हानु वोदरु . सर्वांगीं स्वीकरी सर्वेस्वरु
तें देखौनि बाइसां थोरु : धाक वर्तला ३३०

मग म्हणे नागांबीका . आतां काय करु बाबा कैवल्यनायका
तव देवें बोलीलें बाई भेवो[7] नका . काहीं नव्हे ३३१

एकातें नीमीत्य[8] केल्यावांचौनी : न वचीजे हें राष्ट्र सांडौनि
मग तीसरां दीसीं कैवल्यदानीं : पीडा परीतेजीली[10] ३३२

---

१ कग. स्पर्शें २ कखग °निवासें. ३ खग. विकरों. ४ कग. मागुतें. ख. मागौतें. ५ क ना°. ६ क °ते. ग. °ते ७ कग. तें. ८ कग. भेंउ. ख. भेओ. ९ कग. निमित्त. १० क. प्रत्येजोली. ख. °त्यजिली. ग. प्रत्यजिली.

ऐसें देवाभगताचें मन : जेथ नीन्हा होये खेदखीनें
    तें अतीसेसीं स्थान : प्रसंसु नये ३३३

### बेलापुराहून डोंबेग्राम श्रेष्ठ

सेत्रटील गांव ब्रेलोपुर : जयाचें नांव नेघति अनुचर
    ते वीसेखीतां आपणया थोर : काठीन्य यइल ३३४
स्वयं ईश्वरें कृपावंतें : बीजें करूं आदरीलें उत्तरापंथें
    भणौनि असन्निधान-धर्म : जगंनार्थें[2] जीज्ञासा करवीली ३३५
सांडिला अभिमानु लीळाप्रवृत्ती : उदास घरीलें सकळ पदार्थीं
    नीरुपण करीतां कैवल्यमूर्त्ती : अधीनु नव्हे ३३६
परीसावा पालटु भेदु : नांहीं मागील सुखसंवादु
    भगतेंवीण आनंदकंदु : अनसारिखा दीसे ३३७
वीतळला प्रसन्नतेचा बोलुं[3] : लीळावश दीसे पातळु
    भक्तावांचौनि कैवल्यपाळु : क्रीडा न करी ३३८
राष्ट्रा बोलु लावुनी दातारें . बीजें केलें श्रीचक्रधरें
    ते स्थान सवीस्तरें : प्रसंसु नये ३३९
भणौनि जाणतां अतीसेंसीं विसेखबुधी : प्रसंसा न करावी ब्रह्मवीदीं
    कां जे सर्वज्ञरावो कृपानीधी : सांडौनि गेला ३४०

### सर्व स्थानांचे विशेष डोमेग्रामात

आणिकेंही असती अन्यत्र अवस्थानें
    चरणीं चरणांकीत केलीं जगजीवनें
    परी डोंबेग्रामासि येकें गुणें : उपमु न येती ३४१

---

१ क 'क्षीत्र. २ क. जगन्नार्थें. ३ क. ओहळु.

कोठें वस्ति कोठें आसन : कोठें आरोगण करी मूर्त्ति आनंदघन
तें काइ प्रसंसार्चे स्थान : संबंधमात्राचें ३४२

कोठें ज्ञानीयेंभगतेंत्रीण : आत्माराम राज्य करी आपण
परी ज्ञानप्रेमाचें कार्यकारण : वर्त्ते ना ३४३

कोठें वेदबोधाचें अनुसंधान : कोठें सामर्थ्य वीद्यादान
कोठें ईस्वरीचें महीमान : जाणती ना ३४४

कोठें आनंदु कोठें स्तीति : कोठें प्रकाश कोठें सुखवस्ती
ते आघवेचि वीसेख दीसती : एके डोंबेग्रांमीं ३४५

## रीधपुराहून डोमेगाव श्रेष्ठ

ना जरी म्हणो प्रसीधें परिकर : काशियचा वास रीधपुरें
जेथ श्रीप्रभु निरंतर : राज्य करी ३४६

तो आत्मारामु सानंदीं रमनु . नीर्गुण नीर्लेपां जीवातें उद्धरीतु
क्रिमीतें ब्रह्मपदा असे नेतु : लीळावशें ३४७

आगाध श्रीप्रभुचा पवित्र वीशेखु : आपणपें नेणों म्हणे परमपुरखु
तो स्वय क्रीडा करी कैवल्यनायकु · परमेस्वरपुरीं ३४८

श्रीमुगुटीं आपण जगदेस्वरें : रज वंदिलें श्रीचक्रधरें
तें रीधपुरं सर्वप्रकारें : सांमान्य नव्हे ३४९

परँ[3] तीये नीर्गुणे परब्रह्मीं मज पांतां[4] : परज्ञान बोलणें नाही सर्वथा
उत्तम साघ्य साधन चरीतार्थ करीता
एकु श्रीचक्रधरुचि होए ३५०

---

१ कग प्रसीद्ध. २ ग ऋद्धि. ३ कग. परी. ४ कग पाहाता.

श्रीप्रभु परदस्यां[1] अवतारू : तेथ समळां नाहीं अधीकारू
भणौनि ज्ञानप्रेमाचा संचारू : बोलों नए ३५१

## डोमेग्राम महत्त्व

या दोहीं साधनांची नीस्पत्ती : एकीं श्रीचक्रधरींचि आति
तो स्वीकरुनि उभयशक्ती : डोंबेग्रामीं राज्य करी ३५२
भणौनि डोंबेग्रामासीं उपमीतां : दुसरें स्थान नाहीं सर्वथा
तें वीशेषण सांघैन आतां : अनुचरां ब्रह्मवीदांसी ३५३
असो हें सखोलें भावें : नगर वानुं साजिरें सुहावें
जें अलंकरीलें देवदेवें : आदिनाथें ३५४
सर्वे सेवकजन समस्त : आवडी श्रींघारलें[2] आज्ञानीए भगत
अनुरागें अनुसरलें आर्त्तभूत : वेगळे नव्हती ३५५
एकां होए सुखस्तीती : एक परब्रह्मातें उपासीती
एकां लाधली परमप्रीती : परमात्मयाची[3] ३५६
एक वेधचोधें झीटावलें[4] : ते न वीसंबति[5] काहीं केलें
एक परमानंदें अल्हादलें : अखंडीत ३५७
एकां वीद्यादानें चीत्पती : एका वीहोली भाओभक्ती
एकां संचरीली आर्ति : नीरंतर ३५८
एक स्मरणीं तादात्म : एकां नीरोपिती ज्ञानप्रेम
एक सांडीति सकळ कर्म[6] : ओखटें भणौनि ३५९
एक सेवादास्य करीति : एकां प्रकाशली मुर्त्ती[7]
एक चींतनीं बैसती : ध्यानस्त होउनिया ३६०

---

१ कग. 'दृश्या २ कग. शृंघारीले. ३ ख. 'त्मेयासी. ग. 'त्मयासी. ४ कग. दृढावले. ५ ख. 'भति. ६ कग. धर्म. ७ कग. श्री'.

एक अनीधि–अनीटासि वेगळे · इष्टाकारणें उतावेळे
एकां परधर्मी सर्वत्र डोळे : देखवेया ३६१

एक देवातें देखनी डोळां . एक आटवीती वेळोनेळां
एकां पुरे सुखसोहळा : ईश्वरयोगें ३६२

एक पापासि अतीत : पुण्यीं तादाम्य बहुत
दोखाकडे चीत : जाओं नेदीति ३६३

एक सुखीए श्रीमत : एक अनुरागपर वेधवत
एक ज्ञानीए महत : माहायोग्य ३६४

एक वीद्वांस जाणते : एक पुराणीक पढते
एक सारासार नीवडीते : ज्ञानदृष्टीं ३६५

एक वीवेकिएं वीत्पन्न : एक वीचारें गहन
एकाचें वेधलें मन : ईश्वरीं ३६६

एक वैराग्यनीष्ट नीत्याग · एक वीरामसील वीत्तराग
एक साडौनि सकळै भोग : देवा वालभेले ३६७

एक सीहाणे चौरस : देखणेपणें नीन्हां डोळस
बोलौनि पुरवीति भडस : सामग्रीवंतांची ३७१

एक दैवें अळंकरीले : एक दुखावेगळे[1] जाले
एक सन्निधान पातले : आदिपुरूखाचें ३७२

एकां ठाउकीं[2] अनेकें[3] मतें : एक प्रचुर सकळ सीद्धांतें
एक परावर जाणौनि नेणते : मौनसीळ[4] ३७३

एक अर्थी अवीनाश : प्रमई[5] वहुवस
सीधांतीं[6] मानस : लूपौनि राहे ३७४

एक सदासर्वदा प्रसन्नवदन : एक चातुर्यें आथिलें सुमन
एकां जगदेश्वरवांचौनि आन : दुजें रुचेना ३७५

एक एकांसीं बोलती : देखा हाचि आगाध कैवल्यपती
याचेनि प्रसादें जाणिजती : सकळ शास्त्रें ३७६

एक कळाकौशल्यें नीपुण : जगा नुमाणेति तयाचे गुण
एकांची थोरी देओ आपण : मुखें वाखाणिती[7] ३७७

एकीं देवाचें भणितलें केलें : ते प्रवृती वीषो जाले
एक ईश्वरीं वीनयोगा गेले : सदासर्वदा ३७८

एक सकळ कळा जाणते : एक सन्यासी आचरते
एक बोलौनि : प्रीएवगतें[8] सुखदायक ३७९

ऐसें नगर सनादलें ईश्वरयोगें : तयाची बरव वाणावीचि लागे
भणौनि अक्षरें[9] ओउनि सुरंगें : वर्णीन आतां ३८०

---

१ कग. दुसा°. २ क ठाउनें. ३ कग. अनेगें. ४ कग. मौन्य°. ५ कग. एक.° ६ कग. येशाचें°. ७ कग. वानिती. ८ कग. वचनें. ९ खग. अक्षेरें.

एक अवीधि-अनीटासि वेगळे इथानारणें उतारेळे
एका परधर्मी सर्वत्र डोळे देखानेया ३६१

एक देवातें देखती डोळा एक आठवीती वेळोवेळा
एका पुरे सुखसोहळा ईस्वरयोगें ३६२

एक पापासि अतीत . पुण्यीं तादात्म बहुत
दोखाकडे चीत जाओ नेदीति ३६३

एक सुखीए श्रीमत एक अनुरागपर वेधवत
एक ज्ञानीए महत माहायोग्य ३६४

एक वीद्वास जाणते एक पुराणीक पढते
एक सारासार नीवडीते ज्ञानदृष्टीं ३६५

एक वीवेकिएं वीत्पन्न एक वीचारें गहन
एकाचें वेधलें मन ईस्वरीं ३६६

एक सीहाणे चौरस : देखणेपणें नीन्हां डोळस
बोलौनि पुरवीति भडस : सामग्रीवंतांची ३७१

एक दैवें अळंकरीले : एक दुखावेगळे[1] जाले
एक सन्निधान पातले : आदिपुरूखाचें ३७२

एकां ठाउकीं[2] अनेकें[3] मतें : एक प्रचुर सकळ सीद्धांतें
एक परावर जाणौनि नेणते : मौनसीळ[4] ३७३

एक अर्थी अवीनाश : प्रमई[5] बहुवस
सीधांतीं[6] मानस : खुपौनि राहे ३७४

एक सदासर्वदा प्रसन्नवदन : एक चातुर्यें आथिलें सुमन
एकां जगदेश्वरवांचौनि आन : दुजें रुचेना ३७५

एक एकांसीं बोलती : देखा हाचि आगाध कैवल्यपती
याचेनि प्रसादें जाणिजती : सकळ शास्त्रें ३७६

एक कळाकौशल्यें नीपुण : जगा नुमाणेति तयाचे गुण
एकांची थोरी देओ आपण : मुखें वाखाणिती[7] ३७७

एकीं देवाचें भणितलें केलें : ते प्रवृती वीखो जाले
एक ईश्वरीं वीनयोगा गेले : सदासर्वदा ३७८

एक सकळ कळा जाणते : एक सन्यासी आचरते
एक बोलौनि : प्रीएवगते[8] सुखदायक ३७९

ऐसें नगर सनादलें ईश्वरयोगें : तयाची बरव वाणावीचि लागे
भणौनि अक्षरें[9] ओउनि सुरंगें : वर्णीन आतां ३८०

---

१ कग. दुःखा°. २ क ठाउके. ३ कग. अनेगें. ४ कग. मौन्य°. ५ कग. एक.° ६ कग. येकाचे°. ७ कग. वानिती. ८ कग. वक्ते. ९ खग. अक्षेरें.

## नगर–महिमा

जे अच्यूताचां चरणीं चरणांकित · जालें पवीत्र पावन महंत
तो महीमा वीसेखीतां संत : संतोखवीन ३८१

जैसें लावण्याचें वीनदें उतरलें : कीं श्रींगारें उपेणें केलें
तैसें नगर देखिलें : भक्तवृंदीं ३८२

कीं आनंदाचीया सगती · मदनें मळयानीळेंसीं केली वरती
कीं सुखचि आलें व्यक्ती दुःखें नाशावेया ३८३

कि तें प्रेमाचें पुर : मोक्षाचें माहेर
किं मुक्तीचें मंदिर : प्रतक्ष जालें ३८४

किं तें विचाराचें वेलाउळ : वीवेकाची पटिसाळ
कीं ज्ञानाचें गौळ : सनादलें ३८५

की तें साहीत्याचें कोठार : चातुर्यें आथिलें प्रचुर
संगितें नीरंतर : दुमदुमीत असे ३८६

कीं ते ब्रम्हसुखाचें सार्जे सोहजळ : जाणीवा उभीलें केवळ
नेत्रीं नीहाळितां आनंदजळ : हेलावे दे ३९१

कीं तें प्रसन्नतेचें मुळपीठ : कारुण्यक्रुपेचें उत्तरवेट
कीं चैतन्य वोळगे सुध चोंखट : द्रीष्टीपुढें ३९२

कीं तें वैराग्याचें गीरीदुर्ग : वीरामें वळकावीलें चांग
रजस्तमं नवचे अभंग : अवघड वेटा नांहीं ३९३

कीं तें सांतिक्षेमेचें घुळकोट[३] : भीतरि सांमावीलें सत्वसुभटें
गांभिर्य आथीलें घनवट : कल्हणा घेववेच ना ३९४

कीं तें ममतेचें मंडळ : दयेची[४] दानसाळ
भर्दी बैसोनि राउळ : वेचु करी ३९५

कीं सौंदर्याचें साबरें : स्वयं अळंकरीलें श्रीचक्रधरे
उदार्य ढाळितसे चवरें : सुखसांमर्थ्याचीं ३९६

## छिन्नपाप येथील लीळा

ऐसी सौभाग्यें आथीली नगरी : प्रमय बोलों नेणिजे वहुती कुसरी
जेथ सर्वज्ञनाथु क्रीडा करी : सर्व शक्तिसहीत ३९७

वीस्वनाथ वीहीरती[५] वीराजीं[६] श्रीचरणीं :
भणौनि गोमती पाठविली पीनाएकपाणी
वस्तुसंवंधें आनंदाची धणी : पावावया ३९८

कीं असतां महादेवाचा जटामुगटीं : न चुके जन्ममरणाची कांमाटी
भणौनि चिदात्मकाचयाँ चरणांसीं भेटी : घेओं आली[८] ३९९

---

१ कखग रजस्तमा. २ कखग घुळि'. ३ कखग. सूट. ४ खघ. दयची
५ कखग. वीह'. ६ क. विरजी. ७ खग. 'रमयाचेया ८ खग घेउ.

कीं वीरोधें असतां गौरीसीं : रीगावा नाहीं सुरासीं
तें गान्हाणें सांगों[1] आली ऋषीकेशी[2] : देवराया पुढां ४००

ते पुराणीं पटीजे प्रसीधें[3] . वरी देवाचां चरणीं जाली आगाध
भणौनि वंदीलें भक्तवृंदः उभय कुळतटी ४०१

कीं सारस्वत त्रीयंबकापासौनि प्रवृत्ती : उतरली सांभनादीक शक्ति
ते अच्युता मागों आली मुक्ति : उदकवेखें ४०२

कीं क्षाळावेया जगाचीं माहापातकें : कृपा पाठवीली परमपुरुखें
मग अपणहीं आले कवतीकें . जळकेळि खेळावेया ४०३

तीये गंगेचा तटाकीं . छीन्नपाप तीर्थ लोकीं
तेय आसन होए कवतीकीं : राया चक्रधरासी ४०४

जयों सकळ पापातें नासिलें : अनांदि अविद्येतें छेदिलें
भणौनि छीन्नस्तळी नांव ठेविलें : कृपेचेनि योगें ४०५

तयां आपुला गुणिं वैस्य केले श्रीचक्रपाणी
मग बीजें करीती प्रतदीनीं विहरणासीं ४०६

फोडुनि आपेसाचें भाजन . द्रीष्टीं[6] अवलोकीलें अन्न
तेथौनि तया भांडेभेदन : ऐसें नांव जालें ४०७

तें द्रीष्टि-सबंधासि पात्र · सुखीं पडों नेंदीजेचि अंतर
भणौनि फळा नेले वेगवतर . लीळावशें ४०८

आगें देवो होउनि आचार्या · करीती जीवाची उर्ध्वक्रीयाँ
मग जांओं नेंदीतीचि माहानीरया · दुखभोगासी ४०९

---

१ क. सार्घु. खग. साधों २ ख. रीखी॰ ३ कग. प्रसीद्ध.
४ कग. वदीती.- ५ क. जीये. ६ कग. दृष्टी. ७ कखग. उर्ध॰.

करुनि पींडप्रदान : प्रभु स्वीकरीति आरोगण
कृपात्रवें नाशित आपण : यातनाशरीरे ४१०

देखौनि अच्युतार्चे रूप चापेगोरे[१]
जांघरा मागितला मदनकामेश्वरे
भणौनि देवता वोळगु आलिया अती आदरे
देवद्रणीसी[३] ४११

तें नीत्य शाश्वत प्रसन्नवदन : भक्तीनाशरहीत सक्रिया सोभायमान
दृष्टी[४] नीहाळितां पवीत्रपावन : मोक्षदायक ४१२

तो श्रीधारुवनिचा कैवल्यद्रुमु : प्रेमफळीं आथिला आत्मारामु
देखीलया निवारे ससारश्रमु : आनंता जन्माचा ४१३

तो परमानंदें सदोदीत : लावंण्यनीधी नित्यमुक्त
सोभाग्येसींधु सकळ गुणभरीत : जगमोहनु ४१४

पाहातां मूर्त्ति आनंदघन : डोळ्यां होए अमृतपान
परावरदायक सुखसाधन : दैव भाग्यादीकासी ४१५

तो परब्रम्हपरागाचा पुतळा : कठीं साहीत्यसेंवतयाची[६] माळा
भणौनि सुहार्ते रूप पाहों आलिया सकळा : इतर शक्ति ४१६

तें परब्रह्मँ अनुरागाचें नीधान : सर्वसुखाचें जन्मस्थान
वेधबोधें आथिलें परीपुर्ण : मंगळदायक ४१७

सौदर्याचां सीहांसनीं : उपवीष्ट जाला कैवल्यदानी
तें देखौनियां लोचनीं : आनंद प्रकटे ४१८

१ कग. 'गोरे. २ कखग. ओळगे. ३ कग 'द्रोणीसी ४ ख द्रीष्टी. ५ खग. सोभाग्य'. ६ कग. 'चीया. ७ कखग. ब्रह्मवीथे.

पाळातां आदिपुरुखाचें श्रीमुख : फीटे सर्व इंद्रीयाचें आरोचक
जो जीवां संपादी परज्ञान : पीयूखें कृपा झळंवौनि ४१९

ऐसें रुप नागर नेटकें : स्वयं[2] स्वीकरीलें परमपुरखें
भणौनि देवता पाहू[3] आलिया मीखें : वोवाळनीचेनि ४२०

तो वीशेखीतां देवतावर्गु : मना आगळा उपजे अनुरागु
कां जे पुजुं आलिया श्रीरंगु : प्रभु स्वामि माझा ४२१

तो कैवल्य-गीरी-दुर्गाचा रावो
नीहाळिता[4] नीवर्ते मनइंद्रीयांचा स्वभावो
भणौनि कळाकौसल्य मार्गो आलें पसावो : चरणसेवा ४२२

कीं नवरसीं आंगें आपण : केलें अनुरागाचें परावर्ण
ते चातुर्येंसि पाहुं[5] आले श्रीचरण . प्रभु परेशाचें ४२३

कीं आदिपुरुषु पाहावया दोसें[6] : श्रींघारु आला अष्टभोगाचेनि सौरसें
कीं वेधवतीय लागलें पीसें : लावण्याचें ४२४

ऐसीया सर्व श्रींघार करुनि इतर शक्ति : वोवाळु आलिया लक्ष्मीपती
कीं चैतन्य द्वीधा जाली ईस्वरप्रवृत्ती . परदैवा पाहावया ४२५

कनकपरीयळीं प्रकाशवंत : दीव्य प्रभेचे कीळ झळाळित
तैसें आनदें रत्नदीप डोलत : देखिले दैवंभाग्यादीकीं ४२६

कीं तीया चंद्रसूर्याचीया कळा :
नीरांजन करूं आलिया कैवल्यपाळा
जो जगदात्मा जगत्र जीवाळा[7] . आर्त्तदानी ४२७

---

१ क. पीउस. ख. पीउख. २ कग. स्वयें. ३ कखग. पाहों. ४ कखग. नेहा'. ५ कखग. पाहो ६ ख. दोखें. ७ कग. जीन्हाळा

कीं उदकाबाहिर मज पाहातां : नीगालीया जळीचीयां देवतां[1]
अक्षेत्रणें करावया कैवल्यनांथा : चक्रधरासी ४२८

कीं स्वर्गीहुनि दीव्यांगना : वोळगे आलिया चंद्रवदना
सेवा जाणवीति जगजीवना : आदिपुरुपासी ४२९

कीं कैवल्यनाथा श्रीचक्रपाणी : करावया नवरत्नांची वोवाळणी
पाताळौनि भोग आले उचलौनी : माहा उत्तम ४३०

कीं देओ अनाथनाथु आगाध चक्रवर्ती : अनमीतबंधु कैवल्यपती,
ते श्रवणीं आइकौनि गुणकीर्ती
नागकन्या अवस्वरा[2] आलिया ४३१

कीं आर्त जनांवरी जगजीवनु : आदरें वरीखे आनंदघनु
स्नेहें झळंबौनि नीववी तनु : संसारतप्तांची ४३२

तें आइकौनि उदारलक्षण : अष्ट-माहासीधी आंगें आपण
उत्तरूं आलीया नींबलोणें[3] : चींतामणीचें ४३३

ऐसा पूजा-अवस्वरु देओदणी[4] स्वयं स्वीकरीला श्रीचक्रपाणी
मग देवतां दीधली पाठवणी : चैतन्यनाथें ४३४

ऐसें गोमतीचें तीर : श्रीचरणीं जालें[5] पवीत्र
तें रज वंदीती योगेश्वर : जें देवां दुर्लभ ४३५

### वृक्षवर्णन : यमळार्जुन व निंब यांचे वर्णन

नीळोत्पळांचे झेले : इंद्रनीळांचीया कांती रंगले
तैसे रूखराय देखीले : भक्तवृंदीं ४३६

---

१ कखग. जळदेवता. २ ख. अवसरा. ग. आव°. ३ घ. नीव°. ४ कखग. देवदृणी. ५ कखग. केले.

कीं पाचीचीया दती[1] . रात्रीलीया मेघडंबर शाती
तैसे वृक्ष दीसती : मज पातां ४३७

कीं बोळगतां जगजीवना : अवस्वरा न चुकती ताळमाना
भणौनि नीळी टोपी वाइली यमळार्जुना : व्यापारतेंनि ४३८

कीं आदिनाथ वीहरणा बीजें करीती
भणौनि चैतन्य जाली वृक्षाकृती
ते बोळगे देवाची प्रवृत्ती : अखंडीत ४३९

कीं माधवी मदवीयचे निळंबरे : वनश्रीया प्रावर्ण केलीं परीकरे
ते द्वीधा होउनि पाहों[2] आलीं चरीत्रें
प्रभु आदि पुरुखाचीं ४४०

अमृताचेनि बळें : वासुगी मायेया वाय डोळे
भणौनि पाताळा गेलीं मुळें . तो गर्व झाडावया ४२१

खादियाचे[3] सरळ भाव : जैसे मळिये–मारुताचे[4] हस्तपालव
ते रतिकांतु नीहाळी बरव भणौनि बाहीया पसरताती ४४२

घोसाळे स्यामा स्त्रीयाचे कर तैसे वरचील[6] पालव कोवळे नागर
हाल्ता दीसती अरुवार . हस्तकाचीया परी ४४३

कीं देवासि देयावया क्षेमालींगन . उतावेळ जाले यमळार्जुन
भणौनि बाहीया आलें फुराणें : भेटावया ४४४

कीं ते परमानंदें आल्हादले . आपेंआप वीसरले
तेणें सदें[8] ढुलो लागले : टाळिया वाताति ४४५

---

१ ख. दुती २ घ. पाहु ३ कखग. 'याचे. ४ कग मळया'. ५ घ. घोसाळा. ६ कग. वरील. ७ ग फुरण ८ क छदें

कीं तयाचें कृपाळु मन : जें दीगंगना होआवें देवाचें दर्शन
भणौनि पाल्वें पाचारती आपग : दाहीं दीसांतें ४४६

कीं सेवासंबंधें पातले सुख : भणौनि तरूंसि प्रकटले सात्वीक
कीं कल्पवृक्षेंसीं करीताति कवतीक : वांकुलीया वाताति ४४७

आम्ही अळंकारीलों ईस्वरभोगें : तुं स्वर्गीं फुजसी थाउगें
जयां तुं तो थापिला श्रीरंगें : एर काइ बोलों[2] ४४८

तया नीबाचीं फळें : दृष्टीं पाहीलीं भक्तवछळें[3]
कठुरपण जाउनि जालीं रसाळें : ईस्वरसंन्निधानें ४४९

देखौनि तरूचा मठारा : कल्पवृक्षें सांडीला गारा
जयातळीं आसन होय दातारां : देवरायासी ४५०

कल्पतरु आपुलेनि आंगें : दृष्ट पदार्थ देउ[4] लागे
परि अद्रिष्टाची[5] सोय सांगे : ऐसें सांमर्थ्य नाहीं ४५१

हें खुण यमळार्जुनींचि आति : भणौनि संत नमस्कारु करीती
ज्ञानें गुण वोळखती : ईस्वरकृपेतव ४५२

देखौनि तरूची दैवी उद्भ्रांती[6] : ब्रह्मा सेख दोन्हि भाटीव करिती
धन्य धन्य तुमची शरीरसंपती : जे ईस्वरबीनयोगाँ गेली ४५३

जो आगमा अवघडू : श्रुती न नीहाळे नीम्हां वाढु
तो ठेवा आंतुडला गुढु : तुम्हां परदैयाचा ४५४

धन्य धन्य तुमचीं जीवीतें : कृपादृष्टीं पाहीलें कैवल्यनाथें[8]
जो न पवीजे सकळ सीधांतें : तो तुम्हां सुलभु जाला ४५५

---

१ क. जयातें. २ घ. बोलु. ३ कखग. भक्ति°. ४ कखग. देओ. ५ कखग. अदृप्टाची. ६ ख. उधांती. ७ कग. ईस्वरी°. ८ क. गोपीनाथें.

ऐसें करीतां स्तवन : मानवले यमळार्जुन
उचीतीं[1] हातें वारुनि म्हणती सान सान · भलें केलें ४५६

कवण जांणे तया नीचाची थोरी : जयाची साउली अर्पिली जगदेस्वरीं[2]
जैसे आवडी भजन घडे मायापुरीं : महंतासी ४५७

तेथ वृक्षत्वाचा अंतीं : चैतन्यफळ भोगिती
मग मनुस्य होउनि जन्मती जैसे युगभ्रष्टै[3] ४५८

तेथ बारां वरीखांचीय लाणी : बीजें करीतील श्रीचक्रपाणी
चान्हि ज्ञानें देउनि नीर्वाणीं : कैवल्यपद ४५९

## डोमेग्राम येथील तिन्ही मठ

धन्य धन्य तें माहाद्वार : आपर्णे देवो नावेक होती स्थीर
मग भटातें पुसौनि वीचार . साउमे बीजें करीती ४६०

जैसे कैलास वैकुंठ सत्यलोक सुखें : तीन्ही ग्रांम सरीसे[5] सनादले देखे
तैसे मठ आनंदती आदिपुरुखें :
अवस्थान केलें भणौनिया ४६१

कीं लोकत्रय ईस्वराअधीन : तें दाखवीलें सांमर्थ्यपर्ण
भणौनि स्वर्गमृत्यपाताळ भवन : आणिली मृत्यलोका ४६२

नातरि मायेसिं[7] त्रीवीध होणें आति : परी नलभे अच्युताची संगती
भणौनि जड जाली ईस्वरप्रवृत्ती . मठत्रय होउनी ४६३

---

१ क. उचीते. ख उचीत. २ कग. परमेश्वरी. ३ कग. योग. ४ कखग. आपणपें. ५ क. सारीखे. ६ क. समर्थपणे. खग. समर्थपण. ७ घ. मायसि.

कीं तीयें ज्ञानभक्तिवैराग्याचीं फळें : अलंकरीलीं कैवल्यपाळें
जीवांसीं पुरवावेया सोहळे : आनदसुखाचे ४६४

कीं तीयें ब्रह्ममायाईश्वरादिकें पदें : कार्यासि आणिलीं परमानंदें
तैसे मढ देखती भक्तिवृंदें : दिव्य चक्षुस्तत्र ४६५

जैसे सावदीं[1] शब्दं[2] श्रुत केले : ते अपरोक्षीं अनुभवासि आले
सामान्यीं मळक्षाळनिं सवीसेख देखिलें : वीसेखज्ञानीं ४६६

तैसें ईश्वरापासौनि जीवा जालें श्रवण :
जे चैतन्यफळ पावले वैराग्येंवीण
तें देवें दृष्ट केलें आपण : ज्ञानीयांप्रती ४६७

अथवा ज्ञानवैराग्य दोन्ही एकत्र : आचरतां ब्रह्मपदा जाले पात्र
तें दाखवीलें सवीस्तारे : अनुचरांसी ४६८

नातरी वैराग्य ज्ञान भक्ती : तिहींचेनि योगें पाविजे कैवल्यप्राप्ती
ते प्रतेक्ष केलें लक्ष्मीपती : आर्त्त जनासी ४६९

जया मठाचें द्वार पुर्वाभिमुख : तें शुद्ध सांभव शक्तिचें सुख
परासि अपर आरतें[2] असेख : जैसें चैतन्यस्वरूप ४७०

कैवल्यपदासी दक्षीण वीभागें : आदरे ब्रह्मपद मानणें लागें
भणौनि वडीलपणाची सोय न भंगे :
जयाचें नांव उंचमढ ४७१

तया उचमढासि उत्तरे . राज्यमढीं राज्य केलें श्रीचक्रधरे
तें कैवल्यपद दान दीधलें दातारें :
नागांबीके नागींद्रासी ४७२

---

१ कग. शाव्दी शब्द. २ घ *

कीं सृष्टीमध्यें परावर अवतरती उभयदृस्ये[1] अवतार
तैसे मढ दीसती सुंदर जगतीमाजी ४७३

तया मढाचा अभ्यांतरीं जगदात्मा क्रीडा करी
मणौनि देवतागण बाहीरी[2] मीसें पौळिचेनि ४७४

तया राजमढाचा महीमा परीसता रीगावा नाहीं संसारधर्मां
जें वीश्रामतें स्थान परब्रह्मा परमात्मयाचें ४७५

*आगाधे स्वरूपीं कैवल्यनाथु भगतेंसीं क्रीडले ल्क्षमीकांतु*
तैसा राजमढामध्यें अनंतु सर्व शक्तीसीं राणीव करी ४७६

तया राजमढाचें द्वार वीसेखिता अनुचरा आगळी होए स्वस्तता
तो भावो अवधारीतु आता ब्रह्मवींद ४७७

जीवा कैवल्यमंदिरीं रीगावया दोसें स्वयं वाट केली जगन्नीवासें
देखा राजमढाचें द्वार तैसें मज गमलें ४७८

कीं परमानंदाचा सेजारीं जीवा रीगावा नाहीं आणिकी परी
मणौनि कृपा उपनली ईश्वरीं रचीलें प्रेमद्वार ४७९

जो आगाधु रूपें सौभाग्यें आगळा ल्वाण्यनीधी कैवल्याचा पुतळा
तो प्रेमद्वारेंवाचौनि यही डोळा कहीं न देखीजे ४८०

तो सर्वसुखाची संपती मणौनि अती यत्न करी पराशक्ती
मग कवाड होउनि वोळगे परमप्रीति परदैवातें ४८१

कीं माया ईश्वरीची कामारी प्रवृत्ति वोळगे नीरंतरी
ते कवाडाचेनि मिसें द्वारीं अखंड उभी असे ४८२

---

१ क ग 'दश्यां ख 'दृश्या २ क ग नगरा'

कैसा उंबरवटाचा महिमा वाखाणुं : जयावरि ईश्वर ठेवी श्रीचरणु
बाह्यअभ्यंतरीं बीजें करीतां जगजीवनु :
द्रीष्टी अवलोकिनी ४८३

तो ज्ञानीयां भक्ताचा सेजवेकरी[१] : शुद्ध क्रीया वीसंबली ईश्वरीं
भणौनि कैवल्यनाथु चरणचारी : उभे राहाती ४८४

उंबरा उसीसें करुनि नीजकींकरू : सुखें वीश्रांमे ज्ञानगंभिरु
तो फळा आला अधीकारु : जन्मांतरीचा ४८५

की तो नांगार्जुनाचा पांतिकरु : सेवकभावो जाणवी नीरंतरु
भणौनि पस्यात पाहारीं सर्वेस्वरु : उभया संबंधु देती ४८६

जैसेआगाधे स्वरूपीं कैवल्यपती : कृपाकारुण्य दोन्हीं स्वीकरीती
मग सृष्टीमध्यें बीजें करीती : उद्धरावया भक्तजन ४८७

तैसें पस्यात पाहारीं पुर्णकांमु : दोन्ही दारसंका धरुनि आत्मारामु
एक श्रीचरण ठेवी पुरुखोत्तमु : उंबरवटावरी ४८८

दुसरा नागार्जुनाचीये वक्षस्थळीं : तेणें जाली आनंदाची वाहाळी
ऐसें उभयो[२] समथें[३] एकीं काळीं : दान वचौं लागे ४८९

श्रीचरण आळंगितां नांगार्जुना : आनंदें संतोखु जाला मनां
मग सोडुं नावडे जगजीवना : परमपुरुषातें ४९०

तया उंबरवटासि लक्षण : नागार्जुन करुं जाणे आपण
कां जे दोघीं सेविलें श्रीचरण : चक्रधरा रायाचे ४९१

---

१ कग. सेज'. २ कगव. पुरुषों'. ३ कखग. उभया सम.

जो यां मार्गासि आधारस्थंबु : की कणवेचा सैंभु[2]
जयातें[3] देवो करु म्हणे आरभु : जीर्ं उद्धारात्रया ४९२

कीं तो आधीकार्या नीचनत्रा वखीदाचा वीसात्रा
भणौनि वेगळा नव्हे परदैत्रा : जत्रळिचि असे ४९३

जयाप्रति देवो आपण ब्रह्मत्रीद्या करी श्रवण
तया खात्रासि लक्षण कवणें करावें ४९४

जो ब्रह्मत्रीधेचा वसीठां कीं वीचाराचा चोहटा
तैसा उत्तरदक्षिण वोटा : पसिमीली[6] भीतीसीं ४९५

की तो सूध चैतन्यस्वरूपाचा चत्ररा चौफळ सरिसा साजिरा
कीं वीसात्रा जोडला अमरीं आनदाचा ४९६

की तो गुणधर्माचा बाधा चेतन शक्तीचा सादा
अत्रस्वरू पाति परमानदा : परदैवाचा ४९७

कीं तें आदिपुरखाचें निजस्थान : जयात्ररि करीती सयनासन
तया वोटयाचें महीमान महत जाणति ४९८

जैसें ब्रह्मत्रीचे अनुरागाचें ध्यान कीं कामत्रलें महताचें मन
तैसें रचीलें आसर्न : नागाबिका ४९९

तीय आसनीं लावण्यसागरू : अरुढला श्रीचक्रधरु
रूपें सौभाग्यें सुदरु मीरवत दीसे ५००

जैसा मायाचळाचीय उपराळा उदैला मुर्त्तिमोक्षसुर्याचा पूतळा
कीं पुर्णगीरीचा सीकरीं[9] एकावटली कळा
आनदचद्राची ५०१

---

१ कखग. अमगळासी २ ख. संभु ३ ख जेयातें ४ ग# ५कग वसेंठा ६ कग 'मीले ७ कग आमरी ८ घ सयनासना. ९ क सीखरी ग शिखरी.

तथा श्रीचक्रधराची श्रीमूर्त्ति : देखिली नीजकींकरीं महंतीं
ते सांघैन बोलीं प्राकृतीं : म्हणे मुनि केशिराजु ५०२

—३—

## श्रीमूर्तिवर्णन : शरीरसौंदर्य

प्रमयपोतासाचेनि परिमळें : मर्दनां देइन ग्रंथदेवते वेल्हाळे
उन्मेखकमळाचेनि मकरंदजळें : गाढु टालीन ५०३

परागाचेनि पालवें : सर्वांग प्रमार्जिन प्रभावें
तें मांदणें सवीयां सुहावें : जेणें डोळे नीवती ५०४

वानितां आदिपुरुखाचें रुपडें : विरांमा वीचारेंसीं संवादु पडे
मग वीकरौनि आइकावया आंगा घडे : कवितावधुचीया ५०५*

वानितां ल्यावण्यनीधी[२] लक्ष्मीकांतु : बोल बोलाचा धरुनि हातु
आनदें दोंदील चाले मलपतु : सीधांतमार्गें ५०६

साहीत्याचां सेजारीं : सुख श्रीधारेंसीं गोष्टि करी
म्हणे धन्य धन्य हे वैखरी : जे देवां दुर्लभ ५०७

ऐसी कवीतेची चालि सुरंग सरळें[३] : जैसें अनुराग ज्ञान केवळ
तैसे शब्दें दीसती पदीं प्रांजळ : अर्थपुष्ट ५०८

ब्रह्मवीद्येचीय आरिसां : उमटे कैवल्याचा ठसा
तो दृष्ट करीन राजहंसा : रसाळांसी ५०९

वर्णितां आदिपुरुखाचे अवेव रूपस : आकर्णिनें वरवीदाचें मांनस
ते भावो वोळखत डोळ्स : जे भावरीय शब्दब्रह्मीचे ५१०

परमानंदाचा प्रकाशु : चैतन्यमुसे वोतला आनंदरसु
तो वानुं राणा परेशु : कैवल्यदुर्गींचा ५११

रूपाचा आकारु . देखौनि लक्ष्मीये संचरला विकारु
मग चाळिला धराचारु : प्रभुरायाचा ५१२

देखौनि मुर्ति चांपेगौर : वैराग्य जालें कामातुर
ब्रह्मवीद्या नीरंतर : जवळिचि असे ५१३

आपुलेनि बरवेपणें : मदनु जगातें देखे उणें
तो देवाचेनि येकें गुणें : भुलौनि गेला[1] ५१४

तया देवाचा जांघोवा[2] : लाहावया सादेजे अनंगु बरवा
जयाचेया यकाही अवेवा : उपमा नांहीं ५१५

तें सकळकळा सकळगुणभरीत :
देखौनि लावण्य आपणपें धिःकरीतें[3]
सौंदर्य जालें दुश्चित : तें रूप पातां ५१६

सौभाग्या वेधु संचरला : संगितां वीस्मो थोर जाला
श्रींगारें गर्व सांडिला . बरवेपणाचा ५१७

जया देवाची श्रीमूर्ति : देखौनि पाठीं धावे वेधवंती
ते अव्हेरितां कैवल्यपती . बळिया घर रीगाली ५१८

बरवें जगजीवनाचें ठाण मपीत मोटकें :
चैतन्य आकारलें नागरनेटकें
कीं तें अवक्रीयें[4] परब्रह्म मनुस्यवेखें : मुर्त जालें ५१९

---

१ ख. ठेला. २ क्र. जाघवा. ३ कम. धीकरीत.
४ ख. आविक्रीए.

कीं ते अव्यक्तें क्रीडा केली : मायाव्रेखाची बुंथि घेतली
कीं वयस्तंवनी वीद्या स्वीकरिली : जीव उद्धरावया ५२०

कीं तो मुर्क्ष भगताचा हेतु : भणौनि वय धरीलें वरीसां सतावीसांतु
नालरी पुरवावेया मनोरथु : जाति वीखयांचा ५२१

देखौनि आंगाची कोवळीक : ओवाळुनि सांडिजे सर्वसुख
फीटे डोळ्याचें आरोचक : दर्शनमात्रें ५२२

कनककमळाचेनि रसें : चापेकळिका भाजणीं दीसे
तऱ्हीं ते करुं न यती सरिसे : आंगकांतीसीं ५२३

चापे होतीं संकुमार सपरिमळ : परीमळें पुरते बहूळ
परी ते उग्र भणौनि अळीउळ . अस्वादिती नां ५२४

तया चांपयाची उपपती : देऔं नये आंगकांती
कां जे सौरभ्यें बाहाकाती[3] : नीरंतर ५२५

काढुनि जांबुनदाचा कसु : कीजे वोपसळेसीं सौरखु
तऱ्हीं तया आंगाचा प्रकाशु : अधीक दीसे ५२६

तया कमळाचा आमोदु : मुनीजन–खटूपदें जाणती आस्वादु
सेवितां होए आनंदु : तो तेचि जाणती ५३९

मायामोहाचो आंधारू : फेडावेया उदैजे दीनकरू
तैसा तेया वज्राचा आवेस थोरू : संसारावरी ५४०

तो आपुलेनि तेजीठपणें : संसारावरी घाली घालणें
उठवी मानवळणें : कर्मफळांचीं ५४१

माहापापाचे पर्वत : नाशावेया उन्नत
तया वज्राचें महंत : कवण जाणे ५४२

जयाचा प्रतापु आइकौनु : आंकोचला क्रौधपचाननु
तो ध्वजु गहनु : कैसा सांघों ५४३

जयातें देखौनि दृष्टीं : कामभूजंगाचे पाए रीगती पोटीं
मछरु पळे बारा वाटीं : अहंकारासहीत ५४४

तो आपुलिया आंगवणा : रागद्वेखातें[3] घाली आंकणा
तया ध्वजेंसीं उपमीजे एसणा : आणीकू नाहीं ५४५

संसार–गजाचेया माथेयावरी :
जो दाखवी आपुलीया प्रतापाची थोरी
तया आंकूसाची परी : कवण जाणे ५४६

जो मन गर्व या मदन मात्तांइता : अभीमानु हातीरुवांतें आवरीता
तया आंकुशाची सर्वेया · उपमा नाहीं ५४७

जो भ्रमुभद्रजातीतें नीवारी : अज्ञानहस्तघटातें[4] परीहरी
तो न वर्णवे बोलीं सवीस्तारीं : मज मतीहीनासी ५४८

---

१ ग. पट्'. २ क. माहा'. ग. महा'. ३ गघ. 'द्वेपातें. ४ ख. 'घटातें.

ऐसीया आरिखा उपपती देतां : फोपैल पीतवर्णाची अधिष्ठात्री देवता
जे ओळगे कैवल्यनाथा : राणेयातें ५३०

तीयां चांपेगौरें तनुवरी : मीरवे हरिचंदनांची पींजरी
जैसीं सांभवसुखाची साजिरी : सकर्पुर ५३१

कीं चैतन्यआनदाची खोळ : तैंसी सर्वांगीं उटि पातळ
कीं देवताचक्र सकळ : ओळगे श्रीमुर्त्तितें ५३२

तीयें[1] मुर्त्तिचेनि योगें[2] : उरंगला अनुरागु रंगें
मग वाउनी आनंदाचीं उपांगें : देवता मोजें नांचती ५३३

## श्रीचरण आणि त्याकरील सामुद्रिक चिन्हे

सुरगें सुवासें : होतीं रातोत्पळें बहुवसें
तऱ्हीं ते उपमया न दीसे : चरणकमळांसीं ५३४

होनी अरुवारें अलोहीतें : परी स्वयंसुख नांहीं तेथें
भणौनि इछीती सुर्यातें : उदो करावा ५३५

तेथचें अमोद–सुख थोडें :
कां जें आळिउव्हां आणीका पुष्पांचा पांगु पडे
भणौनि श्रीचरणकमळांचेनि पाडें : उपमुं न यति ५३६

जया श्रीचरणकमळाचेंपातें · आरुखीं मुनीजनभ्रमरांतें
मग आस्वादीती आनंदमकरंदातें :
ते सुख सांघों नेणिजे ५३७

सुरंगें जयाचीं पदांगुळें : देखौनि लावण्यलक्ष्मीए वालभुं[3] उपजे
परी साहील्यसागरयाचीए सेजे : पात्र नव्हेचि ५३८

---

१ क. तीए. ग. तीये. २ कग. युगें. ३ क. वल्लभु. ग. वलभु.

ऐसीया आरिखा उपपती देतां : कोपैल पीतवर्णाची अधिष्ठात्री देवना
जे ओळगे कैवल्यनाथा : राणेयातें ५३०

तीयें चांपेगौरें तनुवरी : मीरवे हरिचंदनांची पींजरी
जैसीं सांमवसुखाची साजिरी : सकर्पुर ५३१

कीं चैतन्यआनदाची खोळ : तैसी सर्वांगीं उटि पातळ
कीं देवताचक्र सकळ : ओळगे श्रीमुर्त्तितें ५३२

तीयें मुत्तिचेनि योगें : उरंगला अनुरागु रंगें
मग वाउनी आनंदाचीं उपांगें : देवता मोजें नांचती ५३३

## श्रीचरण आणि त्यावरील सामुद्रिक चिन्हे

सुरगें सुवासें : होतीं रातोत्पळें बहुवसें
तर्‍हीं ते उपमया न दीसे : चरणकमळांसीं ५३४

होनी अरुवारे अलोहीतें : परी स्वयंसुख नांहीं तेयें
भणौनि इछीती सुर्यातें : उदो करावा ५३५

तेयचें अमोद–सुख थोडें :
कां जें आळिदळ्यं आणीका पुष्पांचा पांगु पडे
भणौनि श्रीचरणकमळांचेनि पाडें · उपमु न यति ५३६

जया श्रीचरणकमळाचेंपातें : आकर्खी मुनीजनभ्रमरांतें
मग आस्वादीती आनंदमकरंदातें :
ते सुख सांघों नेणिजे ५३७

सुरंगें जयाचीं पदांवुजें : देखौनि लावण्यलक्ष्मीए वालभूँ उपजे
परी साहीत्यसात्तरयाचीए सेजे . पात्र नव्हेचि ५३८

---

१ क. तीए. ग. तीयें. २ कग. युगें. ३ क. वल्लभु. ग. वलभु.

तया कमळाचा आमोदु : मुनीजन-खट्पदें जाणती आस्वादु
सेविता होए आनदु : तो तेचि जाणती ५३९

मायामोहाचा आंधारू : फेडावेया उदैजे दीनकरू
तैसा तेया वज्राचा आवेस थोरू : संसारावरी ५४०

तो आपुलेनि तेजीठपणें : संसारावरी घाली घालणें
उठवी मानवळणें : कर्मफळांचीं ५४१

माहापापाचे पर्वत : नाशावेया उन्नत
तया वज्राचें महंत : कवण जाणे ५४२

जयाचा प्रतापु आइकौनु : आंकोचला क्रौधपचाननु
तो घजु गहनु : कैसा सांघो ५४३

जयातें देखौनि दृष्टीं : कामभुजंगाचे पाए रीगती पोटीं
मछरु पळे वारा वाटीं : अहकारासहीत ५४४

तो आपुलिया आंगवणा : रागद्वेखातें[3] घाली आंकणा
तया धजेंसीं उपमीजे एसणा : आणीकू नाहीं ५४५

संसार-गजाचेया माथेयावरी :
जो दाखवी आपुलीया प्रतापाची थोरी
तया आंकुसाची परी : कवण जाणे ५४६

जो मन गर्व या मदन मातांइता : अभीमानु हातीरुवातें आवरीता
तया आंकुशाची सर्वथा . उपमा नाहीं ५४७

जो भ्रमुभद्रजातीतें नीवारी : अज्ञानहस्तघटातें[4] परीहरी
तो न वर्णवे बोलीं सवीस्तारीं . मज मतीहीनासी ५४८

---

१ ग. पट्ट°. २ क. माहा°. ग. महा°. ३ गघ. °द्वेषाते. ४ ख. °घटाते.

परीसा[1] उर्धरेखेचें[2] महिमान आइकता श्रवणा[3] होए अमृतपान
जें ज्ञानीया भक्तांचें जीवन तें सांघों कैसें ५४९

जैसा ब्रह्मभागीरथीचा[4] वोघु उतरला त्रीवेणी संगमीं मीळाला
तैसा अनुकार मीरवला उर्धरेखेचा ५५०

ना तरी नाशावया जीवाचे माहादोख कैवल्यगंगा जाली प्रतक्ष
भणौनि पाववेया परीत्र सुख सकळ तीर्थे यात्रे आलीं ५५१

कीं ते परमार्गाची मोहर ब्रह्मवीद्या प्रसीध परिकर
कीं लावण्यलक्ष्मी[5] सौंदर रंगली तेथें ५५२

कीं तो आनंदु आल्हैला श्रीचरणीं वीळासला
कीं अनुरागु वोळगे आला मीसें ऊर्ध्वरेखेचेनि ५५३

जैसे ब्रह्मासि फुटले अंकुर कीं आनंदा पाल्हैले डीर
तैसे आंगुळियांचे अनुकार नीरोपम ५५४

कीं तें मज गमलें आणिक आंगुळीयांचें करुनि मीख
फडदैलें चैतन्यसुख माहासुखालागी ५५५

नखमंडल

सानुरागें जयाचीं नखमंडळें देखौनि वालभ उपजे चंद्रकळे
मग सेवे आलीं सर्वदळें नखांचेनि मीषें ५५६

कीं तया स्वर्गी करीता अवस्थान न फीटेचि कळंकपण
भणौनि टाकौनि आला श्रीचरण देवरायाचे ५५७

---

१ क परीएसा २ कग उर्ध्व° ३ कग श्रवणासी
४ कखग ब्रह्मगीरीचा ५ ख °लक्षुमी

की दीनकरु राहोभेण : श्रीचरणी रीगाला शरण
म्हणे नीवारिं जी जन्ममरण : देवसीरोमणी ५५८

की नक्षत्रांचीया माळा : चोताळुं आलीया चरणकमळा
तैसा तया नखांचा उमाळा : सुप्रकाशकं[1] ५५९

जे अहंकारे अभीमानें आथिलें :
ते गर्वगळित होउनि श्रीचरणीं वीळासलें
भणौनि उपनांव पावले धुरे[2] ऐसें ५६०

चचळा चपळा दृष्टी सरळी तीख तार कोरसी वेंभळी
जैसी कामबाणाची वाहाटुळी भवती भेरे ५६७

नवल हस्तक-मस्तकाचा आवो दाखवी जो जेथिचा भावो
तें देखौनि सर्वज्ञराओ सतोखला ५६८

मग तीये दीधलें उचित श्रीचरणीं केली रत
सपर्णे जें फळें समर्थ मोक्षासारिखीं ५६९

तीयेचें अग अगाह्णें पाहावया आली लक्ष्मी आपण
की सीर उचलौनि पाळताति सुरगण गुल्फाचेनि मीपें ५७०

की तीयें मोक्षअग्रिदमाचीं फळें दृष्टी अवलोकिता रसाळें
तैसीं घोटीं वर्तुळें काळावीदें ५७१

## श्रीचरणाच्या टाका

नवखड भुवळीचीं राज्यकुळें जेथ नाणें पडे चोरमोळें
ते बाहीर मुर्दे म्हणौनि वाळे ठीकलग सरेना ५७२

तीयें तुकें उणीं चोरयरीं कुडीं न सरेति घरोघरीं
परी टाकसाळ एकी खरी श्रीचक्रधररायाची ५७३

ते मोहर शुद्ध बरवी सुरेख सरती हवावी
उजाळपणें दीसे नीचनवी तीहीं लोकीं ५७४

तें नाणें तुकें टाकीं दों आगळें देखिलें नागार्जुनें भुपाळें
मग नमस्करनि हृदय वक्षस्थळें दाटुनि धरिलें ५७५

---

१ कलग * २ क अग गाह्णे ३ क मूर्दे ४ घ उणें. ५ घ. *

तीहीं राज्यकुमरीं भुपाळीं : करुनि श्रीचरणाची टांकावळी
नीरंतर हृदयकमळीं : कंठीं वाहाती[1] ५७६

भणौनि कर्मभुमीचां हाटीं : महंत बैसवीले नानवटी
मग पारखी करिती गोंमटी : द्रीष्टीं सुलाखौनियां ५७७

तीय टांकसाळेचा ठसा : उमटे जीवा राजसा
तैंचि मुंचीजे[2] भवपाशा : पासौनिया ५७८

कीं देओ जाले पाथरट : लाउनि कृपेची टांकी तीखट
मग कर्म कानवाथर झाडुनि[3] सुध चोखट
सीरसाळा पात्र केला ५७९

तैसें जीवाची अयोग्यता फेडावया लागौनि
चरणद्वइं वीरहले श्रीचक्रपाणी
मग सनाथ केली मेदनी : पदें ठेउनिया ५८०

## श्रीचरणीचे उपानह

तीय श्रीचरणीं उपानउ : जैसीया आनंदाचीया गादीया मउ
कीं देखौनि सुखाचा संभउ : चैतन्य सेवे रीगाली ५८१

परी तेही कठीण कर्कश : तीयपासौनि कोवळें योगियांचें मानस
भणौनि श्रीचरणीं परेशा : मेळवीताति ५८२

तेही आवडी अनुरागेंवीण : दीसे उपंढर हीन
मग सुरंग सप्रेमळ अंतःकरण : भगत मेळवीताती ५८३

---

१ कग. वाताति २ कग. मुचीजे. ३ कगघ. साडुनि,

तया भक्ताची चीलकळीकां श्रीचरणीं रगली देखा
केशउ म्हणे तया सुखा अनुवादु नाहीं ५८४

## पोटरिया

जैसीया आनदाचीया आटिवा तैसीया पोटरिया वर्तुळा ओतिवा
कीं तो आटोपु परदैवा परब्रम्हाचा ५८५

कीं तो मुगुती–मोगरयाचा परीमळु चैतन्यसेंदे भरीला केवळु
तैसा पोटरियाचा सुढाळु मज गमला ५८६

जे साजिरे सुघट नीतळ नीव्हा निवोट
ते गुडघे वरवटें सार्थो कैसे ५८७

जे परब्रम्हक्षेत्रीचे क्षेत्रपाळ मायामोहातें मोडिते माहाकाळ
ते गुढे घेति सकळ अवीद्या–दुर्गींचे ५८८

कीं ते कैवल्य–वनीचे पचानन कुमति–कुजरांचे करीत छळण
कीं कदर्प–काम–दर्पहरण दापाइते ५८९

तयाची देखौनि आगाधीव सकळे मनोरथ–भैरव
ते साडौनि गेले सीव मागौते[3] परततीचि ना ५९०

जे अगाध अलेप्य योगीया अप्राप्य
की ते ठेवे गूढगोप्य आनदनीधानाचे ५९१

मोहतमाचीये रातीं उजळुनि प्रकाशाची वाती
तें गुढ घेउनि हातीं योगीय पारधी जाले ५९२

तया ज्ञानगुढाचेनि बळें देखीलीं सावजें कडुआलें
इद्रीय–हरीणें चीतळें रोहीं मदमत्सराचे ५९३

---

१ ख चीत्त' २ घ 'वट ३ कग मागुते

कामक्रोध सींह सार्धुळ : रागद्वेष व्याघ्र वीशाळ
अविवेची लाहसि उतावेळ : कव्हणा सवरे ना ५९४

आसा त्रीष्णा सीणकारी[१] . रान व्यापिलें[२] ममता-मांजिरीं
गर्वाभिमान-म्हैसा गहवरी[३] : सोर उठवीला ५९५

वासना-वानरांचे थोवे थोर : भुभुकारें अंवर
अभीलाखाचे आसवल असुर : हुडपारताती ५९६

तेथ वेघघांटियाचेनि नादें : तीयें सकळ जालीं लुब्धें
मग विचाराचेनि शास्त्रें स्वापदें : पुरीं केलीं ५९७

अह्ता-आटवीयचा दरा सोधिला : दूष्टां स्वापदांचा परीहारु केला
मग सुध मार्ग लाधला[४] : परब्रह्मनगरीचा ५९८

## जंघा-युग

कैसे जंघायुगें घनवट · जेथ तारुण्य जालें घनदाट
ते न वर्णवे[६] मुळपीठ : मदनमन्मथाचें ५९९

आनदाचे केळिखांब नीट : तैसी माडियाची जावळी[७] नीतळ नीघोट
कीं तें सौभाग्य एकवटलें एकदट · जानुमोर्चे ६००

कीं ते वर्तुळ वोहरतें सैभ : जैसे कैवल्य-कापुरकेळिचे स्तंब
तैसें जघाद्वय नीतळ नीतंब : नीरोपम ६०१

## गुपीत अवेव

जैसा मायाकृपेचा वोथवा : थोकला वीस्वबीजाचा गाभा
तैसी गुपीतें अवेवाची शोभा : जंघाद्वयामाजी ६०२

---

१ कग सीरा.' २ कग व्याले ३ घ. गहीवरी ३ कखग. शास्त्रें. ४ कग. लागला ५ ग. 'योग. ६ खघ वर्णे. ७ घ जाळि. ८ क. गुप्त. ग. गुप्ता.

कीं वेधबोधाचीय माया  नीहटी जैसली स्वस्तता
ते आनदवी आर्तभुता  अनुचरासीं  ६०३

की ते रजवासनेची व्यापारती  कीं कदर्पनामकथेची दुर्ती[1]
पुरवानेया विषयाची आर्ती  आगें आकारली  ६०४

की घालुनि अनुरागाची बुथी  श्रींघार सुखेंसी करी परम प्रीती
तया आनंडी एकवटली दुर्ती[1]  मदनमाणिकाची  ६०५

की ब्रम्हचर्यातें न भगौनि  अवक्रीयें घेतली वीकाराची आरगणी
पुरवानेया मन्मथाची आइणी  वीरुध[2] अगीकरीलें  ६०६

तया अवेगातें देखौनि नेत्रीं  देवताचक्र इछा करी
परी तो न पवीजे कन्हणीपरी[3]  देवाचीय कृपेवाचौनि ६०७

## कटिवर्णन

केसें माजाचें बरवेपण  जें गाभीयें आथिलें गहन
ते आइकतु वीनेकीय वीत्पन्न  अवधान देउनीया  ६०८

मायाप्रवृत्तींचा यत्रीं  केवल्याचा गाभा कामवीला त्रीवीधा परी
ते अनुपम्य चराचरीं  कटीस्थान  ६०९

कीं तें नीर्मळा साभन्न सुखाचे नि कोपें
काडारीलें ल्यारण्यसमुद्राचें दीप
कीं वीश्रामलें वीस्वरूप  आनदालागी  ६१०

कीं तें मदनाचें माराक  श्रृंघाराचें चटतें बीक
कीं सौंदर्यें घेतलें मीख  कटीप्रदेशाचें  ६११

---

१ कग दृती  २ कग वीरोध  ३ कग कन्हणे*  ४ घ नीकोप

तीय कटीप्रदेसीं परिकर : धाखट सेला मनोहर
वेढिता जाला सर्वेस्वर : तें साधैन आतां ६१२

जो मेजाथीला मवाळु : रुंदिया पुरता बहळु
कीं सकुमारेयाचा केवळु : स्वेतवर्णु ६१३

तयाची देखौनि मुवाव्ता : आवडी उपनली पाटसुता
मग संगाहुं गेले नेतां : चाला शरण जाऊं ६१४

तो सुध प्रकासाचा सतारु : सकळ धर्माचा सपुरु
कीं सर्वगुणीं सुभरु : विणिला तो ६१५

तो वेढुनि मालगंठी : गजगती वीजें करी जगजेंठी
मग आनंद जाला सकळसृष्टी : तो निरोपमु ६१६

## नाभिकमळ

सुध परागाचे पाडळ : परिमळें फुल्ले चापेबकुळ
तऱ्हीं ते सरिसि न पवती सकळ : नाभिकमळेंसीं ६१७

जे कैवल्य-कर्दमाची खेडकुळी : साहीत्य-सावरयामध्यें रसाळीं
योगिराय खेळितात्ति जळकेलि : वीसेख-वनितेसीं ६१८

कीं आनंद-मळयगीरीचां माथां : तळौली[1] भरली अमृता
ते उदक-पान होय श्रीखांवंतो : नीर्मळासी ६१९

कीं ते कारुण्याची कुपीका : ब्रह्मरसु सांटवला नेटका
तो अनुभउ नाहीं आणिका . भक्तावाचौनि ६२०

कीं तें मकरंदाचें माहेर : ब्रम्हसुखाचें सेजार
तैसें सखोल नाभिरंध्र : जगवंदनाचें[3] ६२१

---

१ घ. तळौनि. २ क्रग. तृपा'. ३ घ. गजवदनाचे.

## नाभिरंध्र

जैसें कळाकौसल्याचें कोठार : कीं चातुर्य–चक्रवर्त्तीचें भांडार
तैसा नाभिकमळीं भवरा · मीरवत असे ६२२

कीं कैवल्य–गगे आतु भवतसे[1] वेधाचा आवर्तु
तयामध्यें पडीलयां मन्मथु : नीगों न शके ६२३

## वळित्रय

जैसा ज्ञानभक्तिवैराग्याचा ठकारु
तैसा दीसत असे वळित्रयाचा आकारू[3]
जीवासीं सपादी सर्वेश्वरू तीन्ही एकें वेळें ६२४

तो उदारु देओ दीक्षागुरू : देता न म्हणे साना थोर
जैसा वरिखे जळधरु · प्रजन्यकाळीं ६२५

तयासि उभरावयाचें वेसन : म्हणौनि स्वीकरीलें माणुसपण
उदरीं सामावलें त्रीभुवन · चराचर ६२६

कीं तीए[4] स्नेहाग्नीं दावानळीं मध्यें पडिलेया जीवदोखातें जाळीं
तेथ गुण वांचौनि दोख सर्व काळीं : जळौनि जाय ६२७

परी ज्ञानीया–भक्ताचेनि गुणें एकें
उदरीं सतोख मानिला आदिपुरुखें
तो उल्हासु मी देखें दोंदावरी ६२८

तो आत्मरमणु अविनाशु आनंदें सदोदीतु जगनीवासु[5]
तयाचीये उदरीचा उल्हासु · कवण जाणे ६२९

---

१ कखग. भवतु असे २ कग पडलेया ३ खघ आकुरु
४ घ ते. ५ कग जगन्नि'.

## रोमावळी

कैसी रोमावळि सुनीळ : जऱ्हीं एकवटली इंद्रनीळाची कीळ
तऱ्ही ते उपमा पावळ : देवों नये ६३०

नाना ते नव्हति रोमराज: अनारीसें गमतसे मज
तें सांघेन सहज : जाणाप्रती ६३१

परीसा रोमराजीची नम्रता : जैसी सराउं धरी कृष्णवर्ण देवता
कीं ते स्वरूपौनि[1] उतरलें सभावता : शक्तीचक्र ६३२

कीं ते ममता मार्दवली : आनंद-आसुवें श्रवली[2]
तीय एकत्र होउनि उतरली : जैसा वोघ गगनगंगेचा ६३३

*कीं ते अच्युताची खावणी : नित्य वेवस्तेची वाहाणी*
कीं धाव घेतली कृपा-नागिणी : संसार डकावया ६३४

कीं ते चैतन्य वीस्फुरली : कृष्णवर्ण बहुधा जाली
आनंद आस्वादावेया आली : नाभिकंमळासी ६३५

तीया सखोले नाभिकमळीं : मकरंदु एकवटल्या सर्वकाळीं
भणौनि मुनिजन-भ्रमरांचीया ओळी
येति नाभिकमळासी ६३६

## वक्षस्थळ

सवीया सोभायमान वक्षस्थळ : जैसें तारुण्यदसे आलें वीपाळ
कीं तें कामतत्त्व केवळ : कार्यरूप ६३७

कीं तें मुक्तीचें राउळगण : मोक्षाचें मंडन
कीं परब्रह्माचें पाटण : सनादलें[3] ६३८

---

१ खघ. 'पुनि. २ खघ. दार्वली. ३ क. सानदले

तया वक्षस्थळावरी उन्नत · लावण्य भरे उद्धांतें
जे कामियाची कुमती हरीत : आपुलेनि राजसपणें ६३९

· संध्यारागाचा[2] रावणीं : रगले ब्रह्स्पती सुक्र दोन्ही
तन्ही तया कुचतटाची सारिख वाटणी : आतीचि ना ६४०

जैसीं कैवल्यसरोवरीचीं कमळें मकरंदें वाहाकाती वहळें
तैसीं नेटकीं स्तनयूगळें · वक्षस्थळावरी ६४१

## आघात : हस्तवर्णन

साजिरे देवाचे अघात . जे वीरश्रीया वरिले समर्थ
ते पुरवीताति मनोरथ सेवकजनाचे ६४२

चहुं दानीं उदार . शरणागतां वज्रपजर
चतुर्वीधा भुतग्रामीं अभयकर अजानबाहु ६४३

संसारकुपीं जग पडीलें : तें न नीगे कांहीं केलें
म्हणौनि लांब हात स्वीकरीले : काढावया ६४४

कीं अज्ञानाचा माहापुरीं वीस्व वाहुनि गेलें दुरी
तें लांबें हातें काढुनि बाहिरी : सुखीयें केलें ६४५

ना तरी तुझेया चरणातें जगन्निवासीं[3] : जे साडुनि न वचती सहसा
तयावरी पडत आकाश श्रीकरे धरीसी ६४६

सुहावीं भुजायूगळें दोन्ही जैसीचा दया मया लागलीया कानीं
आर्लोच सांघती श्रीचक्रपाणी : आमतें स्वीकरावें ६४७

तयांची आइकौनि वीनती अंगिकारु केला लक्ष्मीपती
मग आवारुं जालें खीती[4] : चहु दानाचें ६४८

---

१ ख. उघात २ कग. की ३ ध. जगनीवासा. ४ कग. क्षीती

कीं ते कैवल्याचे पडपयागी : कैसे डोलताती दोंहीं आंगीं
जैसे दान देयावयालागी : उतावेळ ६४९

आलौकिक बाहुदंडाची उघाइती : जैसी जडाचेतनाची आकर्म शक्ती
की ते स्वीकरीलें कैवल्यपती : परावर दोन्हीं ६५०

जैंसे कनवाळु कोंपर : जे संबंधाकारणें लोरसें लोभापर
तया बोरसें पान्हाओ[2] येतसे थोर : आर्त्त जनालागी ६५१

तें तरि नव्हे दुधांचें स्थान : परी जे अनुष्टीत आग्रहाचें वचन
तयासिंचि होती[3] प्रसन्न : प्रतक्षाकारे ६५२

लोठेपणाचा दरारा : आइकौनि भय उपजे कृदांता संसारा
तो कोंपराचा उबारा : साहों न सके ६५३

तो कोपें कठोर : तवकें तीखट थोर
जेहीं मोडिले भार : संसृती-अरिरायांचे ६५४

ते भवभंग बळियाडें : प्रतापें प्रचुर गाढे
जेहीं मारिले दंडे : अज्ञानसीहांचे ६५५

नीगातें नीघोटें : वज्रकायचीं मनकटें
आणि पाणि[4] पातां घणवटें : गर्वाथीळीं ६५६

की तीयें दादुगी अदटें : संग्रामसौर्याचीं सुभटें
कीं धैर्याची अलोटें : लोटेति ना ६५७

कीं ते नीर्वाण-संग्रामीचे माहावीर : आंगवणां आगळे अपार
कीं वीरश्रीयां भांगी भरीले सेंदुर : तैसे तल्हातें आलोहीत ६५८

---

१ कग * २ घ. पान्हा. ३ कग होए. ४ कखग.* ५ क. तळहात.

की संध्यारागाचे सारिखे : तैसें सतंवर पद्महस्त देखे
ना तरी सांडुनि अनीत्यें[1] सुखें : ब्रह्मादिक शरण रीगाले ६५९

कीं ते जगधापे जगदळे : भुजादंड श्रीमंत सरळे
जैसे कैवल्यतरुचे पाल्वे[3] कोवळे : सुरंग दीसती[4] ६६०

कीं संसारगजाचीं कुंभस्थळें : वीदारलीं श्रीकरें सरळें
भणौनि आरक्तें जाली करकमळें . अवीद्या–वीभाडाचीं ६६१

सामुद्रिकें श्रीकरीचीं लक्षणें : जिय अपेसातें ह्राणिती आपुलेनि[5] संमर्थपणें
तो आंगोठा जगीं वाखाणे : सदा यशवंत ६६२

तो मोक्ष–भवीक्षाचा दाता : आउक्षें नीत्यमुक्त पुरता
आदि अंतीं सर्वकर्त्ता : असतुचि असे ६६३

जैसी प्रसंनता भावरूप जाली : कीं सर्व कर्तृत्वें कार्यासि आली
तैसी धनरेखा मीरवली : सुरेख सरळ ६६४

जे दुर्भाग्यां जीवातें · संपन[6] करी दृष्टिपातें
तें अमोघ सोधी अनंतें : श्रीकरीं धरीली ६६५

ते परदैवें साव्यांकृत : नवां नीधीतें नीस्तरवीत
की ते आनंद–नीधानाची मूर्त्त : जाली भक्तांलागी ६६६

सरळीया सुरंगा : जैसीया मुक्तलतेचीया सेगा
तैसीया आंगोळीया सुरंगा : सोभायमाना ६६७

---

१ घ. आणिके. २ क. जगताप. ३ कग पालव. ४ ख. दीसताती. ५ घ. #. ६ कग. संपन्न.

कीं तीया कैवल्य-कुंकमाचीया कांडवेली
कनकवर्णा साजिरीयां सकोमळी
कीं ब्रह्मश्रीचीया मधा आली . दशावधानें होउनिया ६६८

जैसीं ब्रह्मतेजाचीं तकटें[3] . तैसीं नखें सरळें तीखटें
जयाचेनि प्रकासें आटे : वीघ्नतम ६६९

कीं तीया ब्रह्मश्रीचेचीया वेली ' फुललीया प्रकाशाचां फुलीं
कीं सांभव सुवर्णावरि जडलीं : कैवल्यरत्नें ६७०

कीं चंद्रसुर्यो दोन्ही आपण : दळभारेसी श्रीकरां रीगाले शरण
ते मार्गों आले भुपण : प्रकाशाचें ६७१

तया राजसा आंगोळिकीं : वरी रत्नजडितीं मुद्रिका
जैसीया ब्रह्मश्रीचेचीया दुतिका : तुडताळ करीती ६७२

कीं तीया आवडीचीया आंगवर्णी : वरु आलिया जगजीवना
तैसीया मुद्रिका सेवकजना पढीयासती ६७३

कीं परब्रह्माचीया सगती : विश्रांत जाली पराशक्ती
तेवि मुद्रिका आळगीती : हस्तपल्लवातें ६७४

वोळगानया परमपुरुखु : मीनला शक्तिचक्राचा देशकु
तैसा श्रीकरीं कुसमस्तवकु : परीमळें आथिला ६७५

कीं जांणौनि आर्ताची भावोभक्ती
उपनली कैवल्य दयात्रेयाची[7] प्रवृत्ती
तैसा पुष्पांचा झेला आघातीं : दिव्यरूप ६७६

---

१ कग सारिखीया. ख. सारिया. २ कख. दसा' ग दुसा'.
३ ख. तगटें. ४ कख. आगु'. ख. आगो' ५ घ. 'जडित. ६ कग.
आगना. ७ कखग. देया'.

की वेंधौनि ज्ञानाचीय वर्ते : साधन सीधी नेति जाणते
तया उचित देयानया अनंतें : ब्रह्मवीद्या श्रीकरीं धरीली ६७७

की करीता आदिपुरुखाचें चिंतन : वरवीद जाले सुमन
भणौनि कैवल्यनाथक अग्रग्रहण : करीता जाला ६७८

## हातसर

कैसे सुहावे हातसर · जैसी मुक्तिनवनीता अरुवार
लेउनि फुलांचे अळंकार . देवा वाल्भैले[1] ६७९

कीं ते वीवेकदेवता सुंदर : अच्युतादोखें जाली साकार
मग चोळग जांणवी सतार : मनिकटांची ६८०

चंद्रमंडळाचेनि कीर्णे[2] : चैतन्यें गुंफीलीं तारांगणें
तैसीं मीरवताती[3] बाहुभुषणें · अंगदाजवळी ६८१

कीं ब्रह्मवीचेची वोरणी : ओवीली साहीत्यवनमाळिणी
तैसी वाहिवटे[4] अंत करणीं पढियासले मज ६८२

जैसीं चैतन्ये–वीस्वेचीं पदें . तैसीं शोभती अंगदें
कीं प्रकृती वेध वीनटले वीनोदें : वस्तु व्यापकेंसीं ६८३

कीं तीयें ब्रह्मवीचेचीं वासींगें . भुजां वांधलीं श्रीरंगें
मग सकळ सैन्येंसीं परिवारल्या नीगे : राया रणनोवरा तो ६८४

तो कृदांता संसारावरी . प्रतापमल्लु परेश कटके करी
सर्वंदळीं जींतौनि वैरी : स्थापिले शरणांगत ६८५

---

१ कखग. भैली. २ घ करणे. ३ क. मीर्वती. ४ ग वाहे.

## श्रीकंठ

सुंदर श्रीकंठाची सोभा : जैसी वर्तुळ वोतली हेमप्रभा
कीं तो कांतीउं कांमवला गाभा
सच्चिदानद–स्वरूपाचा ६८६

ती रेखांचा वीस्तारु : जैसा अंसुसहीत परमेस्वरु
तयाचा वेगळाला वीचारु : वीत्पादना करीन ६८७

नीर्वेर्वे स्वरूपीं अव्यक्तीं : तीन्हीं उल्लेख उपजती
तैसी दीसे रेखाकृती : मज पांतां ६८८

कीं श्रीमुर्त्तिवरी वेगळाली : ब्रह्ममायाईस्वरु कार्यासि आलीं
तैसी रेखत्रयाची महीमा मिरवली : श्रीकठाजवळी ६८९

तयाचे भीन्न भाव सुपुर : बोल्तां स्थळ होइल अपार
तरि जीवार्चे जीव्हार : स्मरण ठाकैल ६९०

तर्‍हीं मंजुळां[1] उत्तरीं : सांघैन चैतन्याची थोरी
जे फडदरैलें[2] चराचरीं : जीवांसरिसें ६९१

तें मळकर्मीचें जन्मस्थान : जया व्यापलें त्रीभुवन
तीयचें फळ मोक्षासमान : ते शक्ति केसनी ६९२

ते वोळगे ईस्त्ररी[3] प्रवृत्ती : सृष्टी संहारु जीयचां हातीं
प्रभुची राणीव चालती : पेरेपासौनिया ६९३

की तीयेचा एके सेरटीं : हारपली ब्रह्मांडगोळ्काची दाटी
तीए शक्तीची तरळैली दृष्टी : ईस्वर नीहाळीतां ६९४

---

१ क. मजुळी. २ कल. फडतरैले. ३ कलग. ’राची

## उपसंहार

ब्रह्म तरी निर्गुण नीश्चीत वरि सकळगुणधर्मरहीत
जेथ ज्ञानीयाचा समुह मीळत सुखामध्यें ६९५

तया सुखसमुद्रामाजी रीगौनि बुडी दीधली मुनिजनीं
मग जीवब्रह्म दोन्हीं ऐक्य जालें ६९६

जया ईश्वराचा महीमा बोलावेया सौरसु नाहीं आम्हा
*परि तया आत्मयारामा वाचौनि सुख कैचें* ६९७

तो गुणधर्माअतीतु सर्व शक्तियुक्तुं
भावाभावा नातळतु मध्यें असे ६९८

तो रूपा अरूपा वेगळा स्वस्वरूपाचा पुतळा
भोगाअभोगामाजि सकळा असौनि नसे ६९९

तो नीर्गुण गुणभरितु सतअसतकर्मरहीतु
सर्वसाक्ष सर्वगतु परमात्मा ७००

तो वीश्वाचा वीश्वनाथु वीश्वात्मा वीश्वअतीतु
वीश्वव्यापकु वीश्वभरीतु वीश्वेस्वरु ७०१

तो देखौनि अदेखणा कहीं न वीसवे आत्मरमणा
तेणें अवतारू धरीला सुहावणा सृष्टीमध्ये ७०२

ऐसीया वीश्वधौं धर्माचीया सपती ईश्वरस्वरूपातें ओळगती
तें नीरूपिलें नागार्जुनाप्रती श्रीचक्रधरें ७०३

तयासि चरीतार्थ सकळशास्त्र केला ज्ञानप्रेमासि पात्र
भणौनि श्रीकंठाचें अभ्यंतर तोचि जाणे ७०४

---

१ ख घ. सगती २ घ पद्मरमा ३ क विरुद्धा

तीए श्रीकंठीं कंठमाळ : वार्णितां लपट होती कर्णयुगुळ
जाणाचीया मनोनासिका सुपरिमळ : करीन मीं ७०५

ते मज कैसी गमली : जैसी भक्तिश्री परीमळें शृंघारली
ते परीवारसहीत वोळगे आली : श्रीअंशा ईश्वरातें ७०६

कीं करीतां अच्युताचें सन्निधान : सायोज्यता पातली चैतन्य
भणौनि देवताचक्र अधीन : तीयेसि जालें ७०७

कीं तें मज गमलें आन : जैसी लावण्यश्री दीप्तमानें[1]
फुलांचें अंबर वेढुनी देताय आलींगन : श्रीकंठासी ७०८

जैसा सगुणा भक्ताचा अनुरागु : तैसा माजि माजि वानु सुरंगु
लक्ष्मीयेपासाव दीसे चांगु : गळदंडा तो ७०९

नां तरि करुनि कंठमाळेचें मीषांतर : परदैवा पाहुं आले भक्तिचकोर[2]
आनंदें जाले नीर्भर : वस्तु निहाळितां ७१०

हनवटी

आतां हनवटीयची भाष : मीं सांघैन सत्रीया सुरस
जैसी सीहाणिवेची[3] मुस : मुर्त्त जाली ७११

तो मुखश्रीयेचा रानिवसा : कीं पुरुखार्थाचा ठसा
हनवटीयचा भाव तैसा : मज गमला ७१२

कीं रूपश्रीया आंगें आपण : रचिलें आनंदाचें आसन
तयावरी उपवीष्ट जालें वदन : पुर्ण कामियाचें ७१३

कीं तो सकळवेधाचा अधीशा : श्रींगाराचा कुरुठा
कीं बैसता ठावो गोमटा : ब्रह्मवीयेचा ७१४

---

१ क. दीप्ति'. २ कग. शक्तिचक्र. ३ क. स्याहा'.

### कूर्चवर्णन

जैसे ब्रह्मबीयेचे अंकुर : तैसे कुर्च मनोहर
जयाची आस करिती दीनकर : प्रकासालागी ७१५

तो दुष्टदमनकेतु : खाडारी ठेवि हातु
तरी सांडिती मन्मथु : दैत्यदानव ७१६

नवल श्रीमुखाचें बरवेंपण : देखौनि चर्द्रे तुकीली मान
तें न वर्णवे येकी रसना : मज प्राकृतासी ७१७

कैसी वदनाची टेव : देखौनि विस्मो पातले इंद्रादीक देव
म्हणती हे न देखिजे बरव . तीहीं लोकीं ७१८

बोलिका होए सहश्रवदनु  परी श्रीमुखाचे मात्र नेणे वानुं
तेथ काइ लागे चतुराननु : चौमुखांचा ७१९

तया मुखाचा ठसा : वर्णुं नेणती श्रुती डोळसा
तेथ पाडु काइसा : सील्पत्रीयांचा ७२०

परी तो जगदेस्वरु जगदानी : कृपावसें वसीनला माझा मनिं
तो आनदु सांघतु असे मूर्त्तज्ञानी : म्हणे मुनि केशिराजु ७२१

—४—

## श्रीमूर्तिवर्णन : मुख व वाचा

जे परमानदें धाले  ब्रह्मरसें तृप्त जाले
ते चमत्करयीन[1] एकें बोलें  नीमीक्षामाजी[2] ७२२

जया देवाचें मुखकमळ  वाणितां लब्ध[3] होती मुनिजनअळिउळ
कां जें मकरदें वाहाफ़ात बहळ : मनोहर ७२३

तया मुखचंद्राचें चांदिणें नीकें : फेडी मायामोहाचें काळवखें
मग बोधवंतचकोर सुखें : पारणें करिती ७२४

तो सोळेंकळीं संपुर्ण : सीतळ सुधाकर सगुण
जयाचेनि आधारें पचबाण : वीचरे तीहीं लोकीं ७२५

जेथीचे मधुर बोल : अमृतापासाव सखोल
खीरसागरासीं करीती मोल : आपुलेनि गंभिरपणें ७२६

तया बोलाचेनि प्रकासें : अज्ञानतम निरसे
देशधडी होए आपैसें : अन्यथाज्ञान ७२७

काढुनि सुधरसाचें सार : बोळिजति चंद्रकर
तन्हि वाचा दीसे प्रचुर : सुरसपणें ७२८

चद्रीं वसे अंमृत : परी कृष्णपक्षीं उणें होत
मणौनि वाचेसि उपमीतां : सरिसी न पवे ७२९

## अधरवर्णन

आतां अन्मोदुं अधराचें यीसेषण : श्रोतया करुं शास्त्रश्रवण
जेणें ज्ञानाचें कार्यकारण : नासौनि जाये ७३०

तयाचा सखोल भाओ नीहाळितां : मज आनदु प्रकटे सर्वथा
मणौनि बोलावें लागे आर्त्तभुता : अनुचरांसी ७३१

जे ब्रम्हवीचे ज्ञानभक्तीचें[१] जन्मस्थान
जेथ अखड असे परा आनंदघन
तें कवणौ[२] वर्णवे महीमान : वोष्टपुटांचें ७३२

---

१ क ग 'दावतीचे. ख. 'सक्तीचे २ घ. कवण.

तऱ्हीं प्राकृतीं शब्दीं सूरसीं . आनंद सचरीन आर्त्तजनासीं
ज्ञानप्रेमाचीं फळें गोडिसीं : प्रतक्ष करीन ७३३

अष्टभोगाचां नंदनवनीं . बीव्हास ढाळी बीवेकाचें पाणीं
जाणिवेचीं फुलें तोडी वनमाळिणी : वेधशक्ती ७३४

साहित्याचेनि पडपें : चातुर्य शृंघारातें सींपे :
सांतिक्षेमेचीं लावीन रोपें : ह्रदयमडळीं ७३५

तेय अनुरागाचेयां सींहासना[1] वरी आदरें बैसवीन भक्तिजना
प्रबोधाकरवि जाणवीन वीजना : परमानंदाचा ७३६

कुशळता करीन वारिणी : सींह्याणीव होए चवरधरीणी
सखोलता ओळगे खात्रणी : अनुचराची[2] ७३७

नवरस होति सेवकजन : संगीत गाए सुरस गाएन
सकळ सामग्रीया होएँ[3] अनुचरां अधीन : ऐसें करीन मी ७३८

म्हणाल हा काइसा बोलणें बडीवारू :
तरी भीया प्रतक्ष केला आदिगुरू
तयाचेनि प्रसादें चीवेकरत्नाकरू : भरीतें सांडी ७३९

रजस्तमें नीरसौनि चैतन्यनाथु : सदा ह्रदइ आठवे अखंडीतु
तैसा भाओ बोलैन नीभ्रांतु : आर्त्ता अनुसरल्यासीं ७४०

वैराग्यवीचारांचेनि बळें : कळाकौसल्यें होए आगळें
वीरामा उपजती डोहळे : आनंदरतीचे ७४१

चाड श्रवेचीये संगती : सत्त्व सएमातें धरी हातीं
करावेया परमप्रीती : सुखश्रयासीं ७४२

---

१ क. °रागाचा. २ कखग. °रासी. ३ कग. होती.

ज्ञानशक्ति आपुलां गुणीं : तोडी अज्ञानाची तवनी
आवडि अनुरागें आणी : हृदयमंदिरासीं ७४३

उतकंठेचीए आळ्यां शूध केवळ
लावीन वेधबोधाचें रोप सप्रेमळ
ब्रह्मवीधेचा ओलावा देउनि कैवल्यफळ
अनुचरां दृष्टे करीन ७४४

आत्मया आचाराचें कुट : देउनि करीन शूद्ध चोखट
मग डोळां दावीन घनवट : आगाध स्वरूप ७४५

सौभाग्यें सुंदर्याचा[2] मेळीं : आर्त्ति लावण्यासी करी तुडताळी[3]
कैवल्यातें ओळगे भक्ति प्रेमागळी · तैसा रंगु राहावीन ७४६

प्रबोधु जाणिवेसीं करी उघाणी : वीःपति वीवेकाची पुरवी आणी[4]
तैसे शब्द घोळले परावाणी : बोलैन आतां ७४७

आत्मा परमात्मयासीं सांघे गोष्टी : तोवांचौनि नावडे दृष्टी
तैसे सखोल भाव दावीन ओष्टपुटीं : म्हणे कवी रसाळु ७४८

### अधरवर्णन : परा-करुणा संवाद

निजकींकीरों नीजानंदाचें नीजवर्णे
गोत्रीजें भणौनि सांघैन आपुलेपणें
तें आदरें परीसावें सावधें अंतःकरणें : अवधान देउनियां ७४९

पीळौनि पवळयाचा रसू : रांविजे पद्मरागाचा घोंसु
तऱ्हीं तया अधरबींबाचा प्रकासू · अधीक दीसे ७५०

१ घ. दृष्टी. २ कग. सौंदर्याचा. ३ क. तुतुडताळी. ४ कग आइणी, ५ कग. कीकरा. ६ कग. गोनजु.

अधर सुरग कैसे वानु जेहीं जीतिली पवळयाची ननु
माणिकें आदरे देताति मानु · कोवळे भणौनि ७५१

उधातया[1] माणिकाचे हीर दीसत सवीया सुरग सवीसार
परी नीन्हा नव्हति अरूवार नीहाळिता ७५२

तयाचे कीळ सतवर पाहाता नेटके नागर
परी न जोडे अमृतसार परा वाचा ७५३

ते जाणिजे अच्युताचा अधरीं जे जोडिली सदैवीं अनुचरीं
भणौनि माणिकें न पवति सरी उपमा देता ७५४

तीयें कोरडीं कठीणें मार्दवें परीमळें हीनें
भणौनि अधरेसीं एकें[2] गुणें उपमु न एती ७५५

नातरि सध्यारागाची चुवळी आदरेंसीं धरीली रातोत्पळीं
तऱ्हीं अधरकाति दीसे आगळी तयापासौनि ७५६

तीयें सुरगें सकुमारें सुवासें साजिरीं मनोहरे
परीमळें आथिलीं परीकरे वाहाकाति तीहीं काळीं ७५७

तीयें दृष्टी अवलोकिता कोवळीं दाविता मकरदाची नव्हाळी
तऱ्हीं ते उपमा पावळी · देवो नए ७५८

होती नेटकीं नागरे सवीया अलोहीतें अरवारे
पुण सरीसीं न पवति सर्वप्रकारें देवाचेया अधरेसीं[3] ७५९

जे सदा आथिले सकळगुणीं पुरवीति ज्ञानियाभक्ताची आणी[4]
तो महीमा कैसा वाखाणी : प्रेमगर्भू ७६०

---

१ कग उद्धा' २ कग 'ही ३ दग 'रासीं ४ वग आइणी

## अधरांचा अभिप्राय

जेथ परा वालभैली : लक्ष्मीं सोभेतें पावली
ते केवि वर्णवति आरिखीं बोलीं : मज प्राकृतासी ७६१

परी नागार्जुनाचा दातारु : कृपासींधु श्रीचक्रधरू
तेणें माथां ठेविला अभयंकरु : मज बोल भणितलें ७६२

आरे तुज दीधली आनोज्ञा मती : मीं उभा राहीन तुझां कवितीं[1]
तुं बोलसी तें परमप्रीती : मींचि आइकैन ७६३

ऐसा तेणें मज दीधला वरू : भणौनि सीधांतीं[2] जाला पडीभरू
आता असो हें सखोल भावो श्रुत करूं :
आर्ता अनुचरांसी ७६४

अन्मोदुं अधरांचा अभिप्राओ : जो बोधशक्तीचा ठाओ
तो अवधारीतु भावो : ब्रह्मवीद ७६५

जे अरुवार अलोहीत : साजिरे सुरंग प्रकाशवंत
ज्ञानामृताचा वरीखाओ वरिखत : आर्त्त जनावरी ७६६

परीसा[3] सांभव-सूखाचां नाटकीं : स्वयं ब्रह्मरसु ओतला कवतुकीं[4]
तो आपण श्रीरंगें घरीला मुखीं : मीषें अधराचेनि ७६७

कीं सौभाग्यदेवता आपण : केलें अनुरागाचें प्रावर्ण
तें सवीया सुरंग सलक्षण : मीखे अलोहीत ७६८

कीं ते परमानदाची कुळदेवता : प्रतक्ष जाली मज पांतां
वीखयानद नीवर्त्तौनि आर्त्तभूतां : आपणपें देओं आली ७६९

---

१ घ कौतुकी. २ क. सीद्धाती. ३ कग पर्यसा. ४ घ कौतुकी.

कीं आनंदरतीचें सूख महंत : देखौनि ब्रह्मवीया जाली वीकारवंत ·
ते अधर होउनि मुखीं मीरवत : परम पुरूखाचां ७७०

कीं वेधत्रोधाची अधीष्ठात्री . मुर्त्त जाली मायापुरीं
की मुखश्रीयेसी क्रीडा करी · परा वाचा ७७१

कीं निजानदें त्रूपीतें : भक्तिश्री परीमळें बाहाकात
ते पुरउ आली मनोरथ विखयप्रेमियाचे ७७२

की मुक्तीचीय बोजा सुरंगें आदिलक्ष्मी राविली देवागें
ते वेढुनि आली वोळगे : कैवल्यनाथाचीये ७७३

कीं देओ देखौनि सकळगुणभरीतु : रुपश्रीया केला मनोरथु
मी सदा सेविन अनंतु . भणौनि अधर जाली ७७४

ऐसे अधर सुरग सुहावे . जे प्रकासें वहळ बरवे
ते वानिता सुख होए : निचनवें आनंदरतीचें ७७५

जैसी ब्रह्मवीयेची दृती पढे परब्रह्माची कीर्ती
तैसे अधर बोलता दीसती : आदिपुरुखाचें ७७६

कि अच्युताजवळी अखडित : ओळगे साहीत्यें संगित
ते वरवीदांसीं बोलत पांडीत्य . दावी सीधांतमुद्रा[३] ७७७

कीं कृपाकारुण्य दोन्हीं परावाचेसि करिती उघाणी
आम्हा जडांमध्यें कवण सीहाणी . ते विचारीं[४] आतां ७७८

तव परा करी नीर्धारु आम्हा अखयाचा महिमा असे थोरु
परी कृपेसि ईस्वरू दानों नेदिती ७७९

---

१ कग तृप्त. २ ग साहीत ३ कग. सीद्धात. ४ कग विचारं.
५ कग दान.

ते आपणया सरिसी : उपमुं नये मानसीं
जीयेतें प्रधान करी ऋषीकेसी[1] : देसावया ज्ञानप्रेम ७८०

तीयेचें मगनें[2] दीसे महंत : जे अव्यक्तातें करी व्यक्त
अवतरौनि पुरवी मनोरथ : चराचराचे ७८१

यांयांचि काईं[3] बोलों बडीवारु : कृपा वस्य केले जगदेस्वरू
यऱ्हवीं तो निर्वेउ निराकारु : केवि दृष्ट होए ७८२

तीयेचा महीमा असे आगळा : जे आत्मारामु आणिला भुमंडळा
परमानंदाचा केला सोहळा : ज्ञानीयां–भक्तांसी ७८३

जरी कृपा आपुलां गुणीं : वस्य न करीती श्रीचक्रपाणी
तरी सृष्टीमर्ध्ये कैवल्यदानी : केवि बीजें करीते ७८४

जो आपुलया आनंदा : वेगळा नव्हे सदासर्वदा
तया नीरोपमा कैवल्यकदा : रूपा आणिलें ७८५

आम्हां कृपाशक्तीचा उपकारुं[4] : जें सर्वातें स्वीकरी सर्वेश्वरु
यऱ्हवीं तो अकळ अपरांपरु : केवि पाविजे ७८६

जो अवक्रीयू आगाधु : नीराभिमान नीजानंदु
तो मुर्त्तु जाला जगदबंधु : कृपावसें ७८७

जैं अच्युताजवळी नीरंतरीं : कृपा प्रधान नसे व्यापारीं
तैं केवि बोलावा चराचरीं : सुखानंदु ७८८

जें निर्गुण नीश्चितें[5] : आत्मरमण अनंत
तें केवि होय उपकारभुत : कृपेवीण ७८९

---

१ कग. हृषी° ख. रुषी°. २ कग मगन. ३ ख. काए.
४ क. अगीकारू. ५ कग. निश्चित.

जें निर्वीकल्प नीसग नीश्चळ नीस्तरग
मीं[1] माझें म्हणें ऐसें अग कृपा केलें ७९०

जें अमृतवत नीहाळीता विखो न्हे सर्व भुता
तें कृपावसें जीवदेवता प्रतक्ष जालें ७९१

जे अनादिसीध[2] अगोचर शुद्धबुद्ध सर्व्हा पर
तेणें मानवी मूर्ति मनोहर धरीली कृपावशें ७९२

जें नीर्वीकार गुणधर्मरहीत सर्वसुन्य सर्वातीत
तें कृपेवीण मुर्त्तवत केवि होए ७९३

जो नावारूपासि[3] भीन्न अद्रीष्ट नीरालींबन
तो कृपेसि देउनि मान स्वीकरी मायावेखातें ७९४

जरी कृपा न करिती वीनवणी तरी अगिकार कैचा निर्गुणीं
सुलभु[4] न्हता श्रीचक्रपाणी शक्तिचक्रासी ७९५

जो स्वय सुखरूप प्रकाशवतु अप्रमय आनदभरितु
तो सर्वशक्तीसी क्रीडा करितु कृपायोगें ७९६

जरी कृपा नसती प्रधान तरी आम्हा कैचें सन्निधान
सुखीयें न्व्हे त्रीभुवन चराचर ७९७

जें उदास अल्प्ति न लींपे नीत्यमुक्त
तें सर्वशक्तीयुक्त कृपा केलें ७९८

जरी कृपा न्व्हती आदिकारण तरी जीवा केचें उद्धरण
चुकावेया जन्ममरण आणिक नाहीं ७९९

---

१ कग तें २ कग 'सीद्ध ३ क नामासी ४ कग सुरलभु

जें अप्रमाण असंक्षात[1] : लक्षा नये अनंत
ते कृपा केलें मपीत : देखावया ८००

जें आगोचर अनादिचें : असळग नव्हे मनावाचे
तें धर्म स्वीकरी मनुस्याचें[2] : कृपावसें ८०१

जैसें वारेयाचेनि योगें : समुद्र हेलावे दे तरंगें
जो रत्नें प्रसवे अनेगें : अमोलिकें ८०२

तो अहर्नीसीं आगाधु थोरु : मर्यादा न संडी रत्नांकरु
परी पवनाचीया संगती सागरु : थडीये येरझारा करी ८०३

जैं वायो राहे नीवांत नीश्चळ : तैं केवि आंदोळे समुद्रजळ
तैसें कृपेवीण कैवल्य केवळ : कहीं नव्हे ८०४

आगाधे स्वरूपीं नीराकारीं : कृपा उपजवी प्रेमलहरी
मग त्रीयंसा येउनि गोष्टी करी : चैतन्यासीं[3] ८०५

कृपा भणे[4] चैतन्यशक्ती : येथ सर्वज्ञनाथ बीजें करीती
पुरुषार्थ होउनी वाढवीती : तुझा मानु ८०६

जो सर्वगुणीं सौंदरु[5] : चराचरासि आदिगुरु
तो परमप्रीती चक्रधरु . तुतें अंगिकरील ८०७

तुं आनंदइस्वर्यें[6] महंत : सुखसामर्थ्यें प्रकाशवंत
चेतनामाजि होसी समर्थ : ईश्वरसंबंधें ८०८

देउनि आपुलें संन्निधान : वेधबोध ज्ञान वीज्ञान
तुतें कीजैल प्रधान : सर्व अर्थीं ८०९

---

१ कग. ॰ख्यात. २ कग ॰ण्याचे ख. ॰क्षाचे. ३ ग शुद्ध॰.
४ कखग. म्हणे. ५ कग. सुंदरु. ६ ग. ऐश्वर्यें.

जो परसर्वसुखें पुरवी आणी[1] : सर्वधर्म जयाची करणी
तो तुतें स्वीकरी श्रीचक्रपाणी : ऐसें करीन मीं ८१०

ऐसें जाणौनि चैतन्यातें : कृपा वीनवी परब्रह्मातें
जी तुवा[2] धरावें मायावेखातें : कैवल्यनाथा ८११

मग कृपावसें कैवल्याचा पुतळा : आधीं आगाधें स्वरूपीं आकाळला
पाठीं ब्रह्मवीचेचा हात धरूनि केवळा : बीजें करी ८१२

तेथ कृपा करी वीनती . अवधारीं स्वामी कैवल्यपती
तुवां[2] स्वीकरुनि सर्वशक्ती : अवतारु धरावा ८१३

तुं जगजीवन जगदबंधु : परमात्मा परमानंदु
आनाथनाथ कृपासींधु : सर्वज्ञरावो ८१४

तुं जगदात्मा जगंन्नाथु : कैवल्यदानी ल्क्षमीकांतु
सानंदीं सदोदीतु[3] : कैवल्यदातों[4] ८१५

तु जगदेस्वरु जगदवंदनु : आत्मारामु आनंदघनु
मनुस्यवेखा देइं मानु : मायापती ८१६

तुं सुखरूप सर्वेस्वरु . सुधबुधें[5] सकळां परू
तुजवांचौनि समर्थ थोरू : आणिकु नाहीं ८१७

तुं दयाळु दयावंतु अप्रमय अनंतु
सस्वरूपीं सनाथु : आगाधीवां ८१८

तुं नीर्गुण गुणसागरु : अव्यक्त अपरांपरु
उदरदेवदीक्षागुरु : चैतन्यनाथा ८१९

---

१ कग. आइणी. २ ख. तुआं. ३ कखग. सदा॰. ४ कखग. मोक्षदाता. ५ कग शुद्धबुद्ध.

तुं वेधबोधाचा अधीष्टाता : कळाकौसल्यें पुरता
तुवां धरावें सर्वज्ञनाथा : मायावेखातें ८३०

तुं प्रसीध[1] परीकरु : परमानंददानी परात्परु
तुवां करावा अंगिकारु : शुद्ध चैतन्याचा ८३१

तु जीवोद्धरणु जीवपती : परीयसें[2] माझी वीनती
तुआ स्वीकरावी उभयशक्ती : आदिनाथा ८३२

तु सकळ श्रुष्टीसि आधारु : स्नेहाळु सर्वेस्वरु
तुवा धरावा अवतारु : परावरदस्या[3] ८३३

ऐसी स्तवनपुर्वक वीनवणी : आइके श्रीचक्रपाणी
मग कृपावशें घे गवसणी : मायापुराची ८३४

जो नीजानदीं नीरंतरीं : नीजस्वरूपीं क्रीडा करी
तो कृपे मानु देउनि घरी[4] : मायावेखातें ८३५

जो वीचारशास्त्राची खाणी : वीवेक सेवी पायवणी
तो कृपावसें घे आवगणी[5] : मनुस्यवेखाची[6] ८३६

चैतन्याचीये मुसे मनोहर : वोतली ब्रह्ममायाईस्वर
जडाचेतना शक्तीसीं चक्रधरु : मूर्त्त जाला ८३७

जडामाजि महंत . गुण असति अनत
परी मुक्ष[7] तें प्रेम प्रस्तुत . आइक आतां[8] ८३८

दया मया कृपा कारुण्य . सौंदर्य सौभाग्यासीं करी सौजन्य
उदार्य सहीत वोळगे लावण्य दृष्टीपुढां ८३९

---

१ ग प्रसीद्ध. २ क. परीयेसी ख. परीएसें. ग. पर्यसें
३ कग. °दर्स्या. ख °द्रीश्या. ४ कग. उद्धरी. ५ घ. अव°
६ ख. मनुक्ष°. कग. मनुष्य°. ७ कग मुख्य. ८ कखग. तु

रातलीया नवे नीधी : कळाकौसल्य अष्टमा सीधी
श्रीचरणीं वीळासली वुधी : सौंदर्य[1] देखौनिया ८४९

कैळास वैकुंठीचे सत्यलोक : हरीहर ब्रह्मा पुरंधरे[2] ब्रह्मादीक
स्वर्गी इंद्रचंद्र मुक्षे[3] करुनी अनेक : अंतराळिचे ८५०

आणिकाही अन्या अपारा : शक्ती असती घोरा
त्याही वोळगती दातारा : देवरायासी ८५१

ऐसा सर्वशक्तीसहीतु : श्रीधारला राओ अनंतु
मग कृपेचा धरूनि हातु : कर्मभुमीं बीजें करी ८५२

तेथ सम सारिखीया : इतर शक्तीतुल्य माया
सरि दीसतसे रंकाराया : ईश्वराजवळी[4] ८५३

ते अधीन देवता : हे ब्रह्मांडींची वेवस्था
मायापुरीं समस्ता : ईश्वराअधीन ८५४

ऐसा सर्वशक्तीसंपुर्ण : अवतरलौ[5] जगजीवनु
जीवां ओळे वीज्ञानघनु : कृपावर्से ८५५

ज्ञानीया श्रीमूर्तीवरी धरी वुधि : म्हणे हाचि कैवल्यपती कृपानीधी
याचेनि प्रसादें सर्वसीधी[6] : सुलभाँ[7] होती ८५६

हाचि साधनप्रतीतीप्रापकु[8] : साध्य पावत्रीता परमपुरखु
यावांचौनि दुजा आणिकु : समर्थ नाहीं ८५७

कर्मभुमी[9] मनुस्यदेहायूक्तां : संपादी बोधाचो स्वस्तता
मग अनुसरती आदिनाथा : आदिपुरुखासी ८५८

---

१ कग. सूदर्य. २ कग. °दर. ३ कग. मुख्य. ४ कग. जवळिके. ५ कग. अवत्रला. ६ क. सीद्धी. ७ क. सुल्लभा. ८ कग. प्रकासकु. ९ कग. तेथ°.

ईश्वरा रीगौनि शरण : सीधी नेंती आपुलें साधन
तया सताज्ञानीं कर्मक्षाळण : संनिधानीं होए ८५९

सात्वीं रजस्तमें विभाडुनी : मन आवेसीं जगदीस्वरचींतनीं
तो आरुढ होए सीहासनीं : अपरोक्षाचां ८६०

सकळ मळांचें परीसारण : करुनि देओ देति आपुलें सता–ज्ञान
नासवेया कार्यकारण : विकारविकल्पाचें ८६१

अनंता कर्माचीया रासी : ज्ञानीया अपरोक्षीं नासी
बहुरूपता या वचनासी . अप्रमाण्यं[1] येओं नेदी ८६२

अच्युताचां संनिधानीं : क्षाळी त्रीयंच पाप योनी
मनोधर्मे[2] करी धुनी : संताअसंताची ८६३

जाणौनि अव्यभिचारिणी भक्ती : वीघीनें[3] करी अष्टधा प्रकृती
ब्रह्मादीक आपुलें फळ सपादीती .
परी तो वास न पाहे ८६४

माहा वीघ्नाचे डोंगर : ज्ञानीया एतां देखे समोर
ब्रह्मतुल्य आनदें अंतर : झळंबो नेदी ८६५

जेणें परमानदु अनुभविला : तो चीदब्रम्हा[4] न वचे झांकवला
वीघ्नें उपशमती नेटकी कळा : तोचि जाणे ८६६

ऐसीं वीशेष वीघ्नें सारी : योग्य होए यापरी
तया परमेस्वरु दान करी : सामान्य ज्ञान ८६७

पुरुख अत्रीचा अवतार तीन्हीं : यातें प्रकासी कैवल्यदानी
मग देखों लागे दीव्यलोचनीं : परब्रह्मातें ८६८

---

१ कग. अप्रमाण. २ क.' धर्मा. ३ कग. वीघ्न. ४ क. 'ब्रम्हें.

अथवा येकां प्रेम संचरीती : तेणें वीकार–वीकल्प 'उछेदती
स्वभावो मुक्षे करुनि नीवर्त्तती : देहद्वंद्वें ८७९

तयाचा स्वभाओ ऐसा : जे देओ आवडे गोडिसा
वेगळे नव्हती अविनासों : सुखापासौनि ८८०

रजस्तमाचा नासु : आपण आंगें करी परेशु
प्रतक्ष दात्री मोसु : कैवल्यसुखाचा ८८१

भक्तार्चे सकळै चरितार्थे : संनिधानीं होए निभ्रांत
साध्य साधनाकारे मुर्त्त : आकारलें दीसे ८८२

तयाची ऐसी बुधि प्रतीति : म्हणे हेचि केवळ कैवल्यमुर्त्ती
करचरणवंत ब्रह्म आलें व्यक्तीं : कृपावर्से ८८३

भगत अच्युताचेनि[3] अनुरागें : वियोगीं उरों न सके मार्गे
एरि आवडी काय सागे : तयाचा आत्मा परमेश्वरु ८८४

आत्मेनिवीण देह धोरे : तरी असन्निधानीं भगत उरे
बीजें केलयां दातारे : तया आसणें नाहीं ८८५

भक्त ईश्वराचीय वीयोगीं : आइकतखेओ[4] देह त्यागी[5]
नातरी हृदयामाजी उसळे आगी : अवस्थेची[6] ८८६

तयाचा अनुरागु ऐसा : जीवें न वीसंभे[7] जगनीवासा
नित्यसबंधें परमहंसा : जवळिचि असे ८८७

भक्तार्चे कर्मक्षाळन : देओ संन्निधानीं करी आपण
सर्व दोखांचें कार्यकारण : उछेदुनि जाए ८८८

---

१ कग. मुख्य. २ कखग. सहसा. ३ क. अनुतापा°
४ कख. °क्षओ. ५ क देहे° ६ कखग. °स्तेची. ७ कखग. वीसंवे.

तो गुरु ज्ञानें-जगजेठी वेगळा होए वीकार-श्रुटी
ईश्वर सन्निधानीं उल्हाटी असत कर्में ८६९

सुक्षम प्रपचातें करतीकें जीव सामान्यज्ञानीं नाशु शकें
मळकर्में क्षाळी असेखें जें आपण लाविलीं ८७०

जे जीयें जोडीली जोडी ते तयाची तोचि फेडी
मग वरचीलाची साकडी जगदात्मयासी ८७१

ऐसा सत असत कर्में रहीतु नीर्मल होय अनघुतु
अच्युतेंसी साधे मातु वीशेखज्ञानी ८७२

तेथ देवश्रुटीपासौनु ज्ञानीया वेगळा होय भीन्नु
मग माया कृपावाचौनि सकळ शक्तीदान लाहे ८७३

तो प्रमाणद्रव्य सकळासीं वीसेखीं पात्र होय कृपेसी
मग अयोग्यता नासौनि अवीद्येसी घाओ घाल्रिती ८७४

कृपावसें कैवल्यकदु करी अनादि-अविद्या-मुळ-छेदु
प्रवृती लागे सगुणबधु तोही परता करी ८७५

अज्ञान अन्यथाज्ञान तुटी करुनि देति मोक्षाची साटी
मग ब्रह्मपदाचा राजमठीं तया पट्टु होए ८७६

साध्याचीया प्राप्ती होए साधननीवृती[१]
ज्ञानीये ब्रह्मी मीसळती केवळ जाल्या ८७७

ते बुटी देऊनी सुखीं निमाले ब्रह्मस्वरूपीं नीद्रीस्त जाले
सर्वदोखावेगळे केले रायें चक्रधरे ८७८

---

१ कवण आज्ञा' १ वग साधनाची

अपरा येर्श प्रेम सचरीती तेणें वीकार-वीकल्प उच्छेदती
स्वभावो मुर्ख करनि नीवर्त्तती देहद्वंद्वे ८७९

तयाचा स्वभाओ ऐसा जे देओ आवडे गोडिसा
वेगळे नव्हती अविनासो सुखापासौनि ८८०

रजस्तमाचा नासु आपण आगें करी परेशु
प्रतक्ष दावी मोसु वैवल्यसुखाचा ८८१

भक्ताचें सकळे चरितार्थ सनिधानीं होए निभ्रांत
साध्य माधनाकार मुर्त्त आकारलें दीसे ८८२

तयाची ऐसी वुधि प्रतीति म्हणे हेचि वेवळ वैवल्यमुर्त्ती
परचरणवंत न्य आत्रे व्यक्ती कृपावसें ८८३

भगत अच्युताचेनि[3] अनुरागें वियोगीं वरों न सके मार्गे
एरि आवडी काय सांगे तयाचा आत्मा परमेश्वर ८८४

आमेनिवीण देह धरे तरी असन्निधानी भगत उरे
बीजें केल्यां दातारें तया आसणें नाहीं ८८५

भक्त ईश्वराचीय वीयोगीं आद्यतखेओ[4] देह त्यागी[5]
नातरी हृदयामाजी उसळे आगी अवस्थेची[6] ८८६

तयाचा अनुरागु ऐसा जीवें न वीसभे[7] जगनीवासा
नि यसवधें परमहसा जवळिचि असे ८८७

भक्ताचें कर्मक्षाळन देओ सन्निधानीं करी आपण
सर्व दोखाचें कार्यकारण उच्छेदुनि जाए ८८८

---

१ कग मुख्य २ कखग सहसा ३ क अनुतापा'
४ कख 'क्षआं ५ क देहे' ६ कखग 'स्तेची ७ कखग वीसवे

कैवल्य परब्रह्मीं अपार : भक्तासि वेंच असे थोर
तें देखोनि श्रीचक्रधर : आपणपें समोर दे[1] ८८९

आपुली रती अनुभुनी : परमेश्वरू नीरंतर देती
तें भोगुं जाणे परम प्रीती : भक्त–चक्रचुड्ड ८९०

कैवल्यस्वरूपाचां सेजारीं : आनंदु भोगिजे अनुचरीं
तया सुखासि आदि सर्व प्रकारीं : कृपा ईश्वरीची ८९१

भणौनि कृपेवांचौनि प्रचुर : अन्यत्रं शक्ती नाहीं थोर
आपणपें ईश्वर देति समोर : तया तेंचि कारण ८९२

कृपा अच्युताचां मानसीं : नीरंतर असे अहीर्नेसीं
तीयेवीण जीवरासी : उद्धरे ना ८९३

जैसें तेजा आणि दीनकरा : नाहीं दुजेपणाचा गारा
तेवि कृपे आणि ईश्वरा : मी माझें न लभे ८९४

ना तरी चंद्रापासौनि चांदिणें : भीन्न नव्हे जेणें गुणें
तेवि कृपे आणि अच्युता वेगळें होणें : आथिचि नां ८९५

अथवा दीपा आणि प्रकाशा : भेदु न दीसे सहसा
तेवि कृपे आणि परेशा : एकत्र वासु ८९६

जैसी साकरेची गोडी : नीवटीतां थोर सांकडी
तेवि कृपा ईश्वरातें न संडी : सदासर्वदा ८९७

ना तरी सुवासा आणि कापुरा : भावो न दीसे दुसरा
तेवि कृपे आणि ईश्वरा : नाही भेदाभेदु ८९८

---

१ वग. देती. २ वग. अनेंत्र.

अथवा उदकापासौनि सीतळता : दों ठाइं नव्हे सर्वथा
तेचि कृपे आणि अनंता : नीत्य-संबंधु . ८९९

**कृपा ईश्वरू केला सचाडु : तरी सर्वकर्ता हे घडेना**

तवं करुणा केलें उत्तर : म्हणे "परे तुं प्रमैं[1] पडीखर
शक्तींमाजि सत्रीया चतुर : बोलुं[2] जाणसी ९००

परी सांडौनि यथार्थतें : नीरोपण करीसी नव्हतें
एणें समुं[3] पावतील चीत्तें : महंताचीं ९०१

कृपे ईश्वरा ऐक्यता : बोलो नको सर्वथा
हें नीरुपण माझया चीता : कहीं नए ९०२

जया आगाधा अगोचरा : न लगे दुजेपणाचा वारा
तेय कृपेचीया संचारा : रीगावा कैचा ९०३

परावर परधर्माचा नीवाडु : करावया शक्तीमध्यें जीयसि पाडु
ते जरि म्हणे कृपा ईश्वरु केला सचाडु
तरी सर्वकर्त्ता हें घडे नां ९०४

उदैलया चंद्रबींब परीपूर्ण : नीवे चराचर त्रीभुवन
सोमकांता होए संमाधांन : दर्शनमात्रें ९०५

वीशाळे गगनमंडळीं : चंद्र अरुढ होए सोळेंकळीं
अमृताची दावी नव्हाळीं : चकोरांसी ९०६

आपुलेया कळा-कवतीकें[4] : जग सुखीय केलें शशांकें
कळावतु हें नाव नीकें : तयासिचि साजे ९०७

---

१ कग. प्रमई. २ कखग. वोलों. ३ कखग. सर्म. ४ कग. कौतुके.

आंगीचीया सीतळता : सुधाकरु नीवत्री आर्त्तभूता
जडां अजडां समस्तां : सम वर्त्ते ९०८

ऐसा कुमोदबंधु : उदैलयां त्रीभुवना होए आनंदु
श्रींधारा लागे वेधु : चांदिणयांचा ९०९

वसंतु मन्मथेसीं करी प्रीती : हें खुण चंद्रांची आती
लता तरु रोमांच दाटती : तयाचेनि योगें ९१०

कांमिनी प्रीयातें आलंगीती[1] : एकमेकातें न सोडिती
जाति-विखया संचरे आर्त्ती : चद्रापासौनि ९११

तो जरी दीनकरा सारीखे[2] तपे : तरी अमृताचेनि वडपें कवण सींपे
तयावीण केवी वाढति रोपें : श्रींधाराचीं ९१२

चकोराचें धरणें : तयावांचौनि उठवावें कवणें
व्रतस्ता अमृताचें पारणें : केवि होए ९१३

तैसे जाणिवेचा सींहासनीं तुतें : आपणें[3] बैसवीलें कैवल्यनाथें
परी तें कार्य सविसेख येथें - दीसे ना ९१४

अज्ञानाचें त्रीमीर बहुत : जगीं फेडावया तुं समर्थ
तुतें वोळगती ज्ञानीय महत : चहु दशांचे ९१५

नेणीवेचें सांकडें : जीवां पडीलें असे गाढे
तें फेडावया तुझेनि पाडें : शक्ती नाहीं ९१६

ममनेचीया भ्राती : जीउ भुललें सर्व[4] अर्थीं[4]
तें तुवां कैवल्यपर्थीं : दक्ष केलें ९१७

---

१ खघ. आळवती. २ ख. सारीखें. ३ घ. आपणे.
४ कखग. सर्वार्थी.

तूं परशास्त्रें प्रबळ : जीवां संपादीसी ज्ञान केवळ
जेणें टाकीती वेव्हाउळ : ब्रह्मसुखाचें ९१८

तुं प्रभार्त्रे पुरती : परावर-वस्तु-वीचारु जाणती
म्हणौनि स्वीकरी कैवल्यपती : जीवोद्धरणु ९१९

तें वीसरौनि परज्ञान : वायां नीरोपिसी अन्यत्र आन
कृपे वस्य जालें म्हणसी जगमोहन : स्वरूप ईश्वरीचें ९२०

## परब्रह्माची वीत्पती

तवं परा म्हणे "करुणाशक्ती : परीस परब्रह्माची वीत्पती
मीं बोलों नेणें अधर्मयुक्ती : कव्हणी[1] काळीं ९२१

जें स्वरूप आनंदघन : ब्रह्मवीद्येचें नीधान
तें वांचौनि मज दुजें आन : बोलों नावडे ९२२

जरी आंधारा आणि गभस्ती : उभयां येकत्र होए वस्ती
तरी माझां ठाइं करुणांशक्ती : अन्यथा घडे ९२३

अथवा पापुपुण्य दोन्हीं : असति एके स्थानीं
तरी माझी पवीत्र वाणी : अन्यथा होए ९२४

समुद्र मर्यादा सांडी : कां मेरु वीचरे ब्रह्मांडीं
तरी अन्यथाज्ञान वोवांडी[2] : मज आपणयाकडे ९२५

जीवा नेणीवेची पडे भ्रांती : ते फेडुं सकें मी पराशक्ती
मजवांचौनि आणिक जाणती : आथीचि ना ९२६

अज्ञानाचें पटळें[3] : फेडावया मीचि सबळ
कर्मे नासौनि करीं नीर्मळ : चहुं ज्ञानीं ९२७

---

१ कप. कव्हणे. २ ग. वोवाडी. ३ कग. पडळ.

अनुरागा सवरे आर्त्ती  चाड उतकंठेसीं करी सगती
जीवा आवडी उपजे अच्युतीं  मजपासाव  ९२८

शाति[1] नीवृतीतें परणी[2]  श्रधा क्षेमेची पुरवी आणी[3]
ऐसी मीचि एकी परा वाणी  करु सकें  ९२९

मीं सवांगें वेल्हाळी  कळाकौसल्यें बुधी[4] आगळी
अती बोलता व्रीदावळी  गोसावी कोपतील  ९३०

## सर्वकर्ता या वचनाचा अर्थ

मग परा भणे करणे . माझें मोक्षदायक बोलणें
सर्वकर्त्ता एणें प्रमाणें  सकिलें तुआ  ९३१

या वचनाचा अर्थु  मीचि बोलैन नीभ्रातु
तें आदरे आइक तू . अवधान देउनी  ९३२

तुझया पक्षाची व्यावृती  आधीं करीन आपुलीया मती
मग बोलैन वीत्पती  परब्रह्माची  ९३३

सर्वकर्ता हें वचन  मज साधता नलगे मान
परि यासि अक्षेप असे आन  तो आइक आता  ९३४

श्रीमुखें सर्वसाक्ष हे श्रुती  स्वय नीरोपीली कैवल्यपती
हेचि सका अवधारीं नीरुती  अर्थसहीत  ९३५

जो उदास वीस्वभरीतु  करण-कर्तृत्वाचा नाहीं हेतु
करीता देखे सर्वज्ञनाथु  अहीर्नेसीं  ९३६

---

१ लघ सांनी  २ क ग प्रणी  ३ क ग. आइणी  ४ क. बुद्धी

तो सर्वसुन्य सर्वगतु : आपण कर्त्ता नव्हे[1] अनंतु
दुजयातें करू नें म्हणे साक्षभुतु : होउनि असे ९३७

या अक्षेपा परीहारु : करीतां संदेहो असे घोरु
तो मजवांचौनि नीर्धारु : कवणें करावा ९३८

ऐसया नी कांमां नीश्चींता : केवि म्हणावें सर्वकर्त्ता
हा श्रुतीशीरोध्रु आइक आतां : मजपासाव ९३९

तुझियाँ प्रश्ना प्रश्नोतर : मीं देइन वेगवत्तर
तें नीकें नीहाळीं[4] सुत्र : नीर्वचनाचें ९४०

आधीं सर्वकर्त्ता हें प्रमाण : नीर्वेचु कार्यकारण
मग सर्वसाक्ष सरूपलक्षणें : पाठीं करू ९४१

स्वरूपीं नीत्य नीराकारा : देवता असती अपारा
तेयीं मूर्त्ता होती ईस्वरा : प्रवृति जालिया ९४२

जीवाँ आनदु ऐस्वर्य प्रकाशू : सुख सामर्थ्ये देयावयाचा अभ्यासु
या अवघेया आदि परमहसु : परमात्मा ९४३

अनेगें साध्यसाधनें : फळप्राप्ती ज्ञानविज्ञानें
हें सर्व केलें जगजीवनें : चैतन्यनाथें ९४४

श्रीष्टीमाजि ब्रह्मांडें अनतें : प्रवृत्ति रची व्यापारतें
मग स्थुळां सुक्षमां प्रपचातें : जीव मी माझें म्हणती ९४५

जें अव्यक्तीं नुपजे प्रवृत्ती : तें जीव चेतन केवि होती
आनद सुख-फळें भोगिती : कवणीपरी ९४६

---

१ ख. न्हवे. २ कखग. करीन. ३ खग तुझेया. ४ कग नीहाळावें. ५ कग. स्वरुप. ६ कग. तीया. ७ कग. देवता.

स्वयं आपण अद्रीष्टं¹ : धरी माया-खेळाचा नटु
मग जीव देवता होए प्रकटु : कृपावसें ९४७

त्रीवीधा परी आदिनाथु : अवतार धरी श्रुष्टीआंतु
दाखावया मुक्तिपंथु : जीवजातांसी ९४८

भणौनि याचि अर्था : परमेश्वरू सर्वकर्त्ता
यन्हवि जीव ईश्वर देवता : तीन्ही नीत्य पदार्थ ९४९

जैसें उदैलया दीनकरु : भूतां करुं आवडे व्यापारु
तैसा परीसावा जगदेश्वरु : सर्वकर्त्ता ९५०

आता साक्षीत्वाचा वीस्तरु : मीं बोलैन अती परीकरु
तो करुणे परीसावा आदरू : करुनियां ९५१

जीवीं संतें असतें : कर्मे जोडिलीं बहुतें :
तें साक्ष होउनि सर्वज्ञनार्थे : दृष्टीं देखीलें ९५२

देओ आपण कर्मा नातळे . न करी तया नुपजवी² डोहळे
सस्वरुपीं कैवल्यपाळें : सानंदीं क्रुडाँ³ कीजे ९५३

जीव-देवताचेनि योगें : अच्युताचें आत्मरमण न भगे
भणौनि सर्वसाक्ष हे श्रुती श्रीरंगें : स्वयं नीरोपीली ९५४

जैसें रात्रीचां अवस्वरीं . दीप उजळीजे मदीरीं
तो तस्करा करीतां चोरी : कांही न म्हणे ९५५

चोरु घरांतु राहाटे : परी दीवया कांहीं न वटे
तो सर्वस्व बांधौनि मोटें : घेउनि जाय ९५६

---

१ कग. अदृष्ट. २ कग. 'जती. ३ ग. क्रीडा.

तस्करा चोरी करीता : दीप आज्ञा नेदी सर्वथा
समग्र देखे नेतां : परी नको न म्हणे ९५७

दीप आंगीचेनि उल्हासें : हरीखें डोले रहीवासें
आपणया लागों नेदी पीसें : करण–कर्तृत्वाचें ९५८

तैसा सर्वसाक्षी जगदेश्वरु : सर्वकर्त्ता सकळा परु
कृपेसहीतु नीरंतरु : राज्य करी ९५९

जैसा चदनापासौनि परीमळु : नीवडुं न सके मळयानीळु
तेवी कृपेवेगळा कैवल्यपाळु : कहीं नव्हे ९६०

ना तरी माणिकापासौनी मज पांतां : रंग वेगळा नव्हे निर्धारीता
तेनि कृपे आणि आदिनांथा : भेदु बोलों नैये ९६१

अथवा नेत्रावेगळी दृष्टी : बोलतां आंगा येईल कुटी
तेनि कृपेनांचौनि स्वरूप श्रीष्ठी : अवतारू नाहीं ९६२

हिरया आणि प्रभे भेदु : करितां न घडे शास्त्रसंवादु
तेवि कृपे आणि कैवल्यकंदु : वीसंवति ना ९६३

नीळोत्पळांचा वर्णु : केवि म्हणावा भीन्नु
तेवि कृपे आणि जगजीवनु : नीत्य शास्वतें ९६४

जै जीवा[१] नसे धीकारु : तैं केवि माने श्रींधारू
तैसा कृपेवीण परमेश्वरू : अवतरे ना ९६५

### अविक्रिय ईश्वराला विकार कसा

तव करुणा म्हणे परे : वायां बोलसी पक्षांगीकारे
ऐसीं नीरूपीतां नव्हती उत्तरें : संका न वटे ९६६

---

१ गध, मज्जा. २ कलम. जीवी.

जो नीरंतर ब्रह्मचर्याचीं रासी : सदा नीराभिमान अहोर्नेसीं
तो वीकरौनि वस्य होए कुपेसी : हें केवि घडे ९६७

जो अवक्रीयू आगाधु : नीरोपम नीजानंदु
नीःकामा नलगे बंधु : वीकरलेपणाचा ९६८

तया नीर्वेवा नीराकारा : विकार समर्थीसी तुं परा
परी रीगावा नाहीं या उत्तरा : प्रत्या न ये ९६९

तुज शास्त्रबाह्य नीरूपण : करीतां आपजवे थोर दुषण
कां जें अवीक्रीयू हें प्रमाण : अन्यथा नव्हे ९७०

जें अज्ञानाचें काळवखें : आपुलेंनि आंगें फेडुं शके
तें जरी बोलों[2] नेणे तयाचयासारिखें : तरी जाणीव काइसी ९७१

जें परावर-वस्तु-वीचारें : नीरसी मायामोहाचें आंधारें
तें जरी नीरूपी न घडतीं उत्तरें : तरी चातुर्य बोलों न ये ९७२

जे परशास्त्र बोलौनि प्रचुर : जाणे सकळ सीधांतांचें सार
तें जरी म्हणे ब्रह्म वीकरलें नीर्विकार
तरी जाणती म्हणों नैये ९७३

जे परज्ञानाचां हातेरीं[3] : नेणिवेतें पाठीमोरें करी
तें संदेहो तोडुं न सके चराचरीं : तरी गर्व कां बोलावा ९७४

जे आपुलेनि जाणपणें : शक्तिचक्रातें देखे उणें
सेवटीं तीयचें बोलणें : संदेहो-गत ९७५

परे तुझेनि अनुरागें : रजस्तमें होती नीलागें
मद्मत्सराचें दळ भंगे : आइकनक्षेओ ९७६

---

१ प. पर'. २ग्म बोल. ख. बोलें. ३ कग. हातीयेरी. ख. हातयेरीं.

कामक्रोधाची मांदी : रागद्वेषेसीं संवादी
म्हणे परा पाठविली कृपानीधी : आतां कैसें कीजे ९७७

एसना परे तुं[1] साधकुं : भणौनि प्रधान करी परेखु
सेवटीं अवीसेखी वीसेखु : कल्पीसी तुं ९७८

जीये शक्तीचेनि मुखें : परब्रह्म जाणिजे नेटकें
ते जरी सका अक्षेप न देखे : तरी काइ करावें ९७९

जे वेधबोधाची कसवटी : ब्रह्मवोधेंसीं करी गोष्टी
ते शक्तीची तळैली द्रीष्टी : माझेनि आक्षेपें ९८०

ऐसी करुणा गर्व बोलिली : तवं परा मानसीं अवेंसली
मग पुरुषार्थे[2] नीरोपु लागली : विरुद्ध धर्म ९८१

## विरुद्ध धर्म

मीं सर्वांगी डोळस : साध्यसाधनाचें ज्ञान मातें पुस
चराचरीं वीश्व पाहे माझी वास : जाणिवेलागी ९८२

मी वीचारें वीत्पन्न : वीवेकाचें जन्मस्थान
परावर-वस्तु-ज्ञान : मींचि जांणें ९८३

मी चातुर्ये चौरासें[3] : सींहांणीवें करी माझी आस
बोलौनि पुरवी भडस : महंताची ९८४

मी गांभीर्ये गहन : जाणिवेचें जीवन
परवस्तु दावितें दीव्यांजन : माझां ठाइं ९८५

---

१ कखग. तुझा धाकु. २ कखग. 'र्थेसी. ३ कग. चोरसु. ४ क. स्याहा'.

मी ब्रह्मवीयेची सखी : परज्ञान मीरूपीनें नेटकी
वेध-ब्रोधाचां मस्तकीं : माझा हातु ९८६

मीं साहीत्यें नीपुण : जाणें कैवल्यसुखाची खुण
शृंगार वाय माझी आण : वडील भणौनि ९८७

मी संगीतें सुरस : अभीनवु जाणें नवै रस
परी परशास्त्र बहुवस : बोलो आवडे ९८८

मी ईश्वरा अनुखंगीत : कृपेची पुरोहीत
देवातें मागे उचीत : पाचारौनि ९८९

मीं ब्रोधशक्तीची सांघातीणी : दयेची पुरवी आणी
मातें जगत्र वाखाणी : जाणती भणौनि ९९०

सकळ वीद्या माझां ठाइं . परी मी परा त्यांतु नांहीं
देवो कृपावसें जाणवी : तैं मातें जाणिजे ९९१

लावण्य आपुलेनि बरवेपणें : सुधैं चैतन्यातें उगें म्हणे
परी परशास्त्र बोलों नेणें माझया ऐसें ९९२

सौभाग्य सवीया रुपस सीहांणी : पाहातां पुरे डोळ्यांची आणी[४]
परी परज्ञान तें परावाणीं . मीयांचि बोलावें ९९३

सौंदर्य होर नागर-नेटकें : अंगीकरीलें परमपुरखें
परी नीरुपण माझयासारिखें : करूं नेणे ९९४

उदार्य हानें उदड रोकडें : देतां न पाहे मार्गे-पुढें
परी फेडु न सके बीरडें : अज्ञानाचें ९९५

१ कखग. नीरुपुनि. २ कख. 'म्रव. ३ कग. शुद्ध.
४ कग. आइणी.

मी परज्ञानाचेनि प्रतापें : नेणीवेवरी उठीं कोपें
तरी अज्ञानाचें सैन्य हारपे : देखतखेओं ९९६

काम क्रोध मद मछर : धाके रीगेती शांतिचें घर
राग द्वेख आपुले व्यापार : वीसरौनि जाती ९९७

अहकारु अभिमानु दोन्हीं : पळती[1] एकमेकातें सांडौनि
गर्व सुधी करीतां मेदनीं : सांपडती ना ९९८

माझें आइकौनि नांव : कुठे रजस्तमाची धाव
विकार वीकल्पा एती भाव : मृतासारिखे[2] ९९९

मातें आलें आइकौनि श्रवणीं : कल्पना वासिपौनि पडे धरणीं
माया मोहा होती बारौं भंगाणी : आओ न सभाळे १०००

आसा तृष्णेतें म्हणे : आतां आम्ही तुम्ही कैसें करणें[4]
संसाराचें उठैल ठाणें : परेभेण १००१

ऐसा माझा परेचां दरारा : लागला कुदांता संसारा
तो मुख न दखवीतें पाठीमोरा : जावों लागे १००२

माझें दळ मजसरिसें : आगळीकां पुढें वाढत दीसे
शांति क्षेमा मीळौनि अनायासें[7] : विभाडित कखायातें १००३

आवडि अनुरागु दोन्हीं : विखयावरी करीति धांवणीं
उत्कंठा हाणे पाचारुनि : अभिळाखातें १००४

प्रेत्नाची हानवडी : इंद्रीयें जांणती फुडीं
तें तोंडें करुनि कानवडीं : दरां रीगती *१००५

---

१ ग. पळेति. २ कग. मृत्या°. ३ घ. * ४ कग. राहाणे. ५ कग. दाख°. ६ घ. आग. ७ कग अन्यासे. * क प्रतीत ही सपूर्ण ओवी लिहिताना गाळलेली आहे.

चाड-श्रधेचा उठावा  देखुनि अहता काढी काढावा
ममता काकुन्ती दे तरा  सत्र साडी  १००६

वीचाराचीये हाके सरिसा  सदेहो नीगौनि जाए आवेसा
वीवेक भवडी आटवळसा  नेणीवेसी  १००७

कळाकौसल्या समोर  न न्हाति फळवासनेचे भार
चातुर्य आटाट करी थोर  पारकर्या दळाम यें[1]  १००८

जाणीवेचा घायवारा  लागला मदन-कामेश्वरा
तो घाकें कापे थरारा  उभे न न्हावे[2]  १००९

बुधि[3] भावाचें सबळपण  आ(इ)कौनि स्वार्थ साडी प्राण
आवाका नीगौनि जाए भेण  जेथें सुधि[4] नाहीं  १०१०

कोपल्या वैराग्याची उठावणी  अवीवा असो न सके समरंगणीं
आपेपर वीसरती चळ्हानी[5]  सर्व दोखार्चीं  १०११

परिछेदार्चें दळ उचल्लें  आइकौनि वीघ्नजात आधीचि पळे
परश्रीसताप होउनि आधळे  भवते भवती  १०१२

वीरक्तीचा टर्का[6] झळके  तरी इद्रीयधर्म मनीं शके
म्हणे आम्हा आता नाहीं नीकें  देहीं असता  १०१३

वीरामाचें उपलाणें  आइकौनि पळु काढिला अन्यथाज्ञानें
मुमींजाति मानवळणें[7]  मनोधर्मांचीं  १०१४

मयमाचें पायदळ  मोडी अन्यथाज्ञानाचें[8] बळ
सन्व साडवी सकळ  वीखय-सुखाचें  १०१५

१ क °वीपा  खग °वया  २ कग राहाव  ३ क बुदि
४ क सुदि  ५ कख वल्हाणा  ६ ग टीका  ७ कखग मान°
८ खग अयथयनाच  क °वयनाच

नीराभिमानाचीया नायकवडी : मान्यतेवरि खांचीती धाडी
सचाडता होए कोरडी : आपेंआप १०१६

द्रीष्टी एकवृतीचें मानें : देखौनि आश्रो पावला मरण
अनीष्ट दांतीं धरी तण[1] : म्हणे जीवें राखा १०१७

नीलाग-वृतीची कुळकणी : सलागता आइके आपुलां कानीं
ते सकुटंबी नीगे पालाणौनि : देशत्यागे १०१८

नीढावतेची सौरवृती : उंच प्रपंच डोळां देखती
मग पायां लागौनि म्हणती : आंम्हां जांओं दयावें १०१९

आनास्तों[2] हातें चरकी[3] : ते आळींवनातें न लेखी
घाये हांणौनि कवतीकीं : वेगळें करी १०२०

देहदमनाचेनि धाकें : रजवासना उभी शंके
अनुताप उठी थोरे[4] तवकें : तरी पाप कैचें १०२१

नीर्वेदाचा प्रतापु गाढा : सकळ कर्मे रुळती पाउडां
तो वैरीणी भांजौनि त्राढे पुढां : आंबुलेपणें[5] १०२२

अनुसोच आपण आंगें उठी : तरी पारके पळे तिव्रारे वाटीं
तेणेंसीं मेळवी कांडत्रीटी : ऐसा कव्हणी नांहीं १०२३

आर्ताचा पुरुषार्थु कानिं पडे : सर्व दोखी मरिजे[6] रोकडें
संग्रांमीं भीडतां तीयचेनि पाडें : आणिक नांहीं १०२४

ऐसें असाद्दाण उतावेळें : माझें दळ हातें आगळें
पुरुषार्थे पुरवी सोहळे : संसार-सत्रुचे १०२५

---

१ घ. त्राण. घ प्रतीत आधी मान शब्द लिहून तो खोडला आहे व नंतर त्राण शब्द लिहिला आहे २ ग. आनास्या. ३ कग. चरखी. ४ क. थोरी. ५ खग आमुलेपणे. क. आमले. ६ क. मारीजे.

नेणीव नासावया अर्थीं · मींचि एकि जाणती
भणौनि मातें ल्क्षमींपती · प्रधान करी १०२६

## निर्विकारा कैंचा विकारू या आक्षेपाचा परिहार

आतां आसो हा बडीवारू नीर्वीकारा कैचा विकारू
या अक्षेपाचा परीहार करीन मीं १०२७

तुझे सका-अक्षेप ऐसें जें अवक्रीये न्हे अनारिसें
नीराभिमाना नलगे पीसें अहकाराचें १०२८

भणौनि एणेंप्रमाणें सकिलें[1] माझें बोलणें
शेवटीं दोन्ही पक्ष समर्थु जाणें मीचि एकी १०२९

परी तुझा पक्षु आधीं मी प्रतीष्टा पाओ नेंदी
तेणेंवीण सर्व सीधी नीवडे ना १०३०

जरि नीर्वेव नीराकारु विकार नेणे श्रीचक्रधर
स्वय परब्रह्माचा अवतार हें केवि घडे? १०३१

जो सुधबुधु[2] नीत्यशाश्वतु नीराभिमान नीत्यमुक्तु
तो मनुस्यवेखें कैवल्यनाथु का अवतरे? १०३२

जो अव्यक्त अपरापरु अनादिसीध आगोचरु
तो मायावेख सर्वेश्वर का स्वीकरी? १०३३

जो अवक्रीयु अहीर्नेसीं मातु नेंदी मायापुरासी
तरी ज्ञानप्रेम जीवासी केवि होए? १०३४

आगाधे स्वरूपीं अव्यक्तीं जरी नुपजे लीळाप्रवृत्ती
तरी परमेश्वर परदर्सं[3] होती : हें न घडे म्हणा १०३५

---

१ ब ग तुवा २ ब ग. शुदबुद्ध ३ ब ग 'दर्शी.

जो अद्रीष्ट आनंदघनु : सदासर्वदा नीरालंबनु
तो जरी कृपेसि नेदी मानु : तरी अरर काइसें ! १०३६

जरी कैवल्यमंडळीं नीजानंदीं : नुपजे अनसारिखी बुधी
तरी परावर-दर्स्य हे प्रसीधी : कवणें बोलें १०३७

तो जरी नीर्वीकार नीर्गुण : सानंदीं सदा आत्मरमण
तरी जीवाचां बंधमोक्षीं कवण : क्रीडा करी ! १०३८

तो अप्रमय आगाध-चक्रवर्ती : जे करूणाची न करी ताती
तरी अनाथानाथ हे श्रुती : स्वयं कां नीरोपीली ! १०३९

तो जरी नीरंतर नीराभिमानु : सस्वरुपीं सनातनु
तरी अनमीत-बधु जगजीवनु : हें वचन काइसें ! १०४०

ऐसा सुहावा सप्रेमळीं बोलीं : परा कारुण्यें नीरोतर केली
मग प्रणम्य करुनि पुसुं लागली : वीरुधां[१] धर्मातें १०४१

ऐसया अक्षेपा परिहारु : परे तुजवांचौनि नेणती करुं
हा सारासारवस्तुवीचारु : तुवां बोलावा १०४२

## विरुधा धर्मांचा अंगीकारू ईश्वरींचि आति

मग परा कारुण्यातें[३] म्हणे : हें ब्रम्हवीद्येचें नाणें
मीचि येकि पाहुं जाणें : शक्तिमाजि १०४३

हें परज्ञान परशास्त्र : परीसावया तुंचि पात्र
तुजवांचुनि सुक्षेत्र : आणिक नाहीं १०४४

---

१ कग. 'दर्स्य. २ कग. विरुद्धा. ३ कग. 'ण्येते.

हे सारासारवीवेक वाणी : परीसावया तुंचि सीहांणी
आदरें आइक अंतःकरणीं : अवधान देउनीयां १०४५

आतां वीरुधां[1] धर्मांची वीत्पती : मी बोलैन प्रचुरां मतीं
ईस्वर नीराभिमानु अव्यक्तीं : नीज सत्त्वरूपीं[2] १०४६

तो सदा स्वानंदापासुनी : वेगळा नव्हे कैवल्यदानी
अभिमानें न पडे वेसनीं : मायामोहाचां १०४७

तो मद-मत्सराचीय धारसां : न पडे कखायाचीय वळसां
डंब-प्रपंचाचा वारा परेशा : कहीं न लगे १०४८

कांमक्रोधाचीया दावानळा यउती : वास न पाहे तो कैवल्यपती
अहंते-ममतेची अपकीर्ती : आपणयां लागों नेदी १०४९

रागद्वेखें वर्मस्परीशु[3] : बोलों नेणें परमहंसु
अधर्मासीं न करीं सौरसु : हांसौनिया १०५०

अहंकाराचीय वागुरे आंतु : माजि न रीगे सर्वज्ञनाथु
खेद-आल्हादीं नव्हे[4] भ्रांतु : कव्हणे[5] कांळीं १०५१

तो सुखें संभावनां[6] न मनीं : दुखीया नव्हे[4] श्रीचक्रपाणी
वोखटें नेघे अंतःकरणीं : वीसरौनि जाए १०५२

तो मायापुराचीय खोळे : रीगौनि शूधचैतन्यां नांतळे
मीं मांझें भणौनि कैवल्यपाळें : मानिलें नाहीं १०५३

पुरीं पुरस्तेसी अभीमानु : प्रकृती न वीटाळे जगजीवनु
सत्स्वरूपीं रमे आनंदघनु : सदासर्वदा १०५४

---

१ कग. विरुद्धा. २ कग. स्वरुपी. ३ कग. स्पर्शु. ४ ख. न्हवे.
५ ख. कव्हणी. ६ कग. भावना.

तो जगदेस्वरु वांचौनि येकु : जगीं समर्थ नाहीं आणिकु
भणौनि तया नुपजे उल्हेसु : परश्रीसंतापाचा १०५५

तो गर्वाचा देखौनि पथु : चीजें करी[1] कैवल्यनाथु
कां जे नीराभिमान परवस्तु : नीरंतर भणौनि १०५६

ऐसां अर्थी नीराभिमानु : सर्व दोषां नव्हे अधीनु
येन्हवीं आपुल्या लागि जगजीवनु
अभिमानियां सीरोमणीं १०५७

ज्ञानियां भक्तांकारणें : संसारेंसी लागे प्रजणें
तो अनाथां नाथु एणें प्रमाणें : अर्थ परीसावा १०५८

ज्ञानीयां भक्तांचा ठाइं क्रीया घडे : ते आपण अच्युता स्वीकरणें पडे
तेयचें फळ प्रतक्ष रोकडें : अनुभवा ये १०५९

ज्ञानीयां भक्तांचां सुखदुखीं : खेदअल्हाद होए परमपुरुखीं
भजनें प्रेम हननें नीग्यनर्कीं : जीव नीरयापात्र १०६०

भक्तां कीजे मानआदरू : तेणें सुखीया होए सर्वेस्वरू
आपुल्याचा अंगीकारु : करणें लागे १०६१

परमेस्वरु भक्ताचा आत्मा : भणौनि अभीमानु थोरु परब्रंह्मां
तयाकारणें आत्मयारांमां : संसारेसीं प्रजावें लागे १०६२

भक्ताचा कर्मनाथु : संनिधानीं करी परेशू
तो अहीर्नेसीं वीळासु : आनंद भोगी १०६३

तैसाचि ज्ञानीयाचा वहतु : अभिमानु करी अनंतु
पाठीसीं असे संतनु[2] : स्मरण करीतां १०६४

---

१ कख़ग. न करी. २ क. सदंतु. ग. संदंतु.

धर्मवार्ते प्रसंगें : सर्व शक्तीचेनि योगें
आपण वीजें कीजे श्रीरंगें : चैतन्यनाथें १०६५

एसा अनाथालागि श्रीचक्रपाणी : होए अभिमानीयां सीरोमणी
हे वीरुध-धर्म परा वाणी : मीयांचि बोलावें १०६६

जीवा ओखटें घडे ईस्वरीं : परी देओ अभीमानातें न धरी
कां तो कृपाळु वांचौनि ससारीं : सोडवीता नाहीं १०६७

जैसा सन्निपातैलों नवज्वरीं : वैद्य देखीलया आवेसु करी
परी रस देउनी उपचारी : अन्यथा नव्हे १०६८

तैसा नीराभिमानु नीरंतरु : दोखदर्स्या नव्हे ईस्वरु
ज्ञान देउनी श्रीचक्रधरु · उद्धरी जीवजातांतें १०६९

जीवा ईस्वरीं घडे हनन : तें जरी देओ आठवीती आपण
तरी नीत्य-नर्कोंचें अवस्थान : कहीं नव्हे १०७०

भणौनि नीराभिमानु ऐसां अर्थी . करुणे परीसावा कैवल्यपती
आतां अवीक्रीयूं न वीकरे हे श्रूती : सांघैन तुज १०७१

आगाध स्वरूपीं नीरंतरु : नीजानंदीं नाहीं वीकारु
नीजबोधा बोध सचारु . म्हणों नये १०७२

स्वयं सानंदीं सदा रमतां : वीकारु नुपजे कैवल्यनाथा
तया सुखासारिखें मज पांतां : सूख नाहीं १०७३

तया सदासर्वदा अहोर्नेसीं : अभिळाखु नाहीं मानसीं
वीकारें गुणधर्मांसीं : असळगु नव्हे १०७४

---

१ खघ. सान्य'. ख. सन्य'. २ कग. अवन्नियी.

जैसा सविया तेजाथीला तरणी : फेडी अंधकाराची गवसणी
तो दीवयाचेनि प्रकासें दीनमणी : केवि झांकवे १०७५

तैसें आपुलया सुखापासौनि सर्वथा : विखयेवासना नव्हे अन्यथा
ब्रह्मपदा न वीसंबे सर्वकर्ता : सर्वज्ञनाथु १०७६

जया अव्यक्ता अपरांपरां[1] : विकरणें नाहीं नीर्विकारा
तो काम-लोभाचीय पांजरां : कहीं न रीगे १०७७

ऐसा पदार्थु नाहीं वाडु : जें इस्वरेसीं कीजे पाडु
तरी तो कां होइल सचाडु : कवणालागी ? १०७८

तो आसात्रीष्णेचां जळीं : न बुडे कव्हणी[2] काळीं
पुण्यपापाचां मेळीं : घेपवे नां १०७९

जो अदृष्ट अगोचरु : नीत्यानंद परमेस्वरु
तेयापासौनि समर्थु थोरु : आणिकु नाहीं १०८०

भणौनि अव्रक्रीयु हें वचन . मीया नीरुपीलें अती[3] गहन
स्वानंदी[4] वांचौनि अन्यत्र आन : परीसुं नये १०८१

ऐसा न भंगौनि अर्थु : ईस्वर सर्वशक्तीयुक्तु
राणीव करी अनतु : श्रीष्टीमाजी १०८२

तो श्रींगारिया सीरोमणी : पुरवी वीखयेप्रेमियाची आणी[5]
कामकटाक्षाचां पंचबाणीं : हृदय भेदी १०८३

तो सर्वांग-वेल्हाळु सदा सेवितां अती रसाळु
अचीटु न वीटे कैवल्यपाळु : नीत्यानंदु १०८४

---

१ ख. अपरा°. २ क कव्हणे. ग. कवणे. ३ क समती.
४ कग परी°. ५ कग आइणी.

तो वीळासें वी पनू गाभीर्यें गहनु
वरवेपणा देउनि मानु वीरुव वेधीं लावी १०८५

तो लावण्याचें नीधान सुदर्याचें जन्मस्थान
सौभाग्यें व्यापी त्रीभुवन चराचर १०८६

तो गुणें गभिर रुपें नागर
रजें सवीकारू वीखो भोगु जाणे १०८७

तो सगती सुरसु मती-वीळासु
दृष्टीचा डोळेल्हासु जगा लावी १०८८

तो मुखें मनोहरू अवेवीं हातें उदार
देठीयां देवा[1] पागार कैवल्यदाणी १०८९

तो सर्वगुणाचा रासी सौरभ्य न माय दाहीं दीसीं
मानुसें होति प्रेमपीसीं देखतक्षेओ[2] १०९०

तो चातुर्याचा मेर महीमा मना आगोचरू
ज्ञानीया ज्ञानगभिरु चैतन्यनाथु १०९१

तो वीवेकें पुरता भावाचा भोक्ता
कळाकौसल्यें जाणता सर्वज्ञराओ १०९२

तो सर्वसुखाचा सागरू परमानदें परीकरू
वेधबोधाचा वीस्तारू तयापासौनि १०९३

तो नीहाळिता नीचनवा अनुभवीता अती वरवा
सवीया सवुमारु सुहावा सदासर्वदा १०९४

---

१ कखग देटिया दे २ ख खेवो

तो श्रीखयातें देशोदेसीं : आपण आंगें गीवसी
हृदइं रमे अहीर्नेसीं : अखंडित १०९५

जो जांणिवेचा दीनकरु : प्रेमामृताचा पूर्णचंद्रु
वीचारशास्त्राचा कल्पतरु : वीहरे[1] महीमंडळीं १०९६

तो सीद्दाणिवेचा चींतामणी : चींतीलें दे श्रीचक्रपाणी
ब्रह्मवीयेची पुरवी तवणी : आर्त्त जनासीं १०९७

तो परज्ञानें डोळसु : परावरदानी परमहंसु
द्रष्टी[3] दावी मोसु : कैवल्यसुखाचा १०९८

तो ब्रह्मसुखाचा चंदनु : नीववी संसारतप्ताची तनु
ना तरि आदरे ओळे आनंदघनु : आर्त्त जनावरी १०९९

तो प्रेमकळिकेचा सुवासु : अनुचरां अस्वादितां अविनासु
मुनिजनभ्रमरांलागि परेशू : आंगें आकारला ११००

तो साहित्याचा सारथी : जयातें ओळगे ज्ञानभक्ती
मज ब्रोलावया वीत्पती : तयापासौनी ११०१

तो सकळ वीखयांचा बापु : जयापासौनि जन्मला कंदर्पु
तया ब्रवेपणाचा आटोपु : मी सांघों नेणें ११०२

जयाचा महिमा आगाधु थोरु : मज बोलतां पाहे वीचारु
तो स्वयं जाला सविकारु : कृपावसें ११०३

तो परशास्त्राचा बंबाळ दीवा : कृपा उजळीला सदैवां
भणौनि सुलभ जाला सकळ जीवां : सृष्टीमाजी ११०४

---

१ घ. विहिरे. २ क. स्याहा'. ३ कग. दृष्टी. ख. द्रीष्टी.

नीर्वेवे स्वरूपीं अव्यक्तीं : घेणें देणें नाहीं करुणांशक्ती
मुक्ति एक घेउनि एक देती : कृपावसें ११०५

आइकौनि कृपेची वीनती : ईस्वरू जीवधर्म स्वीकरिती
देहधर्मा मान देउनि वर्त्तती : मनुष्यामाजी[1] ११०६

ऐसा हा शृतिनीर्धारू : आपण बोल्लिले चक्रधरू
वीरुधा धर्माचा अंगिकारू : ईस्वरींचि आति ११०७

## ज्ञानियांचे विरुद्धधर्मत्व : शाब्द ज्ञानात

परी एथ नाहीं अभिन्नव नीकें : जया ईस्वरे ज्ञान दीधलें श्रीमुखें
तेही आपण वीरुध धर्मासारिखे : आचरुं जांणती ११०८

जे अच्युता शरण रीगति · देवाचां गुणधर्मीं वर्तती
तया अवक्रीय हे शृती : अनुष्ठावी लागे ११०९

स्त्रीएचेनि नांवें चीत्र वारिलें देवें
इंद्रियार्थ रस न सेवावे · विकारवसें १११०

या वचना मान देउनि : भीक्षु अन्यथा नव्हे मनीं
सकळ पदार्थावरी वीरमौनि : वास न पाहे ११११

रसने रसाची थोरि आवडि भणौनि आधी[2] घालावी बांधौडी
आसात्रीष्णेतें हाणे तोंडी : नीराभिलाखु १११२

सुवासें सुपरीमळें : घ्रणा–इद्रीयें होति सबळें
भणौनि त्याग करवीला कैवल्यपाळें · परमात्मेनि १११३

हातें धरीजे काडी : हे इंद्रियेधर्माची गोडी
भणौनि करावी कोरडी : देहदमनें १११४

१ ख. मनुक्षां. २ ध. अर्धी.

रसाळ शब्द पडे कानीं : तेणें भीक्षु उणा होए साधनीं
भणौनि नीरबाधे[1] स्थानीं : नीजों पाठवीलें १११५

जरी स्त्रीएचें रूप दृष्टी पडे : तरी वीकाराचें फळ लागे रोकडें
भणौनि देवें सेवत्रीलीं झाडें : वनें उपवनें १११६

तेथ दुजयाचा नाहीं योगु : नें[2] घडे[3] गोष्टी करावयाचा प्रसंगु
हृदइं आठवीतां श्रीरंगु : वीकारु नुपजे १११७

जीवां ईश्वरवांचौनि सुहृदु : कव्हणीं नाहीं बापबंधु
केवळवेधें कैवल्यकंदु : प्राप्य होए १११८

ऐसें जगदेश्वरें भक्तवछळें : जीवां साधन वीहिलें कैवल्यपाळें
ते निर्वीकार वीकारावेगळे : सदासर्वदा १११९

कामलोभाचीय कातरी : कहीं न रीगीजे योगेस्वरीं
सुखदुख प्राप्त जालयां परी : वीकरूं नेणती ११२०

ना जरी म्हणुं गर्वाभिमानुं : तरी तयातें हांसे सकळै जनु
परी जीवें सोडिति आनंदघनु : आत्मारामु ११२१

कांमक्रोधाचा गारा : बोलों नये योगेस्वरां
असळग नव्हेति अहंकारा : कव्हणी[4] काळीं ११२२

तया नाहीं आत्मसंभावना : डोइ वोडवीति दुर्जना
मारिता पुजिता सरि या वचना : मानु देती ११२३

रागद्वेखाचा वारा : कहीं न लगे अनुचरा
अहंतेममतेचीयां[5] मोहरा : उभे न ठकेति ११२४

---

१ कखग. नीरा°. २ घ. नावडे. ३ घ. सर्वा°.
४ कखग. कव्हणें. ५ घ. अहंता.

ते डंव्र प्रपंचासरीसे : उठी बैसी नव्हेति पींसे
परश्रीसंतापा मनेंमानसें : आंतळेति नां ११२५

ते सदासर्वदा जगदेस्वरा : वांचौनि अधीन नव्हेति मदमछरा
अहीर्नेसीं आपुलीया आचारा : वेगळे वीसंबति नां ११२६

ते पापपुण्याचां येकासनीं : कहीं न बैसती अन्यकथनीं
सुखदुखाचीया गोष्टी कानीं : आइकों नावडे ११२७

ते नीरंतर अहीर्नेसीं : गोष्टि करीत परव्रह्मेसीं
आत्मा वेचला परमहंसीं : आखंडीत ११२८

तया परमेस्वरुवांचौनि आन : दुर्जे नाहीं सुखसाधन
श्रीचरणीं वीळासलें मन : नीगों न सके ११२९

जे आदिपुरुखाचीये दृष्टीसमोर : अखंड बैसती योगेस्वर
मुर्त्ति नीहाळीतां मनोहर आनंदु प्रकटे ११३०

जे परमात्मयाचे पाळखती : बैसौनि आनदु अस्वादिती
तया आणिकेंसीं परमप्रीती : करुं नावडे ११३१

जे परमपुरुखाचेनि नीरुपणें[1] . मीं माझें वीसरलें अंत.करणें
तया परमानंदवांचौनि घेणेंदेणें · आणिक नांहीं ११३२

जे कैवल्यनाथा श्रीचक्रपाणीं . टाकौनि येती लोटांगणीं
ते आणिकेसीं उघाणीं : काइ करीतील ११३३

## अपरोक्ष ज्ञानात

हे शाव्दज्ञानियांचें वीत्पादन : करुणे अपरोक्षीं असे आन
तें तुजप्रती आदरें नीरुपिन : सवीसेख ११३४

---

१ कग. सन्निधानें.

चैतन्यमुखें करुनि देवतागण : द्रीष्टी न पाहेति ईश्वरपराएण
हें अनुभवेंवांचुनि नीरुती खूण : कहीं नेणिजे ११३५

अपरोक्षीं ब्रह्मादीकांचें सुख : जैसें कडु काळकुट वीख
अष्टभैरवांएउतें सुख : करूं नावडे ११३६

जेहीं सर्वज्ञनाथाचां संनिधानीं : कैवल्यसुख देखिलें लोचनीं
ते शक्तिचक्राचां उद्यानवनीं : काइ रमतील ११३७

जेहीं कैवल्य परब्रह्म नीर्वधी : द्रीष्टीं अवलोकीलें भावबुधी[2]
ते देवताचक्रांची देखौनि मांदी : काइ सुखीय होतील ११३८

जहीं आगाधा स्वरूपापासौनी : आनंदु भोगिला मुनिजनीं
तें अन्यत्रें सुखें द्दष्टी देखौनी : थास न पाहाति ११३९

जेहीं नीजानंदाचां गजस्कंदीं : अरुढ होइजे वर्वीदीं
ते नीउनें[3] सुखावरी बुधी[2] : काइ धरितील ११४०

एस वर्वीदाचें वीसेसनें : मीयां आदरें केलें श्रवण
अच्युताचें स्वरूप आत्मरंमण : तेय वीकारु काइसा ११४१

भणौनि जया ज्ञान दे जगजीवनु : तो भीक्षु नीर्वीकारें नीराभिमानु
मा तो परमेश्वरु आनंदघनु : तेय काइ म्हणावें असे ११४२

ऐसे वीरुधधर्म वीलक्षण : यासि कृपाचि आदिकारण
व्यक्तीं अव्यक्तीं तीयेवीण : व्यापारू नाहीं ११४३

नीरंतर सर्वकाळीं : कृपा असे ईश्वराजवळी
ते स्वरूपापासौनि वेगळी : कहीं नव्हे ११४४

---

१ कग. मुख्य. २ क. बुद्धी. ३ क. निउन्ना. खग. निउना.
४ क. °दाण ख. °खण. ग. विशेषण. ५ कग. नीराकार.
६ कग. स्वयें°. ख. स्वय°. ७ कग. वैश्वा°.

जैसें दाहकत्व आणि वीश्वानरें दोन्ही म्हणता असे वीचार
तैसें कृपा आणि परमेश्वर भीन्न नव्हती ११४५

अथवा वृक्षापासुनि सांउली दुरि न वचे काही केली*
तेवि कृपा असे सचली परब्रह्मेसीं ११४६

ना तरी कस्तुरी आणि सुवासु उभया नित्य सौरसु
तेवि कृपा आणि परमहंसु दो ही नव्हेति ११४७

अथवा स्वस्तता आणि समाधान परीसों नये अन्यत्र आन
तेवि कृपेवाचौनि आनंदघन स्वरूप नाहीं ११४८

जैसी अनुरागु आणि आर्त्ति एकमेकातें न सडीती
तेवि कृपा असे अच्युतीं अखंडीत ११४९

सदा जगदामेयों जगजेठी कृपा असे जवळि नीहीटी[3]
जैसी सुखावेगळी तुष्टीपुष्टी हो न सके ११५०

जो जगदेश्वर जगद्बंधु परावरदानी परमानंदु
तो कृपेवीण कृपासींधु केवि घडे ११५१

कृपेवाचौनि अव्यक्तीं नुपजे लीळाप्रवृत्ती
जैसी बुधीवीर्णे भावोभक्ती बोलों नये ११५२

जेसी आवडीवीण परमप्रीती न दीसे सकळ सीधांतीं
तेवि कृपेवेगळा कैवल्यपती म्हणता वीरुध ११५३

श्रधेवीणें सर्व भुता उतकंठा नाहीं नीहाळीता[६]
तेवि कृपेवाचौनि जगनाथा असणें नाहीं ११५४

---

१ कग वैश्वा॰ * क दुरी नव्हे कव्हणि काळी २ घ दात्मा
३ कग नीहटी ४ क बुद्धि॰ ५ क श्रद्ध॰ ६ ख नेहा॰

जैसें जाणीव आणि परज्ञान : म्हणों नये दुजें भीन्न
तेवि कृपे अच्युता सनिधान : अनादिचें ११५५

**कृपेवेगळा ईश्वर नाही तर तो सर्वातीत कसा ?**

तवं करुणा म्हणे पराशक्ती : तूं प्रमय बोलौनि पुरती
परी नीरुपुं[1] नको स्वयं युक्ती : न वीचारीत ११५६

बोलतां आपणयां आपणां : आपजवे थोर दुषण
वाया कैवल्यनाथु कृपेवीण : नाहीं म्हणसी ११५७

जो आत्मरमणु अनंतु : सदा स्वानंदीं असे रमतु
तेथ कृपेचा पुरुषार्थु : काइ लागे ११५८

कृपेवेगळा कैवल्यपती : नाहीं म्हणसी तुं जांणती
तरी सर्वातीतु हे श्रुती : न घडे म्हणा ११५९

जो सर्वीयां तेजाधीश तरणी : फेडी अंधकाराची गवसणी
सरोवरीं वीकासली कमळणी : होती आनंदभरीता ११६०

तो जरी आंधाराचा सो आवगे : तरी नित्यप्रकाशक हें नांवं भंगे
पद्मिणी उल्हासति जयाचेनि योगें : तें लटकें[2] होए ११६१

तैसें जया रुपाचेनि प्रकाशें : चराचर वीश्व दृष्टी पडीयासे
भ्रांति फेडावया आणिक ऐसें : देखिजे ना ११६२

तुज यथार्थ वांचौनि सर्वथा : वाचे आंन नये बोलतां
तें अपूर्व सांडौनि हें आतां : वाया नीरुपीसी ११६३

जे सरासारवस्तुविचार जाणे : ते जरि बोले शास्त्रबाह्य बोलणें
तरी तीथे वडीलेतें शंकावें कवणें : नव्हे भणौनि ११६४

---

१ कग. निरोपु. २ कग. लटीके.

## परेचे उत्तर : आत्मप्रशंसा

यावरी परा बोलीली थोरे आवेसें : म्हणे करुणे परीस सावधें मानसें
जें मज आपण जाणवीलें परेशें : तें आइक आतां ११६५

जरी अमृतीं नीफजे वीख : कां सुखीं जोडे दुख
तरी अन्यथा होए माझें मुख : नीरुपीतां ११६६

अथवा क्षुधा पीडे अंनें . कां उदका लागे तांहान
तरी मुखें नीगे अन्यथाज्ञान : मज बोलतां ११६७

अग्नीतें पाजळी पाणीं : कीं दोख नीफजे गुणीं
तरी मीयां करावी उघाणी : अन्यशास्त्राची ११६८

मी सहज सकुमार वेल्हाळी : कठीं शब्दरत्नाची येकावळी
मज देवें लेववीलीयां चोळी : साहीत्याची ११६९

मी ब्रम्हवीद्येचा अंसु : ज्ञानभक्तीसी नीत्यसौरसु
मातें स्वीकरी परेशु : जाणती म्हणौनि ११७०

हे सारासारवीवेक वाणी बोलावया मीचि सीहाणी[2]
मजसारिखी दुजी कोन्ही . आतीचि नां ११७१

नासावया अज्ञान : मजवांचौन नाहीं आंन
देओचि जाणे माझें मगण . एर कार सांघों ११७२

अज्ञानतमाचें काळवखें मीचि एकि दवडु सकें
मातें प्रधान करुनी परमपुरुखें . अवतारु धरीला ११७३

आसो हे तुवां मज वगी केली शंका
तेणें अपूर्व भावो स्फुरला नीका
'सर्वानीतु' या वचनाचा आवांका : सांघैन तुज ११७४

---

१ क. अस. २ क स्या' ख से'.

आधी तुझा पक्षु व्यावर्तु[1] : मग बोलुं आपुला अर्थु
तेणेंवीण तत्त्वसीधांतु : नीवडे नां ११७५

जें आत्मत्वें आखंडीतु : चराचरीं असे वर्ततु
तें केवि म्हणावें सर्वातीतु : ईश्वरस्वरूप ? ११७६

जें दयावंत दयापाळक : आनादिसीध उपकारक
जीवदेवतां नाहीं सुख : जेणेंवीण ११७७

जें अहीर्नेसीं सर्वभुतीं : असे सर्वव्यापक सर्वाअर्थी
तें सर्वातीतु हे श्रुती : केवि घडे ११७८

ऐसें परा दीधलें प्रश्नोत्तर : तव करुणेची मति तीक्ष्ण[2] थोर
तया सर्वेंचि अक्षपिलें वेगवतर : शब्दासरिसें ११७९

जें सर्वसुन्य गुणधर्मरहीत : तें केवि बोलावें उपकारभुत
काइ संबोखिसी माझें चीत : हा परिहारु नव्हे ११८०

या आक्षेपासरिसी : परा संतोखली मानसीं
मग अपुर्व भाओ बोले कैसी : तें जाण अवधारीतु ११८१

ऐसया वीरुधा धर्माचीं लक्षणें : मींचि एकी बोलुं जाणें
मजचि पासौनि चतुर सींहाणे : होती ज्ञानीये भक्त ११८२

हें असळग दीसे आइकतां : परी सोपें नव्हे परीसतां
हें तुजप्रति उघड आतां : सांघैन मीं ११८३

जो अनमीतबंधु आर्त्तदांनी : कृपावंतु श्रीचक्रपाणी
तो स्वयं तादात्म्य होए वेसनीं : जीवउद्धरणाचीये ११८४

---

१ कग व्यावृतु. २ क. तीक्षन. खग. तीखण.

जो पींडब्रह्मांडीं सर्वात्मकु : सत्त्वरूपीं नीत्य-व्यापकु
तो सर्वातीतु आदिपुरुखु : कहीं नव्हे ११८५

ऐसी करुणा नीरोत्तर केली : संका अक्षेपीं परीहारिली
मग सखोल शब्द बोलुं लागली : सप्रेमळ ११८६

## ईश्वराचे 'आत्मत्व'—सर्वात्मकत्व

परा म्हणे करुणे सरसे : हे वीरुध धर्म परीसावे ऐसे
व्यक्तीं अव्यक्तीं अनारिसे : सारिखे नव्हेति ११८७

आधीं आत्मत्वा रूप करूं : मग अतीत्वा पाडु धरूं
कां जे श्रुष्टीमध्यें सर्वेश्वरु : व्यापुनि वर्ते ११८८

अच्युताचीया लीळाप्रवृत्ति : चैतन्ये वीसवलें सर्वभुतीं
चरोचरीं[१] परा शक्ती : विस्तारली ११८९

ते सुखदुखीं जीवासरिसी : खेदु-आल्हादीं होय पींसी
लोभापर माये[२] जैसी : अपत्यालागीं ११९०

ते मनोधर्में संततें[३] : जवळी असे अखंडीत
गीवसीलें[४] राहे चीत : मायामोहें ११९१

हे उपपती घडे कैसी : भणौनि मज अक्षेपिसी
तरी घटघटाभिमानी सांदली जैसी : असतचि असे ११९२

ना तरी जन्मोनि होए उदास : तरी सुत्र न संडी मानस
तेवि परमेश्वरु पांति वास : धरीपडौनि ११९३

कां जे माया ईश्वरीचा अंसु : वरि ममता आथिला जगन्निवासु
भणौनि जीव उद्धरावयाचा अभ्यासु : अहीर्नेसीं ११९४

---

१ घ. चराचर. २ घ. माया. ३ कग. सदत. ४ कलग. गव'.

नासौनि जीवाचे सर्व दोख : सपादी अपुलें नीत्य सुख
ते आनंदघनु मोक्षदायक : मूर्ति जगजीवनाची ११९५

तो ममतालु मयार्वंतु . सकळ जीवांतें असे चिंतितु
आपणपें दयार्वे हाचि मनोरथु : सदासर्वदा ११९६

म्हणसी केवि घडे हा शब्दु : तरी तयाचें नांव कृपासींधु
आणि तो जगदात्मा जगद्बंधु : आनंदिचा ११९७

पस्यात पाहारीं कैवल्यपती : सयनासनीं उपवीष्ट होती
जीवांची चींता स्वीकरीती : कृपावसें ११९८

तो कैवल्यदानी जगनांथु : जीवांकारणें जाला व्यक्तु
प्रेम देयावें ऐसा हेतु : असतुचि असे ११९९

जीवां जगदेश्वरूवांचौनि एकु : सोडवीता नाहीं आणिकु
तो अनमीत-बंधु आदिपुरुखु : अनादिसींधु १२००

नसतां सर्वज्ञाचें संन्निधान : जीवां केवि चुके आयागमन
भणौनि आकारलें आनदघन : स्वरूप अच्युताचें १२०१

ऐसा आत्मत्वें आदिनाथु : अंतरीं आठवी अखंडीतु
भणौनि कासवीचा दृष्टांतु : श्रीमुखें नीरोपीला १२०२

कासवी वीये एकी थडी : आणि आपण जाए पैलाडी[2]
परी मनोधर्मु न सडी : ममता पीलयाची[3] १२०३

तेयौनि तयां बाळकांतें : अंतरीं आठवी स्नेहाळुवें चीत्तें
तेणें अमृतजीवन संचरे नीरुतें : मग वाढों लागती १२०४

---

१ घ. माया°. २ ग पैली थडी. ३ क. पीली°. ग. पीले°.

तैसें दुख भोगिता जया जीवा चैतन्या होय वीसावा
जें देओ आठवी सुहावा स्नेहें झळवौनि १२०५

नातरि येका सचरे वेधु तेणें प्रकटे परमानदु
ऐसा तो कैवल्यकदु आत्मव्यें वर्ते १२०६

हा पहील पक्षु ऐसा आणिक साधैन आनारिसा
जेणें सतोखु होए मानसा महताचेया १२०७

पाडुव यावया दोसें परमेश्वरु सर्व भुतीं असे
जेवि जळीं प्रतीबींबला दीसे उदयभास्करु १२०८

देखुनि उदकाचें निर्मळपण माजि प्रतीभासलें दीसे रवीबींब
तें डहुळलया होय वील्क्षण हारपौनि जाय १२०९

तैसा जीउ नित्य केवळ वस्तु भणौनि आत्मत्र करी कैवल्यनाथु
परगुणीं[1] तादात्म होय बहुत अहीर्नेसीं १२१०

देखौनि गुणाचें अनुसधान तेथ आदरें होय अवस्थान
मग आपुलें देउनि साधन सुखा पात्र करीती १२११

तयाचे मानाभिमान देओ स्वीकरीति आपण
हेंचि नीरुतें परीस ल्क्षण आत्मत्राचें १२१२

आता अव्यक्ते स्वरूपीं नीराकारीं आत्मत्व साधैन आणिकी परी
तें करणे परीस अभ्यंतरीं सावध होउनिया १२१३

जीवा चैतन्यस्वरूपीं असता नाही परमानदाची स्वस्तता
भणौनि प्रवृत्ति उपनली[2] कैवल्यनाथा शृष्टिरचावयाची १२१४

---

१ क ग परी २ ग उपनली

अच्युताची लीळा-प्रवृत्ति : चैतन्य वोळगे व्यापारती
मग श्रुष्टी रची आधाराचती : अनंतें ब्रह्मांडें १२१५

तमीं नीद्रिस्तां जीवांतें : माया सावध करी द्रीष्टीपातें
मग महं म्हणवी चैतन्यातें : वीकरौनियां १२१६

ते तेणेंसींचि उठीती : चैतन्यातें मीं म्हणती
मग मळु लागे ईश्वरप्रवृत्ती : अविद्यात्मकासी १२१७

ऐसें जीव माया शृजीलें : कारण कार्यासि आंणिलें
मग तेहीं आणिक मळ घेतले : आपणयां आपण १२१८

तयाचा ठाइं आधीचि अधमती : वरी माया दीधली सामर्थ्ये-सपती
भणौनि सुक्षमां प्रपंचातें रचीती : तेणें बळें १२१९

अन्यथा-ज्ञानें नव्हतें लटीकें : सकळ प्रपंचातें रचुं सके
विस्वरूप मुक्ष करुनि असेकें : मी माझें म्हणे १२२०

पांचे भूतें तीन्हीं गुण : हेंचि अष्टधा प्रकृतीचें लक्षण
तयामाजि रीगौनि आपण : तादात्म होए १२२१

घेउनि लटकेयाचा[1] अभिमानु : जे आनातें म्हणे आनु
हा मुख्य परिसावा गुणु : अधगतीचा १२२२

जीव सप्त धातु पाचै भूतें : तन्वीं मेळवी अज्ञानपयें
सुक्षम प्रपंच भणे यातें : सतिसा मीळौनि १२२३

आणीकही अनेग अन्यत्र · जीउ रची प्रपंच क्षेत्र
तें नीरुतें वोळखावें सुत्र : अधगतीचें १२२४

ऐसें सकळ प्रपंच घेत : आला मनुस्ये[2] मळां आंतु
मग वीस्वेचीया स्थुळांचीं वास पांतु : सांडमा नीगाला १२२५

---

१ कग. लटिके'. २ ख. मनुक्ष.

पाठीं अनुक्रमें तेही[1] नीर्वाळिलें[2] : जोडिलीं चतुर्विधें कर्मफळें
यापरी मृतीकापर्यंत मैळे : श्रीष्टीमध्यें १२२६

सकळ फळांमध्यें उच नीउनें[3] : चैतन्य मृतीकावांचौनि नाहीं आन
हें उजळलें मैळलें स्थान : सेवटपर्यंत १२२७

स्वर्ग नर्क कर्मभुमी मोक्षु : हा चतुर्वीधाचा वीसेखु
आसो हे अव्यक्तीं[4] उपजे उल्लेखु
अवतारू धरावयाचा १२२८

तो जीवांकारणें जगनिवासु : सविया लोभापर लोंवसु
म्हणौनि शृष्टीमध्यें परमहसु : अवतरे मनुस्यवेखें १२२९

तो मायापुरातें स्वीकरूनी : स्वयं ज्ञानशक्तीतें मानी
मग बीजें करी कैवल्यदानी : कर्मभुमींसी १२३०

तेथ मनुस्यदेहायुक्तां जीवां : उजळी ज्ञानाचा बवाळदीवा
आत्मत्वें जाणवी प्रभु सुहावा : आपुलें साध्यसाधन १२३१

मग कृपा झळेवौनि चराचरीं चहुं दानाचें आवारू करी
तो एकुवाचौनि ससारीं · सुहृद नाहीं १२३२

तयासि उद्धरावयाचें वेसन : म्हणौनि नीरोपी ब्रह्मवीद्या परज्ञान
तें सांडौनि[5] जीव सेविती आन · विखयवीख १२३३

जीव आनादिचे अधोमुख : तेजिती ब्रह्मवीद्यापीयूख
म्हणौनि न चुके भवदुख : यातायात १२३४

सांडौनि ईस्वरदास्य उत्तम : आदरें अपात्रा देति जन्म
म्हणौनि दुखीं घालिजति अधम : कर्मचांडाळ १२३५

---

१ क. तोही. २ क. नीर्वाळोला. ३ कग. उच'. ४ घ. व्यक्ती.
५ ख. सोडौनि.

तो जरि नव्हता प्रदयापाळकू तरि फळीं कैचा सुखरीसेखु
सामर्थ्य देयारया आणिकु दुजा नाहीं १२४६

जीवाचेनि ससर्गें देवताचा आनदु भगे
तो पुरा कीजे श्रीरगें सर्वात्मेनि १२४७

आनद ऐश्वर्य[1] प्रकाशू हा अच्युताचा अशु
म्हणौनि आत्मत्व करी परेशू शक्तिचक्रासीं १२४८

सुख सामर्थ्ये ज्ञान हें ईश्वरीचें अनुसधान
म्हणौनि आत्मत्वें आनदघन स्वरूप गेतें १२४९

तो जगदेश्वर जगदात्मा अभयदान दे भूतग्रामा
आत्मत्व न भगे पुरुषोत्तमा परमानदाचें १२५०

तो व्यक्तीं अव्यक्तीं विश्वनाथु विश्वपती
विश्वात्मकु आदिअतीं अनादिसीधु १२५१

ऐसें आत्मत्वाचें वीत्पादन परा बोल्लिी गहन
तें करूणा आइकिलें अवधान देउनिया १२५२

### ईश्वराचे सर्वातीतत्व

आता साधैन अतीत्वाचा भेदु सर्वानिराळा कैवल्यकदु
दुखीं तादात्म नव्हे कृपासींधु आत्मत्व भगों नेदी १२५३

जीवा एकमेकाचीये भेटी क्रीया घडे वोखटी
परी ईश्वराची दृष्टी गुणीं झळवे १२५४

माहापापाचीया आडी जीउ क्षेणामाजि जोडी
ते जन्माचा लक्षकोडी नीस्तरों न सरे १२५५

---

१ खघ ईश्वय

घडलेयां आत्महनन : तरी तया नाही कव्हणी स्थानें
परि अनारिसें नव्हे आनंदघन : स्वरूप अच्युताचें १२५६

तो कृपाळु जगदेस्वरु : गुणीं तादात्म होय थोरू
दोखांचा पाडी वीसरु : स्नेहें[2] झळंवौनि १२५७

जैसें वाळक अन्याओ करी : तो माता सांटवी उदरीं
वर्मस्परिसें बाहीरि : घालुं नेणे १२५८

तयाचें ओखटें नेघौनि : हितीं प्रवर्ते जननी
आउक्ष होआवें ऐसें मनीं : चींता करी १२५९

ते सविया स्नेहाळु माउली : आपत्याचें गुज बाहीर न घली
अनुचीत उपसाहे झळंबली : सहे मायामोहें १२६०

तैसा जगदात्मा जगदेस्वरु : जीवांकारणे लोभापरु
चींतु नेणे ओखटें वीरु : कव्हणी काळीं १२६१

तया जगदात्मयाचां उदरीं : स्नेहाग्नी वसे नीरंतरी
म्हणौनि दोख पडती आहारीं : अनंता जीवाचे १२६२

जीव जीवांचे दोख सांगती : परि कानीं नेघे कैवल्यपती
जो अहीर्नेसी असे सर्वभुतीं : तेय नेणिव काइसी १२६३

परी तेयिचा ऐसा स्वभाओ : जे दोखां नातळे सर्वज्ञराओ
स्नेहें[3] झळंवौनि घाली घावो : आरीयेसी १२६४

जीउ असंता कर्मी अळंकृतु : आणि ईस्वर सर्वदोखां अनीतु
म्हणौनि हीता प्रवर्ते जगंनाथु : ओखटें वीसरौनि १२६५

---

१ ध. सापन २ गय स्नेह. ३ ध. स्नेह.

जीउ सर्व दोखांचें आळें : सुखा पात्र केला कैवल्यपाळें
ओखटें आचरतीय वेळे : देओ परते सरती १२७७

जीवाची ओखटी वासना : परि दोख नये जगजीवना
कां सर्वातीतु या वचना : गानु देती १२७८

हा अतीत्वाचा पुर्वपक्षु : दुसरा असे आणिकु
तो सांघेन सवीसेखु : विस्तारुनि १२७९

## सर्वातीतत्वाचा दुसरा पक्ष

जीउ असंत कर्मे आर्जीती : आणि देवता होए फळदाती
तें दुख भोगितां अच्युतीं : कैसें वर्ते १२८०

जो आत्मत्वें आदिनाथु : सर्व भुतीं असे वर्त्तुतु
तो दुख भोगितां सर्वातीतु : केवि म्हणावा १२८१

ऐसें संका अक्षेपीं नीर्वचन : मज बोलतां न लगे मान
कैसा दुसरा अर्थु सांघेन : तो आइक आतां १२८२

जो परमात्मा परमानंदु : दुखावेगळा सुधबुधु
उपडी अनादिअवीद्येचा कंदु : तया दुख काइसें[1] १२८३

जीव देवतांचा दुखभोगु : नासावया तोचि चांगु
तेथ निरयाचा योगु : बोलों नये १२८४

जो चराचरा आंधारु : फेडुं सके दीनकरु
तो अप्रकाशकु म्हणतां वीचारु : अज्ञान होए १२८५

नातरी अग्नी वायें पीडे : कां पुण्यीं दोख जोडे
तरी ईश्वरा होए सांकडें : नीरये चुकावेयाचें[2] १२८६

---

१ कग. कंचे. २ क. चुकवावेयाचें.

तुं म्हणसी करुणाशक्ती · केवि घडे हे उपपती
तरी श्रीमुखें नीरपीली श्रुती : श्रीचक्रधरें १२६६

जीव अवीद्यायुक्त अधोमुख   नीत्य नीरानंदु नाहीं सुख
तयाचा ठाइं असती दोख   अनादिचे १२६७

तया दोखाचेनि योगें   जीउ नीरयामाजि रीगे
येरझारा करीता नुबगे   अधोमुख १२६८

परि कृपावसें ईश्वरें   दोख नासौनि करुणाकरें
येक पात्र केले दातारें   आपुलीया सुखासी १२६९

देवता अनादिचीया नीत्यबंधा   पात्र नव्हेति परमानंदा
दोख नासिता कैवल्यकंदा   नासेचि ना १२७०

जेवि कृष्णवर्ण कोळिसा   दुधें धुतलेया न हे अनारिसा
तेवि देवता अविनासा   दोखावेगळीया नव्हेति १२७१

तयाचा ठाइं सामर्थ्य असे   तें सीधी नेइजे जगन्निवासें
क्षुद्रानंद दयावशा दोसें   माजि अवतरती १२७२

ईश्वरु अनादिसीध नीत्यमुक्तु   सदासर्वदा दोखा अतीतु
अहर्नेसीं गुणभरीतु   विश्वा मा १२७३

जीवाचा स्वरूपीं निरंतरीं   सतसीध्य दोनि सामग्री
वाढवीलेया वाढति चराचरीं   चेतन्यमूर्तीकापर्यंत १२७४

जैसी नेत्रीं द्रीष्टी सोहजळ   ते देखे रत्नाचे कीळ
तैसी सतसामग्री नीर्मळ   जीवीं परीसावी १२७५

ऐसीं सत असत दोन्ही   देओ जाणे श्रीचक्रपाणी
परी दोखु विसरौनि गुणीं   तादात्म होय १२७६

जीउ सर्व दोखांचें आळें : सुखा पात्र केला कैवल्यपाळें
ओखटें आचरतीय वेळे : देओ परते सरती १२७७

जीवाची ओखटी वासना : परि दोख नये जगजीवना
कां सर्वातीतु या वचना : मानु देती १२७८

ह्य अतीत्वाचा पुर्वपक्षु : दुसरा असे आणिकु
तो सांघेन सवीसेखु : विस्तारुनि . १२७९

## सर्वातीतत्वाचा दुसरा पक्ष

जीउ असंत कर्मे आर्जीती : आणि देवता होए फळदाती
तें दुख भोगितां अच्युतीं : कैसें वर्ते १२८०

जो आत्मत्वें आदिनाथु : सर्व भुतीं असे वर्त्तुतु
तो दुख भोगितां सर्वातीतु : केवि म्हणावा १२८१

ऐसें संका अक्षेपीं नीर्वचन : मज बोलतां न लगे मान
कैसा दुसरा अर्थु सांघेन : तो आइक आतां १२८२

जो परमांनंदु : दुखावेगळा सुधबुधु
उपडी अनादिअवीद्येचा कंदु : तया दुख काइसें[1] १२८३

जीव देवतांचा दुखभोगु : नासावया तोचि चांगु
तेथ निरयाचा योगु : बोलों नये १२८४

जो चराचरा आंधारु : फेडुं सके दीनकरु
तो अप्रकाशकु म्हणतां वीचारु : अज्ञान होए १२८५

नातरी अग्नी वायें पीडे : कां पुष्पीं दोख जोडे
तरी ईश्वरा होए सांकडें : नीरये चुकावेयाचें[2] १२८६

---

१ का. कंचे. २ क. चुकवावेयाचे.

अथवा परज्ञान होउनि आंधळें : जरी इतर विद्येतें मागे डोळे
तरी सर्वाचेया दुखभोगा मीळे : ईस्वरस्वरूपें १२८७

ना तरी चंद्रा सुटे धडाडी : कां अमृत आसंसी गोडी
तरी अच्युता घडे सांकडी : दुख नासावयाची १२८८

जैसें ब्रह्मवीचेचीये दृष्टीपुढें : इतरज्ञान उभें न ऱ्हायें बापुडें[3]
तैसें ईस्वराजवळि कव्हणि कडें : दुखा रीगावा नाहीं १२८९

तो जगदात्मा जगंनाथु : भूतीं असौनि सर्वातीतु
जेवि घटीं पटीयासे कळावंतु : गगनीहुनी १२९०

चंद्र आकाशीं असे : तो सर्व घटीं प्रतीबींबला दीसे
घट फोडीलया नासे : परी चंद्र जैसा तैसाचि १२९१

ऐसा स्वरूपींहुनि सर्वात्मकु : परीसावा परमपुरुखु
जेवि घटीं असौनि शशांकु : सुखदुखीं घेपवे ना १२९२

तैसें परब्रह्म परीपुर्ण : सर्वभुतीं असे सनातन
सुखदुखा नातळे आपण : अलीप्त अनादिचें १२९३

ऐसा अतीत्वाचा अर्थु : करुणे परीस नीभ्रांतु
आणिकु असे सीधांतु : तो ही सांघैन १२९४

### ते अतीत्व सांघेन आता

तुझी देखौनि आर्ति : मज आगळी एताय स्फूर्ति
भणौनि परब्रम्हाची कीर्ती[४] · आदरें नीरोपिन १२९५

ऐसें अक्षेप-परिहारीं नीरुपण : मजवांचौनि करी[५] कवण
ऱ्यांचि बोलावें सीधांतलक्षण · ईस्वरप्रसादें १२९६

---

१ क. 'स्वरूपी. २ कग. राहे. ३ घ. सावडे. ४ कख़ग नीज' ५ घ. करवी.

प्रेमा[1] आगळिया भक्तीं : परीस परदैवाची वीत्पती
मज बोलतां करुणाशक्ती : आनंदु प्रकटे १२९७

ऐसें परा कारुण्यातें म्हणे : परिस सावधें अंतःकरणें
तुज सांधैन नीजवर्णे : नीजस्वरूपीचें १२९८

वाखाणितां कैवल्यपती : नीन्हां होए नीर्मळ मती
तो परमानंदु परमप्रीती : आदरें आइक्तु १२९९

जो परमपुरुखु परमात्मा : सदा वेगळा सर्वधर्मा
तें अतीत्व सांधैन परब्रह्मां : परदैवांचें १३००

जो आगाधे स्वरूपीं आपण : नीरंतर स्वानंदीं करी रमण
तेथ गुणधर्मांचें कार्येकारण : बोलों नए १३०१

जो आत्मरांमु आनंदभरितु : सत्स्वरूपीं स्वयं नीत्यमुक्तु
तया सुखाचा न टके प्रांतु : शक्तिचक्रासी १३०२

जो अवक्रीयू आगाधु : अप्रमयु अनादिसीधु
नीरोपमु नीजानंदु : नीजस्वरुपीं १३०३

जो सर्वसून्य साक्षभुतु : स्वछंदलीळ सर्वेशशायु
परंमानंदु[2] सदोदीतु : सदासर्वदा १३०४

जो सुखी रंमतां सुधबुधु : सर्वातीतु कैवल्यकंदु
सर्वात्मकु हा श्रुतिवीरोधु : ऐसा असे १३०५

ऐसें अतीत्व आत्मत्वें[3] दोन्ही : मीयां बोलिली सप्रेमळा वचनीं[4]
जया निरुपणाची सीरीयाणी : शक्तिचक्रासी १३०६

हा सारोधार परब्रंह्मांचा : सीधांतु परशास्त्राचा
मीयां बोलिला परा वाचा : ईश्वरकृपेतव १३०७

---

१ घ. प्रेमें. २ सग. 'नंदें. ३ क. 'त्व. ४ कसग. वाणी.

अथवा परज्ञान होउनि आंधळें : जरी इतर विधेतें मागे डोळे
तरी सर्वाचेया दुखभोगा मीळे : ईश्वरस्वरूपें १२८७

ना तरी चंद्रा सुटे धडाडी : कां अमृत आसंसी गोडी
तरी अच्युता घडे सांकडी : दुख नासावयाची १२८८

जैसें ब्रह्मवीचेचीये दृष्टीपुढें : इतरज्ञान उमें न न्हायें वापुडें[3]
तैसें ईश्वराजवळि कव्हणि कडें : दुखा रीगावा नाहीं १२८९

तो जगदात्मा जगंनाथु : भूतीं असौनि सर्वातीतु
जेवि घटीं पटीयासें कळावंतु : गगनीहुनी १२९०

चंद्र आकाशीं असे : तो सर्व घटीं प्रतीबींबला दीसे
घट फोडीलया नासे : परी चंद्र जैसा तैसाचि १२९१

ऐसा स्वरूपींहुनि सर्वात्मकु : परीसावा परमपुरुखु
जेवि घटीं असौनि शशांकु : सुखदुखीं घेपवे ना १२९२

तैमें परब्रह्म परीपुर्ण : सर्वभुतीं असे सनातन
सुखदुखा नातळे आपण : अलीप्त अनादिचें १२९३

ऐसा अतीत्वाचा अर्थु : करुणे परीस नीभ्रांतु
आणिकु असे सीधांतु : तो ही सांघेन १२९४

### ते अतीत्व सांघेन आता

तुह्मी देखौनि आर्ति : मज आगळी एताय स्फूर्ति
भणौनि परब्रम्हाची कीर्ती[4] : आदरें नीरोपिन १२९५

ऐसें अक्षेप-परिहारीं नीरुपण : मजवांचौनि करी[5] कवण
म्यांचि बोलावें सीधांतलक्षण : ईश्वरप्रसादें १२९६

---

१ क. 'स्वरूपीं. २ कग. राहे. ३ घ. साबडें. ४ कखग. नीज' ५ घ. करवी.

प्रेमा[1] *आगळिया भक्तीं : परीस परदैवाची वीत्पती*
मज बोलतां करुणाशक्ती : आनंदु प्रकटे १२९७

ऐसें परा कारुण्यातें म्हणे : परिस सावधें अंतःकरणें
तुज सांघैन नीजवर्णे : नीजस्वरूपीचें १२९८

वाखाणितां कैवल्यपती : नीन्हां होए नीर्मळ मती
तो परमानंदु परमप्रीती : आदरे आइकतु १२९९

जो परमपुरुखु परमात्मा : सदा वेगळा सर्वधर्मा
तें अतीत्व सांघैन परब्रह्मां : परदैवांचें १३००

जो आगाधे स्वरूपीं आपण : नीरंतर स्वानंदीं करी रमण
*तेथ गुणधर्माचें कार्येकारण : बोलों नए* १३०१

जो आत्मरामु आनंदभरितु : सस्वरूपीं स्वयं नीत्यमुक्तु
तया सुखाचा न टके प्रांतु : शक्तिचक्रासी १३०२

जो अवक्रीयू आगाधु : अप्रमयु अनादिसीधु
नीरोपमु नीजानंदु : नीजस्वरुपीं १३०३

जो सर्वसून्य साक्षभुतु : स्वछंदलीळ सर्वज्ञज्ञाधु
परंमानंदु[2] सदोदीतु : सदासर्वदा १३०४

जो सुखी रंमतां सुधबुधु : सर्वातीतु कैवल्यकंदु
सर्वात्मकु हा श्रुतिशीरोधु : ऐसा असे १३०५

ऐसें अतील आरमत्वें[3] दोन्हीं : मीयां बोलिली सप्रेमळा वचनीं[4]
जया निरुपणाची सीरीयाणी : शक्तिचक्रासी १३०६

हा सारोधार परब्रह्मांचा : सीधांतु परशास्त्राचा
*मीयां बोलिला परा वाचा : ईस्वरक्रेपेतव* १३०७

---

१ घ. प्रेमें. २ खग. 'नदें. ३ क. 'त्व. ४ कखग. वाणी.

अथवा परज्ञान होउनि आंधळें : जरी इतर विघेतें मागे डोळे
तरी सर्वांचेया दुखभोगा मीळे : ईश्वरस्वरूपें १२८७

ना तरी चंद्रा सुटे धडाडी : कां अमृत आसंसी गोडी
तरी अच्युता घडे सांकडी : दुख नासावयाची १२८८

जैसें ब्रह्मवीचेचीये दृष्टीपुढें : इतरज्ञान उभें न ऱ्हायें वापुडें[3]
तैसें ईश्वराजवळि कव्हणि कडे : दुखा रीगावा नाहीं १२८९

तो जगदात्मा जगनाथु : भूतीं असौनि सर्वातीतु
जेवि घटीं पढीयासे कळावंतु : गगनीहुनी १२९०

चंद्र आकाशीं असे : तो सर्व घटीं प्रतीबींबला दीसे
घट फोडीलया नासे : परी चंद्र जैसा तैसाचि १२९१

ऐसा स्वरूपींहुनि सर्वात्मकु : परीसावा परमपुरुखु
जेवि घटीं असौनि शशांकु : सुखदुखीं घेपवे ना १२९२

तैसें परब्रह्म परीपुर्ण : सर्वभुतीं असे सनातन
सुखदुखा नातळे आपण अलीप्त अनादिचें १२९३

ऐसा अतीत्वाचा अर्थु : करुणे परीस नीभ्रांतु
आणिकु असे सीधांतु . तो ही सांघेन १२९४

## ते अतीत्व सांघेन आता

तुझी देखौनि आर्ति : मज आगळी एताय स्फूर्ति
भणौनि परब्रम्हाची कीर्ती[4] आदरे नीरोपिन १२९५

ऐसें अक्षेप-परिहारीं नीरुपण मजवांचौनि करी[5] कवण
म्यांचि बोलवें सीधातलक्षण : ईश्वरप्रसादें १२९६

---

१ क. 'स्वरूपी. २ कग. राहे. ३ घ. सावडें. ४ कखग. नीज' ५ घ. करवी.

प्रेमा[1] आगळिया भक्तीं : परीस परदैवाची वीत्पती
मज बोलतां करुणाशक्ती : आनंदु प्रकटे १२९७

ऐसें परा कारुण्यातें म्हणे : परिस सावधें अंतःकरणें
तुज सांघैन नीजवर्णे : नीजस्वरूपीचें १२९८

वाखाणितां कैवल्यपती : नीऱ्हां होए नीर्मळ मती
तो परमांनंदु परमप्रीती : आदरें आइकतु १२९९

जो परमपुरुखु परमात्मा : सदा वेगळा सर्वधर्मा
तें अतीत्व सांघैन परब्रह्मा : परदैवांचें १३००

जो आगाधे स्वरूपीं आपण : नीरंतर स्वानंदीं करी रमण
तेथ गुणधर्मांचें कार्येकारण : बोलों नए १३०१

जो आत्मरांमु आनंदभरितु : सस्वरूपीं स्वयं नीत्यमुक्तु
तया सुखाचा न टके प्रांतु : शक्तिचक्रासी १३०२

जो अवक्रीयू आगाधु : अप्रमयु अनादिसीधु
नीरोपमु नीजांनंदु : नीजस्वरुपीं १३०३

जो सर्वसून्य साक्षभुतु : स्वछंदलीळ सर्वज्ञज्ञातु
परमानंदु[2] सदोदीतु : सदासर्वदा १३०४

जो सुखी रंमतां सुधबुधु : सर्वातीतु कैवल्यकंदु
सर्वात्मकु ह्या श्रुतिवीरोधु : ऐसा असे १३०५

ऐसें अतीत्व आत्मत्वें[3] दोन्हीं : मीयां बोलिली सप्रेमळा वचनीं[4]
जया निरुपणाची सीरीयाणी : शक्तिचक्रासी १३०६

ह्या सारोधार परब्रह्मांचा : सीधांतु परशास्त्राचा
मीयां बोलिला परा याचा : ईश्वरकृपेतव १३०७

---

१ घ. प्रेमें. २ खग. 'नदें. ३ क. 'त्व. ४ कखग. वाणी.

## 'व्यापकत्वा'ची वीत्पती

आतां करुणे तुजप्रती : बोलैन व्यापकत्वाची वीत्पती
ते परीसावी प्रचुरा मती : नीकीया परी १३०८

अवधारीं अपुर्व भाव सखोल :
जेणें आइकतां आनंदु होय दोंदीलु
तो वोडउ वोडवीन नवलु : परज्ञानाचा १३०९

सर्व भुतीं नीजांसें . परमेश्वरू व्यापकत्वें असे
जेवि दीनकरु प्रकासे : चराचरीं १३१०

विस्तीर्णे गगनपंथीं[1] : सुर्यो अरुढ होय रथिं
तो व्यापुनि वर्ते त्रीजगती : जीउमात्रातें १३११

तो चाउरी घाली आकासीं : कीर्णें फांकती दाही दीसीं
पींडब्रह्मांडीं तेजोरासी : आखंड असे १३१२

तया प्रकाश-मंडपातळीं : वीश्व सामावलें सर्व काळीं
तो बाह्यअभ्यतरीं जगाजवळी : सदा असे १३१३

जळस्थळ काष्टपाखाण . तो व्यापुनि वर्त्ते त्रीभुवन
देही असे सनातन : अहर्नेसीं १३१४

हें सांघतां सवीस्तारें : कथा चालैल पसरें
तर्‍हि बोलावें लागे अती आदरें : अर्थु साधावया १३१५

जो अदृश्यमान अचळु : समुद्रीं असे वडवानळु
तो नीजांसें सुर्यो सबळु : जळीं परीसावा १३१६

---

१ कखग. 'पर्वती.

पुनीवेचेनि कल्यांतें : समुद्रा आगळे चढे भरितें
वडवानळु सोली तयातें : नीमीग्यमात्रें १३१७

अथवा जीवनचि व्यापकत्वें : साखापालवीं धांवें
मग फुलीं पत्रीं आथवें : तेंचि होए १३१८

वृक्षामुळीं[1] जळ सांपडे : तें सेंडया जाय कोडें
वाह्यअभ्यंतरीं सुरवाडें : वीसंवलें राहे १३१९

यापरी फळीं फळासारिखें : सर्वरसा मीळीजें उदकें
गोडीसें मधुर कवतीकें : आपणचि जालें १३२०

तें काळें गोरें सांवळें : हरीत पीत स्वेत नीळें
मंजीष्ट वर्णी मीळे : साजात्यें होए १३२१

तें तीखें खार कडवट : मधुरांविल तुरट
रसनेसीं घेतां चविनटें : नीवाडु होए १३२२

तैसें परमेस्वरु सर्वव्यापकु : नेणे अज्ञान कर्मजड लोकु
तें जगीं जाणावया समर्थु एकु : ईश्वरपरायणुचि होए १३२३

देहीं आसौनि जठराग्नि : अन्न असंसी भोजनीं
तो परिसावा दीनमणी : अंतमात्रें १३२४

भीतरि क्षुधापीपासा लागे : तें दीनकरु आपुलें कार्य सांघे
तैसें अच्युताचेनि योगें : जीवां पातृत्व ए १३२५

अथवा वायो असे चराचरीं : तो देहामाजि क्रीडा करी
क्रीडी नीहाळितां कवणी परी : गोचरु नव्हे १३२६

---

१ का. 'तळीं. २ क. तीखट. ख. तीगर. ३ क. चिनट.

तो प्रपंचीं आसौनि नीराभिमानु : आश्रो कहीं न धरी प्राणु
तैसा सर्व भुतीं जगजीवनु : सदा असे १३२७

तो आदिपुरुखु आदिनाथु : चराचरीं वर्त्ततु
सस्वरुपीं असे नीवांतु : सर्व व्यापुनी १३२८

ना तरी नीन्हां नीर्गुण : होति जड पाखाण
तेथ खीरायाची खुण : साधैन आतां १३२९

पाखाणा लोखंड लागे : तेणें अग्नीची तीडीकी नीगे
तें व्यापकत्व[1] एकें अंगें : परीसावें खीरायाचें १३३०

अथवा लोहाचीये मीळणी : एकमेकां कीजे हाणाहाणी
तेथ उद्भमे वन्ही : दहकत्वेंसीं १३३१

नातरी नीजांसें गभस्ती : नेत्रीं करी वस्ती
चराचरीं मुख्य देखणी शक्ती : ते खीरायाची १३३२

ते असंत-सामग्रीयेपासौनि नीगे :
तरि जीवा प्राश्चित दीजे ज्ञानगंगे
मग कैवल्यरत्न देखों लागे : अखंडीत १३३३

अथवा काष्टामाजि सर्वत्रु : व्यापुनि वर्त्ते वीश्वानरु
तो परीसावा दीनकरु . एकें अंशें १३३४

तो अहर्नेसीं असे आंतु : परी प्रतक्ष नव्हे प्रस्तुतु
मथन केलया दृष्टीभूतु : गोचरु होए १३३५

तो डोळां दीसे असळगु : परी न करी कव्हणाचा पांगु
ब्रम्हांडीं आसौनि नीलागु ' सीओं[3] नए १३३६

---

१ खगघ. 'कत्वे. २ कग वेंरवा'. ३ क. असो.

तो उपकारभुतु जीवासीं : संबंधें घातल्लेस्में नासी
भजनें पाकनीस्पती एकांसी : अद्दीष्ट जोडे १३३७

तैसा अव्यक्त आगोचरु : सर्वभुतीं सर्वेस्वरु
व्यापुनि असे नीरंतरू : सुक्षमरूपें १३३८

तेथ अहेतुक घडे भजन · तें ज्ञानासि प्रतीसाधन
मग देखावया कैवल्यनीधान : जीउ पात्र होए १३३९

अथवा आर्चन घडे मायापुरीं : तेणें जीउ होए प्रेमा अधीकारी
मग आनंदु भोगी नीरंतरी : कैवल्यस्वरुपीं १३४०

ऐसें व्यापकत्वाचें लक्षण : ज्ञानप्रेमासि हेंचि कारण
सकळ क्रीयाचा ठाइं·आपण : ईस्वरू आदि होती १३४१

हें सर्वधर्मीचें बीज : साध्यसाधनाचें गुज
मियां नीरोपिलें नीज : परसुखाचें १३४२

ऐसें ऐकें पक्षें वचन : परी सीधात असे आन
तो तुजप्रति नीरूपीन : वीसेखेंसीं १३४३

## नीत्यव्यापकु परमेश्वरु

जो निर्वेन्न निराकारु : नीत्यव्यापकु परमेश्वरु
तो सुहावा शब्दीं सारोधारु : साधैन आतां १३४४

प्रपंचु लटीका नासिवतु : जीव देवता ईस्वरू नीत्य पदार्थु
या तीहींतें व्यापुनि असे अनंतु : आगाधे स्वरूपीं १३४५

आनंद ऐश्वर्य प्रकासें : सुख सामर्थ्यें ज्ञानें नीजांसें
सर्व व्यापिलें जगन्निवासें : नीत्यव्यापकें १३४६

ऐसा वीश्वव्यापकु वीश्वपती : वीश्वात्मा सर्व भूतीं
सर्वातीत हे त्रीवीध प्रतीती : ऐसी असे १३४७

## ज्ञानियांचे आत्मत्व

परी एथ नाहीं नवल : जया ईश्वरें ज्ञान दीधलें केवळ
तें आत्मत्वें ह्र्‌दें ए नीर्मळ : भूतमात्रेंसीं १३४८

मुंगीये वीरु न चींतावें : हें वचनु वीहीलें देवें
म्हणौनि आत्मत्व लागे करावें : सर्वभुतीं १३४९

प्रपंचापासुनि प्रमाणु : करुं नये वेगळा भीन्नु
ज्ञानीया ईश्वरा अधीनु : होउनि वर्त्ते १३५०

जडांची न भंगी आकृती आओ : चेतनावरी नेदी पाओ
ऐसा सर्वभुतीं योगीराओ : आत्मत्व करी १३५१

या अर्था द्रीढकरण : म्हणसी कवण असे प्रमाण
तरी तेंहीं देवें केलें श्रवण : ज्ञानीयांप्रती १३४२

चहु भुत-ग्रामां अभयदान : अच्युतें देववीलें आपण
म्हणौनि अनुष्टावें लागे वचन : अनुसरलयासीं १३३५

उधरावया जीवासी . ऐसा मनोधर्मु अहींर्नेसीं
दोखीलेयां वर्मस्पर्शी : प्रवर्त्ते ना १२५४

तो गुण वांतिवरि[1] गिवसी : अनुचीत रीगों नेदी मानसीं
आत्मत्व करी सकळ जीवांसीं : सदासर्व १३५५

पुढील सो भावी थोरें आवेसें . परि ज्ञानिया नेघे अनारिसें
वीकरो नेणें मनें मानसें : आत्मत्व भगैल म्हणौनि १३५६

---

१ ग. 'वंति'

तो ओखटयाची आठवण : वीसरौनि जाए आपण
गोमटयालागि अंतःकरण : सदा सावधे १३५७

सर्वभूतीं आत्मत्वें : वर्त्तो साधितलें देवें
म्हणौनि ज्ञानियां जीवेंभावें : ईस्वराअधीन होए १३५८

## ज्ञानियाकडून 'सर्वातीत' या वचनाचे अनुष्ठान

आतां सर्वातीतु हें वचन : ज्ञानीया कैसें करी अनुष्ठान
तें तुजप्रती आदरे सांघेन : वीसेखेंसीं १३५९

तया ब्रम्हवीयेचेनि प्रकासें : नीत्यानीत्य दोन्हीं दृष्टीं दीसे
म्हणोनि सर्वातीत होउनि असे : परमांनदीं १३६०

चैतन्य मुख्य करुनि च्युतिमंतें : सकळ फळें सांघितलीं सर्वज्ञनाथें
हें नीरुपण ठसावलें नीरुतें : हृदै ज्ञानियाचां १३६१

याकारणें सर्वातीतु : म्हणिजे ज्ञानीयां महंतु
दोखां नातळे गुणभरीतु : अतीत्व भंगों नेदी १३६२

जीवां जालया शाब्दज्ञान : स्वदेशापासुनि काढे मन
स्वग्रामसंबंधीं आपण : उभा न ठके १३६३

घोखटें नीत्यानीत्य जाणौनि : ल्टीकें आइकों नावडे कानीं
मग नव्हे रे नव्हे म्हणौनी : जाओं लागे १३६४

घेउनि वीखयांचा त्रसुं : संसारावरि करी आवेसु
म्हणे सुहृद एक जगनीवासु : वांचौनि नाहीं १३६५

---

१ ध. सर्वदा. २ का. त्रासु.

ऐसी विखय-वेवस्ता करी : वीरमे सकळ पदार्थावरी
म्हणे ईश्वरावांचौनि संसारीं : सोडवीता नाहीं १३६६

तो बापबंधु जननी : कृपाळु कैवल्यदानी
भयासुरे संसारवनीं : रक्षता तोचि येकु १३६७

तो इष्ट मैत्र कुळदेवत : सखा सुह्रद सकळ गोत
तयावांचौनि प्रस्तुत : आणिकु नाहीं १३६८

तो दुखापासौनि रक्षता : आपुलें साध्यसाधन देता
ऐसें म्हणौनि जगंनाथा : शरण रीगे १३६९

सकळांपासुनि काढी मन : करी अच्युताचें सन्निधान
तो ईश्वरूवांचौनि आन : दुजें दृष्टी न सेत्री १३७०

करुनी सकळ वीखयांचा त्यागु : ईश्वरीं उपजे अनुरागु
तैंचि कैवल्यसुखाचा मेघु : वरिखे आर्त्तजनावरी १३७१

ऐसा ईश्वरें जया दीधला बोधु : तया प्रकटला परमानंदु
नीरंतर करीती संवादु : परब्रह्मेंसीं १३७२

तें सदा स्वस्तता घनवट : अन्यसाधनांवरि करुनि वाट
परमार्गें चालती सुभट : ईश्वरपरायण १३७३

जया ईश्वरे संचरीला वेधु : ते सकळ फळीं मानिति नीरोधु
सदा सेउं आवडे कैवल्यकंदु : अहीर्नेसीं १३७४

ऐसें सर्वातीत होउनी . प्रवर्तले आपुलां साधनीं
तो जगदात्मा येकु वांचौनी : अन्यत्र सुख नाहीं १३७५

इतर ज्ञानाचेनि स्पर्शे : ब्रह्मबीदु नापलवे मनें मानसें
आपणयां लागों नेदी पीसें : रजस्तमाचें १३७६

तो[1] परज्ञानाचेनि वळें : वीकारा वीकल्पा नातळे
पदमटराचीये सांखळे : सांपडे ना १३७७

रागद्वेखाचा नगरीं : कांमक्रोधु राणीव करी
ते द्रीष्टीं देखौनि दुरी : परता पळे १३७८

अहंतेममतेचीं पुरेंपाटणें : जेयें वीके गर्वाभिमानाचें केणें
तें श्रवणीं आइकौनि साध्यपराएणें : देश वर्जिला १३७९

आसात्रीष्णेचां सींहासनीं : मायामोहो वैसे निहीटौनि[2]
तें आइकों नावडे कानीं : ज्ञानियासी १३८०

कखायाचीये होमकुंडीं : जीवजात पडीलें व्रम्हांडीं
परि योगियाचीये भुजादंडीं : आहे न लगे १३८१

अभीळाखाचिए डोहीं मी माझें म्हणतां
विस्व बुडालें दृष्टीं निहाळिता
परी ब्रह्मवीदु आपण सर्वथा : आंतुडे ना १३८२

परश्रीसंतापाचां सेजारीं : जग सामावलें नीरंतरीं
परी योगीया गोष्टि न करी : हांसौनिया १३८३

डंव प्रपंचाचेनि संसर्गें : त्रीलोक्य येरझारा करी वेगें
परी ब्रह्मवीदु आपुलेनि भृभंगें : वासु न पाहे १३८४

श्रींगाराचीय पेठे : विखयाचे हाटचौहटे
योगिया न वचे तीये वाटे : अपवित्रें[3] म्हणौनि १८८५

कामक्रोभाचेनि मृगजळें : तो पाउल तीर्मो नेदी आपुलें
मन परमानंदीं असे वेचलें : अखंडीत १३८६

---

१ कग. थोरॅ. २ कख. निहटूनि. ग. नेहटुनी. ३ घ. अपात्र.

नवरसांची श्रींगारवाडी : सदा सनादली दीसे प्रचंडी
परी योगीया नेघे गोडी : रसीं झळंबेना १३८७

हावभावांचां नंदनवनीं : अष्टभोगाची राजधानी
तें ज्ञानीयां देखे लोचनीं : परि वास न पाहे १३८८

मान्यतेचा माचा मनोहरू : सुरसीं शब्दीं वीणीला सविकारु
परि तयावरी योगीश्वरू : शयन न करी १३८९

वीळासाचीं फुलें[1] सुपरीमळें : मायां तुरंबीलीं मळयानीळें
परि योगीया न भोगी सोहळे : तया सुखाचे १३९०

कर्मवासनेचे वृक्ष सदाफळ : शाखापाल्लवीं सांसिनलें वहळ
परि ज्ञानियाचें मन उतावेळ : नव्हे तयालागी १३९१

मनोधर्माचीय वेली टळमळे : कंदर्पकयेचे घड रसागळे[2]
परि योगिया नुपजेति डोहळे : सेवने अर्थी १३९२

सवियां सुवास सीतळ : इंद्रियार्थाचें जीवन परीमळें[3]
पुण योगियाचें मन अळुमाळ : अन्यथा नव्हे १३९३

ठोंसरें सगात्रें सरळें : पुण्यपापाचीं रायकेळें
योगिया न सेवी जांबुळें : वीकल्पवासनेचीं[4] १३९४

मधुरें गोडिसीं रसाळें : सुख-दुखाचीं अंब्रफळें
योगीया देखुनि कव्हणी वेळे : घेपवे नां १३९५

तो मायाचक्राचीये येरझारे : न पडे क्षुद्रानंदाचीये वागुरे
सदासर्वातीतु होउनि वीचरे : महिमंडळीं १३९६

---

१ कग. * २ कग. रसाळें. ३ खघ. परीवळ. ४ कखग. वीखए'

तो जगावेगळा उदासु : ब्रह्मवीचेचा अंसु
अहर्निसीं जगनीवासु : पुढां देखे १३९७

तो चैतन्याचीये अवगळां : न रीगे श्रीष्टीसंहाराचीये खळां
हृदइं आठवी पुतळा : कैवल्याचा १३९८

तो सांभव-सुखाचीये साळे : माजि रीगौनि न वीटाळे
आगाधु केला कैवल्यपाळें : ज्ञान देउनि १३९९

अष्टभैरवांचीये मोहरे : उभा न ठवे सर्वप्रकारे
वीरुरुप देखे अपुरें : आपणयापसि[1] १४००

आपुलेनि आगाधपर्णे : सेखसैयातें देखे उर्णे
हरीहरब्रह्मादीकातें म्हणे : सारिखांचे आहाच १४०१

तो इंद्रादिकांची न करी गोष्टी : गंधर्वातें नाणी द्रीष्टी
यक्षीणीची सेनाही सेवटीं : असे म्हणौनिया १४०२

तो ब्रह्मरसवांचौनि आन : दुजें न करी अस्वादन
परमपुरुखीं इंद्रीयें मन : तादात्म होती १४०३

तो नीसंग प्रमानंद मंडळीं : आत्मारामु होउनि खेळे जळकेळी
परब्रह्मापासौनि कव्हणि काळीं : वेगळा नव्हे १४०४

ऐसा आनदें आगाधु : ईस्वरीचा ब्रह्मवीदु
तो कहीं न करी संवादु : शक्तिचक्रेंसीं १४०५

परि एथ नाही नवलावो : आइक अतीत्वाचा भाओ
जेणें तुटे सदेहाचा ठाओ : तें सांघैन आतां १४०६

---

१ क. 'पस्य. ग. 'पासी.

## ईश्वरीचे विरही पुरुष : त्यांचे अतीतत्व

अवधारीं अपुर्व बीसेखु : जो इस्वरीचा वीरहियां पुरुखु
तो स्यान प्रसाद वासनिक भिक्षु : शास्त्र अन्य देखे १४०७

जे अच्युताचे पटियते पदार्थु : जेणें सकळ साधने होए चरितार्थु
तयावरि उदास धरी चीत्त : अनुरागु नाही १४०८

नाही आवडि पदीयाओ . न धरी बुद्धि भाओ
जैं मीळे सर्वज्ञराओ : तैं समाधान होए १४०९

जो सर्व सूखाचा जीवाळा : आगाध परब्रह्माचा पुतळा
तेयावांचौनि चैतन्यकळा : बोल्हावे ना १४१०

जो सदासर्वदा परसुखीं . पहुडे परमांनंदाचां पाल्कीं[2]
तो क्षुद्रानंदें ये लोकीं काइ झाकवैल ? १४११

जो कैवल्यकुसमाचा परीमळु मायां तुरबी[3] मुनी मळयानीळु
तो अन्यत्रे सुखीं अळुमाळु : तादात्म नव्हे १४१२

जो ज्ञानामृताचीं फळें नीर्वधी : हातीं घेऊनि अस्वादी
तो अन्यशास्त्रावरी बुधी : काइ धरील ? १४१३

जया प्रेमाचें प्रावर्ण · देवें पांगुरवीलें आपण
तो अन्यपदार्थीं रमण : कहीं न करी १४१४

जो परज्ञानाचां डोळां निरंतरू : नीहाळी कैवल्यमुर्त्ती मनोहरु
*तो द्रीष्टीं न पाहे अपरु : बुधीवीण* १४१५

---

१ खघ. विन्हया. २ क. पाल्लकी. ग. पल्लकी ३ घ. तुरभी.

जो प्रबोधाचीय पालखती परदैवेंसीं
वरि बैसुनि गोष्टि करी अहर्नीसीं
तो अन्यवार्ता आइकौनि रसीं : झळंबेना* १४१६

तो ब्रह्मश्रीयेचां दीव्य लोचनीं : सदा देखे कैवल्यदानी
तो कहीं नाइके आपुलां कानीं : इतर ज्ञान १४१७

जो परशास्त्र पराराणी : परीसे आपुलां श्रवणीं
तो अन्यत्राचां नीरूपणीं : कहीं न बैसे १४१८

जया आनद-नीधानाचा ठेवा : प्रतक्ष दीसे नेत्रपल्लवा
तो अपर सुखाचा सडिवा : आपणयां लागो नेदी १४१९

जेहीं आपुलां संभोगकाळीं बहुवसु
आवडि अनुभविला लक्ष्मीवीळासु
ते भीक्षुवासनीकेंसीं सौरसु : काइ करितील १४२०

जे परवस्तु परेशाचां गुणीं : अनुरागें लांचावले अंत.करणीं
ते शास्त्र आइकौनि श्रवणीं : काइ सुखीये होती १४२१

जेहीं अच्युताचा सन्निधानीं : सुख भोगिलें मुनीजनीं
ते काइ प्रवर्तती अन्यसाधनीं : जाणतजाणतां १४२२

जे चाडश्रयेचां सींहासना : वरि बैसुनि पाळांती जगजीवना
ते वीयोगीं काइ भाळती स्याना : प्रसादासीं १४२३

जे लावण्यसमुद्रामाजि सौभाग्यासीं
अखड क्रीडा करीती अहर्निसीं
तया अन्यपदार्थावरि कैसी : बुधि उपजैल १४२४

---

* कखग तो अन्यत्र सभापणे मानसी : कही सुख न धरी.

तया वीखयग्रासनेची वीकृती : अपरसुखाची ये खंती
अष्टभोगांवरी वीरमती : वीसेखेंसीं १४२५

तया सांभवसुखाचा सळु : स्वर्गसुखें उठी जाळु
जैं मीळे कैवल्यपाळु . तैं विरहाग्नी समे १४२६

ते मान्यतेचया मंडपातळीं : हासौनि न वैसती वऱ्हणी काळीं
रसभावाचा तुखारीं जीवाळी : कर्पोनि जाए १४२७

तया श्रींघाराचा वीटाळु सगितेसीं न करीति खेळु
कानिं आइकौनि शब्द रसाळु : सुखीय नव्हती १४२८

तया जगदात्मावांचौनि आगाधु : नलगे दुजयाचा संदु[1]
ह्रदैं आठेत परमानदु · अहर्निसीं १४२९

आत्मयारामाचेनि वीरहउत्तरे . तो सकळ पदार्थतें वीसरे
सुखीया नव्हे आणिकें अवतारे : येर काइ सांघों १४३०

तया कैवल्यनाथा श्रीचक्रपाणी . वाचुनि आन नाठवे अंतःकरणीं
जो साळांकृत सर्वगुणीं सदासर्वदा १४३१

तो स्वय आपण जगन्निवासु : जैं कृपावसें मीळे परेशु
तैं जीवा होए सुखसौरसु : तयाचेनि योगें १४३२

तया कैवल्यदानित्रांचौनि येकु . दुजा पाहों नावडे आणिकु
तेणेंवीण सुख-वीसेखु आतीचि ना १४३३

जैं जगदबधु जगजीवनु : प्रतक्ष होए आनदघनु
तैंचि नीवे सकळै तनु : वीरहाग्नी आभाओ होए १४३४

---

१ कग. छदु.

फुटाणेकार फुटाणे करीतां : चणे उदकें भोजवी सर्वेया
मग वाळु घालुनि दवडी कठीणता : हीरवटानि[1] दोन्हीं १४४३

ऐसेया दोखांचें जालया क्षाळण : येति सुरे मृदत्व हे दोन्ही गुण
मग आरोगावया होती कारण : करीतया पुरुखासीं १४४४

तैसें जीवां बोध देउनि परेशू : करिती रजस्तमाचा नाशु
मग योग्य जालया होय सौरसु : सत्ताज्ञानेंसीं १४४५

म्हणौनि शाब्दीं रजस्तमें नीरसौनि
साधन सीधी नेति ब्रह्मवीद मुनि
ते अपरोक्षाचां दीव्य लोचनीं : देखती सकळ पदार्थातें १४४६

जया ज्ञानदान करी सर्वेश्वराओ : ते जाणती कर्मक्षाळणीं उपाओ
आतां आसो हें तुज सांघेन भाओ : अतीत्वाचा १४४७

जया ईस्वरे दीधलें सताज्ञान : तयां वीकारश्रीष्टी अधीन
कर्मश्रुष्टीयेंउतें मन : जाउ नेदीति १४४८

तो ब्रह्मादीकांची न पाहे[2] वासें : अष्टभैरवांवरि होय उदास
चैतन्यसुखाची न करी आस : वीघ्न म्हणौनि १४४९

ऐसा ईस्वरीचा ब्रह्मवीदु : सांभवसुखीं मानी नीरोधु
सदा सेउ आवडे कैवल्यकंदु : अहर्निसीं १४५०

तो ब्रम्हवीद्येचेनि उजीयडें : नीत्यानीत्य दोन्ही देखे फुडें
परमानंदवांचौनि सेउ नावडे : अपरसुख १४५१

वीद्या अवीद्या पुरुखु : या तिहींपें देखावया गुणदोखु
ब्रम्हवीद्यावांचुनि प्रकाशकु : दुजें नाहीं १४५२

---

१ क. हीरवट आणि कठीण २ कखग. करी आस.

यापरि योग्य जालया मुनिजन : होती ब्रम्हविद्ये अधीन
तया ईश्वर देती सांमान्य ज्ञान : मळकर्मे क्षाळावया १४५३

तो वीकारश्रीष्टी कर्मश्रीष्टीपासौनि
वरवीदु वेगळा होए सांमान्यज्ञानीं
असेख मळकर्मे क्षाळुनि : माहामुनि वीशेखा पात्र जाला १४५४

जेणें आपणयां आपण : लाविलें मळकर्माचें बंधन
तें तयाचें तोचि फेडी ऐसें वचन : देवें वीहीलें १४५५

या मळकर्मासि आदिकारण : अनादिअवीद्या अन्यथाज्ञान
आदिमळाचें अनुसंधान : तयाचेनि न फीटे १४५६

हें कृपावसें कैवल्यपाळु : फेडावया तोचि सबळु
अनादिअवीद्या आदिमळु : नाहुं शके १४५७

म्हणौनि याकारणें : विशेखज्ञान लागे देणें
तेयावांचौनि नुठी ठाणें : अनादिअवीद्येचें १४५८

यापरि संतें असंतें : मळकर्में क्षाळीलिं बहुतें
मग वीशेखज्ञान जगंनाथें : तया दान केलें १४५९

मग तो वीशेखीं परज्ञानाचां डोळां : देखे कैवल्यपरब्रम्हाचा पुतळा
माया कृपावांचौनि शक्ती सकळा
परमेश्वरू दान करीती १४६०

तेथ सकळाही शक्ती : अधिना अपरोक्षा होती
प्रमाणद्रव्य म्हणौनि मानिती : महंता ईश्वराचेयां १४६१

पाठीं दैवश्रुष्टीपासुनि वेगळा : जालयां कृपा उपजे कैवल्यपाळा
मग घाओ घालिती अवीद्ये आदिमळा : अज्ञानासी १४६२

---

१ खघ. °चा.

अज्ञानच्छेदासरिसें : असेख अन्यथाज्ञान नासे
जीवत्वतूटी केली जगन्निवासें : कृपा करुनि[1] १४६३

जीउ मायेसि करुनि पारंगतु : ब्रह्मीं मेळवी जगंन्नाथु
मग तोही होए नीत्यमुक्तु : ईस्वरासारिखा १४६४

ऐसा सर्व दोख नासौनि नीर्मळु : आत्मा होए शुध केवळु
मग ब्रम्हपदीं पहुड वेल्हाळु : सेजारीं मोक्षाचां १४६५

तो परसुखीं नीद्रा करी : वीसरे साधनाची थोरी
साध्य पावलयां आनंदसागरीं : मीळौनि जाए १४६६

ऐसा होउनि सर्वातीतु : ज्ञानीया ब्रह्मीं कीजे भूतु
मग तोही म्हणावा लागे अच्युतु : सदासर्वदा १४६७

म्हणौनि ब्रम्हवीदु ऐसा अर्थीं : सर्वातीत परिसावा करुणाशक्ती
यऱ्हवीं आपुलयासी परमप्रीती : सदा आत्मत्व करी १४६८

ऐसें अच्युतें जया दीधलें ज्ञान : तयाचें सर्वातीतु साधन
मा इस्वरीचें स्वरूप आंनंदघन : तेय काइ म्हणावें असे १४६९

तो सर्वगुणिं अळंकृतु : आत्मारामु आनंदभरीतु
सर्व व्यापुनि सर्वज्ञनाथु : सस्वरूपीं रमे १४७०

तो सर्वातीतु सर्वात्मकु : सर्वकर्त्ता परमपुरुखु
सर्वशक्ती सुखवीसेखु : तयापासौनि १४७१

तो नीर्वीकारु नीरालंबनु : सौभाग्यें आथिला जगजीवनु
सौंदर्या देउनि मानु : वीहरे महीमंडळीं १४७२

---

१ कग. 'वसे करुनि.

तो नीराकारु अव्यक्तु : लावण्याचा पुतळा कैवल्यनाथु
नीराभिमानु पुरवी अंतु : श्रीधीरचनेचा १४७३

ऐसे गुणधर्म निरंतर : स्वरूपीं असती अपार
परि कृपेवांचौनि थोर : ईश्वरीं आणिक नाहीं १४७४

हे वीरुध-धर्म वीलक्षण : परीसावेया नाहीं साधन
जैं आदिनाथु कृपा करी आपण : तैं भ्रांति फीटे १४७५

हा परशास्त्राचा सारोधारू : परावर-वस्तु-वीचारु
जै कृपावसें जाणवी आदिगुरु : तैंचि जांणिजे १४७६

हा ब्रम्हबोधेचा मतीतार्थु : सर्वधर्मांचा सीधांतु
जैं कृपा करी जगनाथु : तैं श्रुत होए १४७७

हा शब्दब्रह्माचा आवांका : ज्ञानभक्तीची[1] जीवनकळीका
जैं कृपा उपजे परंमपुरुखा : तै वीदीत होए १४७८

हा परज्ञानाचा प्रकाशु : प्रबोधाचा वासु
जैं कृपा करी परेशु : तैं श्रवण होए १४७९

हें साहित्याचें सार : जाणीवेचें जीव्हार
जै कृपा करी मुर्ति मनोहर : तैं प्राप्ति होए १८००

हें परसुखाचें जीवनें[2] परमांनदाचें चांदिणें
ईस्वर कृपावसें करवी पारणें : तैंचि होए १४८१

हा चातुर्याचा उन्मेखु : सकळ कळांचा सुखवीसेखु
जैं कृपा करी आदिपुरखु : तैं अनुभवा ये १४८२

---

१ कखग. शक्तीची. २ क. जीवन.

हें प्रेमाचें दीव्यांजन : संसाररोगियासी रसाएन
जें कृपावसें देओ देति आपण : तें उपचारती १४८३

हे वेधबोधाची मालगंठी : वीवेकाची कसवटी
जें इस्वरु पाहे कृपादृष्टी : तें प्रतक्ष होए १४८४

हें वीचाराचें जीवन : स्वस्ततेचें जन्मस्थान
जें कृपावसें जाणवी स्वरूप आनंदघन : तैचि जांणिजे १४८५

तें स्वरुप-लक्षण ऐसें . सर्वशक्ती नेणवे मनें मानसें
परि मज बोलावया परंमहंसें : अनोज्ञा दीधली १४८६

जें शुद्ध बुध नीत्य शास्वत : सर्वसुन्य सर्वातीत
गुणधर्म आथीलें यूक्त : अनादिचें १४८७

जें अपरांपर अव्यक्त : अद्रीष्ट अमृतवंत
आगोचरु नीत्यमुक्त : नीरालंबन १४८८

जें महंतां महंत : अनादिसीद्ध अनंत
आनंदें सदोदीत : असतचि असे १४८९

जें अवीनाश अच्युत : भव-वीनाश-रहीत
सर्वसाक्ष सर्वगत : स्वयं[1] सुखरूप १४९०

जें सर्वकर्त्ते सनातन : सर्वव्यापक नीराभिमान
अवक्रीये आनंदघन : अहर्नीसीं[2] १४९१

ऐसें इस्वरीचें स्वरूप आगाध : अपरांपर अनादिसीध
तयातें अनुभवीती ब्रह्मवीद : हें कार्य कृपेचें १४९२

मी परावर शास्त्रें जाणती : परि वस्य नव्हे कैवल्यपती
मातें ईस्वरें[3] अंगीकारीती . तया कृपा कारण १४९३

१ का. स्वयें. २ का. अहिर्नसी. ३ ख. परमेश्वरू.

विचारु आंगें होए जाणता : परि वस्य नव्हे सर्वकर्त्ता
तया इस्वरु मानु दे ऐसया अर्था : कृपा आदि १४९४
प्रबोधु होए बुधिवंतु : परि वस्य करूं नेणे अनंतु
तयातें अंगिकरी लक्ष्मीकांतु : ऐसें कृपा केलें १४९५
ब्रम्हवीधा होए डोळसदेखणी : परि अंगिकारु नाहीं नीर्गुणीं
तीयेतें स्वीकरी श्रीचक्रपाणीं : हें कौसाल्य कृपेचें १४९६
सावया सीहाणी होय ज्ञानशक्ती
परि वस्य नव्हे आगाधु चक्रवर्त्ती
तीयेतें परमेश्वरू स्वीकरीती : हा उपाओ कृपेचा १४९७
वेधु वीवेकापासौनि राजसु : परि वस्य नव्हे प्रभु परेशु
तेयातें स्वीकरी जगंन्निवासु : हें सामर्थ्य कृपेचें १४९८
साहीत्य श्रींवारासी[2] थडे[3] मेळु : परि वस्य नव्हे भक्तिवछळु
तया परमानंदाचा नाहीं सुकाळु : कृपेवीण १४९९
संगीत बोलौनि होय सुरस : परि नापलवे अच्युताचें मानस
तयातें स्वीकरीती परमहंस हें कारण कृपेचें १५००
उदार्य दान देउनि होए बहळ : परि वस्य नव्हे कैवल्य केवळ
तयातें स्वीकरीती[4] राउळ : ऐसें कृपा केलें १५०१
सौंदर्य सर्वांगीं होए पुरतें : परि वस्य करू नेणे परब्रम्हातें
तें आपण अंगिकरीजे आदिनाथें : हा उपाओ कृपेचा १५०२
लावण्य होए नीऱ्हां नागर-नेटकें
परि सर्वज्ञातें वस्य करूं न शके
तें अंगीकरीलें परमपुरुखें : कृपावसें १५०३

---

१ क. कैवल्यें. २ कग. शृंगारु. ३ कग. दे. ४ कग. स्वीकरी.

सौभाग्य होए सवीया सुरस : परि जगदात्मा न पाहे वास
तयातें अळंकरी[1] मुक्ति राजस : हें सौजन्य कृपेचें १५०४

दया दातृत्वें होए आगळी : परि पढीयाओ नाहीं स्वरुपीं केवळीं
तीयेतें हातवसी वममाळी : हा योगु कृपेचा १५०६

मर्या लोभापर होए ममताळु : परि वस्य नव्हे कैवल्यपाळु
तीयेसीं जगदात्मा करी खेळु : हा पढीयाओ कृपेचा १५०६

रति अनुभुति दोन्हीं : असती अच्युताचां सन्निधानीं
परि कृपेवीण कैवल्यदानी : वस्य नव्हे १५०७

करुणे तुझा महीमा दीसे गहनु : परि वस्य नव्हे जगजीवनु
तो कृपेवांचौनि नेदी मानु : शक्तिचक्रासी १५०८

तुज प्रेमवांचौनि आन : देखों नावडे दुजें साधन
परि ईश्वरस्वरूप आनंदघन : वस्य नव्हे १५०९

तो एकी[3] कृपेवांचौनि कैवल्यपती : वस्य नव्हे सर्वशक्ती
अनादिअवीद्या-छेदु करीती : तेय कृपाचि प्रधान १५१०

अथवा अयोग्यता नासौनि परेशें : जीव योग्य केले कृपावसें
मग ज्ञानप्रेम देति गोडिसें : साध्य पावावया १५११

या अर्थाचा अभिप्राओ : परीसावया असे न्याओ
जें बोलिला सर्वज्ञराओ : तें सांघैन आतां १५१२

आदि अंतीं परमेश्वरु : मध्ये पुरुखाचा आचारु
या वचनाचा सारोधारु : श्रीमुखें नीरोपिला १५१३

---

१ क. अंगीकरी. २ कघ. माया. ३ कग.*

म्हणौनि कृपावर्से परमात्मां : मानु दे सर्वधर्मां
तेणेंवीण ज्ञानप्रमा : अधीकारु नाहीं १५१४

## मायेचे कार्य की कृपेचे कार्य ?

ऐसा परिसौनि अर्थाचा आवांका : करुणा परेसीं करी शंका
म्हणे चैतन्यावांचौनि परमपुरुखा : व्यापारतें नाहीं १५१५

ऐस्वर्ये आदि करुनि मायासंबंधें : सकळ धर्म निरुपीले परमानंदें
या वचना मानु देउनी कैवल्यकंदें : अवतारु धरीला १५१६

मायेचेनि योगें[1] मज पांता : सकळ धर्म दीसती उत्रंमता
परी कृपेचें कार्य सर्वथा : देखिजे ना १५१७

ऐसया अक्षेपा परीहारु नीगावा : परे तुजवांचुनि कवणें करावा
आता आसो हें अपुर्व भाओ बोलावा : वीस्तारूनि १५१८

या अर्थाची वीत्पती : तुआं बोलावी प्रचुरा मती
तयावांचौनि संदेहो–नीवृती : कहीं नव्हे १५१९

## करुणेच्या आक्षेपाचें अपूर्वत्व

मग संतोखुनि परा म्हणे : हे अपुर्व अक्षेपाचें नाणें
जयासाटीं लाहिजे केणें : परज्ञानाचें १५२०

प्रचुर अक्षेपाचा अभिप्राओ : जो अर्थेसीं मेळवी घायाघाओ
मग हालवसावा लागे सखोल भाओ : ब्रम्हवीद्येचा १५२१

तुझा मतितर्कु ऐसा : जो लोपी परशास्त्रीचीं दीसा
प्रबोधु होए कासावीसा : परिहारु करीतां १५२२

---

१ फग. युगें.

तुझा पुसतां आवाका : शक्तिचक्रा नेणवे देखा
जै ब्रम्हत्रीयेएसणा जोडे सखा : तैंचि भडस पुरे १५२३

तुझीये यूक्तीचें वीसेखण : आइकौनि बोधशक्ति शके आपण
परिसतां होय कासावीस अंत:करण : परसींधांतासी १५२४

सौभाग्य होए सवीया सविकार : परि तुज देवों नेणे प्रस्णोत्तर
उदार्यां नीहाळितां न कळे पार : ईश्वराचा १५२५

दयेचें जगीं वाखाणलें दान : परि नेणे जगदात्मयाचें महीमान
तें सकाअक्षेपीं नीर्वचन : काई बोलैल १५२६

लावण्य होये रुपें नेटकें नागर : परि परब्रह्मातें नेणे सवीकारें
तें हासौनि तुझया अक्षेपासमोर : उभे न ठके १५२७

ममतेचा मनोधर्मु बरवा : जे वीरुं चींतु तेणे सकळ जीवां
परी तुझया अक्षेपा परिहारु नीगावा : करू न सके १५२८

सौंदर्य होए वेल्हाळ मनोहर : सदा केवळीं असे निरंतर
ते तुझीय सकेसरिसें आपेंपर : वीसरौनि जाए १५२९

सगित होए मधुर गोडिसें : जें योगियां लावी प्रेमपीसें
परि तुझी यूक्ति मनेंमानसें : परिहरे ना १५३०

सवींगीं राजस होए वेधवंती : सदा अच्युतेंसीं करी परमप्रीती
परि तुसीं बोलतां करुणाशक्ती : पुरे न करीं १५३१

साहीत्य होए बोलौनि सीहाणें : स्वयं सकळ शास्त्राचा मतीतार्थु जाणे
परि तुझीए यूक्तीपुढें करुणे : मीरवेना [1] १५३२

---

१ कखग सवीवर.

चातुर्य होय डोळस देखणें : सदा इतरज्ञानातें उगें म्हणे
परि तुझीय मतीसीं येकें[1] गुणें : सरीसी न पवे १५३३

क्षेमा कैवल्याचीये सेजे : नाचे आनंदाचीं भोजें
परि संका अक्षेप तुझें : परिहरू न शके १५३४

शांति सुखाचीय साबरां : नीरंतर बोळगे सर्वेश्वरां
परि तुझेया आक्षेपाचा उबारा : साहावेना १५३५

सत्रीया साजिरा होए श्रुगारु : जो कळाकौसल्यातें म्हणें पारु
तो तुझेया प्रश्नाचा सारोधारु : बोलों नेणे १५३६

करुनि अष्टभोगेंसीं सौरसु : वैराग्यातें वीभाडी वीळासु
परि तुझेया अक्षेपाचा प्रकाशु : साहो न सके १५३७

करणकर्तृत्व करुनि केवळीं : कुशळता दीसे योजागळी[2]
परि तुझेया यूक्तीवीसेखातळीं : उभी न ठके १५३८

रूपश्री होए रूपें बरवट : जें वीखरसुखाचें मुळपीठ
परि तुझी संका अलोट : तीये लोटेना १५३९

तेजश्री होए तेजागळी : प्रकाशें चराचर झांकोळी
परि तुझा मतीतर्कु नीर्वाळी : ऐसी हेही नव्हे १५४०

विजएश्री सदा एशवतु : होए प्रतापें प्रचुर महंत
परि तुसी[3] बोलतां पडे दुचीत : आओ न सभाळी १५४१

म्हणौनि सर्वअर्थी होए चतुर सींहाणी
जे जाणे जगदात्यांची खावणी
ते ब्रह्मनीयारांचौनि तुझी आणि[4] : पुरउं न शके १५४२

---

१ क.ग. °ही. २ क.ग. ओजा आगळी. ३ क.ग. तुजसीं, ४ क.ग. आइणी.

ते ईश्वराचें अधांग : अनुरागें रंगली सुरंग
भक्तश्री भोगी नीचनवे भोग : तीयचेनि योगें १५४३

ते आनंदरतीचा हात धरी : अनभुतीची वांटे करी[1]
नीरंतर असे जगदेश्वरीं : दीव्य शक्ती १५४४

ते जरि उजु पाहे वास : तरि शक्तिचक्राची पुरे भडस
नीन्हां नीर्मळ होए मानस : महंताचें १५४५

तीये ब्रम्हवीचेची दुतिका : मी परा प्रसंन होए आइका
तैंचि जाणिजे परमपुरुखा : परमांमयातें १५४६

तुझेया अक्षेपाची थोरी : परिसावया चराचरीं
मजवांचुनि शक्ति दुसरी : आणिक नाहीं १५४७

तुझीये सकेचा नवलावो : टाकी ज्ञानशक्तीचा ठाओ
मग प्रतक्ष करी सर्वेज्ञराओ : अपरोक्षातें १५४८

आता आसो हा शब्दब्रम्हाचा वीस्तारु : तुझया अक्षेपा करूं परीहारु
तया वांचौनि वस्तुवीचारु : प्रत्या नये १५४९

ऐश्वर्य आदि करुनी परेशें : सकळ धर्म नीरोपिले मायावेशें
हा वचनार्थु परीस सावधें मानसें : मजपासाव १५५०

जरि चैतन्यासंबंधें करुणाशक्ती : सकळधर्म म्हणसी उजंभती
तरि जीवा जालया कैवल्यप्राप्ती : माया काइ लागे ? १५५१

ते साधनींचि होए उदास : साध्याची न पाहे वास
जीवां कैवल्यस्वरूप अवीनाश : प्राप्य होए १५५२

---

१ क्रम. °कारी.

नीरंतर अच्युताचीया संगती : जीउ नीचनवा नीजानंदु भोगिती
तेथ चैतन्य-मायाव्यापारती : म्हणों नए १५५३

जेथ आत्मारामु अहर्निसीं : आपणपें समोर दे भक्तासी
तेथ रीगाव्या नाहीं चैतन्यासी : आगाधे स्वरूपीं १५५४

जो अद्रीष्ट अगोचरु अव्यक्तीं : स्वानंदीं रमे कैवल्यपती
तेथ भक्तावांचौनि सर्वशक्ती : रीगावा नाहीं १५५५

तो जगदात्मा जगनिवासु : भक्तां प्रत्यक्ष होए परेशु
चैतन्यां नातुडे मोक्षु : तया सुखाचा १५५६

भक्तासि आपुली रती अनभूती : परमेश्वरु सदा सर्वदा देती
तेथ मायासंबंध करुणाशक्ती : बोलों नैए १५५७

ऐसया अर्थाचें वीत्पादन : म्हणसी परीसावेया कवण वचन
तरि तेंहीं आदरे नीरूपीन : तुजप्रती १५५८

माझी बोल्ती वीत्पती : तूं परीस प्रचुरा मती
जे श्रीमुखें नीरूपीली श्रुती : ते सांघैन आतां १५५९

## माया संबंध पातली तेथचि न पवे

मायासंबंधु पातली तेथचि न पवे : ऐसें वचन नीरोपिलें देवें
म्हणुनि हेंचि मुक्षे परीसावें : वीरुध-धर्म १५६०

या अर्थाचें वीशेखण : बोलावया मीचि प्रवीण
मजवांचौनि कार्यकारण : ठाउकें न पडे १५६१

ईश्वर अप्रमयो आगाध-चक्रवर्ती : चीदब्रम्हां नेणवे सर्वसंपती
हा श्रुतीचीरोधु करुणाशक्ती : आइक आदरू करुनीयां १५६२

---

१ का. मुख्य.

जेथ आत्मारामु अपरांपरु : स्वस्वरूपीं रमे नीरंतरु
तेथ चैतन्या नाही अवस्वरु : कव्हणीं काळीं १५६३

जेथ परमात्मा परमानदु : सदा स्वानदीं असे कैवल्यकदु
तेथ माया न पवे सबधु : विसेखेंसीं १५६४

जो अद्रीष्ट अगोचरु : स्वच्छदलीळ सुखसागरु
तो चीद्ब्रम्हा[2] परमेस्वरु प्रतक्ष नव्हे १५६५

जो नीर्वेउ नीराकारु · सर्वातीतु सर्वेस्वरु
तेथ मायेचा व्यापरु : काइ लागे १५६६

जो अवीनाशु अनंतु : अपार अमृतवतु
तो चैतन्या सर्वज्ञनाशु : द्रष्टी न पाहावे १५६७

जो अव्यक्त शुद्बुध · आ मरमणु आगाधु
अप्रमयो अनादिसीध : अहर्निसी १५६८

जो नामारूपासि अतीतु : सर्वसुन्य नीत्यमुक्तु
चीद्ब्रम्हां न टके[3] प्रातु तया स्वरूपाचा १५६९

ऐसें जें आगाधस्वरुप करुणाशक्ती
तेथ चैतन्य न पवे नाहीं उर्धगती
असो, हे पातली ते वीरुध श्रूती आता ज्ञान करू १५७०

जेथ ब्रम्ह माया ईस्वरू : सदा केवळीं असे नीरंतरु
तेथ मायासंबधें सकळु व्यापारु : ईस्वर्य[4] आदिकरुनी १५७१

त्रीअसीं तीन्ही प्रवृत्ती : कृपेचेनि योगें उद्भवति
तेथ माया वोळगे व्यापारती सदासर्वदा १५७२

---

१ क नुपजे ग नुपवे २ घ 'ब्रम्ह. ३ क टाके. ४ कग ऐस्वर्य.

केवळीं सुध चैतन्य नित्यसंबधें : नीजांसें बोळिले परमानंदें
मग कृपेचेनि योगें कैवल्यकदें : तया मानु दीधला १५७३

जीवाकारणे परमहंसें : चैतन्या अंगिकरीलें कृपावसें
मायावेल धरुनि फेडिती पीसें : अनादिअवीद्येचें १५७४

कृपावसें जगन्निवासु : मायापुरुषार्थे होए परेशु
जीव उद्धरावे हाचि हेतु अभ्यासु : अहर्निसीं १५७५

कृपावसें जगजीवनु : अंगिकरी स्वयं मानवी तनु
परावर स्वीकरी आनंदघनु : नीववी संसारतप्तातें १५७६

उभेद्रीस्यत्वं आदिकरुनि : सकळ धर्म स्वीकरी कैवल्यदानी
मग मायेचेनि योगें वीहरे मेदनीं : व्यक्त जालया १५७७

जीवां देऊनि आपुलां निजसंबंधु : करीति मायामोहाचा मुळछेदु
अज्ञान नासौनि उपडी कदु : अन्यथाज्ञानाचा १५७८

एकां नीरुपीती परज्ञान · एकां मूर्त्तीचि[3] साध्यसाधन
एकां देती वीद्यादान : फळानद १५७९

एकां सन्निधानिं असतां : नासे अनधीकारु आयोग्यता
मग पात्र होती कैवल्यपथा : ब्रह्मविद्येसी १५८०

हा अर्थ साधावेया कारण : म्हणसी कवण असे प्रमाण
तरि तेंही आदरें श्रवण : करीन तुज १५८१

कृपावसें अव्यक्त ईश्वरु : अवतारु होए सगुण साकारु
नीस्तरावेया भवसागरु : जीवजातांसीं १५८२

---

१ कग उभयेदर्स्यत्व. २ क्ग. आपुला सवधु. ३ घ. मूर्त्तीचि.

देउनि आपुलें संन्निधान : तोडीती अवीद्या-भव-बंधन
दास्यमोचक हें वचन : श्रीमुखें निरूपिलें १५८३

ऐसें त्रीअंसापासौनि अवतारीं व्यक्तीं : मायासंबंधें सकळधर्म उत्रंभती
परि सर्वधर्मांचीं कार्यें करुणाशक्ती : नाहीं कृपेवीण १५८४

सकळां सर्वांसि भेदु : हाचि मुख्य परीसा श्रुतीवीरोधु
जैं कृपावसें जाणवी जगदबंधु : तैंचि जाणिजे १५८५

## करुणेची विनंती : विरुद्धधर्माचे स्वरूपलक्षण सांग

तवं करुणा म्हणे परे : तेंहीं बोलावें अती आदरें
तुजवांचौनि सर्वप्रकारें : जाणती नाहीं १५८६

वीरुधा धर्माचें स्वरूपलक्षण : होए सकळ सीधांतासि आदिकारण
तें नीरूपावया माहा वीचक्षण : परे तुंचि एकी १५८७

## व्यक्ती व अव्यक्ती परमेश्वराचे विरुद्ध धर्म

तव परा म्हणे करुणे सुरसे : हे वीरुध-धर्म परीसावे ऐसे
जे व्यक्तीं अव्यक्तीं स्वीकरीले परेशें
मायाकृपेचेनि योगें १५८८

सर्वातीतु सर्वकर्ता : सर्वसाक्ष नव्हे भोगता
सर्वात्मकु सर्वभुतां : अभयदानी १५८९

नीराभिमानु नीर्वीकारु : नीत्यव्यापकु परमेस्वरू
या वीरुधा धर्मांचा अंगिकारु : ईस्वरींचि आती १५९०

परि याचें कार्यकारण बोलतां : ईस्वरीं उपजे प्रसंन्नता
तें अवधान देउनि आइक आतां : करुणे मजपासाव १५९१

---

१ कखग. "सावा.

अतीत्व आत्मत्व हे वीरुध-धर्म दोनि
मुखें परीसावे माहावाक्य नीर्वचनीं
हेंचि कारण नीरूपिलें कैवल्यदानी : ज्ञानियांभक्तांसी १५९२

अतीत्वाचें कार्य लक्षण ऐसें : जे देओ नीराभिमानु होए कृपावसें
भणौनि अवक्रीयु हे श्रुती परेशें : स्वयं निरुपिली १५९३

आणि नित्यत्वें कैवल्यनाथु : चराचरीं असे साक्षभुतु
ऐसा कार्येकारणीं सर्वातीतु : परिसावा परमेश्वरू १५९४

आतां आत्मत्वाचा कार्यविशेखु : जगदात्मा परीसावा सर्वव्यापकु
जो सदासर्वदा सुखदायकु : सनातनु सर्वकर्त्ता १५९५

तो परमात्मा परंमपुरुखु : कृपावसें होए मोक्षदायकु
अनमीतबंधु धरी मायावेखु : अवतरे अनतीं अवतारीं १५९६

कृपाकारुण्य च्यान्ही : सौभाग्य सुंदर्याचा हातु धरी
मग लावण्य उदार्यातें अंगिकरी : आपण आदिनाथु १५९७

ब्रम्हवीद्या मुख्य करुनि ज्ञानशक्ती : वेधवोधेसीं अवतरे कैवल्यपती
साहीत्य श्रींधारेसी करी परमप्रीती : संगित सेवक होए १५९८

भक्ताकारणें कैवल्यनाथु : रतिअनभुतीचा धरी हातु
मग बीजें करी मायापुरांतु : आगाधु चक्रवर्त्ती १५९९

हे वीरुध-धर्म वीलक्षण : जगदेश्वर बोलिले आपण
ऐसें आत्मत्वाचें कार्यकारण : अखंडस्वरुपीं परीसावें १६००

ऐसें कृपेचेनि योगें करुणाशक्ती[१] : सर्वधर्म परीसावे स्वरुपीं अव्यक्तीं
सकळै चैतन्याचीया सगतीं : केवळीं बोलावे १६०१

---

१ कग. मुख्य.

सगुण साकारु सर्वेस्वरु नाथु : मायासंबंधें होय व्यक्तीमंतु
मग जीवां नीरोपी मोक्षपंथु : ज्ञानप्रधान करुनी १६०२

एकां घडवी पुरभजन : तेय मायाचि पुढां होए प्रधान
प्रेम होआवया प्रती साधन : शुद्ध चैतन्य परीसावें १६०३

वीस्वरूप मुक्ष¹ करुनि चेतना देवता : होती चीदब्रह्मा अनुखंगिता
हा सकळधर्मांचा आवांका सर्वथा
करुणे परीसावा तुआं १६०४

म्हणौनि सकळां सर्वांसि भेदु : परीसावा लागे सीधु
कृपेवांचौनि कैवल्यकंदु : प्राप्य नव्हे १६०५

जडाचेतनांमाजि नीभ्रांतु : नीहाळितां नें दीसे महंतु
कृपेवांचौनि शक्तिसमर्थु : आणिक नाहीं १६०६

कृपा सर्वधर्मांसि आदिकारण : अवीचा न तुटे कृपेवीण
नीवारावेया जन्ममरण : ईस्वरीं हेचि एकी १६०७

कृपावसें मूर्त्ति आनंदघन : जीवा संपादी कैवल्यदान
कृपेवांचौनि साध्यसाधन : आतीचि ना १६०८

कृपावसें ईस्वर प्रेम देति : तया प्रकारें कैवल्यमूर्ती
हा भाओ करुणे तुजप्रती : सांघावा न लगे १६०९

जीवां प्रेम दे लक्ष्मीकांतु : हा तुझाचि मनोरथु
परी कृपेवांचौनि कैवल्यनाथु : कव्हणा वस्य नव्हे १६१०

कृपावसें जगदेस्वरु : होए उभयद्रीस्भौं अवतारु
कृपेवांचौनि नाहीं अधीकारु : ज्ञान–प्रेमासी³ १६११

---

१ क्ग. मुख्य. २ क्ग. ० ३ क्ग. 'दर्या.

कृपावर्से श्रीचक्रधरु : करी मायापुराचा अंगीकारु
तोडावेया संसारतरु : माहादुर्घटु १६२२

कृपावर्से चैतन्यनाथु : अवतार धरी श्रुष्टीआंतु
दाखवी आपुल्या कैवल्यपथु : जीवजातांसी १६२३

कृपावर्से परमेश्वरू : जाणवी परज्ञानवस्तुवीचारू
तेणेंवीण संसारतरू : कहीं न तुटे १६२४

कृपावर्से लक्ष्मीकांतु : ब्रह्मवीद्येचा धरूनि हातु
बीजें करी अनाथनाथु : भूमंडळासी १६२५

जैं कृपावर्से आनंदकंदु : करी प्रबोधेंसीं संवादु
तैंचि तुटे अवीद्यावंधु : मायामोहाचा १६२६

कृपावर्से कैवल्यनाथु : होए सर्वात्मकु सर्वातीतु
प्रेम देयावया जगीं समर्थु : आणिकु नाहीं १६२७

कृपावर्से ईश्वर कटाक्षीं सरळीं : अनुचरां आनंदाची करी[3] दीवाळी
जो राणिव भूजे कैवल्यमंडळीं : अहर्निसी १६२८

कृपावर्से ईश्वरु स्वलीळा : अवतरे परब्रह्माचा पुतळा
तैंचि तराय ये सकळकळा : साहीत्य-संगितासीं १६२९

कृपावर्से ईश्वरु शब्दीं सप्रेमळीं : दाखवी कैवल्यसुखाची नव्हाळी
जो आत्मारांम सर्वकाळीं . सर्वातीतु १६३०

जैं कृपावर्से अपरांपरू : करी सर्व शक्तींचा अंगिकारु
तैंचि सुल्लभू होय सर्वेश्वरु : सर्वज्ञनाथु १६३१

---

१ कखग. आपण॰. २ घ. अनतु॰. ३ घ *

## करुणेकडून परेची प्रशंसा

मग करुणा परेतें म्हणे : तुझें महीमान देओचि जाणे
मज नीरोत्तर केलें जेणें गुणें : तें सांघों नेणिजे १६४२

हे परावर-वीवेक-वाणि : तुजवांचौनि नेणे कव्हणी
शक्तीमाजि सत्रीया सीहांणी : माहात्रीत्पन्न १६४३

उदार्य होए हातें मोकळें : देतां न पुरती[1] सकळ फळें
परि प्रभुचरीत्रें रसाळें[2] : बोलों नेणे १६४४

सौंदर्य होए सर्वांगीं बरवंटु : नेहाळितां[3] सदा अवीनाश अवीटु
परि बोलौनि नव्हे घनवटु : तुझेनि पाडें १६४५

लावण्य होए रुपें राजस : कंदर्प करी तयाची आस
परि बोलौनि पुरउं नेणे भडस : चराचराची १६४६

सौभाग्य चातुर्याचेनि सौरसें : मन्मथा लावी कांमपीसें
परि परशास्त्र तुझया ऐसें : नीरोपुं नेणे १६४७

दया दातृत्वें होए उदार : देतां न वीचारी सानें थोर
परि परज्ञान बोलौनि प्रचुरं : तेही नव्हे १६४८

माया मनोधर्में मानसीं होए कोवळी
जीव उधरावे हाचि हेतु सर्वकाळीं
परि परशास्त्रसीधांताची नव्हाळी : दाउं न शके १६४९

मी प्रेम देयावया होए प्रधान : परि नीरुपुं नेणें परज्ञान
हें बोलावया माहात्रीत्पन्न : ईश्वरीं तुंचि एकी १६५०

कृपा जरि म्हणों नेणती : तरी तीए वस्य होए कैवल्यपती
ब्रह्मवीद्या मुक्षकरुनि सर्वशक्ती : तेचि कारण १६५१

---

१ घ. नुपरती. २ कग. सरळे. ३ कग. नीहा.[4] ४ चतुर.

जें जगदात्मयाचां मांनसीं : सदासर्वदा असे अहर्निसीं
तीयेचेनि योगें सर्व दोसीं : रीगावा नाहीं १६५२

कृपेचा देखौनि गुणवीशेखु : आपणें वस्य होए परमपुरुखु
म्हणौनि जीव उद्धरावे हाचि उलेखु : नीरंतर १६५३

सवीसेख नेणिजे कृपेची थोरी : जे वसे जगदात्मयाचां अंतरीं
तें जाणावया परे चराचरीं : तुंचि यकी १६५४

ते जगदांबिका भावप्रभावीं : स्नेहें झळंबौनि अच्युतातें वीनवी
मग ज्ञानप्रेमाचे मेघ ओळवी : आर्त्त जनावरी १६५५

कृपा आदिपुरुखाचें अधींग : तीय पासौनि प्रकटती मोक्षमार्ग
अवीद्याछेद करुनि संमर्थ चांग : ईश्वरीं आणिक नाहीं १६५६

ईश्वर होए व्यक्तिमतु : हा कृपेचा पुरुषार्थु
सर्व शक्ती स्वीकरी अनतु : तीयेचेनि योगें १६५७

कृपेचीया सगती कैवल्यनाथु : जडाचेतनासीं सांधे मातु
हा मीयां जांणितला परसीधांतु : परे तुजपासाव १६५८

जें नीरंतर व्यक्तीं अव्यक्तीं : परब्रह्मातें न वीसवे कृपाशक्ती
तीयेतें परे म्हणतां नेणती : अज्ञान आपवजैल १६५९

तुवां कृपेचें महीमान : नीरुपिलें अती गहन
जेणें चमतकरे मन : महंताचें १६६०

भणौनि कृपा होए वीत्पन्न जाणंती
जीयेसी आत्मारांम करी परमप्रीती
तो संदेहो तोडौनि तुवां पराशक्ती : मज सुखीयें केलें १६६१

---

१ ल आपुण. २ कग. उल्लेखू.

श्रींगार होए रसाळ नेटका : व्यक्तीं आवडे आदिपुरुखा
परि ब्रह्मवीद्येचा आवाका : बोलों नेणे १६६२

कळाकौसल्य आपुलां गुणीं : पुरवी अष्टभोगांची आणी[1]
परि कैवल्यस्वरुप वाखाणी : ऐसी मति नाहीं १६६३

साहीत्याचेनि संगें सवीकार : वेधवंती होए कांमातुर
परि ब्रम्हवीद्येचें गहींवर : नीवडुं न शके १६६४

वीव्यासु होए देट्टुगा[2] नागरू : जो नवरसातें म्हणे पारू
परि ब्रम्हवीद्येचा सारेधारू : सांघों नेणे १६६५

क्षेमां आपुलेनि अंगें : रजस्तमातें म्हणे उगें
मदमत्सराचें दळ भगे . देखतक्षेओ[3] १६६६

शांति होए सत्वागळी : जे रागद्वेखातें जाळी
कामक्रोधु दोन्ही नीर्दाळी[4] : वेळु न लगतां १६६७

भणौनि परे एचि अर्थी : शांति क्षेमा प्रचुर बोलिजती
परि ब्रम्हवीद्येची वीप्पती : आथीचि ना १६६८

भक्तासि रति अनभूति दोन्हीं : सुखदायका होति साध्यसाधनीं
परि ब्रम्हवीद्या नीरूपीतां कैवल्यदानी
परे तुतें प्रधान करी १६६९

मज पांतां तयाचा ठाइं : बोल्ती सांमग्री नाहीं
मग वीज्ञानशक्ती काइ : म्हणावें असे १६७०

संगीत सीहाणें होए मनेंमानसें चैतन्यातें नीवजी शब्दें सुरसें
परि परज्ञान मधुर गोडिसें : समर्थु नेणे १६७१

---

१ कग. आइणी. २ ग दाट्टुगा. घ देटंवा ३ ख. 'खेओ.
४ घ. निर्वाळी.

रूपश्री होए आंगें आठाइती : साजिरी भणौनि स्वीकरी लक्षमीपती
परि ब्रह्मवीयेची अभीनव द्रुती : काढुं न शके १६७२

तेजश्रीयां प्रकाशाचा पाडु : जीएचेनि त्रीभूवना होए उजीएडु
परि परावर या दोहींचा नीवाडु : करूं न शके १६७३

वीरश्री होए प्रतापें प्रचुर : जीयेचीया कोपाखालि न स्हाति माहावीर
परि ब्रम्हवीयेचें जीव्हार : भेदुं न शके १६७४

विजयश्री होए सदा यशवंत : अपेशातें हाणौनि पाडी नीभ्रांत
परि ब्रह्मवीयेचें ज्ञान चरितार्थ : करूं नेणे १६७५

सेहाणिवेचेनि योगें मज पांता : घनवट होए सखोल्ता
परि ब्रह्मविद्ये अर्थी सर्वथा : जांणती नव्हे १६७६

सदा सर्वदा असे अच्युतीं : वीदेह माया व्यापारती
परि एयाज्ञान पराशक्ती : आथीचि ना १६७७

जे निरंतर अव्यक्ताजवळी : नीत्यसंबंधें असे केवळीं
परि आगाध स्वरूपीं[2] कव्हणी काळीं : देखिलें नाहीं १६७८

कृपावसें सुद्ध चैतन्याची गवसणी : जीवांकारणें अंगीकरी श्रीचक्रपाणी
परि ब्रम्हवीया परशास्त्रातें परावाणी : तुवांचि बोलावें १६७९

करुणा चातुर्यें नीपुण : कुशळता होए सवीया सगुण
परि परज्ञान बोलौनि प्रवीण : म्हणुं नैये १६८०

आत्मत्व अदिकरुनि प्रसंन्नता : अनंत धर्म वोळगती अच्युता
परि ब्रह्मवीयेचें कार्य सर्वथा : देखिजे ना १६८१

---

१ कखग. °श्रीये. २ खग. स्वरूप.

विस्वरुप मुख्य करुनि अष्टधा प्रकृती :
सेखसायों ब्रम्हादीक चेतनाशक्ती

या शुद्धचैतन्याचे पार नेणती :
मग ईस्वर काइ म्हणावें असे १६८२

जरि म्हणुं सील्पदेवता : तरि तीया न देखती कैवल्यनाथा
असो हे ते गोष्टि करावया आतां : कारण नाहीं १६८३

म्हणौनि परज्ञान बोलावया अर्थीं : परे तुजवांचौनि नाहीं जांणती
जीव उद्धरावया कैवल्यपती : तूतें प्रधान करी १६६४

जे सविया डोळस देखणी : जाणे जगदारमयाची खावणी
ते ब्रम्हवीद्या तुझी सांघातीणी : येर काइ सांघों १६८५

ते सवांगी वेल्हाळी वीत्पन्न : गांभीर्यें आथीली गहन
कैवल्यें परब्रम्हावांचौनि आन : बोलों नावडे १६८६

कृपावसें देओ आनंदघनु : आधीं ब्रम्हवीद्येसि दे मानु
कां जें तीयेवीण भक्तजनु : उद्धरे ना १६८७

आगाधे स्वरूपीं अनमीत्तबंधु : कृपेसि करी गोष्टि संवादु
मग ब्रम्हवीद्येचा हातु धरुनि कैवल्यकंदु :
त्रीयंसा वीर्जे करी १६८८

तेय केवळीं[3].कैवल्यपती : स्वयं अंगीकरी ज्ञानशक्ती
पाठीं प्रबोधु पाचारिती : जाणिवेसहीतु १६८९

तया ईस्वरें देऊनि मानु : परे तुसीं[4] बोलें जगजीवनु
तुआं उद्धरावा आर्त्तजनु : आपणपें देउनियां १६९०

---

१ कग. 'संया. २ ग. * ३ कग. केवळ ४ कग. तुजसी.

ब्रह्मवीया मुक्षकरुनि ज्ञानशक्ती : प्रबोध जाणिवे[2] सांघातें असती
वीवेक सदा वोळगे तुझी प्रवृत्ती : आज्ञाधरु होये १६९१

उदार्य सुंदर्योसीं करी वीचारू : आंम्हीं परेचा सांघात धरूं
इयेचेनि प्रसादें पाओं परमेस्वरु : आगाध चक्रवर्ती १६९२

[1]लावण्य सौभाग्यातें म्हणे : परा प्रधान केली जीवोद्धरणें
आतां अपुर्व सुख सुहावणें : पाओंनि आम्हीं १६९३

साहीत्य श्रींगारेसीं बोले संवादु : आम्ही भोगुं नीचनवा नीजानंदु
जीउ उद्धरावया कृपासींधु : साकारु जाला १६९४

शांति क्षेमेची पाहे वास : संगीत वेधवंतीयसीं बोले सुरस
कळाकौसल्यातें म्हणे सुख अविनास :
आम्हां प्राप्त जालें १६९५

रती अनभुतीचा पुरे हेतु : साकार जालयां सर्वज्ञनाथु
अनुरागु आर्त्तीसीं सागे मातु : शास्त्र–संवादु करी १६९६

चातुर्य आपुलेनि चौरसपणें : अष्टभोगांसीं करी बोलणें
नवरस उपमती थोरें मानें : अल्हादु होए १६९७

दयामयेची पुरे भडस : ब्रम्हवीद्या होए सत्रीया राजस
ज्ञानशक्तीचें तोखे मानस : आनंदु प्रकटे १६९८

गांभीर्य घनवट गहनता : सदा सांघातें असे सखोलता
साही रीतु बोलती आनदभरीता : एकीमेकीसीं १६९९

मळ्यानीळाचेनि स्परीसें : मदन आपलवे मनें मानसें
तेजश्री द्रीष्टी करी सुधे[3] प्रकाशें : चराचर . १७००

---

१ कग. मुख्य. २ कखग. 'वेसी. ३ कग. शुद्ध.

रुपश्रीयेचा पुरला मनोरथु : आंमतें स्वीकरी कैवल्यनाथु
म्हणौनि वीजयश्री[1] सांघे सीधांतु : स्नेहें झळंवौनि १७०१

नीरंतर परे तुजपासीं : स्वस्तता असे अहर्निसीं
सुखश्रये[2] दोन्ही शब्दासरीसीं : एओं लागती १७०२

तुजपासौनि प्रसन्नता : वेगळी नव्हे सर्वथा
द्रीष्टीपुढां कुशळ्ता : खेळती असे १७०३

ऐसें केवळीं कैवल्यपाळें : कृपावसें भक्तिवछळें
जडवर्ग[3] स्वीकरूनि परे वेल्हाळे : तुज प्रधान केलें १७०४

मग सुध चैतन्यांतें स्वीकरीती : विश्वमुल्य करुनि चेतनाशक्ती
मायापुरवार्या होय कैवल्यपती : सर्वज्ञनांयु १७०५

ईश्वरीं जीउ उद्धरावयाचें वेसन
भणौनि नीरुपिती ब्रम्हवीद्या परज्ञान
तें बोलावयाकारणें केलें प्रधान : तुतें पराशक्ती १७०६

ऐसें परे तुझें आगाध महींमान : जाणे कैवल्यस्वरूप आनदघन
तुजवांचौनि नेणिजे साध्यसाधन : जगदेश्वराचें १७०७

तुं जैं प्रसन्न होसी परावाचे : तैं अज्ञान फीटे जीवजांतांचें
तुजवांचौनि कहीं न वचे : अन्यथाज्ञान १७०८

तुझें वर्णावया आगाधपण : परे मज तुचि आदिकारण
तुझेनि प्रसादें जालें श्रवण : ब्रम्हवीद्या परशास्त्र १७०९

ऐसें सप्रेमळ शब्द पराशक्ती . तुं आदरें बोलिलीसी मजप्रती
भणौनि रीगावा जाला सकळ सीधांतीं : परीसावया १७१०

---

१ कखग. 'श्रीएसी. २ घ. 'श्रीय ३ क. पड' ग. वड'

हा तुझा उपकारु परे : मी अहर्निसीं न वीसरे
जीयें साधितलीं बीजाक्षरे : आगाधें स्वरूपींचीं १७११

ऐसे सुहावे शब्द करुणाशक्ती : बोलौनि प्रणम्य केलें अतिप्रीती
मग आनंदें नीर्भर होउनि असे अच्युती : सदासर्वदा १७१२

हे परा करुणेची जीज्ञासा : आइकता तुटे अज्ञानाचा पासा
प्रेम होए ज्ञानीया डोळसां : म्हणे मुनि केशिराजु १७१३

—५—

## श्रीमुखवर्णन : सिंहावलोकन

हा परीसतां शास्त्रसंवादु : श्रोतयां उपजे केवळीं वेधु
हृदैं प्रकटे परंमानंदु : नीरंतर १७१४

हें आदरें करीती श्रवण : तया नीचारे जंन्ममरण
प्रतक्ष होए मुर्तिसगुण : दयावया कैवल्यपद १७१५

हें आइक्तां अंत:करणीं : प्रबोधु करी घररीगवणी
हृदैं प्रकाशे श्रीचक्रपाणी : कैवल्यनाथ १७१६

हें परीसतां परज्ञान : तुटे अवीद्याभवबंधन
जीवां प्राप्य होए आनंदघन : कैवल्यस्वरूप १७१७

हा वीसखीतां परसीधांतु : प्रतक्ष होए सर्वज्ञनाथु
भणौनि मज जाला मनोरथु : बोलावया १७१८

कृपा-कारुण्य दोन्ही जगजिरासें : स्वीकरीलीया ओटपुटांचेनि मीषें
जीव्हेचां ठाइं नीरंतर असे : परावाचा १७१९

---

१ क्त. सीद्धांतु

हा सखोल भाओ सप्रेमळु : आइकतां ए आनंदाचा कल्लोळु
जेणें तोखे प्रभु कैवल्यपाळु : आत्मारांमु १७२०

कारुण्यकृपेचा प्रतीवादु : तोडावया परा सोडिला नीबधु
भणौनि श्रुन जाला कैवल्यकंदु . तीयेचेनि प्रसादें १७२१

जे जगदंबिका जगदेश्वरी चराचर वस्तुचें ज्ञान करी
ते वरद केली अनुचरीं : नागार्जुनादीकीं १७२२

नागींद्रामुखें बोल्तता परज्ञान : ब्रह्मवीद्या वाचौनि न नीगे आन
तें मीयां आदरें देउनि अवधान : आइकीलें सर्वीसेख १७२३

स्वय श्रीमुखें श्रीचक्रधरें आपण : नागार्जुनाप्रति केलें नीरूपण
तें परिसावया परसीधांतलक्षण . तोचि पात्र १७२४

तया नागार्जुनाचा उचिष्ट प्रसादु : मज सेवितां लाधला सुखस्वाद
भणौनि वर्णावया कैवल्यकंदु नीर्मळ मति जाली १७२५

ते माउली सदा प्रसन्नवदन ज्ञानामृतें वोल्हावलें हृदयमन
वाचा बोलौनि नीवनी आनंदघन : ससारतप्तातें १७२६

ते स्वय झळ्वौनि स्नेहवसें . सुहावेया दीष्टी परेशें[1]
मग पेहें पाजी बोरसें : प्रसंन्नतेचें १७२७

ते दीष्टी प्रसंन्न अमृतसजीवनी : हृदें प्रकासली ब्रह्मवीद्या होउनि
तियेचेनि प्रसादें मज मूर्त्तज्ञानीं : बोलावया स्फुर्ति जाली १७२८

ऐसें स्नेहें[2] प्रसंन्नता जैं जोडे : तैंचि ब्रम्हवीद्या हातां चढे
प्रबोधज्ञानशक्तीचेनि उजीयडें . प्रकाशे कैवल्यमूर्ती १७२९

---

१ ख. परीसे २ क. स्नेहें.

तीयें मज दोन्ही जोडली सर्वथा
म्हणौनि अधरु वर्णिले माहावित्पन्नता
हा सखोल भाओ परीसावा श्रोतां : आदरे ब्रम्हवीदीं १७३०

ऐसें अधराचें[1] वीत्पादन : मियां वीसेखिलें अती गहन
साउमें असे कथाअनुसंधान : तें जाण अवधारीतु १७३१

सकुमारे वोटपुटें गोमटीं : जैसी चैतन्यें घडीली लावण्यरत्नाची पेटी
कीं सुंदर्यसुक्तसंपुटीं : सामावलीं कैवल्यरत्नें १७३२

तैसें तया अधराभीतरी प्रकाशवत : दंतपंक्तीची प्रभा फाकत
जैसी ज्ञानशक्ति उन्नत : सेवा जाणवीत असे १७३३

देखौनि दशनाचा नवलावो : हीरा सांडिला घणाओ
आनंदरती मागतसे पसाओ : हात जोडौनियां १७३४

आगाध दंतपंक्तीची कीळ : जैसी दीव्यशक्तीची[2] झव्हाळ
कीं ब्रम्हवीद्या वेल्हाळ : चवकती असे १७३५

## हास्य : जिव्हा

जैसें कैवल्यकमळ वीकासलें : तैसें इखीत हास्य केलें
कीं प्रसन्नतेचें फुल फांकलें : जगन्नाथें १७३६

जैसी अनभुति आकारली : कीं प्रवृति वीनउं आली
तैसी जीह्वा पढीयासली : मुखामध्यें १७३७

अवधारीं स्वामी जगन्नाथा : अनोदकें स्वीकरीजो[3] सर्वथा
मग एइल पवीत्रता : गोडियेसहीत १७३८

---

१ ख. आदराचें. २ ख. 'शक्तीचा. ३ कग. 'जी.

तुं नीत्यमुक्त नीत्यानंदु : देइं पंधरां रसांसीं संबंधु
तयौनि स्वीकरीता जाला कैवल्यकंदु : सकळ रसांतें १७३९

दातारें पाय सेविले : म्हणौनि पवीत्र पावन जालें
मग श्रुती नावें ठेविलें : अन्नब्रह्म १७४०

तीये रसनेचां अग्रीं : परा वाचा घरटी करी
तेथ रीगों न ल्हाए वैखरी : आपैसया १७४१

जेव्हळीं अद्रीष्टीं उपजे प्रवृत्ती तेव्हळीं वैखरीय मध्यें परा संचरती
मग ज्ञान देउनि उद्धरीती . मनुक्षातें १७४२

## तांबूल आणि पीक

जैसें कारुण्य करंबलें : कीं वीखयप्रेम कार्यासि आलें
तैसें तांबुळें रंगलें : सवियां सुरंग १७४३

जैसी अनुरागें वेधवती : करी ब्रह्मवींचेसीं परमप्रीती
तैसे अधर रंगले दीसती मज पांतां १७४४

कीं मुक्तीचा बोजां[२] : आत्मा चुघळीला ओजा
तैसीया फोडी वीराजा : मज दीसताती १७४५

कीं तो द्रवला प्रेमरसु · ज्ञानसुधेपासाव सुरसु
जैसा श्रीये श्रीरगा जाला वीळासु : तैसी पीक अधरावरी १७४६

## मिसरू

जैसा ज्ञानगंगेचा थडिवा : परमानंदु अंकुरैला निचनवा
तैसा मीसरू भीनला बरवा : कृष्णवर्णु . १७४७

---

१ क तांबोळ. २ कग बोझा.

कीं कैवल्यकुसमावरी : मकरंद महुरैला तारुण्यभरीं
कीं मुनिजनभ्रमरांचीया हारी : एती मुखकंमळासीं १७४८

तो सकळ पुरुषार्थे सवळु : मीसीयां घाली वळु
तरि कोपा आगळा माहाकाळु : कपोंनि जाय १७४९

तो तरि निराभिमानु नीर्वीकारु
परि आपुलेया कारणें मीसीयावरि ठेवी श्रीकरु
ते देखौनि कृदांतु संसारु : मनीं शंकला १७५०

ऐसा वोलतां प्रतापु : श्रोतां न करावा अक्षेपु
मी सांघतसें आटोपु : आमुलेपणाचा १७५१

## कविता : श्रोता : वक्ता

सखोल नासांपुटांचे भाव वानितां : चढवीन सुखाचीया सरिता
सर्वांगीं सात्वीक प्रकटती भक्तां : सप्रेमळांसीं १७५२

सांवैन सकळ सीधांताचें[2] जीवन : श्रोतां परीसावें देउनि अवधान
अपूर्व भाओ बोलावया माझें मन : आल्हाद करितुसे १७५३

जैं पुर्णचंद्र श्रोतां जोडे : तैं साहित्यसमुद्रा भरितें चढे
नातरि अज्ञानवडवानळें आखुडे : वेळु न लगतां १७५४

देखुनि चातकाची आर्त्ती : आदरे मेघ वरीखाओ करीती
तेवि सचाडां श्रोतयाप्रती : वक्तयां बोलों आवडे १७५५

नातरि जाणौनि सुधारसाची गोडी : चकोरचद्रेंसीं धरणें मांडी
तें देखौनि अती आवडी : कळावंतु अमृत श्रवे १७५६

---

१ क. आमोले २ घ. सीधाचे.

तैसें सुजाणाचेनि योगें : कविता साहित्यसंमुद्रामाजि रीगे
मग अपुर्व भाओ दाउ लागे : शब्दरत्नाचे १७५७

म्हणौनि आर्त जोडे श्रोता : तैं रूप होय सकळ सीधांता
येऱ्हवीं अपत्राप्रती बोलतां : वायां जाये १७५८

जैसें नागराचेनि फाळें खरडबरडें[1] : उलथौनि घालिजती येरीकडे
घाते वाफे पेरिल्यां परी[2] बींवुडे : अंगीं कष्ट उरती १७५९

बैलाचेनि योगें अपार : वाहावळु कष्ट करी थोर
अवळसवळे पडे वेरझार : सेवटीं दुखीया होए १७६०

दुणिजे तिगुणिजे सरिसे : कांसीया बाहिर घाली आयासें
जरि[3] तें पीकों नेणे कुभचासें : सुक्षेत्र नव्हे १७६१

तैसें अपात्राप्रती अनुरागें : बीजाक्षरे बोलिजती सुरगें
तें वायाचि जाय आवघें : आपणयां सुख नाहीं १७६२

नातरि नपुंसका हातीं : स्त्री लाविजे सौभाग्यवंती
तो[4] भोगावया परमप्रीती : पात्र नव्हे १७६३

जैसें बहिरयाचां पाटणीं : ब्रम्हवीद्या निरोपिजे परावाणीं
परी तो अनधिकार्यांसीरोमणी . परिसावया योग्य नव्हे १७६४

अथवा जात्यधाचां नगरीं : लावण्य श्रुंगारेसीं बीजें करी
तें नीहाळावें कवणी परी : नेत्रेंवीण १७६५

सवियां सुह्यावें[5] सुखदायकु : मुकेया चाखों देइजे पीउखु
तें सांधों नेणे सवीशेखु : गोडी तयाची १७६६

---

१ घ. 'वडें. २ घ. # ३ कखग. परि. ४ कग. ते. ५ घ.#

अमोलिकां रत्नांचें लेणें : मर्कट केवि मीरउं जाणे
तया पात्र होती चतुर सीहाणे : कुमर चक्रवर्तीचे १७६७

अनेगी अपार पुस्पजाती : नाना परिमळें बाहाकाती
तया भवरूवांचौनि परमप्रीती : भुंजों नेणे १७६८

सकुंमारें कनककंमळें : वीकासती परिमळबहळें
तें भोगावया कर्कश काउळें : पात्र नव्हे १७६९

जळीं असौनि पानकुकडीं : पाणियामाजी देती बुडी
परि सुवासा कमळाची गोडी : कहीं नेणती १७७०

सुहावे सोनेकेतकीचे हाते : दीसती मकरंदे उद्घाते
तेथ अळिउळवांचौनि भोगते : वायोंस बोलों न येती १७७१

जाइजुइ चांपे[१] मांदारु : बकुळ पाडळ कुंकमकेशरु
सेउं जाणती भोगि[२] भंवरु : तीहीं काळीं १७७२

भंवरासारिखे काळे : होति सपक्ष गोमीसळे
परि परागाचे सोहळे : भुंजों नेणेति १७७३

वर्णसाजार्ये सावडे : वनीं वीचरे कुंभारकुकडे
ते अमोदाची पारखी फुडें : केवि जाणे १७७४

बचकुंदें मोगरे मालती : सुवासें सतपत्र सेवंती
ते भोगावया अतीप्रीती : एक खटपदचि होये १७७५

अथवा आठें आंगीं ढळतें सुढाळ : रानटां हातीं देइजे मुक्ताफळ
ते काइ जाणे रत्नजाति केवळ : ठीकवणियांवांचौनि १७७६

कस्तुरियचा वीणा अलौकीकु : केवि वोळखे गंवार मालकु
तो जगीं जाणावया समर्थ एकु : नृपचक्रवर्तीचि होए १७७७

---

१ ख. आबेयाचें. घ. आबेरेया. २ कग. भोगिए.

कापुर परतौनि सुवासें चंदनें : पींसया देइजे मर्दनामादनें
वरि खडुरसीं वाढिजे बोर्णे : तें वायांचि जाये १७७८

जवादि पांमराचां भांगीं : भरिली जाय वाउगी
तेवि मुर्खाचां संयोगीं : शास्त्र बोलों नए १७७९

सुगंधा मुखाश्रयाची गोमटी : सुक्रा सर्वांगीं दीजे उटी
ते वायांचि जाय सेवटीं : अपात्र भणौनि १७८०

एक्षकर्दमें सरिसा : डवरीजे चतुर्पद म्हैंसा
तेथ उपभोगु बोलों नये जैसा : पात्रुत्वेंवीण १७८१

तैसें मुर्खाप्रति बोलतां : शब्दाचें रहस्य जाय सर्वथा
भणौनि आर्तु पाहिजे श्रोता : परीसावया १७८२

जैसें चंद्राचां चंद्रकीर्णीं : सोमकांता द्रवे पाणी
तेवि वक्तयाचां मीळणीं : श्रोतयां सुख होए १७८३

नातरि द्रावकाचीया संगती : लोखंडा पाझर सुटती
तैसे वक्तयांचे बोल नीववीती : श्रोतयातें १७८४

सूर्यकराचेनि प्रकाशें · कमळांचें वांवळ वीकासे
तेवि श्रोतयाचें मन उल्हासे : वक्तेयाचीये भेटी १७८५

पुनीवेचेनि चद्रबींबें परीपूर्णें : चकोरां होये चंद्रकरांचें पारणें
तेवि वक्तयाचेनि दर्शनें : श्रोतयाचें हृदय नीवे १७८६

अथवा जळधरे वरीखाओ केलया : अतरीं समाधान होए बापया
तेवि वक्तयाचीये भेटीं श्रोतया : अपुर्व जोडे १७८७

जालयां वसंताचा उमाळा : कोकीळ आळापु करी सरळा
तेवि वक्तयातें देखुनि डोळां : श्रोतयां हरीखु होये १७८८

---

१ कग. ना तरी.

कमळाचां[1] उद्यानवनीं : भ्रमराची पुरे आणी[2]
तो जेवि मकरंद अस्वादनीं : सुखीया होए १७८९

तैसें बोलावया होए पात्र : तया नीरुपिजे सकळ शास्त्र
जैसें वाटे[3] पाहे सुक्षेत्र : बीजा उदकाची १७९०

वाहावळें उदकाचेनि योगें : सुभुमीं बीज पेरू लागे
तें नीगालया भग्रीस्थ साधे : पुढीला पीकाचें १७९१

तें देहे दीसवडां आगळें : वाढत दीसे सरळें
घुमरीसीं उठी येके वेळें : भार आतौनि पीके १७९२

पहीलें पेरिजे स्वल्पथोडें : पाठीं आणावया लागती गाडे
मग वाहावळाचें फीटे सांकडें : सुखीया होए १७९३

तैसें पात्राप्रती नीरुपण : करीतां ईश्वरीचें पुरे वेसन
तो ज्ञानप्रेमावांचौनि आन : जोडुं नेणे १७९४

बोलिजे स्वल्प साधारण : तव परीसावया पुढां धावें मन
जैसें तळेवां लाविलेया चदन : सीतळता सीरां जाये १७९५

म्हणौनि नीरुपितां लीळाचरीत्र : परीसांवया पाहिजे क्षेत्र
तें वायां न वचे पवीत्र : ब्रह्मवीद्या • १७९६

जैसें आस्वीनीचेनि[5] चंद्रमडळें : रस्मी सारद्रव होइजे मळयाचळें
मग फुटति[6] कमोदें परीमळवहळें : बांवने बोलिजेति १७९७

नातरि कापुरकेळीचां गाभा : स्वे चद्रकरांची प्रभा
ते मुरालया दीसे सुवास सोभा : तयातें पोतासू भणिजे १७९८

---

१ कग. ना तरो' २ कग. आइणी. ३ कग. वास
४ कग. ना तरो' ५ ख आसीनीयेचेनि. ६ खघ. स्फुटति.

तो भोगावया समर्थ थोर होति राय-राजकुमर
तेथ काइ लागती मूढ गवारु हृदयसून्य १७९९

जें जाणिजा नीपुण कळाकौसल्यें प्रवीण
आपुली वाहारीती आण जगान्तरीं १८००

जे रूपें नागर गुणें गभिर
सौभाग्यें सुदर आठाइती १८०१

जे कुशळता पुरतें बुधी आगळे जाणते
दृष्टीं आकर्खिती मनातें रसाळाचेया १८०२

जो सर्वांगीं बरवट देति विळासाचें पुट
निखो भोगुनि सुभट सर्वार्थी १८०३

जे हातें उदार पदार्थे अपार
मुखें मनोहर नीहाळीता १८०४

जे रसीं रमते भोगीं भोगते
सुखीं सरतें सदासर्वदा १८०५

जे आसनीं नीट सयनीं घनवट
जातिवीखें अवीट वीटति ना १८०६

जे डोळा देखणें कानीं आइकणें
अतरीचीये खुणे रूप करीती १८०७

जे अंगीं नीके बोलीं बोल्कि
शब्द नेटके परीसो जाणती १८०८

जे उचीतीं दाते त्यागीं भुगते
हृदइ जागते सदासर्वदा* १८०९

---

* ही ओवी क प्रतीत नाही

ऐसे रहस्य-रंगु जाणने : भेटती सुजाण श्रोते
तरी कवितेया चढे भरितें : ज्ञानामृताचें १८२०

आतां परज्ञान जांणिवेचां चंद्रुकरीं : उन्मेख-मळयाचळाचां पाठारीं
सीधांत-कमोद विकासति ते अनुचरीं
अवग्रहण करावीं १८२१

लीळाकापुरकेळीचां गाभेवनीं : सुरे मूर्तिचंद्राचें पाणीं
तो पोतास नीहाळावा जाणीं : प्रमयवहळ १८२२

प्रकासौनि परसुखाचें चांदिणें : उठवीन संतचकोरांचें धरणें
मग सपांती करवीन पारणें : ज्ञानामृताचें १८२३

योगींद्रहृदयजळीं परीमळवहळें : साहित्यसुर्याचेनि मंडळें
वीकासिन ब्रम्हवीयेचीं कमळें : मुनिजनभ्रमरांलागी १८२४

अगाधा परशास्त्रसरोवरा : माजि दाविन वेधबोधाचा भंवरा
कैवल्यकंदाचा वांटीन चारा : भगतराजहंसासी १८२५

प्रेमकुसमाचेनि मकरंदजळें : भोजें नाचवीन मुनिजन आळिउळें
भक्तिमूखाचे पुरवीन सोहळे : आर्त्ता अनुचरांसीं १८२६

वनरर्ता साधुचातकांलागी : परमानंदाचे मेघ जगीं
ओळविन कथाप्रसंगीं : म्हणे मुनि केशिराजु १८२७

—६—

## नासावंश वणन

असो हे प्रमेयरचना : जेणें सतोखू होए श्रोतयांचीया मना
तो नासावंशु वानु जगजीवना : जगदात्मयाचा १८२८

जो मळयानीळाचा अधिष्ठाता : योगी[१]-हृदयकमळ भोगिता
ज्ञानप्रेमाची प्राप्ति करीता : कव्हणी न देखे १८२९

जो विश्वचैतन्यासि परू : सकळ सीधांता आगोचरू
तो देखिला सर्वेश्वरू : दैवभाग्यादीकीं १८३०

जो सेखसैया नीर्धारीतां : ठाउका न पडे नीरुता
वेदां चातुर्ये स्तवीतां : गोचरू नव्हे १८३१

जो कैळास वैकुंठ सत्यलोकीं : ब्रह्मयां नुमाणे चतुर्मुखीं
तो केवि जांणिजे इंद्रादिकीं : आगाध अपरांपरू १८३२

जो शक्तिचक्रासि अतीतु : गुणधर्मां वेगळा रहीतु
तो भक्तजनां जाला दृष्टभूतु : कृपावर्से १८३३

जो सौंदर्याचा सरळु : वेसाकार वर्तुळु
तो नासादङु घेतसे परीमळु : मुखकमळांचा १८३४

कीं ते महताची कुळेश्वरी : जे अखंड आराधिजे अनुचरीं
ते प्रतक्ष जाली चराचरीं : लीळावर्शे १८३५

तो सुखश्रीयेचें मंडण : लावण्यासि आदिकारण
सौभाग्या आलें बरवेपण : जयापासौनि १८३६

तो श्रींगाराचें सीर : रूपश्रीयेचें मंदिर
बरवेपणाचें जीव्हार : आणिक नाहीं १८३७

तो सौंदर्याचें प्रावर्ण : अष्टभोगांचें भूषण
चातुर्याचें स्वरूपलक्षण : तोचि एकु १८३८

---

१ कख्रग ॐ

तो नवरसांचें नीधान : परिमळांचें जीवन
जेणें रूपा आणिलें वीळासवन : अवग्रहणमात्रें १८३९

तो सकळ अवेवां आदिगुरू : कळाकौसल्यें मनोहरू
जेणें सरता केला श्रींगारु : तीहीं लोकीं १८४०

तेयाचेनि आदिलक्ष्मीं बरवी : दीसे श्रींगारली सुहावी
सेहाणिवा[१] आपणयातें दावी : शृष्टीमध्यें ·· १८४१

ते मायापुराचें मुख्यपीठ : गांभीर्यें आथिलें घनवट
जयाचेनि दीसे बरवंट : शुद्ध चैतन्य १८४२

ते श्रीमूर्तिचें आभरण : जयाचेनि साजिरे सकळ गुण
योगियां फावे सुष्टरमण : तयाचेनि योगें १८४३

तें नवां नीधींचें माहेर : सर्वसुखाचें भांडार
अष्टमाहोसीधीचें[२] नीरंतर : भावें वोळगती १८४४

कीं तो वेधवंतीयेचा कुवासा : जेणें जनु केला प्रेमपीसा
भीतरील भाओ सांघों कैसा : सप्रेमळ १८४५

कीं तें आनदरतीचें साबरे : सतसुमनातें सेत्री आदरे
कीं मोक्षप्रेमाचे ओवरे : मुर्त्त जालें १८४६

कीं तो ब्रह्मरसु नीर्मळु मायामुसें ओतला सरळु
कीं परमांनंदु आकारला केवळु : नासावंशवेखें १८४७

कीं कैवल्यदुर्गामध्यें मंदिरें : ब्रह्मईश्वराचीं वेगळालीं सेजारें
तया भितरि यतीं–जातीं द्वारें : पाडिलीं जैसीं १८४८

---

१ घ. सेहाणिव   २ घ. अष्टमा॰

अभिन्नवें स्वास-उस्वासाची गती : जैसी कृपा बाहिर नीगाली मलपती
नीर्गाळलेयां जीवातें धरूनि हातीं . मेळवी ब्रह्मस्वरूपीं १८४९

की राजहसाचा पाउलीं : कारुण्य वेल्हाळतें आली
मग आंनदाचां ताटीं आर्त्ती केली : भक्तरायासीं १८५०

करुनि सर्वसुखाची कुरवंडी : तयातें ओवाळुनि सांडी
मग धरुनि दर्डी : चाले साहित्यसाबरयाआंतु १८५१

तया चालतां चरणातळीं आनंदाचीया गादिया रसाळी
तें सुख नाहीं कव्हणी काळीं : ज्ञानीयासी १८५२

तया साहित्यसाबरयाचा गाभारा बरवा
जेथ भक्त आंनद अनुभवी नीचनवा
तो सूखादिकीं परीसावा : सावध होउनियां १८५३

तया सुखासि नाहीं अंतर : सरुपातें देखे समोर
तेथ भेदु-अभेदु ऐसा विचार : करु न एति १८५४

तेय नाहिं व्यक्ति आकारू : परी तो अतीइंद्रीयाचा व्यापारू
जीवांसी सपादी सर्वेश्वरु : सुख भोगावया १८५५

तेथ भीन्न ऐक्यता . दोन्हीं दिसती उन्नभता
ऐसेया धर्माची वीरूधता : तोचि जाणे १८५६

तीये आंनदरतीचां सेजारीं : भक्त जाणे ईश्वरसुखाची थोरी
तें जोडलें सर्वप्रकारीं नागांनिकेसीं १८५७

---

१ घ अभिन्न. २ फ. वेल्हाळवंतु. ख. 'ळवत.

## कपोलद्वय

पाहावेया रूपाचें देटुगेपण : सौभाग्यें केलें लावण्याचें दर्पण
तैसे कपोळद्वय सलक्षण : मज गमले १८५८

कीं ते सुखसामर्थ्याचे आरिसे : साहित्य–संगितें उटिले जैसे
तेवि कपोळाची प्रभा प्रकाशे : माहाउत्तम १८५९

जैसा स्नेहसंमुद्र उचंबळला : तैसे बींद एती कपोळा
ते लोब्रत दीसती उमाळा : सुर्यकरांचा १८६०

कीं ते स्वेदाची करूनि प्रतिभींती : ब्रम्हरसु आला व्यक्ती
तया सुखाचा अनुभउ जाणती : भगतराजहंसु १८६१

कैसे सोगाळे प्रसन्न : आकर्णपर्यंत कृपालोचन
तें न वर्णवे जन्मस्थान : प्रेमशक्तीचें १८६२

परि ते कृपालु माउली : स्नेहवसें याचेसि आली
भणौनी बोलतसें बोबडां बोलीं : महीमा डोळयांची १८६३

जें देखणे सकळ शास्त्रीं : होति शब्दरत्नांचे भाव्री
ते पारखीतु नीकया परी : बोल माझे १८६४

## नेत्रकमळें

सकरुणे अच्युताचीं नेत्रकमळें : जैसीं ब्रम्हतेजाचीं[1] दैवफळें
कीं सुध–चैतन्याचीं सुनीळें : चोखाळलीं १८६५

तया नेत्रकमळांचीए पातां : दीसेति परंमानंदाचें प्राग उघळतां
तेथ भोगिया भव्रु भगतां[3] : वांचौनि नाहीं १८६६

---

१ का. 'विद्येचीं. २ घ. * ३ घ. भोगता.

तया पक्ष-सरोजावरी उधाती : आनंद-मकरंदाची द्दती
म्हणौनि झाका वरी पडती : मुनिजन-भ्रमराचीया १८६७

कीं प्रेमदान देयावया उतावेळें : तैसी ढाळु देताति बुबुळें
भवते शक्तिचक्राचें मादियाळें : तैसी दीसे रोमावळी १८६८

कीं ते मज गमलें ऐसें : पीसयाचीं करुनि मीसें
उदार्य चवरे ढाळित असे कनकदडें १८६९

घोंसाळीं श्रीनेत्राचीं पातीं : जैसी आकारली केवळ वेधवती
कीं कारुण्यें धरिली साति : कनकवर्ण १८७०

कीं प्रसन्नता वीसेखेसीं : वेगळी नव्हे अहर्निसीं
भ्रूसचीया जाली पीसी : प्रेमाल्हादीं १८७१

कीं प्रेमसमुद्रामध्यें जैसें : तळपताति भक्तमीनुमासे
तेवि भितरील बाउली पद्दीयासे . मज पांतां १८७२

कीं परमानंदु सीहांसनीं सुहावना
उपवीष्ट जाला कैवल्यमडळीचा राणा
तें देखौनि सौभाग्य जांणवीताय वीजना
सुदर्य दोहीं बाहीं १८७३

कीं नित्यमुक्तें नीरंतरीं : कृपा प्रधान केली व्यापारीं
तें प्रेम दयावया पाचारीं : अधिकार्यातें १८७७

कीं ते कैवल्यमंडळीचे[1] जाण[2] : स्वयं सुखवेधासि कारण
नीवारीती जन्ममरण : द्रीष्टिपातें १८७८

ते चराचर वीस्वमोहन . देखताति[3] त्रीभूवन
प्रेमावांचौनि आन . देओं नेणती १८७९

ते सुखदानी सुखदायक : सर्वकर्ते सर्वव्यापक
कैवल्यपद दयावया आणिक : दुजें नाहीं १८८०

ते साहित्यश्रृष्टीचे चालक · मूर्तीजवळि मुख्यनायक
पींड वम्हांडप्रतिपाळक . परमानदस्वरूप १८८१

तो मोक्षदायक दीव्यलोचन : नेत्रवीळास कमळनयन
सुधबुद्ध सर्व साधन : सीवी नेतें १८८२

कैसी द्रीष्टि सुहावी सरळ : जे समळातें करी निर्मळ
फेडी भ्रातीचें पटळ : अमृतश्रावी ते १८८३

ते कृपाकटाक्ष सरळ : धारा गळे तीखट वीसाळ
उपडीती अहंतेममतेचें मुळ : कदासहीत १८८४

ते अनियाळे अघनासन : तोडीति अविद्याभवबंधन
संपादिति सुखसाधन : साध्यासारिखें १८८५

---

१ क्रम. मंदिरीचे. २ ग. जन. ३ घ. देताति.

## भिवया

नागर भवैचें[1] वंकटपण : जैसें अनुरागा घातलें माजवण
कीं विकारा केलें वस्यकरण : वैराग्यासहीत १८८६

कीं तीया ईस्वरीचीयों[2] सुरेखा : वेधवोधाचीया साळांखा
नेत्रीं परा-अंजन सुआवया देखा : सदैवां पायाळासी १८८७

तें जोडे अंजन : तरी पाविजे कैवल्यनीधान
नीवारें जन्ममरण : पारुखे संश्रुती १८८८

की तया चक्षु-सरोजांवरी : मकरंदा सौरभ्य सांघों आली कस्तुरी
कीं मुनी-मळयानीळ गेले चांचरी : दोंदीलपणें १८८९

कीं मुक्तिमंदिरीचीं कवाडें सवळें : उघडावया कीजे वांकट उटाळें
तैसीं मीरवताति भ्रुमंडळें : आदिपुरुखाचीं १८९०

कीं भेदावया जीवांचे माहादोखु
वेधवंतीया हातुवसीलें सारंगधनुखु
मग दृष्टी-वाणा लाउनि देखा : विंधती असे १८९१

कीं सृष्टिसहारातें करीती : जया देयाची प्रवृत्ती
ते मुर्त्ति जाली शक्ती : भ्रुभंगवेखें १८९२

## डाव्या भिवईवरील कांदी

वर्णितां श्रीमुर्त्ति अवेव-शूधी : परी तयावेगळी दीसे कांदी
जे स्वीकरीली कृपानीधी : तें कथन करीन १८९३

---

[1] पाग. भवैयाचे. [2] पाठ ऐश्वर्याचिया.

ते चैतन्यसुखापासाव सुहावी : ब्रम्हपदापरीस बरवी
ते डाळीये भवैंवरि लोहवी : मीरवीति असे १८९४

तयां आपुलेनि बळें : दासी केलीया सकळ फळें
ब्रम्हवीचेवरी आगळें : करूनि असे १८९५

ते प्रेमाची सांघातीणी : शुद्धबेधाची साजणी
जे योगियांचां अंतःकरणीं : सदा वसे १८९६

कीं ते नीष्ठापूर्वक कृपा : उल्लेखु उपजवी स्वरूपा
मग अव्यक्ता आली अनुकंपा : सकळ जीवांची १८९७

तो नीर्वेड निराकारु : परि कृपावसें जाला साकारू
नीस्तरावया भवसागरू : जीवजातांसी १८९८

तो अवक्रीयु अविनाशु : कृपेसि जाला वस्तु
मग अवतरौनि केला नाशु : दुखभोगाचा १८९९

## भालप्रदेश

जो नीवृतीचा नीर्मळु : शांतिरसाचा नीसळु
कीं चातुर्याचा चौफळु : भाळप्रदेशू १९००

कीं ते अतील्य आकारलें : नीत्यत्व नीतळ नेटावलें
तैसें ल्लहाट मीरवलें : नीऱ्हां नीघोंट १९०१

तीये ललाट-प्रदेशीं बरवंटु : रेखिला कस्तुरिएचा मळिवटु
जैसा क्षेमें कौसल्या भरिलासे सपाटु : लावण्यश्रिया १९०२

---

१ कग. तीया.

### भालप्रदेशावरील पत्रवेली

कीं भाउबीजेचां दीवसीं : अर्धचद्रु उदैला आकाशीं
की चारा घातला नेत्रचकोरांसीं : महीमंडळीं १९०३

जैसी तेजश्री श्रींधारली : तैसी दीसे पत्रवेली[१]
कीं श्रीष्टिकरतेनि[२] मोहर घातली : देवमुद्रेची १९०४

की ते अवस्ता ठसावली : कीं जाणिव सुरेख उमटली
कीं जन्मपत्रीका लीहीली : ज्ञानिया-भक्ताची १९०५

### श्रीमुगुट

वानुं श्रीमुगुट गंभिरु : जो रूपश्रीयेचा श्रींधारू
कीं तो माहामहीमेचा मेरू : मंगळरूप १९०६

कीं तें ब्रह्मानभूतीचें सीखर : आत्मव येकवटलें अरुवार
मणौनि त्रियच-हननीं श्रीकरु : ठेविला श्रीमुगुटावरी १९०७

जैसीं कैवल्यदुर्गावरी अपारे : लखलखीताति कृपाशस्त्रें
तैसी कुरुळावळी विस्फुरे : माहां सुनिळ १९०८

परी ते नव्हेति केशकळाप : बांबळैलें नीळें ब्रह्मस्वरूप
कीं तें उघडलें मोप : विचीत्रशक्तीचें १९०९

कीं चैतन्य-चवरयावरी असमसाहु : आसनीं उपवीष्ट जाला प्रकासु
कीं भावप्रभावीं मांडिला रहीवासु : येकमेकेंसी १९१०

तीए श्रीमुकुटीं मुकुटमाळ वाखाणीतां : आणि पुरवीन वसंता
साही रीतु आनंदभरिता : भोजें नांचवीन १९११

---

१ कग. 'वल्ली. २ कग. 'कर्तेनि. ख. 'करितेनि ३ कग प्रकासु'

तया परब्रह्म-पार्यतकाचे आधारे : सुरवाडे मायामकरंदाचे मोगरे
धुमफस हांनताति घसरें : श्रीमुकुटावरी १९१२

सुवासें फुलांची पांती : जैसी वीकासली वीश्ववीजांची-सेजंती
तैसीं पुष्पें माझां चीतीं : पदीयासलीं १९१३

तया शतपत्रांचीया द्रती : अष्टदळ-कमळें जालीं सरतीं
माहानत्र वेधांचीया मालती : महीमा पातलीया १९१४

आनव वेधाची आरगुदीं[1] : हरीहरब्रम्हादीक पाडळ वचवुंदीं
वीरारे करीताति विनोदीं : इंद्रादिकांसीं[2] १९१५

अंतराळिचे रायचंपक : जाइजुइ-आंबयासी[3] करीताति बीक
वस्तुसंबधें पातले सुख : भणौनि अल्हादताती १९१६

तेथ मुनिजन-मधुकर : पीउनि मकरंदाची मदिरा
धुमाडि करीताति नीरंतर : रुंझि घालिताती १९१७

तेथ रीतुराओ मळयानीळु : माधवीयेसीं करी खेळु
ग्रीस्मीं घे आदळू · हीमवत रीतुसीं १९१८

सारदीएचा वरिखाओ : सीसी रीतुतें म्हणे सांभाळी आओ
माझा ओळखें भाओ : सकळ सामर्थ्यैसीं १९१९

ऐसे साहीत्यसंगितें घोळिले बोल बोलतां
रसीकां नीचनवी भरैल अवस्था
साधनीं होइल दक्षता · ईश्वरविखयासीं १९२०

---

१ कग. 'गदी. २ घ इंद्रुचद्रा' ३ कग. 'चापयासी.

तियें कर्णयुगळीं झुळ्वुकें : शुद्धवेधाचे नेटकें
माद्धर्य[1] करीताति कवतीकें : कपोळ-कांतीसीं १९३०

कीं ते उदोस्त करीतां श्रमले : सुर्यादिक खेदखीन जाले
ते फळ सांडौनि सीण सांगों आले : कर्णाजवळी १९३१

श्रीमूर्तीवरील आंगसोकें : बाहीरवास

परीसा आंगसीकाची थोरी : मी बोलैन बोलीं नागरीं
ते नीहाळावी अनुचरीं : सखोलां दृष्टीं १९३२

जैसा आनंद-मळयाचळाचां अधोपरीं
उदयोभास्करू घरटी करी
तैसा बाहीरवासु वेढिला कटीसूत्रीं : चैतन्यनार्थे १९३३

कीं चक्राक्षदेवतेभंवंती : वीद्याधरी प्रदक्षिणा करीती
वरु मार्गो आलिया लक्ष्मीपती : आम्हां कांतु होआवा १९३४

कीं पाहावया देओ मंगळमुर्त्ति : दिव्यांगना जालिया वस्त्राकृती
पाळ्‌तां नेत्र आनंदती : भणौनि दर्शना आलिया १९३५

कीं तो सरागु सपंढरू : जैसा क्षीराब्धि क्षीरसागरू
जयातें प्रधान करी सर्वेस्वरू : ते थोरी सांघों नेणिजे १९३६

कीं तो सुध प्रकासाचा पडिखरू : कीं संभ्रमाचा सतारू
भणौनि आपणपें दातारू : वेढिते जाले १९३७

आंगी

ऐसी[2] नेटारली[2] श्रीमुर्त्ति : वरि आंगी बाणली नीरुती
जैसी ग्रह-कास्मिराची दीप्ती : वीस्फुरत दीसे १९३८

---

१ क. माद्धर्य. २ ख़ग. ऐसीए नेटारलीए. क. "नेटारलीए.

कीं आदकौनि परमानंदाची कीर्ती : एकवटलीया अनंता शक्ती
आनंददान मागों आलिया लक्षुमीपती : कैवल्यनायासी १९३९

कीं तो कैवल्याचा पुतळा : म्हणौनि देवता जालिया पायघोळा
आगियेमाजि रीगौनि सकळा : आनंदु आस्वादिताती १९४०

फुटा

आतां फुटेयाची महीमां असे सांघत : जया पुरुखा प्रसादीं बुधि बहुत
तेहीं होउनि येकचीत्त : अवधान दयावें १९४१

जैसा परब्रह्मांचा पुतळा : प्रसन्नतेचेनि प्रकाशें गवसला
तैसा फुटा परावर्ण केला : कैवल्यपाळें १९४२

तो फुटा कैसा वानावा : जेथ गुणधर्माचा मेळावा
नीरंतर ओळगे परदैवां : परमात्मयातें १९४३

तो इश्वर्यें[1] आथिला सांमर्ग्यवंतु : चेतनशक्तीतें नेमितु
जेणें पुरवीला अंतु : जळघोप-नीवारणीं १९४४

जैसा कृपेचा ओंळ ओळला : कीं प्रसन्नतेचा मेघु वोरीखलौ[2]
तैसा फुटा दान दीधला : भगतजनासीं १९४५

जैसें सीतकाळीं बाळक सीतें पीडे : तें देखौनि मायेसि[3] होए सांकडें
मग पाल्वें पांगरौनि बैसवी पुटें : कृपाळु भणौनि १९४६

तैसा तुझया वियोगाचा स्याळा : न साहेचि सेवकजना सकळां
मग फुटा देउनि भक्तवछळें : तुवां बीजें केलें १९४७

---

१ कग. ऐश्वर्यें. २ क. वरीखला. ग. वरिसला ३ कखग. मातेसी.
४ कग. भक्ति.

तयां फुटयाची दसी : जे आर्त्तिपुर्वक धरीति मानसीं
तया सायोज्यता होय परब्रम्हेंसीं : म्हणे मुनि केशिराजु १९४८

—७—

## श्रीमूर्ति नीरांजन

### श्रीमुकुटीचें टोपरें

जैसें क्षीराब्धिचें मुक्ताफळ : तैसें श्रीमुकुटीं टोपरे नीतळ
कैळासप्रभेपासाव उजळ : अधीक दीसे १९४९

कीं तया चैतन्यरत्नाचीया कीळा . अनुरागें आथिलीया बहळा
तैसें टोपरे राउळां : ओळगवी नागार्जुन १९५०

कीं तें ब्रह्मतेज आंदोळ्ळें : श्रीमुकुटावरी स्फूरलें [1]
तें वडिल भणौनि ईश्वरें मानिलें : श्रीमुगुटावरी १९५१

ऐसा सर्व श्रींघारे मीरवला : चद उपमे आसनीं उपवीष्ट जाला
मग नागांबिका जीवें ओवाळिला : श्रीचक्रधरू १९५२

### पूजावसर नागांबिकेकडून ओवाळणी

ते ओवाळणी आइका : उजळ्लीया दीपकळीका
जैसीया उतरलीया मुक्षनायका सस्वरूपीहुनी १९५३

कीं तीया प्रकाशवता जोती : दया मया कृपा कारुण्य चौथीं
चैतन्य वीदेह पराशक्ती : आदिकारूनि १९५४

कीं देखावया देवाचें रुपडें : स्वरूपीं सुख नाहीं तयाचेनि पाडें
भणौनि पाहों आलिया कोडें मीसें दीपाचेनि १९५५

---

१ ग. फुरले.

ऐसीया पालमांडां पांचै वाती : जैसे कैवल्यमंदिरीचे दीप डोलती
की देवता तांडव नाचवीती : आनंदभरिता १९५६

प्रेमाचां परियळीं : अनुरागें आर्त्ती उजळ्ळी
मग नीरांजन करीती जाली : लावण्यनीधीसीं १९.७

## आरती

"जय जय परममंगळा परमनीधाना : जये गरूवेया गंभिर गहना
जय ससारतप्तां आनंदघना : अनाथनाथा १९५८

जय मुनिवर मुनीवंदना : तुवां आनंद सचरीलें[1] त्रीभुवना
*अनिमीत्तवंधु जगजीवना : जगंनाथें* १९५९

तुं आर्त्त जनां अवंचकु : उदारलील परमपुरुखु
नीत्यशास्वत सुखदायकु : सनातनु १९६०

तुं जगदवंधु जगदेस्वरु : चराचरांसी आदिगुरू
स्वयं परब्रह्मांचा अवतारू : अवतरलासी १९६१

तुं दयावंत दयापाळ्कु : ममता आथिला कैवल्यनायकु
पींडब्रह्मांडदीपकु : नीरालंबनु १९६२

तुं लावण्याचा मेरू : कारुण्याचा करूणांकरू
सौभाग्याचा सागरू : सर्वज्ञनाथु १९६३

तुं उदार्याचा उदधी : कृपेचा कृपानीधी
सौंदर्य नीर्वधी : तुतें वोळगे १९६४

---

१ घ. सचरवीला.

तुं सर्व गुणांचा रासी : चीदब्रह्ममुक्षकरूनि तुझीया दासी
रीगावा नाहीं अष्टमाहासींधीसी[1] : तुझां स्वरूपीं १९६५

तु प्रसन्नतेचा परिकरू : परमानंददानी परमेश्वरू
परावस्तु वीचारू . वीचारज्ञ १९६६

तु अच्युत अविनाशु : महाभूतांचा महेशु
जीवां जन्ममरण गर्भवास . नीवारिता १९६७

तुं मायावेगळा मायापती : मज देइं आपुली नीत्यभक्ती[2]
तुझे चरण वाहिन चीतीं अखंडित १९६८

तु माझिये दृष्टीवेगळा न व्हावासि भक्तिवछळा
मियां देखावासि एहीं डोळां : सदासर्वदा १९६९

ऐसी स्तवनपुर्वक वुपार्ती : करीता पालिमांडें[3] न धरे हातीं
आठै सात्विक प्रकटती : ते सांघे कवी रसाळा १९७०

## सात्विक भाव . अश्रु

परीसा सात्वीकाची मुद्रा : जैसें भरीतें चढे प्रेमरत्नाकरा
तैसीं आसुवें येती नेत्रा : आरद्रं म्हणौनिया १९७१

कीं सानुरागें सुनिर्मळ आदोळलें आनदजळ
तैसे वोसडती नेत्रयुगळ अश्रूपातीं १९७२

कीं सौभाग्यें सौरम्याचेनि परीमळें उधाती लावण्यसरोवरीची कमळें
तो मकरद बाहीर उचबळे . आनद-रतीचा १९७३

---

१ खघ. अष्टमा' २ ग. 'मुक्ती. ३ क. पाले' ग. पाल'.
४ कग. सारद्रव.

## स्वेद

जैसा आनंदाचा घनु वरीखला : तैसा स्वेद ये कपोळा
कीं अमृताचेनि तुखारे सींपीला : आर्त-जनु १९७४

कीं मायापुराचीये पूर्णिचे पूर्वदीसे : परमानंद-चंद्र उदैला कृपावसें
तेणें भक्त-सोमकांत द्रवति आपैसें
अधीकार्य भणौनि १९७५

कीं परमात्मयाचा मेळीं : आत्मा खेळे जळकेळी
तो सुखरसु हेलावला कपोळीं : स्वेदाचेनि मीसें १९७६

## रोमांच

जैसे प्रबोधवसंताचीयों[1] सीतळता : आंकुरैलया प्रेमलता
तैसे रोमांच दीसती मज पांतां : सर्वांगीं जे १९७७

कीं भक्तिचीये भूमीके : प्रेम पेरिलें परमपुरुखें
तें डीरैलें थोरे सुखें : लसलसीत १९७८

कीं उतकंठेचा सुक्षेत्रीं : परा वाचा वरुखली अमृततुखारीं[2]
तेणें आर्त्ति पाल्हैली प्रचुरीं : परेशालागी १९७९

कीं दैवराहाटीचीये मळां नीचनवा : दीधला ज्ञानशक्तीचा ओलावा
तेणें अनुरागु वीस्तारला सविया सुहावा
साखा-पालवीं १९८०

कीं करूनि योग्यतेचे वाफे : देओ कृपादृष्टीचेनि उदकें सींपे
तेय कोंभैली दीसती रोपें : सांतिद्रुमाचीं १९८१

---

१ घ. वसंत-प्रबोधाचीया २ कग. 'धारीं.

कीं सवीया सप्रेमळ आवडीचें आळें
तेथ मुगति मोखियाचें वीरुढें कोवळें
तें[1] उपजत उद्धाय परीमळें : मूळापासौनि १९८२

कीं लावण्यनीधी निरुपम : हृदइं प्रवेसला आत्माराम
भणौनि जीवें केला संभ्रम : रोमांच गुढी उभीली[2] १९८३

## कंप

जेवि मूर्ति मव्यानीळाचेनि स्पर्शें : कारुण्यकेळी थरारीतु दीसे
देखा कपादि भाओ तैसे : मज गमले १९८४

कीं कैवल्य–मंदिरीचां कळसीं : प्रसन्नतेची पताका झळाळी जैसी
तेवि कंपु प्रकटे नांगांविकेसीं : अनुभूतिचा १९८५

कीं शुद्ध–वेधाचां राहाणीं : बैसवीली ब्रह्मविद्या जाणी
उगवावया गुतली गाऱ्हाणीं : अनंता जन्माची १९८६

कीं जालयां प्रेमाचा सचारु : आंगीं अवतरला अपरांपरु
तो सर्वज्ञरावो श्रीचक्रधरू : क्रीडे देहामाजी १९८७

## स्वरभंग

जैसा कैवल्यगंगे आलेयां माहापूरु :
कुंठला अंत:करण वोघांचा व्यापारू
तैसा दाटत दीसे स्वरू : स्तुती करीतां १९८८

कीं मोक्ष–भुजंग लागलयां जिव्हारीं : आनंदाचा झेंडु आला अभ्यंतरीं
तेणें शब्द न रीगे बाहिरी : आंत कोंडला राहे १९८९

---

१ घ. तेथ. २ कग. उभविली.

कीं परब्रह्माचीया मीळणीं : पुरली शब्दब्रह्माची आणी[1]
ते नादब्रह्मातें म्हणे मातें सांडौनि : झणें जासीं १९९०

मग तयातें धरूनि हातीं : राहावी सौजन्यवृती
अनुष्ठावया परम प्रीती : एकमेकेंसीं १९९१

तया दोघांचा ऐसा वृतांतु : जें उभयां सारिखा मनोरथु
भणौनि कंठु दाटे सदगदितु : वेगळी नव्हेती १९९२

## विवर्णता

जैसे वीखयानद रसें सींपीतां : सुख–अतीसयो नीवर्तला सगुणभक्तां
तैसी आली वीवर्णता : मुखावरी १९९३

*कीं आदिनाथाचां कटाक्षीं सरळीं : जाली मळ्कर्माची होळी*
ते मुखीं बैसली काजळी : सविया सोभायमान १९९४

कीं अच्युताचेनि अवलोकनें : पुसीलीं जीवधर्माचीं लक्षणें
अतर आत्मयां उमटलें नाणें : परा वस्तुचें १९९५

कीं देओ सर्वशक्तीयुक्तु : भीतरीं सामावला अनंतु
भणौनि कृष्ण मजीष्ट हरीतु पीतु : रंगु भेदारला १९९६

कीं जगदात्मयाचेनि दर्शनें : फीटलीं अनधिकाराचीं कारणें
तें सुद्धत्व वरि आलें मीं म्हणें : पात्रत्वाचें १९९७

कीं आदिपुरुखाचेनि बोलें : जीवस्वरूप नीन्हां उजळलें
तयावरि बींब थारलें : नीजभक्तीचें १९९८

कीं सर्वेस्वराचेनि स्मरणें : उठीलें तापपापाचें ठाणें
मग बोधशक्ती केलें उपेणें : योग्यता देखौनियां १९९९

---

१ फग आइणी.

कीं तें आत्मत्व दुणावलें : स्नेह व्यक्तीसि आलें
कीं जीवांवर बोजां[1] काढिलें : केवळ वेधाचीये २०००

ना तरि परीसीं लागलयां झटे : लोहाचें लोखंडपण फीटे
मग पालटौनि होए गोंमटें : सुध साडपंधरें २००१

तयाचे पवीत्र परीकर : कीजेति उत्तम अळंकार
मग माथां मीरवीति कुंमर : चक्रवर्त्तिचे २००२

तैसें पातलयां ईस्वर-संनिधान : संबंधें नीवर्तले तीन्ही गुण
कीं जीव नित्य केवळ हें प्रमाण : देवें साच केलें २००३

कीं नासौनि जीवाचे सर्व दोख : संपादिलें आपुलें नीत्यसुख
भणौनि वीवर्ण जालें मुख : अनारिसें दीसे २००४

कीं जीवमुद्रेवरी खटकोनें : मीरवलें कैवल्यरत्न
तें पालटौनि धरी नाना वर्ण : तीहीं काळीं २००५

## स्तंभ

सांतिरसाचें[3] पुट दीधलें : तेणें जीवाचें रजस्तम निरसले
स्वभावादिक उछेदले : स्तभाचीया परी २००६

कीं देओ देखिलेयां लावण्यसागरू : अंतरीं अन्यत्राचा पडीला वीसरू
कीं जीवात्मयां वेचु झाला थोरु : कैवल्यस्वरूपीं २००७

कीं पाळांतां अच्युतु आनंदमूर्ति . कुंठली सर्व इंद्रीयाची गती
कीं हृदइं वसवीली वेधवती : वीसेखेंसीं २००८

कीं परसुखीं रमतां प्रभावीं : परमानंदाची गोडी नीचनवी
ते सेवितां आपणपयातें नांठवी : रंमण फारावेया २००९

---

१ कग. वोझा. २ कग. पट° ३ कग. ना तरी°.

कीं करीतां सर्वज्ञाचें संभाखण : संकल्प-वीकल्पा वेगळें जालें मन
भणौनि मुर्तीवांचौनि आंन : दुजें स्फुरेना २०१०

कीं तो कृपाळु लक्ष्मींकांतु : तोडुनि जीवाचे सकळै हेतु
मग तादात्म करी वहुतु : आपुलां ठाइं २०११

कीं देओ परब्रम्हाचा पुतळा : आवडी भक्ताचीये भरे डोळां
तो भोगावया सुखसोहळा : चातुष्टय स्थीर जालें २०१२

कीं जगदेस्वराचीया संगती : जीवां जाली कैवल्यप्राप्ती
ते अनुभवीतां ईस्वरप्रवृत्ती : चैतन्य वेडावलें २०१३

कीं सुखसमुद्रामाजि जीव-सरीता : मीळालया होती येकचीता
तैसे देहभाव वीसरली मज पांतां
आत्मा नीश्चळु जाला २०१४

## प्रळप

जैसें डोळा सुदलयां ज्ञानांजन : दीसे चराचर त्रीभूवन
मग परधर्मावांचौनि आंन : दुजें रुचेना २०१५

ना तरि ज्ञानसुर्याचेनि उजीयेडें : इष्टानीष्ट दोन्हीं ठाउकें पडे
परधर्मावांचौनि सेउं नावडे : अन्न जैसें २०१६

तैसें जीवां जालयां आत्मज्ञान : आपुले दोख ईस्वरीचे गुण महीमान
देखौनि होए मूर्छाप्रपन्न : प्रळयवंत २०१७

कीं परकैवल्यस्वरूपाचां सेजारीं : अनुरागु आर्त्ति संचरली थोरी
कीं जीवकैवल्या आली प्रेमल्हरी : तेणें वीकळु गेला २०१८

कीं श्रधेचीय सावरां चाड वीश्रामली : शांति क्षेमेसीं मुराली
कीं दृष्टा अवस्था दुणावली : अती गाढी २०१९

की सत्वसहीत भावभक्ती : उतकंठेसीं करी परमप्रीती
कीं अवस्ता[1] स्वता सौंदर्यातें चींती : नीरिचत होउनियां २०२०

कीं साहित्याचीये सेजे : नीजानंदु नीवृतीतें भजे
कीं सुख-श्रींघारातें मीं मांझें : म्हणौं नेदी २०२१

कीं आत्मा मनोद्वंद्वाअतीतु जाला . परमात्मस्वरूपीं आनंदु आतला
तैसा सखोल भाओ मज गंमला : प्रळयाचाची[2] २०२२

कीं देवें आपणपें समोर दीधलें : तें वचन प्रतक्ष जालें
कीं साधन साध्यातें नीवर्तलें[3] : मज पांतां २०२३

यापरी आठै सात्वीक : मीयां वर्णीले तें आइक्तु रसीक
जे जाणति फुडें भक्तिसुख : ईश्वरपरायण २०२४

नातरि अन्यथाज्ञान-आदिमळत्रुटि केली
तैसी पानाची आणी[1] परती सारीली
कीं साधननिवृत्ति जाली : विसेख-ज्ञानीयाची २०२९

यापरि वीडी नीर्वोळुनि श्रीमुखीं घातली : ते मज कैसी गमली
जैसी ब्रह्मपदा नेलीं : मुनींवृंदें २०३०

ते पावले मोक्षप्राप्ती : बुडी देउनि ब्रह्मीं मीसळती
पाठिसीं घातले कैवल्यपती : कृपाळु भणौनिया २०३१

## आरोगणा-प्रसंग

जो सदा सर्वदा तृप्तकाम : स्वभावा मातु देउनि स्वीकरी देहधर्म
तयाचीया आरोगणेचा संभ्रम : सांघों कैसा २०३२

जैसें अमृतें अमृतसार कांमविलें : कीं आनंदें आनंदातें नीफजविलें
तैसें नागांविका ताट ओगरीलें : लावण्यनीधीसीं २०३३

ना तरी सुखासि सुख आलें भेटी : कीं प्रेमें प्रेम पाहिलें दृष्टीं
तैसें घृत-पए-साकर एकी वाटीं
श्रीकरे समरस्य केलें २०३४

तया रसासि लक्षण : सर्वज्ञवांचौनि करी कवण
जयातें देओ आरोगीति आपण : भक्ताचेनि हस्तें २०३५

ते नांगाविकेचे पातिकर : सुरस गोडिसे मधुकर
जेहीं जगदात्मयाचें उदर : सुखीये केलें २०३६

कीं ते सुधवेधाचे अधीकारी : भणौनि देओ आवडी अंगीकरी
साहाणुके सांटवीले मायापुरीं : पाठी प्रेमासि पात्र २०३७

---

१ ख अणी.

की सत्वसहीत भावभक्ती : उतकंठेसीं करी परमप्रीती
कीं अवरतां स्वता सौदर्यातें चींती : नीश्चित होउनियां २०२०

कीं साहित्याचीये सेजे : नीजानंदु नीवृतीतें भजे
कीं सुख–श्रींधारातें मीं मांझें : म्हणों नेदी २०२१

कीं आत्मा मनोद्वद्वाअतीतु जाला : परमात्मस्वरूपीं आनंदु आतला
तैसा सखोल भाओ मज गंमला : प्रळयाचाची[2] २०२२

कीं देवें आपणपें समोर दीधलें : तें वचन प्रतक्ष जालें
कीं साधन साध्यातें नीवर्तलें[3] : मज पांतां २०२३

यापरी आठे सात्वीक : मीयां वर्णीलि तें आइकतु रसीक
जे जाणति फुडें भक्तिसुख : ईश्वरपरायण २०२४

## फोडी आणि विडा

श्रीमुखीं सकर्पुरा फोडी : बाइसें करुनि देति बीडी
परी हातीचा कंपु येकि घडी : राहेचि ना २०२५

तया वीडयाचे भाव मज कैसे गमले
जैसे फळीए पद्महस्तां सरण रीगाले
कीं अधीकार्यें जीव श्रीकरीं योजिले : व्यापारतेनी २०२६

कीं ते सगुणसाकार : हरीत पीत देवतांचे अवतार
श्रीकरीं सुख देखौनि अपार : सेउ आले २०२७

कीं ईश्वरींचा कृपाकटाक्ष झळकला : तेणें जीवा अजीयें वीभागु केला
तैसा देंदुं फेडवीला : नांगाविकेकरवी २०२८

---

१ खघ. अस्वस्तता. ग. अस्वस्ता. २ घ. प्रळयचाचा. ३ ग. नीर्वतलें. ४ कग. देंडू.

नातरि अन्यथाज्ञान-आदिमळत्रुटि केली
तैसी पानाची आणी[1] परती सारीली
कीं साधननिवृति जाली : विसेख-ज्ञानीयाची २०२९

यापरि वीडी नीर्वोळुनि श्रीमुखीं घातली : ते मज कैसी गमली
जैसी ब्रह्मपदा नेलीं : मुनींवृंदें २०३०

ते पावले मोक्षप्राप्ती : बुडी देउनि ब्रह्मीं मीसळती
पाठिसीं घातले कैवल्यपती : कृपाळु भणौनिया २०३१

## आरोगणा-प्रसंग

जो सदा सर्वदा तृप्तकाम : स्वभावा मानु देउनि स्वीकरी देहधर्म
तयाचीया आरोगणेचा संभ्रम : सांघों कैसा २०३२

जैसें अमृतें अमृतसार कांमविलें : कीं आनंदें आनंदातें नीफजविलें
तैसें नागांविका ताट ओगरीलें : लावण्यनीधीसीं २०३३

ना तरी सुखासि सुख आलें भेटी : कीं प्रेमें प्रेम पाहिलें दृष्टीं
तैसें घृत-पए-साकर एकी वाटीं
श्रीकरें समरस्य केलें २०३४

तया रसासि लक्षण : सर्वज्ञवांचौनि करी कवण
जयातें देओ आरोगीति आपण : भक्ताचेनि हस्तें २०३५

ते नांगाविकेचे पांतिकर : सुरस गोडिसे मधुकर
जेहीं जगदात्मयाचें उदर : सुखीये केलें २०३६

कीं ते सुधवेधाचे अधीकारी : भणौनि देवों आवडी अंगीकरी
साहाणुके सांटवीले मायापुरीं : पाठी प्रेमासि पात्र २०३७

---

१ ख. अणी.

जैसे क्षुधाआर्थी अन्नाकारणे आर्त : तें जेविलयां होए तृप्त
मग म्हणे अन्नवांचौनि समर्थ : आणिक नाहीं २०३८

तैसें ईश्वरे स्वीकरीलें वेसन : तें पुरलेयां होए समाधान
भणौनि भक्तांचें महीमान : श्रीमुखें वाणिलें २०३९

आरोगण साहुनि श्रीचक्रपाणी : भगतजनां दीधली पाठवणी
सएन करीती प्रभारत्रे कत्रणी : तें आइकतु ब्रम्हवीद २०४०

जैसें चैतन्यपुराचीये मांदुसे : स्वयं प्रब्रह्म सांटवलें अनायासें
तैसा पहुड स्वीकरीला जगन्निवासें : राजमढाआंतु २०४१

ना तरि परमात्मा परकैवल्य नीजबोधीं
विश्रामल्या साहुनि सक्तिचक्राची मांदी
कीं नीज नीजैलें निजानंदीं : नीजस्वरूपीं २०४२

चेतनत्वाचें करुनि आठांगुळें : व्यापारवर्से सृजीलीं बाळें
मग प्रसवली एकें वेळें : सकळ जीवातें २०४७

घेउनि ममता उसंगिए : पाजी अन्यथाज्ञानाचें पेहें
अज्ञानें पांगरौनि दीए : प्रकृती-धायेचां हातीं २०४८

ते कोडेंकवतीकें : वाढवी तीयें बाळकें
आंगुळें लेववी नीकें : पंचभूतीकांचें २०४९

गुणत्रयाची रीठेगांठी : विखयांचें वाघनख कंठीं
इंद्रीयांची बींदली मनकटीं : कोडीसवाणी २०५०

कर्मांचे कडीदोरे नागर : अहंतेचें आमुलें[1] सवीकार
पाइं नेवाळे वाजती परीकर : मनुस्यमळाचे २०५१

मतीत्रयाचां पाल्कीं नीजे : परीयें देउनि म्हणे मी माझें
मग हींदोळा घाली सहजें : आपणयां आपण २०५२

कर्मभूमीचां आंगणीं : रांगौनि पाउल घाली जंन्ममरणीं
मग चतुर्विधाचां पाटणीं : खेळों जाय २०५३

ऐसा सुखेमु नीवोळला : सुष्टदुष्ट क्रीए पात्र जाला
मग नाटकसाळे नाचों घातला : विश्वरूपेचीये २०५४

मग मृदंगाचेनि आधारें : श्रुति वाइली अहंकारें
बुधि टाळ धरौनि अनुकरे : म्हणे सावचीत होइं २०५५

कासौनि अन्यथाज्ञानाचा चोळणा
रंगीं उभा राहे आपुलीया आंगवणा
मग नवरस-नांटकीचेया खुणा : रचूं लागे २०५६

---

१ कग अमुले. ख आवुले.

सतीसां[1] दष्टीचा मेळावा : तोचि कारण नाच्चे तांडवां
अष्टांगलक्षणे बहुतीं टेवा : रंगु रचना राहावी २०५७

अधमतीचेनि रसें : सर्वांग सांवरी[3] सरिसें
सप्तताळ साधी अनयासें : सामर्थ्यांतव २०५८

अधरतीचा उलाळा : देउनि दाखवी अभिनव कळा
वीखयसुखाचा पुरवी सोहळा : आपणयां आपण २०५९

संयुक्त हस्तकाचेनि अनुकरणें : हंसपक्ष त्रीपताकातें जीणे
मृगसीरू सुचिकामुखातें : म्हणे महं महं २०६०

पुष्पांजुळीसीं खटीकामुखु : माजि संचरे नीतंबक्रु
सेवटीं नाच नीर्वाळी मुष्टिकु : संक्षुनीचा २०६१

ऐसी चौसटी हस्तकाची परी : समर्थुनि चवके कर्मभुमींवरी
मग स्वर्गनर्कांचीया भवरी : देओं लागे २०६२

तैसें जीए व्यापारीं जें तादात्म : तें घेउनि उठीति तेंचि कर्म
एकीं वसवीले चाऱ्ही भूतग्राम : अहंतेतव २०६३

एकीं संतें असतें : फळें जोडिलीं बहुतें
एकीं हटीं पडौनि आपणयातें : भस्मा नेलें २०६४

येक जांणौनि ओखटया प्रवर्त्तलें : ते नीत्यनर्कासि गेले
एक ईश्वरें अव्हेरिले : सृष्टिपर्यंत २०६५

एक अवेचकत्व सर्वभूतीं : मायासहीत भजन करीती
ते ज्ञानासि पात्र होती : अधीकार्ये २०६६

---

२ कग. छत्तीसा. २ क. नाचे.ख. नच्यु. ग. नाच. ३ कग. सारी.

एक वीखो होती प्रेमासी : तया देओ न वीसंवति अहर्निसीं
नीरंतर असती मुर्त्तिपासीं : वेगळे नव्हेति २०६७

### भक्ताकडून निरूपणाची विनंती

ऐसीये परयात पाहारां : उपहुड होए श्रीचक्रधरा
आसनीं उपवीष्ट जाले तंव अनुचरा : चेओ आला २०६८

ते सुजगरे[1] होउनिया समस्त : आले एकमेकातें पाचारित
परंमपुरुखासि करुनि दंडवत : बैसते जाले २०६९

ते अनुचर मज कैसे गमती : जैसा सर्वेस्वरु श्रृंगारला सर्वशक्ती
तैसे भक्तजन बैसले दीसती : श्रीचक्रधरापुढें २०७०

कीं फळीए सांडोनि नीजभुवनें : ओळगों अच्युता आले अंगें मनें
तैसीं पातलीं सेवकजनें : आदिनायाजवळी २०७१

कीं तो आर्तांचा दाता : तेथ थोर दान वर्त्तैल मज पांतां
भणौनि स्वरूपींहूनि उतरलीया देवता
मीसें मनुष्याचेनि २०७२

कीं अमृतश्रावीया वाणी : ज्ञानीयां भक्तेंसीं बोलैल श्रीचक्रपाणी
तें नीरुपण आइकावया श्रवणीं
वरवींदीं केला परकायाप्रवेसु २०७३

ऐसा अवसरू मीरवला : तंयं लोकत्रइं आनदु जाला
इंद्रादीकीं वरीखाओ केला : दीव्य पुष्पांचा २०७४

ऐसीये श्रीमुर्तिचें दास्य जोडे : तैंचि भवबंधु वीघडे
मग कैवल्यसुख चोखडें : भोगिजे नीरंतर २०७५

---

[1] क. सुजागर. खग. सुजिगर.

ऐसा अवस्वरु देखौनि नीजकिंकरें : परतु केला नागीद्रें
"जी तुतें अनुभवावें कवणें द्वारे :
तें मजप्रति सवीस्तारे : गोसावीं निरूपावें २०७६

तु गुणनीधी गुणसागरु : पाववया कवणु आचारु"
तें नीरुपीता जाला श्रीचक्रधरू : नागींद्राप्रती २०७७

## निरूपण : ईश्वरप्राप्तीचे साधन

मग म्हणे जीवोद्धरणु : "मी ब्रह्मवीद्येचा दर्पणु
मातें पाववया मींचि सगुणु : अवतरलां असें २०७८

मी सर्वकर्त्ता सर्वेस्वरु : सुधबुधे[1] सकळां परु
मातें पाववया मींचि गुरू : जीवजातांसीं २०७९

माझेनि सन्निधानें : करावीं कर्मक्षाळणें
मातें पाविजे माझेनि ज्ञानें : दास्य करीतां २०८०

मी जीवांचा जीवपती : मजवांचौनि नाहीं उर्धगती
माझी करावी भक्ती : वेचलेपणें २०८१

माझें वचन प्रतीपाळावें : मीं म्हणैन तेंचि करावें
जन्मजीवीत द्यावें : माझां ठाइं २०८२

आवडीं चीत्त वीत्त काया : तीन्हीं आर्पावीं सर्वज्ञराया
सांडौनि ममतारूप माया : अनुसरावें सर्वभावीं २०८३

दूखणत्रयातें तेजावें . मजचि अधीन होआवें
मातेंचि भजावें . अनतीं परीं २०८४

---

१ कग, शुद्धबुद्ध.

एम-नेम-याग-यजनीं : अनेगीं स्तोत्रीं स्तवनीं
मातें स्तवावें अनाथ होउनि : अन्यन्य गती २०८५

जप तप व्रतें दानें : नानावीधें आराधनें[1]
ऐसें अंतरबाह्ये भजनें : मजचि भजावें २०८६

मीं सर्वसुखाचा राशी : मातें आठवावें अहर्नीसीं
मनोधर्म बुधि आवेसीं : माझां स्वरूपीं २०८७

शयनासनीं भोजनीं : मातें स्मरावें मनीं
कैवल्य-पडपदानी : मीचि येकु २०८८

माझें चींतन : अखंड करावें ध्यान
न संडावें अनुसंधान : कीटकीचीया परी २०८९

कीटकीयेतें भींगुरुटी धरी : नेउनि घाली मंदिरीं
आपण जाये बाहिरी : लींपौनियां २०९०

ते भींगुरुटीयचेनि[2] धाकें : थोर श्रमली मानसीकें
मातें खाईल भणौनि संकें : मनामध्यें २०९१

तियेतें चींतीतां अंतःकरणीं : कीटकीये जाली सारिखवांटणी
तैसें लक्ष न संडावें ध्यानपरायणीं : ईश्वरचींतनाचें २०९२

भणौनि संसाराभेण : मजचि रीगावें शरण
माझी करावी आठवण : वीसरू न पडतां २०९३

हृदयभूवनाचां अभ्यंतरीं : कखायाचा केरू लोटी बाहीरी
मग सडा-संमार्जन करी : नीर्वीकल्पाचें २०९४

---

१ क. साधनें. २ कग. 'टीचेनि.

होउनि नीर्वीकार निराभिलाख : भरावें चाडेचें चौक
घालावीया रंगमाळिका : अवस्तेचीया २०९५

चातुष्टयाचां गाभारां : रचौनि उत्कंठेचा देव्हारा
मग आसन करावें अरुवार : अनुरागाचें २०९६

ऐसा ठाओ नीराबाधु : देखौनि बीजें करी परमानंदु
आसनीं उपवीष्ट होए कैवल्यकंदु : मग पुजा करावी २०९७

देखिलयां जगजीवना : अस्त्रपातं[1] येति नयना
तेणें प्रक्षाळावे श्रीचरण : चक्रेस्वराचे २०९८

आवडीचा आडा रेखौनि ललाटीं : सुष्ट सुमनाची माळ वायी श्रीमुकुटीं
पुरस्कार–शब्दांचा गळदंडा कठीं : परीमळबहळ २०९९

वीरहाग्नीचा आंगारा अत्यंतीकु : देह–धुपटणां दावावा भावदसांकु
उजळौनि ज्ञानाचा दीपकु : मग आर्त्ती करावी २१००

जन्माचें वस्त्र वार्वे : अनुतापाचें[2] आर्चन करावें
मग मातें वीनयावें : आरोगणेलागी २१०१

प्रेमाचां तार्टीं : मध्यें ध्यानाचा ओगरु नेहटीं
वीस्तारुनि स्मरणध्यानाची[3] वाटी . आर्पितु म्हणावें २१०२

करुनि नीर्वेदाची ठाणवी . तपाचां टौव्हां प्रीतीची वाति लावी
सत्वाचेनि स्नेहें पाजळावी · मी आरोगीं तव २१०३

कर्माचें नीवलोण उतरीं : सर्वधर्माची कुरवडी करी
मग आरोगण जालेयांवरी : जीव–वीजन मेळवावें २१०४

---

१ क. अश्रू' २ ख. अनुतापें. ३ खग 'साधनाची.

प्रेत्नाचीया फोडी सचाडा : सपादीं वीरामाचा वीडा
मग प्रेमदांनी जगीं फुडा : मीचि आथी २१०५

मी मंगळरूप मगळदायकु : मजवांचौनि नाहीं अन्यत्र आणिकु
जीवातें उद्धरीता मीचि येकु : श्रीप्रेमय्यें २१०६

मी वीरवाचा वीरनेपती : मजपासौनि सकळ सामर्थ्ये सीधी जाती
सर्व भोगांची नीरप्ती : माझांचि ठाइं २१०७

माझी मूर्ति मनोहर : नेत्रीं नीहाळीं नीरंतर
वाचेसि येउ नेदीं अन्यथा उत्तर : अन्यकथनाचें २१०८

माझीं चरीत्रें गोडिसीं : श्रवणीं आइकें आदरेसीं
परीसतां मुचसी : भवव्रधातें २१०९

मोक्षदोत माझे श्रीचरण : तया साष्टांगीं करावें लुंटण
जेहीं नीवारिलें जन्ममरण . शरणांगतांचें २११०

माझी सेवा नीचनवी : दास्य करावें हस्तपाल्वीं[1]
मातें भजावें सर्वभावीं ' सकळ सांमग्रीया २१११

ऐसा भक्तिपुरश्चरु : तोचि मातें पावे नरू
मग मीं उद्धारदेवदीक्षागुरू : त्या आपणपें दे " २११२

" आइकें नांगींद्रा " म्हणे श्रीचक्रधरु :
" मी कृपानेत्रें अवलोकीं जीवाचा अधीकारू
दृष्टीसरीसा नीगे अंकुरु : आवडी अनुरागाचा २११३

तीये आवडीचेनि पार्डे : पांतां चैतन्यसुख सावडें
विश्वरूप सुख करुनि धोकडें[2] : स्वर्गसुख २११४

---

१ कग. 'पल्लवी. २ कग. धोगडें.

तया अनुरागु वृक्षाचा तोवरू : देहवीयेतें म्हणे थोरू
ब्रम्हवीया करी जयजयकारु : गोडिसा भणौनि २११५

माझेनि दास्यें जीवन–व्यापारे : भक्तिदम वाढीनला सवीस्तारे
तया फळें लागलीं महुरे : प्रेमरसाचीं २११६

तोये सुखासें सुसुवादें[1] : भीतरि भरीलीं परमानंदें
भणौनि मी गोडियेचेनि वीनोदें : आरोगीं सदासर्वदा २११७

तया फळासि रक्षण : मीं अंगें बैसें आपण
हों नेदीं अवजतन : अन्येत्राची २११८

तीयें वाणीसारे वरीचीया वरी : मीं झेलीं आपुलां श्रीकरीं
तया फळाचा भोगता करीं : मींचि यकु २११९

मी भक्तांचां मानसीं : आवडीं अखडें असे अहर्निसीं
आवेसें संसारावरि कासीं : भक्तालागी २१२०

मी वसें भक्ताचां जीव्हारीं : मजवांचौनि तया कैची उरी
मी मनुक्षवेखु धरीं : तो तयाचि कारणें २१२१

तयाचें साधन चरीतार्थ . मी आपुलेनि आंगें असें करीत
तो आनंदरसें भुलत : करीतां जाणे ना २१२२

मज परमात्मयां परब्रम्हां : वेगळा नव्हे आत्मयारामां
मीं मांनु दें जीवधर्मां : तो हेतु भक्ताचा २१२३

जो तृप्त ब्रम्हरसा : तेणें मीयां स्वीकरीली क्षुधापीपासा
पदार्थ अंगीकरुनि फेडी अवदसा : भक्तजनाची २१२४

---

१ का. सुस्वादें. २ का.#

कटाक्षाचेनि वाणें : उठवी वीकार-वीकल्पाचें ठाणें
भीतरि रीगौनि जीणें : स्वभावांदीकातें २१२५

तयाचां तोचि स्वभाओ : जें मी प्रकटें सर्वज्ञराओ
देहद्वंद्वाचा उछेदे ठाओ : दर्शनमात्रें २१२६

माझेनि संन्निधानेंवीण : न व्हाति भक्ताचे प्राण
भणौनि नित्यसंबंधु हे खूण : श्रोते जांणती २१२७

माझें सेवासंभाखण : तें भक्ताचें आत्मधन
मुर्तिची साध्य-साधन : सर्वस्वलाभू २१२८

मीं भक्तेंसीं बोलें वाचा रसाळां : तेणें तयाची वोल्हावे जीवनकळा
भणौनि नीरुपण आइके वेळोवेळां : आदरु करुनि २१२९

माझी परमात्मयाची खावणी : भक्तावांचौनि नेणे कव्हणी
वेसन भक्ताची पुरवी आणी[1] : प्रवृत्ती वीखो जाला २१३०

मज भक्तवांचौनि आनु : पढीयंतें नाहीं प्रधान
करुनि न करीं संभाखण : आदि-लक्ष्मीयेसी २१३१

जें स्नेह आवडि भक्तेंसीं : ते प्रीति नाहीं अन्यत्रेसीं[2]
असेख देवताचक्र दे दानासी : दोनि वेगळीया करुनि २१३२

मीं आत्मरमणीं रमतु : परी आंगेंसीं धरीला असे भक्तु
दृष्टीपुढां देखें सततु[3] : केधवांहीं वीसत्रे नां २१३३

माझा सर्वे श्रींगारु : दावणा मीरवणा अलंकारु
भक्तावांचौनि पदार्थ थोरु : नाहीं मातें २१३४

---

१ कग. आइणी. २ खघ. त्रीयसी. ३ ग सतोखतु.

तो माझेनि स्वरूपेंसीं नीरतर रमे अहर्निसीं
मग मीं आपणपें न रखें आनदाचा रासी येर काइ सांघो २१३५

भणौनि वीवेक-चक्रवर्ती मातें पाविजे माझिया भक्ती
अथवा ज्ञानवैराग्य आचरती तयाही लाभे २१३६

## वैराग्यमार्ग विकाराचे सामर्थ्य त्याचा त्याग

परीयेसी ज्ञानसीरोमणी तुज सांधैन वैराग्याची वाहाणी
कर्मधर्मत्रीखयादिक विधि[1] माझा चरणीं
विसरौनि जाये २१३७

का जे वीकाराचीये वळसा पडिलया नीगावा नाहीं सहसा
धर्मासि वीघातक ऐसा आणिकु नाहीं २१३८

तो ससार-मडळीचा नृपचक्रवर्ती आरूढ होउनि वीळासाचा रथीं
जेणें सकळ सृष्टि केली आपैती दाटुगेपणें २१३९

हावभावाचा हातेरीं[2] वैराग्यवनीची बनकटी करी
मग पाचारुनि धरीं[3] माहातापसातें २१४०

मनोरथ-गजाचेनि दळभारं सरिसावचा चाले स्थीरे
चातुरग सैन्याचेनि आधार गवसी योगियातें २१४१

अष्टभोगाचे असीवार वरी चटती नवरस माहावीर
केमें कदर्पाचे जुझार त्रिभाडीति वीतरागातें २१४२

जयाचा सारथी श्रींघार रीतुराओ प्रधान प्रचुर
सगित करी माहामार जीव्हारवेर्म्ही २१४३

---

१ क ग # २ क ग हातियरीं ३ घ जीत*

द्रीष्टीचेनि अनुकारे : ब्रह्मचर्यातें करी घावरें
 धीरामां चढे भूरे : आवो न संभाळी २१४४

कटाक्षखर्गाचीये धारेतळीं : जेणें जींतली सप्तदीपावळी
 तयासि भीडे संवंदळीं : ऐसा कवणु असे २१४५

तो वीखयभूपाळु अदटु : देखौनि सत्व सांडी लाठु
 धैर्या उपजे वीटु : अनास्तेचा २१४६

तो हाकी वाचा रसाळा : तरी बीतळे वीवेकाचा मेळा
 सएम सांडौनि पळे पाळा : नीवृतीचा २१४७

तो वीचार-वीरांमातें सूनि दृष्टी : जरी आडवेनि अघातें उठी
 तरी तो यात्रा साहे ऐसा श्रीष्टी : देखिजे ना २१४८

तो आपुलेनि सत्राणें : वीरगतावरि[1] घाली घालणें
 वाग दाटुनि हाणें : अनुरागातें २१४९

तो आवेसला लागे पाठीं : तरी श्रद्घा उभी न न्हाये नीहटीं
 चेंपुनि खोवी संमुठी : आचारवीरातें[2] २१५०

तया कांमाचीये आंगवणे : न पुरती चाडेचे उपलाणें
 देखौनि काढावा काढीती वळाणें[3] : सुधि भावाचीं २१५१

तो वाघ[4] डोलवी थोरें तवकें : तरी सांतिसैन्य भंगे असीकें
 क्षेमा[5] चरण रीगे धाकें : वीलय-वासनेसी २१५२

तो कोरसीया कांनाडी : परीछेदाचें सीर पाडी
 तया पंचबाणाची हानवडी : कव्हणा साहावेना[6] २१५३

---

१ कग. वीरकना'. २ कग. वीचारातें. ३ कग. वळणें.
४ ग. वाग. ५ ख. खेमा. ६ कखग. न साहे.

तया मदनाचीया मारांका . उतकठा मनीं वाहे संका
अनुसो-आर्तिसि सीकवी[1] आवांका : पळात्रयाचा २१५४

जया मन्मथाचेनि मानसीकें : प्रयत्न अहर्निसीं आदकें
नीर्वेद अनुतापा पासौनि फाके : जाए न पुसन २१५६

तो रोखें वांकुडी पाहे यास : तरी अवस्ता आपुली सांडी आस
पाठिमोरे करी साहास · वीळखीराचे २१५६

तो क्रोधें कोपला रीतुकांतु : तरी साधकाचा पुरवी अतु
एकांकी भीडे ऐसा अवधुतु . वीरळा नांदे २१५७

तो अनीयाळीं[2] द्रीष्टीं तावी : तरी नीद्राळता वाळे उभी
रंकवृति न म्हणे ना भि : नीचाडतेतें २१५८

नातरि हातवसी तीख तार तरी नीराभिलाखु वीसरे आपेपरु
आस्तेतें पुसे मज कवण त्रीटारु : असावया २१५९.

अथवा चचळ चपळेचीए कातरी : पडीलया दुखीताचि होए वोहरी[3]
तयामाजि येकाधायेकु नीगे वाहीरी · तरि सदैव दैवाचा २१६०

सरळेंचीय धारसां · नीराभिमानु सांपडे सरिसा
तो काकुळ्ती होए कांमपीसा . पायां लागे २१६१

तो नेहाळी तरळलेनि नेत्रें तरी मुनिजन सांडिती शस्त्रावस्त्रें
नागिवे नाचवी मदनमत्रें : त्राहाटौनिया २१६२

वेंभळी दीसे असळग : परी कळाकौसल्यें नीन्हां चांग
विदगासुनि मारी मार्ग : धर्मजातांचे २१६३

---

१ क्ग करवो. २ ग्ग. 'ळीया ३ क. वांहारी.

प्रसंनता उभारी हात : तरी लाज वीसरे पुरूखार्थ
घायें हांणौनि करीती वीघात : भावाआभाओ[1] दोन्हीं २१६४

सहजेचा वाजे वारा : तरी परधर्म कांपे सांडी गारा
घोंसाळी करी उबारा : गजबजौनि पाडी २१६५

मंदा मदनउल्हासों : चैतन्या घालिती चीखयपांसां
कुटीळा चडे आवेसा : तरी ठाओ नुरे २१६६

अमृतवदना सावे गातु : तरी प्रबोध होये गर्वगळीतु
चंद्रिका उठवी आकांतु : परशास्त्रासीं २१६७

सौम्या सवीया सीतळ : परी ध्यानस्ते तीयेचेचि[3] बळ
मळजे मीळौनि सीधी नेती सळ : रसराजाचें २१६८

नीरक्षणीं नीन्हां नीसांक : तें कामियाचें जांणे मारांक
आंकुचीता उचिते चडवी वीक : सौर्यवृतीचें २१६९

नीर्मळेचा झळके वासु . तरी वसतु मन्मयेसी मांडी सौरसु
स्तंबेतें न वीसबे नेत्रविळासु : मिसळे तो दोहींवाहीं २१७०

लव्वीता रणीं उभी ठाके : तरी एकांको वीरांमासि नाही नीकें
हास्या अवज्ञेचें करोनि वारिकें : टाकी लवलाहेसीं २१७१

मधुळी पसरेसीं बोलें पैजा : म्हणे पाहे दबडघाओ माझा
ब्रम्हवीयेसी जुझैन ओजां : तें कौसल्य नीहाळीं २१७२

धीरा आपुलेनि आंगबळें : उचीष्टेंसीं उठीति येकें वेळें
कांता क्षेत्रत्याचे दावावेया सोहळे : पारकया प्रती २१७३

---

१ क. 'वीभावो. २ क मदनाचा'. ख्ग मदना'. ३ क. 'चेनि.

कातरेची अभिनव कुळखणी ' जें झुंझतां न देखें दुजें कोन्हीं
अवचीती आंगा पडे पंचबाणीं : हृदय भेदी २१७४

भयें स्थीरा उठी एकली : तरी मुनीजनाची होय खंदळी
दैन्या वीटवौनि सांडी मुतळीं : अपात्र करी २१७५

ऐसेयां सतीसां दृष्टीचेनि मारें : वेध-वोधातें करी पुरें
आंगीं आदळल्यां नुरे : सफळ सामर्थ्य २१७६

तो संसार-वनींचा काळ-कृदांतु ' अतुरपणें दीसे अद्भुतु
तेणेंसीं मेळवी हाताहातु : ऐसा कव्हणी नाहीं २१७७

तो पापाची पाखर : नरकांचें राज्यद्वारें
तापपापासि सेजारें : विखो जाण २१७८

तो कखायाचा सखा : क्रोधाचा पाठिरखा
असंत कर्मा असेखा : विखो आदी २१७९

तो विकल्पाचें मुळ : आळींबनाचें कुळ
धर्मासि घालवि हुळ : मदमत्सरांकरवीं २१८०

तो अभिमानासि बुधि सांगता : अहकारातें दक्ष-करीता
अहतेसी पेला देता : दुजा नाहीं २१८१

तो गर्वाचा सारथी : दुःकृताचा सांघाती
अनिष्टा उपजवी आर्ती : दुर्वासनेची २१८२

तो आंगवणेचा आधारु : उंवाचा सारोधारु
प्रपंचाचा वीस्तारु : रजापासौनि २१८३

---

१ क्ग. छनीसा. २ क्ग. राज' ३ क वारण.

तो अवंचकत्वाचा वेसनीयां : लटकेपणाचा मानियां
तमातें उठवी थापटौनियां : म्हणे उभें राहे २१८४

तो अज्ञानाचा अलंकारू : अन्यथाज्ञानाचा श्रींघारु
नित्यनर्कासि महुरु : वीखो पुढां २१८५

तो दुखाचा सुह्रदु : दैनीचा जेष्ट बंधु
आदिअंतीं स्वतसीधु : असतुचि असे २१८६

तो इंद्रीयांचें जीव्हार : कपटाचें कोठार
असत्याचें भांडार : हाचि एकु २१८७

तो ओलटयाची वागुर : हिंसेचें प्रथम सार
सर्व दोखांचे व्यापार : याचि पासौनि २१८८

तो परश्रीसंतापाचे पाख : मायामोहाचें आंगरख
जीवातें नीरया नेतें नीरोख : आणिकु नाहीं २१८९

तो लोभाचा गुरु : ममतेचा मैत्रु
वीवेकातें म्हणे पारु : नावेक वेन्हीं २१९०

तो रागाचा जावळी : तर्कें बुधिभावातेंसळी
द्वेखातें म्हणे बळी रे बळी : बाप माझा २१९१

तो अभिळाखाचा वांठु : वीचारा न दटे धीटु
जुंझतां नांगवे नीटु : सरिसेनि पाडें २१९२

ऐसा विखो गहन गाढा : कव्हणी न म्हणावा बापुडा
जो ज्ञानीयातें मारूनि फुडा : गडदरां घाली २१९३

भणौनि धर्मासि रक्षण : प्रयत्न करावा नीपुण
वीखयांचें दर्शन : झणें घेसीं २१९४

सनिशार वस्त्र न व्हारें इद्रीया स्चे तें नेघारें
अस्त्रियेचेनि नारें चीत्रही वारिलें २१९५

चेतन आगें चापेगोरटी डोळस जे चातुर्ये आथिली स्पस
तीयेची पाह्य न ये वास हारभार्गी २१९६

ते गुणें उपगुणें सीहाणी बरवेपणाची खाणी
बोलौनि पुरवी आणी[1] त्रिखयात्मकाची २१९७

ते नागरपणें नीपुण जाणें कदर्पकथेची खूण
आपुली जगीं वावी आण कुसव्लतेअर्थी २१९८

ते लावण्याची लाणीं तारण्याची तरणी
रजें आथिली एक्षिणी मदनमातारळी २१९९

ते सौभाग्यें सुदर बुद्धी आगळी मनोहर
अनुरागु उपजवी थोर आपणयारी २२००

ते श्रींघारे पुरती कळाकौसल्यें जाणती
वैसीक बोले अतीप्रीती प्रमयरहळ २२०१

धुघाते कामक्रोधादीकौं गरळी[2] दीसे वीखएभूजगाची पुटिकाळी
तैसी आडवी वेणी खोरीली[3] सग्ळी जग डकारया २२०२

तयाचीये फडेवरी मज पाता दीसति रत्नाचे कीळ झव्ाव्ळिता
तैसें सीसफुल मीरवे माथा मनोहर २२०३

जेसें कनकप्रभेचें तरुट तैसें भाळस्थळ नीव्हा नीट
कटाक्ष नेपाळें सुनिळ चोखट . खाणौरी अनगाचें २२०४

---

१ कग. आइणी २ क गळली ३ घ खावी

भेदावया कांमुकाचें मन : कंदर्पे कोदंडीं लाविले बाण
तैसे मारांक दीसती नयन : वंक्रटा भवैयांतळीं[1] २२०५

ते रणनोवरे रणपींसे : प्रतापें प्रचुर सबळ सरिसे
चैतन्या झोंबों पांति आंवेसें : विखयवीरांचेया २२०६

कीं ते मदनाचे राउत हातागळे : सरांउ करीतां देती उलाळे
तैसे भीतरीं तळपताति डोळे : माह्य सुनिळ २२०७

कीं पाटिसीं बांधौनि मुंडकीं : मदन वीवेकातें नोकी
साहे रे साहे भणौनि घनुखीं : सर सांडी २२०८

सोडी दृष्टीची मालि अनीयाळी : तरी वीचाराची संदि करी वेगळी
परधर्माची तुटे जीवाळी : वेळु न लगतां २२०९

कैसा नाशावंशु सरळा : जो भोगी सुमनसौरम्याची कळा
वासु नेघे सुगंध परीमळा : घ्रांचौनियां २२१०

वेधावया विखये-मीनाचें मानस : कंदर्पे गळी ओवीलें[2] आंविस
तैसें नासिकीं मोतीं मीरवे राजस : अधरयोगें २२११

चंद्रु प्रतक्ष केला आराधनीं अनंतीं : तैसी वर्तुळ मीरवे मुखाकृती
बोलतां झळाळी दंतपंक्ती : जैसें पक्व दाळींब २२१२

अधर सुरंग कैसे अलोहितें[3] : जैसें राज्यमदा[4] आलें मुर्त
तें देखिलया आकर्खे चीत : वीत्तरागाचें २२१३

वदनीं तांबोळ मिरवे माहाराजस : जैसें शृंगाराचें फुल सुरग सुवास
कीं मदनभुजंगें मुखीं धरीलें आंविस : स्वयं वीकाराचें २२१४

---

१ खघ. भवै तळी. २ घ. गोवीलें. ३ घ. लोहित.
४ कखग. राज॰

तयाची गरळ सतंव्र : ओतली दीसे मनोहर
तैसी पीक शोभे सत्रीकारु : ओष्टपुटांवरी २२१५

राजस कुचतटांचे भाव वीसेखितां : रसीकां नीचनवी भरैल अवस्ता
कां जें मारितें अंग फुडें मन्मथा : मदनकामेश्वराचें २२१६

विखयांचीया बोला प्रथम काळीं : तारुण्य कोंभैलें हृदयमंडळीं
तैसा भाओ गमला स्तनयूगळीं[1] : रसाळांसीं २२१७

कीं शृंगाराचेनि पूर्णजळें : कांमतत्त्व उगवलें थोरें बळें
तया लागलीं दीसतीं फळें : पंचबाणाचीं २२१८

कीं मुखचंद्राचें चांदिणें गोरे : हृदयमळयाचळावरि पडे आदरे
तया ओदा स्फुटती कमोदें अरुवारें
कदर्पकामकळेचीं २२१९

नवल हस्तपल्वांचें बरवेपण : जें सविया साजिरें सलक्षण
जैसें कदर्पें भातां भरिले बाण : भरवसयाचे २२२०

सकुमारा आंगोळिया करकंमळीं[2] : भेदीति वीखयात्मकाची जीवाळी
जैसीया तीखटा भाली सरली : मन्मथाचीया २२२१

कीं प्रपंचाचां क्षेत्रीं रजोगुणें : कांम-कांडवेली पेरिलीया पंचबाणें
कीं वीकारा डीर फुटले मी म्हणें : मीसें आंगोळियांचेनि २२२२

तया आंगोळियाचां सेवटीं : नवें शोभायमान गोमटी
जैसी केतकीपत्रें वीरगुंठी : बीरलीं मकरध्वजें २२२३

कीं तया चोखीं सतारीं फुलीं : फुलीया वीकाराचीया वेली
कीं अनगें आयुध्यें हातवसीलीं : विखय-वीरांलागी २२२४

---

१ कख‍ग. स्तनमंडळीं. घ. स्तनयुगमंडळीं. २ कग. यग्ळी.

कैसा माजु मोटका मनोहर : सविया समळु साजिरा सवीकार
जैसा मदनुपंचानतुं[1] कामातुर
जगमस्तकीं क्रीडा करी २२२५

तैसें जंघायूगमावरी वेल्हाळ : कटीसूत्र मीरवे ओहरतें सरळ
कीं तारुण्य मुसे ओतलें केवळ : कांमतत्त्वाचें २२२६

कीं स्वयं श्रीधरें आपण : वाउनि अनंगाची आण
कटीप्रदेशीं केलें आवतरण : विळासियांलागीं २२२७

मांडियांची जावळीं नीन्हां नीतळ : जैसें कापुरकेळीचें वेलाउळ
कीं रतीकांताचें रमतें राउळ : रसाळां दृष्ट जालें २२२८

वर्तुळां पोटरियांचा भाओ : जो सारी वीखयसुखाचा ठाओ
देखिलयां होए थोर उछाओ : कामसक्तांसीं[2] २२२९

कांतिवा कळावीया संमठां : पाहातां वीखयात्मका पडे ताटा
टांका आंगुळीया अती बरवंटा : जैसीं रातोत्पळें २२३०

स्यामा अप्रसुता[3] सावळी : कळाकौसल्यें बुधी आगळी
लेइली मदवीयेची कांचोळी : रत्नखचीत २२३१

ते आंगासरीसी तटतटी : कुचतटांचे भाव दावी द्रीष्टी
कळावी मीरवे मनकटीं : हस्त-कडगांजवळी २२३२

कांकणावरि जडिले हीरे : ते बाहिवटेयांसीं बोलती बीरारे
खेळ खेळतातिं गजरें : एकमेकांसीं २२३३

मुद्रिकांचीं माणिकें नागरें : आंगुळियावरि शोभती सवीकारे
पाइं रुणझुणितातिं नेपुरें : चालतां हंसागती २२३४

---

१ क. 'पंचवाणु. २ कग. 'रावनीसी. ३ क. 'सुद्दा. ख. 'सुधा.

सेंदुरा सेला परीकरु : कंठीं मुक्ताफळांचा हार
भांगीं भांगटीळा सुंदरू . कुरुळांजवळी  २२३५

असो हे बहुतां शृगारीं सोभिवत : देखिलयां आकर्खे धांवतयाचें चीत
जीउ वीसरे आपुलें आत्महीत : द्रीष्टी जाल्यां  २२३६

ऐसें तारुण्य जेथ वसे : तें नीहाळितां नव्हे अनारिसें
मुनिजनां लागे कांमपीसें : दरीसनमात्रें  २२३७

भणौनि स्त्रीएचें रूप नेटकें : द्रीष्टीं न पाहावें प्रमाणपुरुखें
देखिलयां होतीं अधोमुखे  आचार–वीराचीं  २२३८

जेहीं परस्त्री मानसीं अभिलाखिली : तया वीखयवासना उपनली
सर्वेचि हिंसा आंगवीली : उभे वर्गाची  २९३९

तो तीयेसीं करी गोष्टी : तव भाताराची पडे दृष्टी
मग अंत.करणीं घाली गांठी . रागद्वेखाची  २२४०

पाठीं वीखयसेवा हावभावीं · करीता देखे नेत्रपाळवीं
तेणें आवेसु आगळा भरे जीवीं : क्रोधें सांभाळेना  २२४१

तेव्हेळीं हातवसी खर्गखांडें  वेगळी करी सीर रौडें
थापटौनि आपुलीं भूजादर्डें : जगीं जैतवतु होए  २२४२

ऐसे रजोवासनां मेले  ते आपणयां आत्मघातकी जाले
मग यमदुतीं वोढुनि नेले : नर्क भोगावया  २२४३

## निरय–वर्णन

जीये सयमें एमपुरीयेचीं दुखें · नीरुपीलीं आदिपुरखें
तीयें सांगतां जीवीं सके : सावरति नां  २२४४

---

१ कग. सयेमें.

ते नर्क बोलतां वाचे : आपुलें मन आंकोचे[1]
परी दोख नाशावया जीवांचे : कांहीं सांघावे लागती २२४५

जेहीं स्त्री पाहिली डोळां : तेथ लोहाचा तांउनि घालिजे गोळा
ठाओ नुरे पांतियां बुबुळां : असंत सामग्रीयेतव २२४६

ना तरि तीखटां चांचुचें वज्र कठीण : डोबकाउळे टोंचिती नयन
ते दुख भोगावें आपुलें आपण : कव्हणी नाभि न म्हणे २२४७

तीयें चुंबन दीधलें आवडी : तेणें लाधली सुखाची गोडी
भणौनि तातले फळें घालवीति तोंडीं : बोवाउं नये २२४८

म्हणती घेइं घेइं वहीला : तुं भोगिया चतुर भला
वीग्वो सेउं जाणसी दादुला : तुंचि एकु २२४९

तवं प्राप्त होए आलिंगन : जेणें नीवालें इंद्रीयें मन
तयाकारणें रचीली आण : स्त्री पोडषवरीखी २२५०

नागर लोहाची पुतळी : ताविजे तांवां जाळीं
तीये देवबीताति कवळी : भोगिया म्हणौनिया २२५१

तें रूप देखौनि अनारिसें : माघौता सरे मनें मानसें
तवं येर पुढें लोटी सांडसें : आंगी जडवीती २२५२

मग तो तीयेतें पोटाळी : तेणें अंतरआत्मेयाची जळे जीवाळी
यातनाशरीराची होतां होळी : मानु न लगे २५५३

जे फुलांपासौनि संकुमार : वारेनि वाळे अरुवार
ते कळाग्नीचीये उबे[3] संमोर : केवि राहे? २५५४

---

१ ग. आणि खोचे. २ खघ. फाळ. ३ कग. उके.

भणौनि जया लागलें कांमर्पीसें : ते सएमनी दुख भोगवीति ऐसें
याकारणें वीखयाजवळि राजसें : उभयां न ठकावें २२५५

## सुख-शयनामुळे होणारे नरक

तवं पुढिला दुखालागि : सर्वेचि सावध कीजे वेगीं
म्हणती उपस्थीत जालें तें भोगीं : फुलांचें अरळ २२५६

सविकार सुपवती बाज : वरि घालिजे सुमनांची सेज
मुकुटीं बांधौनि फुलांचे भोज . सुखें नीद्रा करिसि २२५७

माथां दाटुनि सुमनीं ' म्हणसी भोगिया एकु[३] मेदनीं
मजसारिखा दुजा कव्हणीं : वर्ते ना २२५८

ययाचें दुख दारुण दुष्ट अपवीत्र अवघड माहा कष्ट
तें भोगावया सुभट : जीवचि होति २२५९

बारां गांउवांचेनि मानें बहळ ' दसदसीत खैराचे इगळ
तेथ सयन करवीति दुरळ . दूत यमरायाचे २२६०

येकें कातें नीजो पुरे : तव अगाचा ठाओ नुरे
येरी सवा घातलया मूरे : परि सावध करीति २२६१

आणिका दुख देउनि आपण : रीगीजे इंद्रियार्था शरण
तेणें न चुके जन्ममरण : नीरय सयमनीचे २२६२

पुटिलाचीये पाठी कुडी कीजेति जाळ
[१] द्रीष्टी घेउनि सेविजे सीतळ मौवाळ
तयाचें सीध जाणावें पापफळ : खदीरांगर २२६३

---

१ कग. मी°.

## चंदनादि विलेपनामुळे होणारे नरक

घेउनि यक्षकर्दमाची उटी : कस्तुरीयेचा टीळा मीरवी ललाटीं
एणें जें दुख होइल सेवटीं : तें जाणे ना २२६४

अंगीं लाउनि चंदन : तोखवीजे आपुलें मन
तें देखा मुख्य साधन : तैल्यपाकाचें २२६५

अथवा पुढीला लटका देउनि आलु : घेइजे रवा द्रव्य पाखालु
तें उसीनें यमपुरीचे फेडी कालु : सहश्रगुणां २२६६

ताउनि लोहाची कढें : तेलें तळीजति तयाचे वडे
हीरवा राहील मणौनि येरीकडे : उलथौनि पाहाती २२६७

तवं अंतरबाह्य दोन्ही : उकडली देखे लोचनीं
मग पुरे म्हणौनि : बाहीरी काढिती २२६८

ऐसीं दुखें दुर्घटें : भोगावया जीवचि लाठे
जे येरझारा करीती पेठें : स्वर्गनर्कांचीये २२६९

## स्वार्थपर सुखभोजनामुळे होणारे नरक

आपण सुरसें सोपस्करें : अन्नें सेवीति अतिमधुरें
परी भुकैलें बोळीनेलयां दारें : तया घासु न घली २२७०

वेळींव सेवैया सरवळे : लाडु तीळवा अमृतफळें
खार्जे करंजीया तुपफेलें : गोडिसा आंबेरसु २२७१

साकरमांडे खीरी घारिया : आळिवां खीरी वरवीया
घृतपर वडे वडौरीया : ओगर परीमळें आथिले २२७२

---

१ कग. वोळीनले.

इडरीया आंबवडे : गुळें दाटिले कोरडे
इंद्रियां जैसें आवडे : तैसें सेवितातीं २२७३

सवियां सुवासा सीकरणी : दधी दुध पन्हें गुळवणीं
उदका देइजे भाजणी : परीमळ-पोतासांची २२७४

फेणी घ्रत गुळौरिया : सुरस मांडे मांडपुरीया
पत्रशाखा अन्न रुचावया . खारिचें आलें नीबु २२७५

साजुकें तुपें तळीलीं : वागें कारलीं तोंडौळीं*
सेंगा सूरण पडौळी : मीरें लाउनियां २२७६

खर्बूज काकडी कोहळे : वाळुकें दोडकें पडवळें
बहुत पत्रशाखें मीळे : तैं रुचीसीं जेवी २२७७

चीली चाकवत बसला : राजगीरे माटे पोकळा
घोळ मुख्य करुनि भाजिया सकळा
राइतीं नानापरीचीं २२७८

वेलें भोकरें आंबळें . कांकडे करवदें सालैफळें[3]
सधीया सुवासें रसाळें : पाले विचीत्रापरीचे २२७९

पांपड सांडे कुरवडी : एळा मीरीयें सांबार कढी
असो हे पत्रशाखांची परवडी : सांघतां चर्या ठाकैल २२८०

ऐसे खडरस अस्वादिता परत्र दुरावे सर्वथा
न पारुखे संश्रुती यातायात : जन्ममरण २२८१

---

* घ. वागें काचरी कारली. १ ख. साक. घ. शाखा.
२ कग. माठ. ३ कग. साल°. ख. सालि°.

सकर्पुर फोडी सुवासा : मुखीं घालिजति राजसा
मग घोडीया मोडी खसखसा : देंटु फेडुनि २२८२

तांबोळ सुरंग रंगलें दीसें : तेणें सुखीये होए् मनें मानसें
परी देहांतीं दुख होइल कैसें : तें ठाउकें नाहीं २२८३

ऐसें सेहाणें चतुर : अष्टभोगीं आथिले नर
ते नर्क भुंजती घोरंदरं[१] : आहाळ्वाहाळीं २२८४

या पदार्थाची गोडी : अच्युतेंसीं अंतर पाडी
यमपुरी दाखवी रोकडी : भीरे भोगावया २२८५

अथवा मुखें बोलौनि वर्मस्पर्शु : पुढीलाचीया जीवा कीजे नासु
तेणें आयागमन गर्भवासु : कहीं न तुटे २२८६

तयाचें दुखफळ कैसें : उरावरि पाओ देउनि आवेसें
सकंदीं जीव्हा उपडिति आवेसें : वेळ न लगतां २२८७

नातरी ताउनि लोहाचीं सळे : भेदीति रसनेचीं मुळें
ऐसे दाखवीजति सोहळे : हातात्री २२८८

## सुगंधसेवनामुळे होणारे नरक

परीसा घ्रणों इंद्रिएचा[२] वेध : जें परीमळ आवडे सुगध
जैसा फुलालागि खटुपद : सदा तादांमकु २२८९

जाइजुइ मोगरें मालती : चांपे बकुळ पाडळ सेंवती
ऐसीया अनेगीं पुस्पजाती : भोगु जाणे २२९०

---

१ कग. घोराघर. २ कखग. इद्रियें घ्रूणाचा.

सवियां सुहाया सीतळ : वाळां पाचि करंवाळ
सोनेकेतकीचा परीमळ : अति आवडे २२९१

कापुर कस्तुरी हरीचंदन : कुंकम केशरें वेधे मन
भोगीं जवादि भरूनि आपण : वीचरे वधुजनांमाजी २२९२

करी हांसा राभस्य रळी : कवतीकें खेळे जळकेळी
बहुतां मीळौनि मांडी धुमाळी : वेळु गमावेया २२९३

देखौनि स्त्री स्याम सांवळी : मुखें तीयेवरि टाकी गूळळी
करिं धरुनि चंदनचीपोळी : सींपीती येकमेकांतें २२९४

हातीं घेउनि कनकघोटे : डोळयाचे भाव करी हींपुटे
मन नीन्हां चैतन्य चोरटें : वीखयलपट २२९५

खेळौनि सीहाणेंपणें वरीवडु : भीतरी हावभावीं रमे लांगडु
तयासि अधीन होती ते माहां मुटु : जगामाजी २२९६

मन भाळे सुवासा परीमळा : आणि दुर्गंधीचा घे कांटाळा
तो जाइल थोर दुखफळा : देखतदेखतां २२९७

ऐसीं परीमळद्रव्यें परीकरें . सेविजति अति आदरें
ते जाणावें सर्वप्रकारें ' नीरें साधनें २२९८

ऐसे करी वीनोद वीळास . गर्वे आणिकाची न पाहे वास
तयाची काळ पुरवी भडस : एमपुरीएसी २२९९

ताउनि काळकुटाचें पाणी : तया देइजे नाकवणी
कृपा भाकिता कव्हणीं : साउमे नव्हे २३००

---

१ कग निरए'.

नातरी मेण राळ दोन्ही : माजी लाखेची मेळवणी
येकत्र करुनि येके भाजनीं : बुडीं जाळ पेटवीती २३०१

तें वीघरलया उपरि पाठीं : ओतिजे दोन्ही नासापुटीं
तेणें कपाळीं भीतरि तीडीक उठी : तें तोंचि जाणें २३०२

तेथ कन्हणी नाहीं कणवाळु : म्हणती भोगिया तुं वेल्हाळु
तुज आवडे थोर परीमळु : तो घेइं आतां २३०३

अथवा अग्नीचेनि योगें बहुवसु : कीजे कथिलाचा रसु
तयाचां नाकीं देति नसु : घेइं म्हणौनि २३०४

तो जाउनि गोल्हाटीं : जीवाची जीवाळी नीवटी
ऐसीं दुखें सेवटीं : जीवचि भोगी २३०५

## वस्त्र-प्रावर्ण यामुळे प्राप्त होणारे नरक

सवियां सुरंगें सतंबरें : वस्त्रें प्रावर्ण करी अति सपुरे
मंजीष्ट टोपेचीं परीकरे : अलोहीतें २३०६

श्रीशी नीहाळितां नेटकें नागर : सेंदूरे कुटे सत्रीकार
जैसें पार्ते मीरवे अरवार : रातोत्पळाचें २३०७

एक पातळ पांपेचें पींवळें : येक स्वेत श्रीधारु मेचुचे सोनेसळें
एक नीन्हां कृस्णवर्ण काळें : कस्तुरीसारिखें २३०८

एकी रंगाचीया आइती : जोंतीली इंद्रनीळांची द्रुती
एक परिमळें वाहाकाती : जैसीं नीळोपळें २३०९

एकीं वस्त्रें सभ्रमें चोखटें : एकें मेघवर्णी कन्हीं कासवटें
एकें मदवीएचें मंजीष्टें : माहासुनिळें २३१०

एकें सविया सोहजळें संकुमारें : एकें वाणेलगें मनोहरें
एकें पांगुरतां हळुवारें : फुल्सांसारिखीं २३११

ऐसीं नानाविधें वीचीत्रें वस्त्रें : प्रावर्ण केलीं मदनमंत्रें
तया प्राप्त होती असीपत्रें : एमपुरीयेसीं २३१२

तीखटा खांडियाचीयां धारा : तैसीं पानें असती तरुवरा
वरी घातलयां यातना-शरीरा : ठाओ नुरे २३१३

तळीं पडीलेयां होए शतचुर्ण : सर्वेचि सावध करीती काळगणें
कां दु:खभोगु तो प्रपंचेवीण : आथीचि ना २३१४

माघौता उचलौनि आवेसें थोरें : वृक्षावरी घालिती अती आदरें
हे घोरांधर सएमनीचे नीरे : जीउचि भोगुं सके[3] २३१५

ऐसीं जीवासीं दुखें भोगितां : घ्रुणा नुपजे यमदुतां
भणौनि कळियूगीचे पदार्थ जाणतां
द्रीष्टीही न पाहावे २३१६

## राज्योपभोगामुळें होणारे नरक

जालया नृपचक्रवर्ति राजन्यमौळी
दांडीय सुकासनिं बैसौनि जाए वीहाळी
परीहांसौनि मेदनीवरी कव्हणी काळीं
पाउल न ठेवी २३१७

सवियां अरुवारें अंथुरणें : वरी नीद्रा करी श्रीमंतपणें
यें ओळखावीं नीरुतीं लक्षणें : देशवळ नर्कांचीं २३१८

---

१ कग. खाडे. २ खगघ. गुण. ३ कग. सरे.

होउनि इंद्रियार्थी अधीन : त्रीसरे ब्रह्मवीद्या परज्ञांन
दवडी कैवल्यसुख आनदघन : निरेयां पात्र होए २३१९

जेवि पारधीया गोरि गातां प्रसंगीं : आपणपें लुब्ध होइजे कुरंगीं
तव येरु अवचीता आंगा घडे वेगीं : मागीलाकडौनि २३२०

स्वरीं तादात्म होए अंत करण : वीसरे मी माझें ऐसी आठवण
इद्रियार्थें पावे मरण : जीवें जाए २३२१

अथवा जळीं असौनि मीनु : होए इद्रियार्था अधीनु
तो अभिळाखें तेजी प्राणु : आंविसालागी २३२२

पारधी मांस ओवुनि गळीं : घाली उदकाभीतरी जळीं
तें दृष्टी देखौनि सरळी : मीनु धांव घे २३२३

तेया मुखें घेतां आंविस : गळीं पोवे सीस
तेथ जीवीताची आस : बोलों नये २३२४

अथवा दीवेयाची ज्योति चोखडी : देखौनि पतंगु करी वरिपडी
मग हींसा आगत्री रोकडी इंद्रियार्थे झळंवौनि २३२५

तया सुखाचेनि अनुरागें : मरण पाविजे पतगें
तेवि वीखयाचेनि संगें : दुख प्राप्त होए २३२६

जीउ सेवी इद्रियार्थु : अंगत्री मरण आत्मघातु
दुख भोगावेया समर्थु : होचि होए २३२७

यारा गांउवांचेनि मानें आइका : धगधगीत तावेयाची भूमिका
तेथ सएन करीतां वीखयामका : कैसें होए ! २३२८

जेवि खवळलेयां वीश्वानराचां मुखीं : सतपत्रीं घालिजति कवतीकीं
तें कर्पोनि जाति असीखीं : वेळु न लगतां २३२९

तेवि तंत्रपुष्टांचें दुख भोगितां : जीवां उरि नाहीं सर्वथा
परि सावध करावें[2] लागे यमदुता : नीरे भोगावया २३३०

मग उलथौनि एरी सवा : पांति भाजला कीं हीरवा
ऐसीं दुखे सदासीवा : कल्हणाहीं न व्हांवीं २३३१

होउनि पृथ्वीमंडळीचा भूपाळु : आत्मा अष्टभोगां दे आंगमेळु
रसें झळबौनि करी खेळु : विखयवासनेसीं २३३२

रीगौनि वीळासाचीए गाभारां · जन्म दे मदनकांमेस्वरा
आवडी नीगों न सके बाहिरा : विखइं तादात्में[3] होए २३३३

ऐसाही वीहाळियें[4] नीगे . तरी मन गुंतलें राहे मागें
सर्वेचि परतौनि ये वेगें : वेळु न लगतां २३३४

ऐसा आकृति-विखो सेवी : नीरतर तेंचि वसे जीवीं
जैसा काग सुक्र चुडि खोवी : अमेध्यांआंतु २३३५

तैसें विखयसेवे वेचलें मन : विसरला परत्र साधन
मग म्हणे यावांचौनि आन . सुख नाहीं २३३६

ऐसया विखयात्मका : नेईजे कुंभिपाका
मग अनेगीं जाचणुका · विचवीजे तो २३३७

माहां प्रचड थोरू . लोहाचा डेरा घोरांधरु
तयामाजि घालिजे नरु : विखयात्मकु २३३८

---

१ कग. वैश्वा' २ कलग करणे. ३ कलग 'त्मकु
४ कलग व्याहाळीए

वरी पर्वताएवढें झांकणें : बुडीं काळाग्नि पढवी नांणे
ऐसीं दुखें माहां दारुणें : जीउचि भोगी २३३९

भेण एकी सत्रा डोई काढी : तव मुदगलाची होये वरिपडी
म्हणती विखयसुखाची गोडी : तूंचि जाणसी २३४०

तो घाओ लागलेयां सीरीं : आत्मा दुखवे जीव्हारीं
सीवसीव नीरयाचें दरीसन चराचरीं[1]
करुहणाइ न व्हावें ! २३४१

सीजलया सुरणाचेनि पाडें : जीवाचें सर्वांग उकडे
तें जांणावें फळ रोकडें : अनिष्ट-सेवेचें २३४२

धरीतां विखयाची सोए : ऐसा दुखभोगु प्राप्त होए
याकारणें सर्वज्ञरायें : त्यागु करवीला २३४३

ऐसें नर्क भोगितां : घृणा नुपजे येमदुतां
म्हणौनि वीखयसुख जांणतां : कानीं नाइकावें २३४४

हे मूक्षकरुनि चौऱ्यासी : नीरे तरी जीवासी
तें सांधतां पुढीले कथेसी : विलो पडैल २३४५

## विषयोपभोगाचे नरक

विखयसंबधें अवीनास आणिक : जीवां प्राप्त होती नीत्यनर्क
ते वाचे अनुवादिता माहा दुख : मना भए संचरे २३४६

स्त्रीयेचेनि इसाळें अहर्नीसीं · जीव वैर चाळी परब्रह्मेसीं
तें ओखटें वीसवे जगंन्निवासीं : प्रसवें हनन घडे २३४७

---

१ क ग ससारी.

तयाचें दुखफळ ऐसें नीय याळें उपायें न नसे
जैं ईश्वर नाशिति कृपावशें तै विनाशु होए २३४८

असक्षात काळाग्नि रुद्राचे दळवाडें माजि वडवानळु सरिसेन पाडें
तर्‍हीं ते उपमा सानी देता न घडे नीयनरकासी २३४९

ऐसी वीव्रयसेवा करीता अतर पडे वैवल्यनाथा
म्हणौनि अनिष्टमात्र सर्वथा दृष्टीं न पाहावें २३५०

## असति-परीचा आचारधर्म

नवें वस्त्र तरी नीखेदु पागुरता आपजवे प्रमादु
करीता धर्मेसीं सवादु थीगळ वीहीत २३५१

न करावें पयोपान नेघावें श्राद्धअन्न[1]
न गमे तरी एक सावन चौंम यें २३५२

स्वनीष्ट मीठा अनोज्ञा नाहीं प्राप्त काळीं घेयावें सर्व काहीं
अथवा घेउनि घेतलेंचि नाहीं ऐसया असावें २३५३

मीनल्या धर्मेवीण सेविता आपजवे दुखण
भणौनि भगो वेदावें प्रमाण आचरतेनी २३५४

सगोत्राचया ठाया जावें तरी तयाचीये वासने वीखो होआवें
गुण घेउनि नीगावें गुणग्राहीकें २३५५

असावें उदासवृत्ती अच्युतगोत्रेंसीं परम प्रीती
करूनि न करावी सगति बहुतर काळ २३६५

पुढीलाचे दोख नेघावे[2] देखिलेया बाहिर न घडावे
पोटीं सामवावे मातेचीया परी २३५७

---

१ क श्राद्ध २ क न सगावे

तो तरी दोखेंसीं वर्त्तला : बोललीयां आपण न सेवीत गेला
भणौनि न बोलतांचि भला : वचनयोग्य २३५८

आपुलें मौन्य न भंगी : दुष्ट शब्द नाइके कर्णयुगीं
बोलावें धर्मप्रसंगीं : धर्मांचि पुरतें २३५९

अधर्माचा त्यागु करावा : धर्मासि आधारु देयावा
सदोख पुरुखू सांडावा : विशेखेंसीं २३६०

आपण दोख नाचरावे : आणिकाचें दुजयाप्रती न संगावे
गोंमटेया आड न यावें : अन्यत्राचया २३६१

करुनि लटकेयाचा परीछेदु : चुकवावा अन्यकथनाचा बाधु
मग करावा धर्मसंवादु : अवबोधसांग्येंसी २३६२

भेटलेया शास्त्रज्ञ : परस्परें करावें मथन
मग काढावें नुतन : ब्रह्मवीयेचें २३६३

करावीया माझीयाचि गोष्टी : एकमेकातें पहावें दृष्टी
पाडावें वचन अनुष्टीं : हे उभयां लाभे २३६४

भीक्षा जालयां न मनावा संतोखु : न मीळतां पडैल एकदोन उपवासु
परी सत्वाचा आवेसु : ठांकों नेदी २३६५

देहावरी तादात्म नसावें : कुचीळ मळीन होउनि असावें
रोडिकेपण अपात्रत्व आणावें : आपुलां ठाइं २३६६

आणुनि मृयाची संभावना : माथा ओडवावा दुर्जना
चीळसि उपजे जगत्राचया मना : ऐसें वर्त्तावें २३६७

जे देखसी वीखयवहळ देस : तेउतें जाउ नेदावें मानस
अटन करावें बहुवस : गडेग्रामीं २३६८

मदन–वसंताचीये मीळणीं : कामातुरा होति कामिनी
नवरस न साहाति वीरहीणी : तें नगर वर्जावें २३६९

श्रींगारु रजेंसी क्रीडा करी : मना इंद्रीया अभिलाखु सचरी
तया भोगभुवनाचा अभ्यांतरीं . न रीगावें तुवां २३७०

वीकाराचीये पाटणीं : वीखो वीळासांतें न्हांणी
तेथ नसावें ध्यानपरायणीं . क्षेणमात्र २३७१

असावें वळिताचीये संदी ' जेथ आपुली कव्हणीं नेणे सुधी
अन्यत्रावरि नुपजे बुधी : आपणयासीं २३७२

पाहुनि नीराबाध स्थांन : योगियें सेवावें रानवन
जेथ अखंड फावें चींतन : काळ वायां न वचे २३७३

नसावा दुजयाचा योगु : असतां घडे गोष्टिप्रसगु
नीरंतर होआवा अनुरागु ' माझा स्वरूपीं २३७४

जया देशाचा सेवटीं : स्मरण सर्व्वेसीं साधे गोष्टी
तो प्रदेशु न सडावा सुभटीं जन्मपर्यंत २३७५

वीचार वीवेकातें करी चतुर . भाओ भक्तीसी मानी थोर
बोधु वेधासि नेदी अंतर तरी तेथचि असावें २३७६

माहानदीचां वाळुवटीं . मुनी नसावें नीहटीं[1]
रजस्तमातें द्रीष्टीं . देखावें ना २३७७

असावें सीळातळीं सीखरीं . कपाटीं कोहकीं गीरीवरी
झाडाचा पालवीं नीरंतरी ध्यान करावें २३७८

---

१ क नेहटी

नीर्वेदअनुतापाचेनि योगें : अनुसोच आर्त्ति न भंगे
असावें अच्युताचेनि संगें : माहां तापसी		२३७९.

नसावा आश्रो मात्र : नवरसां न व्हावें पात्र
तोडुनि आसेचें[1] सूत्र : साधावी[2] एकांकीता[2]		२३८०

पाडावा वीकल्पाचा वीसरू : वीकारीं न करावा आदरू
समुळीं उपडावा अकुरू : अहंतेममतेचा		२३८१

होउनि नीरालिंबन : लोंशें नेदावें वासना मन
अदृष्टावांचौनि आन : आपुलें नव्हे		२३८२

शमदमांचेनि योगें : इंद्रीयें जीणावीं नीसंगें
मग मनोरथातें म्हणावें उगें : स्थीर राहे		२३८३

वीखो अन्यधर्माची सांटवण : तेथ बोलों नये स्मरण
भणौनि करावें देहदमन : देवालागी		२३८४

चालतां सहजें[3] आंगें : प्रमाणुची व्यक्ती न भंगे
ऐसें विचरावें वीतरागें : महीमंडळीं		२३८५

आचरतां अधीकवृती : नव्हे साधननीस्पती
रंकपणेंचि नीवारिती : मानाभिमान		२३८६

माधुक्रीयेचें[4] वांचौनि अंन्न : सदा सेव्य नव्हे पचन
होउनि वर्तावें अधीन : ईस्वरधर्मासी		२३८७

न भरतां वृतिरसु : साधनीं असावा अभ्यासु
उपजो नेदावा त्रसु : प्रेत्न सावध होआवें		२३८८

---

१ क. असकीचे.   २ क. साधावा एकाता   ३ कखग. सजें.
४ क. माधुत्रिये

व्रीती[1] मपीत आहारु नेघे : भरलेपणें उणें अंन्न मागे
अती सत्वस्मरण भगे : वीखयां शरण जाये २३८९

प्राप्तवचनवाक्यलंघन : स्वनीष्ट वासने दे मन
येणें आचारें साधकजन : साध्य न पवे २३९०

त्रसलेया अन्नाची आस करी : वीसरे साध्यसाधनाची थोरी
मग प्राप्तअप्राप्त सेउं आदरी · द्रीष्टी न पाहात २३९१

हा वीधि हा नीसेधु ऐसें न विचारी मनें मांनसें
भुकैलें काउळे तादात्म जैसें : बळीकरणालागी २३९२

ना तरी देवतांची जालेयां झडपणी
मुद्र ओवाळुनि सांडी पांचांखरी गुणी
तें देखीलया धांवती सातपांच सुनीं : खावेयालागी ३३९३

पुढील आंधी घांसु घे तोंडीं · तंव मागिलांची पावे लवडी[2]
मग शोवतां होए कळवंडी : एकमेकांसीं २३९४

तें अंन्न तरी न ये हाता : परी दुखीये होती भांडतां
भणौनि प्रेत्न करावा सर्वथा : त्रसों नेदावें २३९५

तैसा त्रसला होतसांतां जीवु : वीहीत–अवीहीत दोन्हीं लागे सेउं
पाठीं मुख्य विखयाचौं अनुभवु : मनीं असौंसों करी २३९६

तो प्रथम उल्लेखु न मोडे : तरी विखयाचीये वागुरे पडे
मग नीगों न ल्हाये चहुकडे : पासीं आकिला २३९७

---

१ कग वृती. २ खग लवडी. ३ कग. सेवा'. ४ कग. असता. ख. आसांसा.

हारभावीं वीखो सेवितां : दुरावे कैवल्यदानी मोक्षदाता
जीवा नीरयापासौनि रक्षता : आंणीकु नाहीं २३९८

ऐसें प्रमाणग्राह्य आचरती : ते आदरें वीखया शरण जाती
दुखभोग प्राप्ति होय अंतीं : अद्रीष्ट दुरावे २३९९

भणौनि प्रमाणपुरुखें : वृति नाचरावी साधकें
त्रसों नेदिजे हें वचन नीकें : अनुष्टु जाणावें २४००

न व्हावें रसक्रीये अधीन : प्रयत्नीं सावध करावें मन
तैंचि पाविजे स्वरूप आनंदघन : अच्युताचें २४०१

स्वय आपण आदिपुरखें : प्रेत्नीं साह्य सांघीतलें श्रीमुखें
येणें आचारें नासति भवदुखें : अनता जन्मांचीं २४०२

न भोगावी सुखस्थीती : करावी दुखेंसीं सगति
कर्मनाश तो अप्राप्ती . वाचौनि नाहीं २४०३

शास्त्राअंतरवृत्ती[१] : माधुक्रीया करावी इती
सानें थोर न पाहुनि वीरक्तीं : भीक्षे रीगावें २४०४

सांडौनि स्वस्तें घरे : सभगाचीं देखौनि सैरा वीचरे
तेणें संन्यासलक्षण भगे पुरे : वितरागांचें २४०५

गोडिया नेघावें अन्न : सारनी गगेचें भोजन
मग देवेंसीं करावें सयेन : झाडातळीं २४०६

जेथिचे जे प्रमाणु : ते तेथचि करावें सवान
मग घालावें आंयुरण : जें वचन वीहिलें २४०७

---

१ कध. शास्त्र'

व्रीती[1] मपीत आहारु नेघे : भरलेपणें उणें अन्न मागे
अती सत्वरमरण भगे : वीखयां शरण जाये २३८९

प्राप्तवचनवाक्यलंघन : स्वनीष्ट वासने दे मन
येणें आचारें साधकजन : साध्य न पवे २३९०

त्रसलेया अन्नाची आस करी : वीसरे साध्यसाधनाची थोरी
मग प्राप्तअप्राप्त सेउं आदरी : द्रीष्टी न पाहात २३९१

हा वीधि हा नीसेधु ऐसें . न विचारी मनें मांनसें
मुकैलें काउळें तादात्म जैसें : बव्हीकरणालागी २३९२

ना तरी देवतांची जालेयां झडपणी
मुद ओवाळुनि सांडी पांचांखरी गुणी
तें देखीलया धांवती सातपांच सुनीं : खावेयालागी २३९३

पुढील आंधी घांसु घे तोंडीं . तव मागिलांची पावे ल्वडी[2]
मग झोंबतां होए कळवडी : एकमेकासीं २३९४

तें अन्न तरी न ये हाता : परी दुखीये होती भांडतां
भणौनि प्रेत्न करावा सर्वथा : त्रसों नेदावें २३९५

तैसा त्रसला होतसांतां जीवु : वीहीत-अवीहीत दोन्ही लागे सेउं
पाठीं मुक्ष विखयाचा[3] अनुभवु : मनीं असौंसा[4] करी २३९६

तो प्रथम उल्लेखु न मोडे : तरी विखयाचीये वागुरे पडे
मग नीगों न ल्हाये चहुकडे : पासीं आछिला २३९७

---

१ कग वृती. २ खग ल्वडी ३ कग. सेवा'. ४ कग. अगसा. ख आसंसा.

हातभावीं वीखो सेवितां : दुरावे कैवल्यदानी मोक्षदाता
जीवा नीरयापासौनि रक्षता : आंणीकु नांहीं २३९८

ऐसें प्रमाणवाह्य आचरती : ते आदरें वीखया शरण जाती
दुखभोग प्राप्ति होय अंतीं : अद्दीष्ट दुरावे २३९९

भणौनि प्रमाणपुरुखें : वृति नाचरावी साधकें
त्रसों नेदिजे हें वचन नीकें : अनुष्टुं जाणावें २४००

न व्हावें रसक्रीये अधीन : प्रयत्नीं सावध करावें मन
तैचि पाविजे स्वरूप आनंदघन : अच्युताचें २४०१

स्वयं आपण आदिपुरुखें : प्रेत्नीं साह्य सांघीतलें श्रीमुखें
येणें आचारे नासति भवदुखें . अनता जन्मांचीं २४०२

न भोगावी सुखस्थीती : करावी दुखेंसीं सगति
कर्मनाश् तो अप्राप्ती : वांचौनि नाहीं २४०३

शास्त्राअंतरवृत्ती[१] : माधुक्रीया करावी इती
सानें थोर न पाहुनि वीरक्तीं : भीक्षे रीगावें २४०४

सांडौनि सत्वरतें घरें : संभत्राचीं देखौनि सैरा वींचरे
तेणें संन्यासलक्षण भगे पुरे : वितरागांचें २४०५

गोडियां नेघावें अंन्न : साहनी गगेचें भोजन
मग देवेंसीं करावें सयेन : झाडातळीं २४०६

जेथिचे जे प्रमाणु : ते तेथचि करावें सत्रान
मग घालावें आंयुरण : जें वचन वीहिलें २४०७

---

१ कध. शास्त्र

ना तरी असावें ग्रामाचा प्रांतीं : नीर्लेपे देउळीं पहुडती
रसाळ शब्द कानीं न पडती : तैसा ठाइं २४०८

ना जरी मनीं शका स्फुरे : तरी मनुष्यें पाहावीं नीर्वीकारे
तेथ मुरुकुडी घालावी आचारे : अळकरीलीं[1] जें २४०९

ध्यानस्थ होआवें पस्यात पाहारीं तेव्हेळीं मी हृदयासी बीजें करी
तो काळ साधावा योगीस्वरीं[2] · माहा उत्तम २४१०

नसावें येके स्थानीं : नाइकावी गीतध्वनी
जेथिचे जे शब्द ते तेथचि वीसरौनि जाओं लागावें २४११

नेघावें सलागाचें दरीसन जेथ धर्माचें नाही पुरतेपण
अधर्मे कत्र्ळीजैल आपण भेटि जालिया २४१२

नसावें बहुत परीकरणीं[3] : न करावी नाथिली उघाणीं
आपणया होए सचहांनी : ते गोष्टीचि ना २४१३

बहुतांचां गोदळीं · घडे नींदा राभस्य रळी
मग अभिमानाचां दावानळीं : पडती एकमेक २४१४

अनमोदु वीसरे गुण बोले पातळ पीसुन
मग प्रीती सौजन्याची खूण : हारपौनि जाए २४१५

क्षेमे-नीवृतीचा मुळीं : पडे क्रोधाग्नीची[4] इगळी
ते बुधि-भावातें जाळी : वेळु न लागतां २४१६

एकमेका उपजे आवेंसु परस्परे होए धर्माचा नासु
भणौनि बहुताचा सहवासु : न करावा तूआ २४१७

---

१ ग 'वरिले. २ कग. योगें' ३ क. प्रकर्णीं ग. प्रकणी
२ कग. वाम'.

असावें एकलयां एकांकी : चाडश्रधेसीं देह सोखी
आवडी जन्म लावी लेखीं : अवस्तापुर्वक २४१८

चर्म अस्तीसीं जीरे : अवेवांची व्यक्ति उरे
आत्मां परमात्मयांतें स्मरे : अहर्निसीं २४१९

वीचरतां हारीं पाउल न पडे : मुखें बोलात्रयाचें सांकडें
ऐसाहीं गोष्टि करणें पडे : तरी अच्युतेंसीं करावी २४२०

हातें न करवति आयास : खटखटां वाजती संदिकळास
नेत्रीं पाहावी वास : माझीये मूर्तीची २४२१

उदर पाठिसीं शरण रीगे : भूजादंडाचा व्यापारू भंगे
कपोळीं ठाय सांडिले आवघे : चाळे सुखोल होती २४२२

सर्वांग दीसे नीभाव : इंद्रीयांची मोडे धांव
मनोधर्मीं सांडिली हांव : संकल्पवीकल्पाची २४२३

आहाराचेनि मपीतपणें : देहद्वंदा आणावें उणें
वरी हस्तलीखीत उमटे वाणें : तैसें दीसे सीराजाळ २४२४

असावी मनुस्यमात्राची आकृति : करावी फळ्यासनेची नीवृती
विखयभोगीं सांडिली संगती[1] : अपात्र भणौनि २४२५

जे अप्रस्यें मळकें : नीर्वीकार फाळकें[3]
तें पांगुरावें पुरुखें : वस्त्र देखा २४२६

अथवा हाताचेंचि प्रावर्ण : करुनि दीगंबरां होआवें आपण
तेणें नीराश्रयासि लक्षण : सविया होए २४२७

---

१ कखग. सपती. २ खग. अप्रास्य. ३ कखग. फाटकें.

देह प्रेतासारिखें दीसे : उमटती प्रपचाचे ठसे
आत्मा उजळे ब्रह्मरसें : होए प्रेमासि पात्र २४२८

नसावा व्यक्तिवर्णु : याती नेणवे काइ कवणु
शुद्र की वैस्य ब्राह्मणु : ऐसें कळों नेदावें २४२९

आणावी रंकपणाची कळा · जैवि भणंग वरपडें होए दु:काळा
कां अंतेजु अशकती पडे दुवळा : तैसें असावें २४३०

जीतांचि होआवें मृत्यवत . देहमनोद्वंदा अतीत
आपुलें आपण करावें हीत . ज्ञानाचेनि बळें २४३१

उठीवैसीचा अर्थीं · चांग करावी नीगुती
वचनावेगळें वीरक्तीं · पाउल न घलावें २४३२

जो दंदियादुर्जनाभेण समर्था रीगे शरण
तो आपुलें सावधपण · भगों नेदी २४३३

ऐसांही दुचीता पडे . तरी तयांसि सापडे
मग दंद[१] सीधी नेति फुडें · वैरी मारौनि २४३४

तैसे ससारशत्रूचेनि धाकें . सदा जागतें असावें साधकें
धर्मे वाचौनि प्रमाणपुरुखें . क्रीया न करावी २४३५

वीधि प्राप्त नव्हतां योगी आचारवीचारातें लंघी
तया साह्ये करीते जगी कव्हणी नाहीं २४३६

असावध देखौनि पुरे : अवीधि संचरे तेणेंचि द्वारें
मग करूनि जाति मारे : माहांवीघ्नें २४३७

---

१ ध. ददी. २ क्म. 'चि.

पडे इष्टाचा वीसरु : होए अनीष्टीं पडीभरू
तो धर्मापासौनि जाए नरू : पदार्थसंबंधें २४३८

देखौनि स्त्री रुपस बरवी : मन आत्मयातें कष्टवी
मग वीखो भोगी हांवभावीं : सांडवीतां न संडी २४३९

लागलेयां कामाचें पीसें : बीधिनीखेदु डोळां न दीसे
मरणातें आंगवी मीसें : धर्माचेनि २४४०

जीए काळींचें जें वचन : तें लघुनि होए रसनीए अधीन
तेणें सीधी न वचे साधन : योग्यता नाहीं २४४१

ईस्वरीचें प्रमाण न भंगे : तोचि वीधि लेखीं लागे
एर करण वाउगें : करावेंचि ना २४४२

प्राप्त जालयां दुख : एतीं न मनावें[1] असुख
न भोगावें मानसीक : धर्मी दक्ष होआवें २४४३

पावलया देहघातु : जीवें न सोडावा अनतु
हृदइं दृढ धरावा अच्युतु : आत्मेनसीं २४४४

बोलतां धर्मबाह्य बोल : नाही सुखश्रयाची ओल
ते गोष्टि आइकतां प्रसौ होइल : अन्यवार्त्तेसीं २४४५

असावें मपीत भाखण : न बोलावें अधीक निऊण
धर्मी मीळे तेंचि वर्तन : एतीं वर्तावें २४४६

बोलतां शब्दें उचें : पुढीलाचें मन सकोचे[2]
तें उत्तर हांसौनि वाचे : एओं नेदावें २४४७

न म्हणीजे उत्तम हीन : सोच्य देखावें आपणयां आपण
सुख न मनावें मजवीण : कव्हणी काळीं २४४८

भणौनि प्रधान करुनि वीचारू : योगियें आचरावा आचारू
तैंचि जीणवे संसारु . माहादुर्घट २४५९

असळग न व्हावें कव्हणा : भगों नेदिजे आगाधपण
गांभीर्यें आंगिकरावे गुण : गहनतेचे २४५०

असतां आहाच उखर : अन्यथा होए आणिकांचें अंतर
जेणें आपैसा होइजे पात्र : तो वीधि न करावा २४५१

पुढीला वीकल्प जने वायावीण तें मनेंमानसें न करावें करण
सदा सावध वर्तावें आपण : सर्व अर्थी २४५२

कीजे वचनवीहीत आचरण : तेंचि कीर्ति-एसासि कारण
जेणें आंगीं बाणे भारण ज्ञानयोगाचें २४५३

असावा शांति-नीवृत्तीचा शृंगारू . क्षेमा अळ्करीला होआवा योगेश्वरू
पराभवीलया नेघे वीकरु : दुर्जनाचा २४५४

सुखदुखीं नव्हे अनारिसा : न पडे कामलोभाचीये धारसा
आपणया लागों नेदी पांसा मायामोहाचा २४५५

सुरसीं न व्हावें सुभर : सदन नेघिजे सवीवर
कदन्नेंचि भरावें उदर : नीरसें भणौनि २४५६

करीतां रससेवना भीक्षु साधनीं पडे उणा
मग न ए सत्वस्मरणा : धर्मि नीबळु जाए २४५७

साधनीं असावें वेचलेंपण : हेंचि उत्तमाचें लक्षण
जें मज रीगावें शरण : सर्वभावीं २४५८

जैसे वीरहीणी पतीचां वीयोगीं : अष्टभोग डाजती आंगीं
नवरसांचा भाओ-भुजगीं : डकिजे ते २४५९

तैसें माझां असनिधांनीं : सुखीया नसावें मुनिजनीं
वीखोमात्र दृष्टीं देखौनि : तीडीक उसळावी २४६०

तोडुनि वीखयांची वासना : मीं वांचौनि आंन नावडे मना
हाचि सारोधार परज्ञाना : परशास्त्राचा २४६१

अहर्निसीं असावी आत्मसुधी[1] : उपजों नेदावी पापबुधी
कृपा प्रधान करुनि सकळवीधी : दास्य करावें २४६२

माझया प्रवृत्ती : चराचरीं चैतन्य व्यापारती
मीं असें सर्वभुतीं : सुक्षमरूपें २५६३

भणौनि चतुर्वीधा भुतग्रांमां अभयदान : देउनि बोलावें प्रीयवचन
कुचंबों नेदावें मन : भूतमात्रांचें २४६४

सांडौनि सकळै हेतु : न करी फळाचा मनोरथु
मग होउनि वीत्तराग वीरक्तु : मातें धरावें २४६५

### विषय-वैऱ्याबरोबर साधकाचे युद्ध

ऐसा प्रयत्न करीतां : न संवरे रजाची अवस्था
तरी आणिक उपाओ आतां : सांघैन तुज २४६६

तुं होइं आसाहानां[2] क्षेत्री : खांडें काढुनि नीगें वीखयावरि
तरहातें भालि हाणौनि गुदारा करी : एरीसवा २४६७

---

१ घ. 'बुधी. २ घ. 'हान.

जऱ्हीं वीकाराचेनि राउतें रजें वीसाळें : कटाक्षाचां बाणीं सीर केलें वेगळें
तऱ्हीं धड तुटलया जीवें न संडावें सळें : ईश्वरधर्माची २४६८

तुंआं नेघावा दरारा : न भियावें कुदांतां संसारा
रणीं उभा ठाकें रणनोवरा : मग सीधी नेइन मी २४६९

तुं होइं नीमीत्यमात्र : वरि भवे माझया नामाचें नामचक्र
माझी मुर्ति नीरंतर : जवळीचि असे २४७०

तुवां वीरामाचें वीरावें : पोटापासौनि आंगवांवें
तैचि साह्य वर्तैल बरवें : मजकडौनि २४७१

तुं जुझारां राओ जुझारां[1] जगजेठी
रणस्तंबु स्थावरीं[2] देशाचां सेवटीं
मग पाठिमोरी करीसील सृष्टी : माझेनि बळें २४७२

विरामांचेनि सर्वदे–बळें : देह इंद्रीयांवरी करीं आगळें
नीचाड भाट पाठउनि बाधे दळें : माहांकाळासीं २४७३

करुनि जन्मांचें खांडें : विभाडावें वीघ्नाचें अवघडें
मग उचीत पावसी रोकडें : ईश्वर–धुरेचें २४७४

लेउनि वैराग्याची संजुती . ज्ञानाचीं शस्त्रें घेउनि हातीं
भक्तीचां घोडा वळघौनि क्षेत्रीपती : वावें ससारावरी २४७५

बाणौनि नीवृत्तीची दुपटी : वीरक्तीचे टोप मुगुटीं
राधावळी लेयावी गोमटी . ब्रम्हचर्याची २४७६

कुचीळपणाचा मुदगलु : आंगीं घालावा कंगुलु[3]
मग प्रदळ–प्रंचाननु रणबागुलु : ऐसें ब्रीद तुझें २४७७

---

१ ध.० २ घ. सावरि. ग. स्थावर. ३. क. कगोलू.

तु स्मरणें साजिरा सवळु : रणरंगु रणवंगाळु
    खांडेनि महत गाहाकाळु : मायाचक्रासी २४७८

प्रीतीचीया पाखरा : घाली घोडेया तुखारा
    मग उत्पवन करीं वांनरां : चक्रेस्वराचा २४७९

अनचक्राचीया सुडग्रां : आगडी बांधौनि धरी[२] आंगाका
    रणपीसा होइं तु नीका : ब्रम्हचर्या घोडयाचेनि न्यायें २४८०

आव्हाराचां गजरीं : आइकौनि मायामोहा ऐं स्वारी
    रणभयासुरे तुरे सैन्याभीतरी : सुडार्मी तुं २४८१

हाक देउनि उठावें : पुढील पाउल मागें न ठेवावें
    माझें नांव सारुनि जावें : पारकेयावरी २४८२

पातला रे पातला ससारा : मीं चक्रेश्वराचा वानरा
    तुं माझेया भुजाचा उगारा : साहासी केवि ? २४८३

ऐसें भणौनि त्यागाचे सावळें : मोडारी अहंकाराचीं भडवळें
    नीन्हा नीभाजांगीं दळें : मदमत्सराचीं २४८४

अप्राप्तीचा सेल्याटीं . फेडुनि[४] कर्माचे भार परते लोटीं
    मग साहे रे साहे भणौनि उठीं : एकें वेळें २४८५

वीचाराचीया सागी : वीखयाचीया नाइकाडी भगी
    आचार-खर्गाचे घाय देयावे[५] आंगीं : फळवासनेचां २४८६

मायाटुनि मात्रेचें खेडें : हानरसी देहदमनाचें मालडें
    मग पाचारौनि मारी पुढें : रजस्तमातें २४८७

---

१ साप. सडवा २ साग न'. ३ मग मेति ४ प फेडुनि. ५ स्लग. 'वेया.

वीवेकाचेनि फरसें निघातें : हाणौनि पाडी अभिमानातें
शांतीचेनि ओडणें आपणयातें : नीकें राखै २४८८

महातपाची सुरी . पडीतालुनि सरीसी धरी
मग नेजां खोंचीं उरावरी : अभिळाखातें २४८९

सयमाचीया सींगणी : कामक्रोधादीक भेदावे रणीं
अनुसो[२] अनुतापाचां वाणीं : वधावे रागद्वेख २४९०

नीर्वेदाची लहुडी : विकार-वीकल्पाचीं हाडें फोडी
हातांपायांची करावीं कांडी : मनोधर्मांचीं २४९१

काढुनि परछेदाची बांक : लावावें इंद्रीयधर्मांचें नाक
बांधौंडीं घालावीं निशेख : रसना हे २४९२

अनास्तेचें अलंग तीखट : खोंचौनि फोडी गर्वाचें पोट
लोभाची करी बारा वाट : वीदारुनि सांडी २४९३

धैर्याचेनि सांडसें : कखायाचीया दाढा उपडी अनायासें
मीसीया तोडुनि करी खोसें : असत्य बापुडें २४९४

धरौनि मौन्याचे आंकोडे : फाडावीं अहंतेचीं गालफडें
ममनेंचीं दोन्हीं धडें : वेगळीं करावीं २४९५

रोउनि सत्वाची सळे : काटावे डंब-प्रपंचाचे डोळे
मग दोन्ही करुनि आंधळे : जीवदान दयावें २४९६

नीढाळ्तेचेनि दीगलें : आळिंबनातें करी आदिमेलें
प्रथ्रीसंताप घाया आले : तरी चुकों नको २४९७

---

१ घ. नेउनि. २ क 'सांच. ग 'सोचि.

अनुरागाचां दांडीं : श्रीरणा करावी आडमोडी
ऐसाही आस लागैल तोंडीं : तरी तेही हाण २४९८

सळ्युनि सपाटी : काढुनि कल्पना करीं हीपुटी
पीटुनि घाली सरोटी[१] : नीराश्रयातें २४९९

नीळाग वृतीचां हातगुंडीं : सचाडतेचां मुरकुंडां पाडी
ऐसें जुझ करावें खंडोवीखंडी : संसारशत्रुसीं २५००

आर्तिचां जमदाडीं[२] : अविद्येचीं सीरें तोडी
उभउनि जैत्याची गुढी : बाहे आफळावी २५०१

जींतले रे जींतले भणौनि देयावी क्यारी
मारिला रे मारिला संसारवैरी
ऐसी अंतर्बाह्य भक्ति करी : तोचि मातें पावे २५०२

करुनि रिपुंची खदळी[३] : संश्रुनी अरीरायातें नीर्दळी
ऐसा वीपाइला भूनळीं : सहश्रामर्थ्यें २५०३

आपुलेनि आंगबळें : सीधी नेयावीं[४] धर्मसळें[५]
तैंचि मीयां कैवल्यपाळें : पसाओ देयावा २५०४

ऐसीए कळेचा जाण नीश्रांतु : नाहीं अन्यत्र शक्ती अवतारांआंतु
माझें प्रेम देयावया समर्थु : मिचि एकु २५०५

देवतांची फळे अनित्य

एक्षएक्षीणी गंधर्व असेख पापपुण्यमीश्रित इंद्रादीकाचें सुख
नीत्य मानीति ते मुर्ख जगामाजी २५०७

कैलासवैकुठीचे ब्रम्हादीक न देखती ब्रम्हवीद्येचें मुख
अज्ञान हरीहर असेख सत्यलोकवेन्हीं २५०८

हसाचें रूप धरौनि . सत्यलोका बीजें केलें मीया कैवल्यदानीं
ब्रम्हवीद्या निरपावया लागौनि चतुराननासी २५०९

तेव्हेळीं तीये स्यानीं मीया बोलिली ईस्वरज्ञानाची वाणी
परि तो अनधिकार्यां–सीरोमणी घेओ परीसो नेणे २५१०

ऐसा अयोग्य अपात्र न सचरे वीचारशास्त्र
मग मीया बीजें केलें वेगवतर नीजधामासी २५११

भणौनि ब्रम्हादिकाचीया मुर्त्ती देवपणें मजसारिखीया दीसती
परी कैवल्यसुखाची सपती बोलो नये २५१२

## शेषशायी–लक्ष्मीला वेध ब्राह्मण मृतपुत्र आख्यान

शेखसाया सारिखा बरवटु तया आला आपुलया रूपाचा वीटु
का जें देवाचीए चरणींचा अगुठा देखौनि मुगुटु
तुकीला तेणें २५१३

भुमडळीं अवतरला श्रीकृष्णु जो नागर नेटका सगुणु
तयाची मुर्ति देखौनि नारायणु वीस्मो पातला २५१४

तव करीता भातार–भक्ती लक्ष्मी जवळि पाय तल्हातीं
ते अवस्थाभुत होउनि चीतीं पुसो लागली २५१५

मग तीया भणितलें हें काइ जी अपूर्व देखिलें
कां सीर तुकीलें . तें आम्हा साघा २५१६

कां जालेति विस्मीता : काइसया तुक्रीला माथा
तें आंम्हा वीसेखता : ज्ञान कीजे २५१७

तव म्हणे सहश्रवदनु : "ईस्वरे धरीली मानवी तनु
तयाचें सुदर्य पाहुनु : आम्हीं ठेंगणे" २५१८

ऐसें आइकौनि बोलणें : लक्ष्मी शेखसायातें[1] म्हणे
"काइ तुम्हाहुनि वरवेपणें : आगळीक असे ?" २५१९

यावरी क्षीराब्धिनीवासिया : बोलिला शेखसाया
"श्रीकृष्णाचे चरण वदिलयां : आम्हां बरव येइल २५२०

तो सुंदर्याची खाणी : सौभाग्याचा तरणी
तयाचेया श्रीचरणाची सारीखेवांटणी[2]
आम्हांसि कैंची २५२१

तया श्रीचरणाचेया आंगोठयाचेनि नखेंसीं
आम्ही न पओ सरीसी"
यावरी लक्ष्मीए मानसीं : वेधु सचरला २५२२

ऐसी सदैव ते सुदरी : जे देवातें चींती अतरीं
श्रीकृष्ण भेटावा ऐसी वासना करी : आर्तिपुर्वक २५५३

मग स्त्रीया-सीरोमणी : बोलिसी सेखसैयाची राणी
"हें काइ जी सुदर्याची सीराणी : अभिनव सागत असा २५२४

वरवेपणाची गरुवती : तुम्हां वांणली असे बहुती
ते जेणें हरीली तुमची कुमती
तो आंम्हां डोळां दावावा २५२५

---

१ कग. 'सैयातें. १ कग. सारीख'.

अवधारा माझी वीनती : मीया देखावा श्रीकृष्णचक्रवर्ती"
ऐसा आग्रहो केला हे श्रुती[2] . देवें निरूपीली २५२६

मग तो क्षीरसागरीचा राणा : बुधी आगळा सींहाणा
श्रीकृष्ण आणावेया आपुलीया भुवना
उपाओ करीता जाला २५२७

ब्राह्मणा एकाचीं बाळकें : घेउनि आला कवतुकें
तवं एक माहामोहाचेनि सोखें : श्रमु पातला २५२८

तो दुखेसीं अक्रंदतु : म्हणे "ये राजीं पाप वर्ततु
माझीं अपत्यें काळ असे नेतु : वेळोवेळा २५२९

या रायाची नगरी : अधर्में व्यापिली थोरी
भणौनि मानसीकाचां पुरीं : वाहावतु असें २५३०

मीं केधवाहीं कहीं तन्हीं : इतुलाही अधर्मु न करीं
माझी प्रजा न वाढे" भणौनि राज्यदारीं : बोबायिला २५३१

तव तेथ आला सुभद्रापती
तेणें पुसीलें "हा गा ब्राह्मणा कां करीतासि खीती"
एरु म्हणे "रामकृष्ण न पुसती
तु काइ पुसतासि ?" २५३२

तवं म्हणीतलें पार्थें . "भटो, सवरा आपुलीया मनातें
मी राखैन तुमचीया बाळकातें : शोक न करा" २५३३

मग बोलिला ब्राह्मणु . "तुं कोण्हाचा गा कवणु ?"
एरु म्हणे "मी कीरटी[1] अर्जुनु : गाजीवां धनुखाचा" २५३४

---

१ घ. स्तीती. २ ग. कीरीटी.

मग म्हणितलें द्वीजवरें "तुज न रखवेति माझीं लेंकुरें"
यावरि पैजा सारिली धनुर्धरें धनजयेंनी २५३५

"मीं गीकट-कोदंड-भैरउ काळा नागवे अडउ
अपत्यें न रखें[1] तरी मुख काइ दाउ
करीन अग्निप्रवेशु" २५३६

ऐसी अर्जुन प्रतज्ञा बोलिला ब्राह्मणु आनदत आश्रमाप्रति गेला
आनघा वृतातु साघो लागला स्त्रीएपुढे २५३७

तव तीया ब्राह्मणीं भणितलें "ऐसें तुम्हा काइ जालें
आजीचि आमचें अपत्य सरलें हा अल्हादु काइसा?" २५३८

मग बोल्लिलें वीप्रनाथें म्हणे "परीस परीस काते
प्रतज्ञा सारिली पार्थें जाळेंके राखैन भणौनि" २५३९

या सब्दासरीसी तेही हरीखली[2] मानसीं
दुखनीवृति जाली कैसी उभे वर्गाची २५४०

मग तीयें मागौता गर्भ संभवला देहेंदीसु अतीक्रमला
प्रसुतीसमइ आफारीला धनजयो २५४१

"आगा आगा पडुसुता तु नीपुत्रीयाचा दाता
प्रतज्ञा सारिली ते आता साच कीजो" २५४२

"हो का" भणौनि अर्जुनें मानिलें शास्त्रास्त्रीं[3] घर पाजरीलें
गुणीं बाण लाउनि बाहीर उभे ठेले अपत्यें रक्षावेया २५४३

---

१ घ रखवति  २ फग 'खैली  ३ खघ 'अस्त्री
४ फखग पज'

तवं तीये जाली प्रसुती : न देखे पुत्रसंपती
उपजनक्षेओ अपत्य अंतीं : अदृष्टें जालें २५४४

मग बाहिर येऊनि वीप्रु : म्हणे "मरो मरो हा धनुर्धरु
काइ जीणे जीतायें भूमीभारु : वांयांवीण ! २५४५

मर मर गा अर्जुना : जळो जळो तुझी संभावना
मुख दावितां पंडुनंदना : लाजसि ना ? २५४६

जळो जळो तुझें गांजीव धनुख
काइ बोलिलासि पुरुषार्थाचें बीक
आधी देखें पुत्रमुख : ये वेळे तेंही नाहीं" २५४७

तवं म्हणे कीरटी : "भटो कां कोपतसा काइसयासाटीं ?
मज सुधि करु देया; नाहीं तरी सेवटीं : काष्टें खाइन" २५४८

एरु म्हणे "तुझेया काष्ठांतु काइ घेआवें : तुहीं वायांवीण जासील जीवें
मग तीये कोंतीयचेनि[2] दुखें कें रीगावें
कवणी मायेचां पोटीं" २५४९

ऐसें बोलिला द्वीजवरू . तवं स्वर्गा गेला धनुर्धरू
लोकपाळ धांडोळीले परी एकही लेंकरूं : देखेचि ना २५५०

मग तो जाला प्रतज्ञाहतु : मागौता आला मृत्यलोकांतु
म्हणे "धीगी धीगी[3] माझा पुरुषार्थु"
भणौनि सरण रेखलें २५५१

---

१ खघ. अद्रीप्टी. २ ख. कोंतीचेनि. ३ कग. धीगधीग.

अर्जुन श्रीकृष्णाजवळिके गेला
तयातें म्हणे "जी मी प्रतज्ञाहतु[1] जालां
आतां काष्टें खादन वहीला : जीउनि काइ करुं?" २५५२

तवं म्हणे श्रीकृष्णचक्रवर्ती : "तुम्ही सुधी करा भलतेउती
मग अग्नि-प्रवसाचें काइ केउती : गेले असे?" २५५३

येरु म्हणे "देवा आइक : मीयां धांडोळीले स्वर्गलोक
परी एकही वाळक : दीसेंचि ना" २५५४

मग म्हणे सर्वज्ञराओ
"आतां आम्हीं तुम्हीं चाला सुधी करुं जाओं"
ऐसें बोलौनि देठीया देवांचा देओ : काइ करीता जाला २५५५

तो ज्ञानीयां चक्रवर्ती : भक्तांचा प्राणपती
अपत्यें आंणावया श्रीकृष्णचक्रवर्ती : नीगते जाले २५५६

लोकालोक पर्वतवेन्हीं : रथेसीं बीजें केलें मुरारीं
तेथ रथ सांडुनि चरणचारीं : साउमे नीगाले २५५७

पुढारां असे अंधकारु : तेणें काहीं न देखे धनुर्धरु
तेन्हळीं सुद्रसेन चक्र सर्वेश्वरु : पुढें धरीता जाला २५५८

तया चक्राचेनि उजीयेडें पार्थु : चाले श्रीकृष्णाचा धरुनि हातु
साउमी कास्मीराची भूमिका असे देखतु : प्रकाशमय २५५९

तें तेज आतुर सविया : न साहेचि अर्जुनाचेया डोळया
मग श्रीकृष्णु पुढें मध्यें धनंजया : मार्गा सुद्रसेन २५६०

---

१ घ. प्रज्ञा'. २ कखग. 'याचा.

तव साउमा आला सेखशयनु तेणें देवासि केला बहुत मानु
आपुल्या राज्यभुवना गेला घेउन मोहो[1] उल्हायेंसीं २५६१

माचेयावरि आसन रचीलें तेथ श्रीकृष्णनाथ उपवीष्ट जाले
केशीं श्रीचरण झाडिले देवरायाचे २५६२

प्रक्षालुनि चरणयूगळ नानाविधि दीव्य परीमळ
वाउनि वैजयती माळ मग स्तुति केली २५६३

## शेषशायीकृत श्रीकृष्णस्तवन

" जय जय सकळ प्रमाणा आगोचरा जय ज्ञानीया ज्ञानगभीरा[2]
जय भक्तकाजकैवारा कृपाळुवा २५६४

जय जय गोकुळनायका जय एदुवश-कुळदीपका
जय भूता अभयदानदायका दयाळुआ २५६५

जए प्रतापें प्रचुरा जए उमप उदडों उदारा
जय भवभयनाशा कृपाकरा कैवल्यनाथा २५६६

जय जय दैत्य दानव मर्दना जय शरणागतरक्षका मदसुदना
जय वैरीवीभाडा दळभजना पवाडेमल्ला २५६७

जय जय अगाधा आगोचरा जय सौभाग्यसींधु सुदरा
जय सवक्षणा साकारा सुहावेया २५६८

जय जय स्वयप्रमाणा स्वप्रकाशा जय सकळसुलभा सर्वसुरसा
तो मिया देखिलासि श्रीपरेशा प्रभुराया २५६९

जय जय सुखरुपा सुखदाणी मीया देखिलासि येहीं लोचनीं
तुचि वसावासि माझा मनीं नीरतर २५७०

---

१ क माह॰ २ खघ गभेरा ३ कखग #

तुं गरुवेयां देवां गहनु : गभेरां देवां मूगुट-पाट-वर्धनु[1]
घनवटां देवां गडगर्जनु : देवपती २५७१

तुं देटियां[2] देवांचा दीनकरु : आठाइतया देवां आकृतीसारु
वीळांसीया देवां सवीकारु : वीशेखेंसीं २५७२

तुं नीसळां देवां नीचनवा : बरवेयां देवां बंवाळ्दीवा
सुंदरां देवा सुहावा : सदासर्वदा २५७३

तुं रुपसां देवा मनोहरु : भोगियां देवां अजरांमरु
वोलिकेयां देवां चतुरु : सेहाणेपणें २५७४

तुं नागरां देवां नेपाळा : कुशल जांणता सकळकळा
भुतळींचया देवां भुपाळा : उचींसीरु २५७५

तुं मठारयां देवां मीसरगंडु : मतीवंता देवा वादवीतंडु
अभिमानियां देवां अतीप्रचडु : आगाधपणें २५७६

तुं वीवेकीया देवां हवाला : वित्पन्ना देवां वीगोवा
बुधिवंता देवां सांघावा : माहांमंत्रु २५७७

उचललेयां देवां उल्हासु : कामिया देवां समरसु
रसाळां देवां राजसु : पूर्णकामिया २५७८

तुं सकुमारां देवां वेल्हाळु : सुरंगा देवां रंगवाहाळु
सुरसां देवां सुढाळु : आर्टे आंगें २५७९

तुं चालतयां देवां चौरसु : देखणयां देवां डोळेलासु
रमतयां देवां रतिवीळासु : सौभाग्यवंतु २५८०

---

१. कखग. मुगुटवर्धनु. २ कग. देठिया.

तुं उमेठां देवां अळंकारु : मुरडीयां देवां खोंबकरु
देव्हडयां देवां देठपागारु : कमळनयना २५८१

तुं सरळेया देवां समठु सरिसा : आरिखां देवांसि आरिसा
तुंतें देखौनि जगन्निवासा : वीस्मो पातले २५८२

तुं नेटकयां देवां नीकोपु : जमदंड देव जगतापुं[1]
धुर्तां[2] देवां जगझांपुं[3] : जगीं जगदाणीं २५८३

तुं उदारां देवां चंद्रकरु : साजिरेया देवां श्रुंगारु
महीमेचयां देवां माहांमेरु : मेदनीपती २५८४

तु सुखीयां देवां श्रीमंतु : अहंकार्यां देवां अदभूतु
दृप्तां देवां धुमकेतु : जगामाजि २५८५

तुं अदटां देवां असुरु : जुझारां देवां माहांवीरु
अलोटां देवां अति उग्रु : उगलमुगला २५८६

तुं दापिया देवां धाडिधडकुं[4] : नीभेडा देवां भयानकु
नीसंगा देवांतें नेमकु : नीमासुरपणें २५८७

तु असाहानयां देवां अजगरु : सबळां देवां निब्रडतरु
साति कराव्रया मेघडंबरु : दैत्यव्रीभांडु २५८८

तुं दाटुगेया देवां दव्रडघाओ मोडलयां देवा साव्रावो
प्रतापीया देवां देवरा्ओ दैत्यसुदनु २५८९

तुं उद्भटां देवां उतावेळा : ददिया देवा जगदळां
नीव्रातियां देवां नीकटाळां[5] . कौसाल्यमल्लां[6] २५९०

---

१ कखङ. °धापु २ क तु समर्थां. ३ कग °झपु.
४ क. धाडीत डकू. ग. धाडितडकु. ५ कग. नी.कंटाळा. ६ कग. °मल्लु.

तुं सुंदर्यां देवां वडवानळु : अमोद्दां देवां माहांकाळु
रणव्राउळयां देवां जगबोळु : तुआं केला २५९१

तु अविचारां देवां अव्रघडुं : रणपीसयां देवां खांडेभडाडु
गांजिलया देवां गायकवाडु : मालमर्दना २५९२

तुं क्रोधियां देवां कोपागळा : उसळ्तयां देवां उलाळा
झळ्केचयां[2] देवां झळाळा : जैतवादी २५९३

तुं अस्वपती देवां अभंगु : गजपती[3] देवां रणीं रणसींगु
नरपती देवां नीचंगा चांगु : एकला चक्रवर्ती २५९४

तुं पाताळिचयां देवां रणकुदळु : अंतराळिचया देवां उलकालोळुं
स्वर्गीचयां देवां चवर वेत्राळु : चौंहातमल्लु २५९५

तुं पूर्व-उत्तरेचीयां देवां नीघोटु : दक्षणेचयां देवा सीरसाटु
पसिमेचयां देवां धाकु अचाटु : तुझया भूजांचा २५९६

तुं चर्पटां देवां चपळु : तोंडाळयां देवां घननीळु
तु पाउस वरखसी परीवळुं : वीरश्रीयेचा २५९७

तु उद्धकां देवां उमाळा : धांवतया देवां चळवळा
हाणतयां देवां हातागळा : व्हडपंचाननु २५९८

तुं रागिठां देवां दीसां[6] सळुं[6] : कळाया देवां गोत्रकोल्हाळु
द्वेखिया देवां मारसांखळु : भाले भयासुर २५९९

---

१ ग. °हडु. घ. °घडु. २ कग. झळकतेया. ३ घ. जग°. ४ क उल्ल°. ५ कग. प्रबळु ६ कग. दीपाळू. ख. दीरा सूळ.

तुं तीखटां देवां अडदरु : मातलयां देवां प्रतापरुद्रु
तांपसां देवातें आवरू : तुंचि जाणसी २६००

तुं वांकुडयां देवा घाय उजु : आडवेयां देवां आकाळवीजु
असिधारां देवां सैंभ सहजु : स्वतंत्रु २६०१

तु भुजागळयां देवां माहाबाहो : अलेखनयां देवां कुळदेओ
पारिकयां देवांचां मस्तकीं पाओ : ठेउनि पराभविसी २६०२

तु तळपतीयां देवां तोडरमल्लु : भडभीसणां देवां रणबागुलु
बगळलयां देवां रणीं रणमल्लु : एकांक-वीरु २६०३

तु वैरी वनवारण काळडंकु : असुर-कुळ-साळिवां नीन्हा नीतंकु
अरिराय रवदळी नीभांजकु : सबळ वहनु २६०४

तु अपुरयां देवां पुरावा : भेजलयां देवां मेळावा
भंगिलयां देवांचा कुढावा : तुचि करीसी २६०५

तु अशूभा देवांचा अमोला : रणकठीणां देवांचा नीपातु केला
आचागळियां देवां त्रासु लाविला : समोर उभे न न्हाती २६०६

तु त्येजिठां देवा सीरोमणी : खरमरयां देवां समरगणी
भीडतां नांगवेसि श्रीचक्रपाणी : आमोलेपणें २६०७

तु सकळां देवांसि परु : सर्व अर्थीं आदिगुरु
तुजवांचौनि समर्थु थोरु . आणिक नाहीं २६०८

**मला, शेषशायीला तुझे वर्णन करता येणे अशक्य**

जरी दीपका सर्वसपती : उमाणें घेवंवे गभस्ती
तरी तुतें वर्णवे यदुपती : सहश्रीं मुखीं २६०९

---

१ कग. कुडलेया.

दर्पणा चंद्रमंडळा : गणना करवे सकळकळा
तरी तुझी आगाधीव गोपाळा : मज ठाउकी पडे २६१०

जैसी समुद्राची सखोलता : मुगिये नातुडे सर्वथा
तैसें तुझें महीमान अनता : मी वर्णुं नेणें २६११

नक्षेत्राचा प्रकासु : सुर्यकरेंसि करू न सके सौरसु
तैसा माझिये मतीचा वीकासु : तुजपुढां २६१२

जरी पांखांचीया तवणीं : मुरकुटा गगनासि घाली गवसणी
तरी तुझे पवाडे सारगपाणी : मीयां वानावे २६१३

मुखीक आपुलेनि बळें : जरी सिंहेंसीं मांडी सवफळें
तरी तुझीं चरीत्रें रसाळें : मीयां बोलावीं २६१४

मसकाचेनि पांखें : जरी गरुड होंकरीला उभा ठाके
तरी तुझीये लीळेचे आवांके : मज कळावे २६१५

पतगें पावकेंसीं : केवि बोलानी सरिसी
तैसें तुझें कौसाल्य रुपिकेशी[1] : मज असळगु नव्हे २६१६

जरि डोळांचेनि उदकें : माहामेरुचें सीकर झांके
तरी तुझीं नवल कवतीकें : मज अनुवादु करवती २६१७

घटाभितरीलें पुर्णजळें : जरि मेघाची ताहान वोळे
तरी परब्रह्म सांवळें : मज मनीं[2] अनगमे २६१८

खद्योतांचा वळसा : जरी दीवाकरातें संवरी सरिसा
तरी तुझया पुरुषार्याचा ठसा : मज वीसेखवे २६१९

---

१ फग. हृपी'. ल. रीसी'. २ फग. मना.

मृणाळसुत्राचां ततीं : जरि आळिला राहे इंद्राचा ऐरावती
तरी तुझी वीचीत्र शक्ती : मज व्राखाणवे २६२०

काउळे आपुलया गती : जरी चाळतां राजहंसातें[1] जींकीती
तरी तुझी अगम्य गहनगती[2] : मज कथन करवे २६२१

स्वराचेनि अपुर्वपणें : जरी साळै कोकिळातें जीणे
तरी तुझीया गुणांसीं उमाणें[3] मज घेरवे २६२२

सगात्र सेंदुरे गोरे मनीं : तें जरी पुर्विति मानीकाची आणी[4]
तरी तुझी अवघड खांवणी मज जाणवे २६२३

फटीकों चींतामणी : उदारों दीसेति सारिखव्राटणी
तरी तुझें दातृत्व श्रीचक्रपाणी : मज सांगतां सोहपें २६२४

माहानीबा आपुलेनि बळें : जरी कल्पतरुसीं बांधेवे दळें
तरी तुझया रुपाचे सोहळे : मज प्रससा करवती २६२५

जरी बुरटे गाइ लोंभाळुवें · कांमधेंनुचयासारिखे खीर श्रवे
तरी तुझें सुंदर्य बरवें · मज वाचे उचारे २६२६

परीमळें सुन्य एरंडाची डाहाळी ते मरवा-सीरेसीं[6] बोले ग्रीदावळी
तरी तुझी आगाधु क्रीडाकेळी : मज वाच्य करवे २६२७

कानवाथरे म्हैसे पाखाण तयांचां ठाइ जरी दीसे परीसाची खुण
तरी तुझीये चेष्टेचें आगाधपण : मज नीर्वचु करवे २६२८

चाचरे चरब्रटें कुआरीचीं पानें : तें जरी केतकीदळेंसीं होती समानें
तरी तुतें मीयां सहश्रवदनें : मुखें वाणांवें २६२९

---

१ कग हसाते. २ कग गुणगती. ३ ग. दे॰. ४ कग आइणी. ५ कग. फुटिका. ६ कग. मरवाश्रीयें.

कणेरी पुष्पांचा वासु : जरि पार्यातकावरी करी आवेसु
तरी तुं लक्षवेसि परमात्मा परेशु : मज अज्ञानासीं २६३०

आंगीं वास नसौनि देशवळें हरीणें
तीयें जरी कस्तुरीमृगेंसीं आणिती उणें
तरी तुतें मीयां नाराएणें : सुलभ मानावें २६३१

जान्यंधाचां हातीं : दीजे अवीध मोती
ते तथा ओवे तरि तुझी गुणकीर्ती : मज पववे २६३२

अमृताची गोडी : मुंकया बोलतां साकडी
तैसी तुझया लावण्याची पारखी फुडी : मज होववे ना २६३३

काचाची शोभा : ते जरी लोपी हीरयांची प्रभा
तरी तुझें दयाळुपण गोपीवल्लभा : मज अनमोदन करवे २६३४

ब्रह्मबीयेचें गंहींवर : वहीरे नाइके सार
तैसें तुझे गुणधर्म अपार : मी काइ जाणें २६३५

कुष्ठीयाचें देह लाधलें स्त्रीलिंगा : तें अप्रयोजक रायाचया अर्धांगा
तैसें तुझेया सौभाग्या श्रीरंगा : मी पात्र नव्हे २६३६

कां जे देवपणाचा बंधु : मज लागला नीगंधु[1]
भणौनि तुझया सुखासि कृपासींधु : मी अयोग्य जाल्यां २६३७

जे सांडौनि सकळ संपती : तुझया चरणातें ओळगती
तेचि तुतें जाणती : तुझेनि प्रसादें २६३८

घेउनि अन्यत्राची अनावडी : नीखेध भणौनि सांडी
तोचि आळंगी भुजादंडीं : तुझीये मुर्त्तीतें २६३९

---

१ खग. नीगदु. क. नीगधु.

देह इंद्रियातें दंडीती · तुझेनि ज्ञानें वर्तती
तेचि तुतें पावती . तुझया स्वरूपातें २६४०

जैसा केळाचीए पाती सुइजे दोडका : तो तेणेंचि मोलें न सरे देखा
तैसी मी तुझीए एके शक्तीची आदिपुरखा
सरीसीं न पवे २६४१

मग माझी केव्हडी मती : मी काइ करीन तुझी स्तुती
परी जैसी मायबापें सतोखती : बोला अपत्याचीया २६४२

बाळक बोले बोबडा उत्तरीं
तें आइकौनि सतोख मानिला मातापीतरीं
तैसें माझें स्तवन मुरारी तुआं अवधारीजे २६४३

जैसें तव्हातीचेनि उदकें दीनकरा : अर्घु दीजे उदयभास्करा
तैसें माझें वर्णन दामोदरा तुआ स्वीकारावें २६४४

पाडिवेया एरी दीसीं बीजे : चद्रमा दसीया ओवाळिजे
तैसें माझें वानणें बहुत मानिजे : मेघश्यांमा २६४५

रगटया पाटोळियाँ गांठि घालीतां शशांकुवाचौनि नाहीं सर्वथा
तैसी माझी वाचा गोपिनाथा पवीत्र करावी २६४६

जैसी कापुराचीया पर्वता भवती : उजळीजे गुगुळाची वाती
तैसी माझी सबीस्तर मती तुम्हां पाहुनियां २६४७

जैसा उधातया नीचनवीयाँ परीमळा
वरी नित्य मकरदपरागाचा पुतळा
तो पुजिजे सेवतयाचा कळां : तैसें मीया केलें देवा " २६४८

---

१ कखग. °ळेया  २ कख °वेया.

ऐसें स्तुतिस्तवन केलें : मग अपत्यांतें आणिलें
हात जोडुनि वीनवीलें : " जी क्षेमा कीजो २६४९

या कारणें गोसावी एथ करीतील बीजें
भणौनि मीयां सांटवीली सुखाचीय सेजे
परी तोही अपराधु उपसाहिजे : कृपानीधी २६५०

लक्षुमीयां थोर आग्रहो केला : जें तु देखावासि कौसाल्यमल्ला
म्हणौनि ऐसा प्रसंगु घडला : जें आगमनें तुमचें " २६५१

ऐसें आइकौनि भावभक्ती : बीजें केलें श्रीकृष्णचक्रवर्ती
तव लक्षुमिये सचरली वेधवती : ते सर्वे नीगाली २६५२

मग संबोखुनि तीयेंतें राहावीलें : अर्जुनेंसीं द्वारावतीयेसि आले
ब्राह्मणातें सुखीयें केलें : अपत्यें देउनियां २६५३

आपुलेनि आंगें श्रीकृष्णनाथें :
सकळ सीधी नेउनि श्लाघ्य केलें ज्ञांनीयातें
आम्हातुम्हां सुधि नव्हेचि म्हणती बळिभद्रातें
तें अर्जुनें केली २६५४

अवकीये व्रत्त क्षीराब्धी : विकरों नेणे हे प्रसीधी
परि कैवल्यसुखाची सुधी : तोही नेणे २६५५

### अष्टभैरव देवतांची हीनता

जरि म्हणो अष्टधाप्रकृती : तरी ते तमें जीवातें भस्मा नेती
गर्वाभिमानें पार जाती : आणिकातें लेखीति ना २६५६

१ फल आया'.

ते अहकार्यें आपण करीती सृष्टीरचनासहरण
परी कैवल्यसुखाचे जाण तेही नव्हेति २६५७

## विश्वरूप देवता—कैवल्यदानाला असमर्थ

विश्वरुपेसारिखें देवत जीवातें मुतीकापर्यंत मेळीत
परी कैवल्यपद महत देओं न सके २६५८

ते सकळ ब्रह्माडासि आधारू प्रपचाचा हावरू
परी कैवल्याचा दातार तेही नव्हे[3] २६५९

## चैतन्यमायेला माझें प्रेम ठाऊकहि नाही

जे सकळ सृष्टीची अधिष्ठात्री चराचर निर्मे सामात्रीलें रोमाग्रीं
ते माया माझी कामारी मातें ओळगे २६६०

माझा सकळै व्यापारु चैतन्येनाचौनि नेणे करू
परी माझया ज्ञानाचा सदेह थोरू
पडीला पराशक्तीसी २६६१

ते पातली माझा सबधु परी मीं न कळे आगाधाचा आगाधु
मींची जीवा जाणवी जगदबधु तैचि जाणिजती २६६२

अनता ब्रह्माडाची घडामोडी जीए करीता नलगे अर्धघडी
ते चैतन्य नाहीं माझा पार्डी मीं अगाध—चक्रवर्त्ती २६६३

मोक्षिसीं उपमीलें जीएचें फळ परी ते नव्हे नीत्य केवळ
मग माझें प्रेम नीर्मळ ते केवि जाणे २६६४

---

१ क पदार्थासी २ कग हारू ३ घ नव्हेति ४ कखग *
५ घ *

## माझें ज्ञान व प्रेम देणारा मीच

मी चीदब्रम्हां नेणवें मनेंमानसें : ब्रह्मादीकां लागलें जाणिवेचें पीसें
तेथ इतर ज्ञान धापिसें : कें रीगैल २६६५

जरी म्हणों जडवर्गु : तरी तयासि माझा योगु
तयांतु असौनी नीराळा नीसंगु : मीं अलक्षु लक्षे नां २६६६

मी अनादिसीध अनतु परमेश्वरु : वेदां वीतपती बोलतां आपारू
ब्रम्हवीधा करुं न सके नीर्धारू : माझया स्वरूपाचा २६६७

दयामया कारुण्य कृपा : उदार्य सौभाग्य मियां आणिलीया रूपा
सुंदर्य लावण्यें आली ओपें : माझेनि संन्निधानें २६६८

मी कैवल्याचा दाता : आत्माराम सस्वरूपीं रमता
मजचि पासौनि जीवदेवतां : सुखस्वाती होए २६६९

मीं सर्वधर्मांसि वेगळा : मग आपुला आपण भोगी सोहळा
स्वयं जांणता जाणवीती कळा : माझांचि ठाइं २६७०

मी नीरोपकु नीरूपीता : सर्व-शास्त्र-श्रोता
मींचि वीसांवा आर्तभुतां : अनुचरांसीं २६७१

जरि म्हणों अवतारु कळेचे जाण : तरी कव्हणा कव्हणी वेसन
परी तें माझें प्रेम नीर्गुण : स्वीकरीलें नाहीं २६७२

एकां अवरे फळें दयावयाची प्रवृत्ती : एक परदरयवें ब्रह्मपदा नेती
परि प्रेम देउनि जीवां अनुभौ रती : हा उलेखू नाहीं २६७३

---

१ कखग. 'ण्या. २ ख. ओप.

पाहातां वेडयापीसयाचां ठांइं : ज्ञानप्रेम यें दोन्हीं नाहीं
मग कछमछादीकें काइ : म्हणावे असे २६७४

भणौनि ऐसीये कळेचा पारखी : मजवांचौनि नाहीं ब्रह्मांडगोळकीं
उचीतीं कैवल्य देयावया आणिकी
दुजी धुर दुर्लभ नाहीं २६७५

ऐसा सुंदर्ये-सग्रामीचा सुभट : भीडतां नांगवे अदट
तया कैवल्यमंदिरीं शेसपाटु : मीचि भरीन २६७६

करीन सुखसामराज्याचा भोगता . परकैवल्यसभोगु रसीं रमता
माया-कृपा-वांचौनि सकळ देवता : दास्य करीतील २६७७

औदार्याचा[2] दांडीं साजिरा : लावौनि[3] लावण्याचा डोल्हारा
मग हालवीतील सुंदरा : दयामया कृपा कारुण्या २६७८

थरोवरी[4] सुरंग सुतंवर . प्रेमाचे पासवडे परीकर
तयावरी अरल घालिजैल अरवार · अनभुतीचें २६७९

सौभाग्याचां सेजारीं : मीं आपुली रति देइन नीरंतरीं
वीजणा जांणवील विद्याधरी : ब्रह्मवीद्या २६८०

प्रसन्नतेचा बवाळदीवा : माझा आनदु सदा सुहावा
भोगितां नीत्य मधुर नीचनवा · अधीक दीसे २६८१

भावप्रभावाचेनि वीळासें · क्रीडा केळि वीनोद हांसें
तें भगतेंसीं परेशें . म्याचि करावें २६८२

---

१ कग. कछादीक. २ कखग सौंदर्याचा. ३ कग लावुनि. ख लावौनि. ४ ग. तरो°.

जे सर्वगुणीं सुंदर[1] : सव्याज्ञ समर्थ साकार
सदा संपुर्ण स्वतंत्र : जांण माझें स्वरूप २६८३

जें नीर्गुण गुणवंतु : नीर्वीकार निश्चंत[2]
आत्मरमणीये अनंत : अनादिसीधु २६८४

जें नीलाग नीर्मळ : नीसंग भक्तिवछळ
नीरालिंबन केवळ : सर्वव्यापक २६८५

जें नीर्वेर नीराश : साक्षभुत उदास
लोभापर बहुवस : जीवांलागी २६८६

जें ममताळु महंत : उदार कृपावंत
स्नेहाळु अखंडित : आसळग नव्हे २६८७

जें ज्ञानमय गुढ गुह्यतर : प्रकाशवंत साविया सपुर
आनंदघन अपार : अनादिचें २६८८

जें अचळ कुटस्त स्थीर : ध्रुव अप्राप्य अक्षेर
अदृष्ट आगोचर : सल्क्षणीक २६८९

जें संताअसंतासि भीन्न : अपुर्व अती[3] गहन
अद्वीत सनातन : मंगळरुप २६९०

जे स्वछंदलीळ स्वइछावश : अदेखणें अतिडोळस
अभोगतें सवियां सुरस : भोगुं जाणे २६९१

जे भेदाअभेदासि मीळ्लें : सकळकळां स्वयं जाणतें
नेणीव भाव-आभाव तेथें : दोन्हीं बोलों न एति २६९२

---

१ कग. सादर. ख. सौदर. २ कग. निश्चित. ख. निश्चित.
३ कखग गति.

जे सर्वधर्मयूक्त सर्वकर्तें : सकळ सांमग्रीया सफार पूर्तें[1]
सनाथ सुध सुखीं रंमतें : स्वयं सुखरूप २६९३

जें सर्वात्मक सर्वातीत : सप्रकाशक सामर्थ्यवंत
सपरीणांम असे संतत : सस्वरूपीं २६९४

जे अवेक्तीं[2] आकारावेगळें : जयापासौनि सकळ फळें
कार्यकारणीं नीत्य नीराळें : उरलेंचि असे २६९५

जे स्थुळा–सुक्षमां सरिसें : अव्रक्रीय नव्हे अनारिसें
प्रकृतीप्रपंचा न मीळे जैसें : जळीं प्रतीबींब २६९६

जें नीराभिमान नीराधार : नीःप्रपंचू नीराकार
नीर्वीकल्प नीरंतर : नीत्यमुक्त २६९७

जें सकळ समान सहज सैंभ : सुग्र सरस सर्वसुलभ
जें आगाध दूर्लभाचें दुर्लभ : कर्हीं न पवीजे २६९८

जें अनुभवितां अमृतसार : अवेच न वेचे कल्याणभद्र
अविनाश न नसे अती मधुर : अवीट वीटे नां २६९९

जें सर्वभोगाचें सार्वरें : सकळ पदार्थीं परिपुर्ण पुरें
तें मीयां आपुलें स्वरूप अतीवीस्तारें
तुजप्रति नीरोपीलें २७००

ऐसीया माझीया पुण्यकथा आदरें आइकती : ते प्रेमपावन होती
संसार–दुःखापासौनि मुचती : श्रवणमात्रें २७०१

---

१ ग. परतें. २ कखग. व्यक्तीं.

## हे ज्ञान-रहस्य अपात्रांना देऊ नये

ऐसीया नीरुपणा होए पात्र
तोचि आनदमडळीचें राज्य भुंजे यकछत्र
आपणपें ईश्वर देति समोर : कांही वचीति ना २७०२

हें उत्तमाचें उत्तम : परमानंदाचें परमधाम
टाकावया दुजें वर्म : आणिक नाहीं २७०३

हें पवीत्राचें पवीत्र : परब्रह्म प्रसीध परीकर
पावावया मुक्षद्वारें : मूर्तिस्मरण २७०४

हें सकळ गुढाचें गुढ : आइकता आगाध अवघड
परि जें ईश्वरे केलें लळेवाड : तया सोपान समीप २७०५

तु प्रवृत्ती वीखो जालासी : भणौनि मज वीसेखे पढीयेसी
मग हे ज्ञानरत्नाची कठमाळ तुज प्रीयोत्तमांसीं :
मी सांघता जालां २७०६

जें अतीसयेंसीं गहन गुह्यतर . विचारिता वीसेखें वीचीत्र
सकळ ज्ञानामध्ये प्रचुर : स्वस्ततताकारक २७०७

तें अनतीं आराधनीं : नेणिजे साध्यसाधनीं
मींचि कृपावसें जाणवी अन्तरौनि : तैंचि जाणिजे २७०८

बहुता पुण्याचीया रासी : जीवें जोडिलीया सायासीं
परी माझेया ज्ञानाची सोय कैसी : ऐसें जाणती नां २७०९

जऱ्हीं भाओ इष्ट दोन्हीं : एकत्र कीजेति मेळउनि
तऱ्हीं ईश्वरज्ञानाची वाहांणी : ठाउकी न पडे २७१०

---

१ कग. मोक्ष°.

वैराग्याचेनि व्रतें : जीवें जोडिलीं देवतांचीं फळें
परी वीचारशास्त्राचे सोहळे : कहीं न देखे २७११

तीर्थक्षेत्रव्रतादीकें दानें : कीजेति कोडिसंख्यावेन्हीं यागयेजनें
परी माझें परज्ञान मुक्ष मनें : कल्पवे नां २७१२

कैलासवैकुंठीं घडे भक्ती : जीवासीं होए आत्मउपास्ती
परी व्रह्मवीचेची दुर्त्ती[1] : कव्हणा काढवे ना २७१३

अष्टांगयोगाचेनि आधारें : शरीरे कीजेति अजरामरे
परी तेंही पडनी एरझारें : एथार्थज्ञानेंवीण २७१४

होउनि वज्रासनीं आरुढ : ओडिएना बंधि घालीती दृढ
चंद्रसुर्यो म्हणती भीड भीड : एकत्र जालेयां २७१५

नीद्रा स्वप्न सुखपती : तुर्य अवस्था चौथी
वीसुधि चक्रीं स्थीर होती मेळावा करनिया २७१६

अष्टदळकमळीं करनि गडे सहश्रदळा आली थोरे क्रोडें
तें कुडलनी चाले पवनाचेनि पाडें . मनासरिसी २७१७

नवनाडी सदी सोळा अतीक्रमोनि आली इडापींगळा
तीहीं गुणीं केला एकवळा पचप्राणेंसीं २७१८

मग आधारं मनैपुर स्वाधिष्ठानातें[४] लघुनि जाए पसीम पथें
श्रीकुट-सीखरीं अमृतकळातें आस्वादन करी २७१९

गोल्हाट मडळाचा मध्यप्रदेसीं आत्मा अवतरे आनदेंसीं
तो एथचेया कोमळ बोधवतासी : सरि न पवे २७२०

---

१ कग मुति. २ खखग. अज्ञान. ३ कग पण°. ख मणि°.
४ खघ. साधि°.

ऐसें अवघड अपार : कष्ट केले थोर
परी परमार्गशास्त्र[1] : आंतुडेचि नां २७२१

महांतपाचेनि व्रुणें : कीजैल शरीराचें सांडणें
परी ब्रह्मचैचेची खावणि जाणे : ऐसें साधन नाहीं २७२२

हे सकळ विद्यांचा राजा : जाणावेया उपाओ नांहीं दुजा
जै कृपाकटाक्ष झळके माझा : तैंचि जांणिजे २७२३

ते पराचाचा पडीखर : परीसावया नांहीं दुजें द्वार
मीं उभेदयावांचौनि आणिक अवतार
चालतेबोलते नव्हती २७२४

ऐसा जो गोप्यपदार्थु : तो मीयां तुज केला श्रुतु
परी अधीकारेवीण वीदीतु : कव्हणासीं न करावा २७२५

जैसें पायाळा सदैवां : ज्ञानांजन सुइजे नेत्रपालवा
मग तें देखों लागे ठेवा : आनदनीधांनाचा २७२६

तैसें परीत्येजुनि सर्वदोख : जे रजस्तमावेगळे अनींदक
परमार्गीं प्रवर्तले पुरुख : तयां आइको दयावें[2] २७२७

जे आर्त्त चाडार्थी : वीखय-सेवा नलगे चीतीं
आजि पाहे अनुसरो म्हणती : तयां वंचुं नए २७२८

अथवा यथार्थ ज्ञानें जीज्ञासा करीत : वेधें अनुसरले बोधवत
सकळांपासौनि वीरमले वीरक्त : तया कथन करावें २७२९

कां जें भक्तिभावें अळकरीलें परीपुर्ण : तयां आदरें करावें श्रवण
नातरि साद्रव जयाचें अतःकरण : ते पात्र बोलावेया २७३०

---

१ कग. परमार्थ' २ कग. द्यावे.

जे देवाकारणें दुखीत ' वीरहयेथा उत्कठीत
अथवा आचारनीष्ट स्मरणव्रत
तया वीशेखें वीदीत करावें २७३१

हे वाचौनि जे अभिमानगीरीदुर्गा चटीले[1]
अहकारें मान्यते अधीन जाले
तयाप्रती हें रहस्य आपुलें बाहीर न घलावें २७३२

जे उपाधीचें मानीती सुख धर्मवार्ते नव्हेति अभिमुख
ते जाणौनि दांभिक एथार्थ बोलो नये २७३३

जे करीती अवज्ञा अव्हेरण गुण नेघौनि दोखौचि वेचलें मनें
ते नास्तीक ओळखौनि नीपुण त्यास न घलावा २७३४

जे गुणाचेचि करीती दोख ल्टकें श्रीजौनि तोडें जल्पती अनेक
ते गुणद्वेखीए पापी नींदक देखौनि नीगळ होआवें २७३५

जे कठीण भयानक तामस परश्रीसतापु करीति वर्मस्परीस
तें चांडाळ आइकौनि घेयावें मीस अज्ञानपणाचें २७३६

जे क्रुर कखाइ घातकी वासना काटले अभिलाखी
तयाजवळि हासौनि कवतुकीं उभया न हावें २७३७

जे कोरडे कर्कश सत्रीया नीचाड उदास
तयाप्रति बोल्ता आपुलेंही मानस तैसेंचि होए २७३८

जे कपट कुल्ट कुडे बोल बोलती वाकुडे
ते धुर्त[3] कारीवादी[3] पुडे मनी गाठीं घालिती २७३९

---

१ कग चढीनले २ कखग वेचलपण ३ क धुत कार्य' ग चेत कार्य'

जे लटीके नीष्टुर लावक : मान देउनि संपादीति सुख
तयाचा वीश्वास न मनावा वीशेख : अंतःकरणीं २७४०

जे दुष्ट दुमन दुराचारी : वीत्तरागांची खति भोगिती[1] अंतरीं
ते त्यजावें सर्वप्रकारीं : जाणतेन वीशेखेंसीं २७४१

जे कखाइये कुवेसनी : वीरक्तांचें[2] वीपरीत वाहाति मनीं
तयाचां वैसलयां एकासनीं : अदृष्ट दुरावे २७४२

जे कुसंगी कर्मजड : वानात्रेयालागि करीती वडबड
तयासीं करीतां सवांद अंतरे गुढ : ब्रह्मवीद्या २७४३

जेहीं धर्माची सांडौनि वाट : अन्यथाज्ञानें भरीलें पोट
तयांप्रति बोलीलयां आपणयां नीपट : धर्महानि होइलें[3] २७४४

आपण सलाग ठाय सेविती : आणि नीलागातें आचरों नेणें म्हणती
तयाचि देवासि एइल खंती : धर्मनष्ट म्हणौनि २७४५

जो मीयां आचार वीहीला : तो सांडौनि अवीधि प्रधान केला
तो पुरुख जीतुचि मेला : असतेनि आयुस्यें २७४६

जे आचरतयाचा आइकौनि शब्दु : भीतरि उपजे थोर क्रोधु
तयासि अर्थाअर्थ संबधु : लागों नेदावा २७४७

जे नीरवेदाचें[4] रीगति घर : आणि नीवृतातें हांसती अज्ञानटोर
ते नर्क भुजतां घोरांदर : कव्हणी नाभि न म्हणे २७४८

जे वीखयांतें सेविती सदा : आणि दमनसीळाची करीति नींदा
ते दुखें भोगितां कैवल्यकंदा : घ्रुणा नुपजे २७४९

---

१ फ. भाविती. २ फग. वीतरागाचे. ३ फग. होए.
४ फग. नीपेधाचे.

आपण अनीष्टें खादलें : आणि तापसांतें म्हणती ठक आले
ते अधपाता गेलें : देखतदेखतां २७५०

जे चर्याव्रतातें देखौनि दृष्टीं : रागद्वेख भरीती पोटीं
तयासि असावया सृष्टि : ठाओ नाहीं २७५१

जे आपण सवीकार सगर्व : आणि संयमियातें म्हणती आलें सत्र
तयाचे पुरती हावभाव : सएमनीएमसीं २७५२

जे ज्ञानीयांभक्तांतें देखौनि डोळां : उपजे परश्रीसतापाचा उमाळा
ते शरण जाती काळा : एमपुरीएसी २७५३

आपण दोख आचरती : आणि धर्मज्ञातें अधर्मसीळ म्हणती
ते नर्की पचती[1] : अन्यथाज्ञानीये २७५४

जे वीखयाचें करीति समर्थन
ज्ञानें वैराग्य आचरतां म्हणेति नव्हे साधन
तयाचें मुख पाहांतां घडे आत्महनन अनुसरलयांसी २७५५

अधर्माची करीती प्रतीष्टा : परधर्मातें म्हणति नव्हे नीष्टा
ते लागले नीत्यनर्काचीया वाटा . परतारक २७५६

ऐसे जयाचां ठाइं देखसी दोख : तयांप्रति न सोडावें मुख
म्हणती अज्ञान वेडे मुर्ख : तरी सुखचि मानावें २७५७

जे सकळ परीवारावरी बुधि धरीती
ज्ञानीयाभक्तातें माझां ठाइं मानिती
ते वांचौनि ज्ञानचक्रवर्ती : येर दृष्टी ही न पाहावें २७५८

ऐसें बोलौनि जगंन्नाथें : बीजें केलें उत्तरापथें
उद्धरावया आर्त जनातें : सबध देउनियां २७५९

---

१ फलग. पचीजती.

## श्रीचक्रधराचें प्रयाण : नागार्जुनाची विरहावस्था व शोक

श्रीचक्रधराचेनि सांनिधानें विरहीत : वीरहो भरला नागार्जुना महंता
तो सांघैन आतां : वीत्तरागांसीं २७६०

जैसा जीवनावेगळा मीनु : सांडुं पाहे प्राणु
तैसा देवेंवीण नागार्जुनु : राहों न सकें २७६१

गोसावीं केलया वीजें : जो न साहे जीवीताचें ओझें
वीसरला मी माझें : अवस्तेतव २७६२

वीजें केलयां श्रीचक्रधरा : डोळया सुटलीया धारा
आत्मयाची गजबज थोर : सांघों नेणिजे २७६३

आसुइं[1] कुहीजले लोचन : दाहीं दीसां धांवे मन
वाचेसि न ए आन : श्रीचक्रधरवांचौनिया २७६४

इंद्रीं[2] ठाए सांडिले : श्रवण आइकों वीसररलें
सर्वांगीं वीकळ गेलें : देवेंवीण २७६५

माधुक्रिये अवस्वरीं रीगत : भीक्षे श्रीचक्रधरु दया म्हणत
चैतन्य जालें दुचीत : दुखास्तव २७६६

गोसावीं अव्हेरु केला : मणौनि दुखाचा माहापुर लोटला
भीतरुनि उभडु आला : तो संवरे नां २७६७

मग म्हणे आहां श्रीचक्रधरा : मज कव्हणी नाहीं सोइरा
सखासुहुर्द[3] दातारा : मज तुंचि एकु २७६८

तु तवं कृपाळु जननी : सकळ जीवांतें आठवीसी अंतःकरणीं
कां मातें संसारप्रजनीं : सांडुनि गेलासी २७६९

---

१ कग. आसुवें. २ कग. इंद्रीयें. ३ कग. सुहृद.

काइ माझें वीरु घेनलें : कां अंत:करण निष्ठुर केलें
कां मातें सांडिलें : माहणवांतु २७७०

तुं जालासी उदासु : आतां कवणाची करीनें आस
तुज बापेंवीण रुपीकेशी : मज कव्हणी नाहीं २७७१

वाट.पाहातां श्रमले नेत्र : मानसीं आठवी नीरंतर
परी तुजसारिखें अन्यत्र : देखिजे ना २७७२

वायां तुतें वीसंबलां : म्हणौनि दुखा वरिपडा जालां
आतां कवण म्हणेल आपुला : तुजवांचौनियां २७७३

माझें ओखटें नेघौनि : तुं हीता प्रवर्तलासि श्रीचक्रपाणी
तया लोभाची सारिखवाटणी . आतीचि ना २७७४

मातें पाठवीलें रीधपुरां : तइ भेटी उतावेळ जालेति दातारा
तें स्नेह श्रीचक्रधरा : कां वीरस जालें २७७५

क्षेमालींगन देतां वेळीं : मासीं संन्निधानाची भास केली
जें आतां एयुनि तुज कव्हणीं काळीं
केंहीं[3] पाठीवीजे नां २७७६

तो पुढारु सांडिला : कां माझा अव्हेरु केला
काइ खांवणि चुकलां : तें तुचि जांणसी २७७७

तु आनदाची दीवाळी : भक्तजनासि केली
मग सकळ सभा सौख्य देखिली : तुझेनि आगाधपणें २७७८

तुआं जळचरां लाविला वेधु : पाखीरुआं संचरीला आनदु
देउनि जडांअजडां संबंधु : सुखीये केलें २७७९

---

१ कखग. करी. २ क ऋद्धि'. ग. ऋधि. ३ कखग. कही.

तुआं त्रीयंचातें तारिलें : स्वानसर्पातें उद्धरीलें
आनंदाचें आंवारे[1] केलें : सकळ जीवांसीं २७८०

तुझी मुर्ति सुहावणी : पाहतां डोळयां जालीं पारणीं
परमानंदाची रांकधणीं : तुआं केली २७८१

तुतें देखिलयां डोळां : वेधु लागला गाइगोपाळां
तेणें तुआं माझा पडिताळा : कां सांडिला २७८२

तुं कृपाळु अनंतु : दुखदानी नव्हेसि नीभ्रांतु
कां माझा केला घातु : वीयोगशस्त्रें २७८३

तुआं जगदेश्वरें जगन्नाथें : अव्हेरुनि उदास धरीलें मातें :
आतां कोठे पाहीन तुतें : कवणीकडे २७८४

तुआं चरणीं चरणांकीत : गौतमी केली सनाथ
दरीसणें पुरवीले मनोरथ : अनाथजनांचें २७८५

तुआं मेलें जीववीलें : जीतें सुखासि पात्र केलें
अयोग्य योग्यतेसि आणिलें : दोख नासौनि २७८६

तुं कृपावसें कैवल्यपती : अवतरल्यासि सर्वभूतीं
मातें सांडौनि केउती : कां गेलासी २७८७

तुज गुणचि आठवणें : दोख वीसरसी कृपाळुपणें
थोडेनि बहुत देणें : हें तुजचि साजे २७८८

तुं भावाचा वेव्हाइतु : न पाहासि आदिअंतु
जीव उद्धरावे हाचि हेतु : तुज अहर्निसीं २७८९

---

[1] क्रम. आराउ.

तु सुखरूप सुखसागरू : जीवां चीतु नेणसी ओखटें वीरु
तरी दुख देउनि माझा अव्हेरू : कां केला २७९०

तुआं वीजें केलें[2] देवें जीवीं[1] कैसेनि नीस्तरावें
कवणापुढे सांगावें : जडभारी २७९१

पडीलयां संसार–आगीचां वणवां : अन्यथाज्ञानें नाहीं नीगावा
ममतेचां आहीं झळंबलेयां जीवां
आतां कवण काढील २७९२

रजस्तमाचेनि जाळें : जीवाचें सवींग पोळे
तें ज्ञानाचेनि सुधाजळें : नीववीता कवण सांघें २७९३

तुआं मनुश्यां युक्तां : ज्ञान दीधलें अनंतां
प्रेम संचरीलें भक्तां : नागांवीकेसी २७९४

तुं कैवल्यसुखाचा मानसरोवरू
जेथ भक्तराजहंसांचा खेळु नीरंतरु
योगीजनचकोरांचा पूर्णचंद्रु : सर्वज्ञनाथा २७९५

तुं आनदआसनीयचा[3] चद्रमा
योगीजन–कुमोदांचा वीसांवा पुरुखोत्तमा
भक्तसोमकांताचा आत्मा · आनदमूर्ती २७९६

तुं परज्ञानाचा दीनकरु : वेधवतीय दीक्षागुरु
तुजवांचौनि न नसे आंधारू : अज्ञानतमाचा २७९७

तुं सकळ सृष्टीचा श्रृंघारु : श्रीष्टीकरीतां[4] सर्वेश्वरु
सर्मलयां[5] जीवां आधारु : अनाथनाथा २७९८

---

१ ग. जीवी. २ कग. केलेया. ३ क. आस्वीनिचीयेचा. ग. आस्वीनीयेचा ४ कग. श्रृष्टीकर्ता. ५ कग. श्रमलेया.

तुं सर्वसुखाचें वेलाउळ : स्नेहसमुद्राचें मांडवल
स्वयंप्रकासाचें बहळ · स्वरूप तुझें २७९९

तुझया वीयोगाचा वडवानळु : हृदयसमुद्रातें सोखी न लगतां वेळु
आतां आनदाचें भरीतें चढउनि सुकाळु
कइ करीसीलें[1] मुर्त्तीचद्रा तु २८००

तुं सा्धुजनाची वीश्रांमसाळा : भक्तांची जीवनकळा
सर्वसुखासि जाला उन्हाळा : तुआंवीण २८०१

आता आवडीचें आयुस्य पुरलें : साहित्य सगितासि मुंचलें
श्रींधाराचें देह विसर्जलें : आइकतक्षेओ २८०२

लावण्याचीये राणिवे फुडी . पडीली प्रवृत्ति-काळाची धाडी
ते[2] करुनि गेली[3] उघडी : ज्ञानविज्ञान दोन्हीं २८०३

सौभाग्याचें सौरम्य नेलें[4] : सुदर्याचें सत्व काढलें
उदार्य उणें पडीलें : दातृत्वेंवीण २८०४

ज्ञानाचा सूर्यो मालवलों[5] : वीचाराचा चद्रु अस्तु जाला
सृष्टीमध्ये अंधकारु पडिला : अज्ञानाचा २८०५

लोटला ममतेचा माहामेरु : आटला कारुण्यकृपेचा सागरु
दयेचा मोडला आधारु · देयावेया नाहीं २८०६

खोमली वेधाची ठाणवी : माळवली बोधाची बबाळदीवी
आचाराची वाति कवणें लावावी : तुजवांचौनिया २८०७

तुजवीण जगनीवासा : प्रेमा आली अवदसा
मोक्षाचा वीघडला कुवासा : नीढाळु ठेलीं[6] २८०८

---

१ कग करीसी. २ कग. तो ३ कग. गेला ४ कग गेले.
५ घ. मावळला ६ क. गेला. ग. गेला.

भक्तीचां सेजारीं : वीन्हाग्नी[1] प्रजळ्ली थोरी
ते तुजवांचौनि संसारीं : वीझवाशी कवणें २८०९

तुज जगदात्मयाचेनि वीयोगें : अनभुती ओसावली सर्वांगें
रति आभाओ जाली मार्गे : राहावेंचि ना २८१०

अष्टभोगाचीये राणियसां : भेवे असंभिधान–भीलांचा वळसा
जगबोळु जाला नवरसां : कव्हणी आपुलें न म्हणे २८११

सुखाचीए सावरां : दुखें संपुर्ण केला मारा
तो कुढावा दातारा : कवण करील २८१२

मुक्तीचां राउळीं जीवपती : आकाळवीजू पडली अवचीतीं
ते जाळुनि गेली संपती : सकळकळांची २८१३

तुज बीजें केलया जगदीस्वरें : बीवेकु नागवला सर्वप्रकारें
आमतें श्रीमुखें म्हणसी पोरें : तें साच केलें २८१४

ब्रह्मश्रीयेचां भांडारीं : कवण रीगाला खाणौरी
तो घेउनि गेला खुलौरी : आनंद-नीधानाची २८१५

अनुरागीं परमार्गी चाल्तां : बाट पडली कैवल्यनाथा
सर्वस्व गेलें भक्तां : ज्ञानीयाचें २८१६

बरवेपणा जाली सीराणी : रूपाची तुटली तवणी
मनमथा पडीली हांनी : वीखयसुखाची २८१७

तुजवीण सुखसंन्निधी : पोरटी झाली बुधी
जाणिवेचें वेसन कृपानीधी : कवणें पुरवावें ? २८१८

---

१ पाठ. विरहाग्नी.

अंतरलेया परेशु : रसराओ जाला नीरासु
भंगला सूखसौरस् : साहीं रीतुचा २८१९

आजि ग्रीस्मि उघडी पडीली : माधवीची उटि उत्तरली
हिमवंतीएची शक्ति काढली : सर्वज्ञनाथा २८२०

सारथी[1] जाली सत्त्वहीन : सीसु रीतुसी आलें नीवळपण
सिहाणीवेचें गेलें अंतःकरण : बोली वीसरली २८२१

वीळासवन आहाळलें : कळाकौसल्य भीतरिं पोळलें
प्रांणचैतन्य मुसावलें : रीतुरायाचें २८२२

पडीलयां वीयोगाचां दु.खानळीं : कर्पली प्रीतीची जीवाळी
प्रसंन्नता जाली आंधळी : वाट पाहांता २८२३

चातुर्य वेडावलें : आपणपयांतें वीसरलें
तुआं अनंतें ब्रीजें केलें : मणौनि देव २८२४

कुसळता नेणती जाली : कांम करुं वीसरली
महीमेसि अवकळा आली : तुजवीण २८२५

गहनतेचा कळसु पडीला : गांभिर्या घाओ जाला
घनवटीएचा मान गेला : तो कवण वाढवील २८२६

तारुण्याची लोटली सीग : कांमतत्वें सांडिले भोग
वीजयश्री जाली उरंग : तुझेनि वीरहें २८२७

तुआ अंगीकरुनि कैवल्यदांनी : परिपुर्ण केली वयस्तवनीं
ते एकली सांडुनि नीरांजनी : कां गेलासी २८२८

---

१ क. सरधी.

मोडली ब्रम्हसुखाची पेंठ : तनुसाधना जाली बारा वाट
चीतळले सकळ वीद्यांचे हाट : ते कवणें भरावे २८२९

आजि वीत्पती वीराली : वीत्पन्नतेची नीरास जाली
सखोल्ता वाग्या वेंचली : कांहीं स्फुरेना २८३०

उत्कंठा आली उतावेळपणें : ते तुवां नीववीली क्षेमाळींगनें
आतां तीयेचें कोड पुरवावें कवणें : तुजवांचौनिया २८३१

चाडेचे सोहळे : तुवां पुरवीले भक्तिवछ्ळें
तो तुं उदास जालासि एकें वेळें : कां जगंन्नाथा २८३२

आजि अवर हारपलें : परब्रंम्हीं लया गेलें
नीऱ्हां नीःश्वाळें ओडवलें : लोकत्रया २८३३

रूपश्रीयेचीं लक्षणें पुसीलीं : वीरश्री अपेसासि आली
यशें हानवडि सांडिली . निबळ जालें २८३४

तेजश्री जाली दैवहत : रूपश्रिएचें गेलें महत
नीराधार पडीलें जीवजात : सर्व अर्थी २८३५

सींतरलीया अष्टमा सीधी : नागवलिया नवही नीधी
तुष्टीपुष्टीची नाहीं सुधी · ऐसें जालें २८३६

कद्र्पा करीता अंगत्रण : पाठिसीं उभे राहे कवण
का मळयानीळाचे प्राण : घेउनि गेलासी २८३९

खोचुनि आदिलक्षुमीयेचें जीव्हार : पाडिलें सुद्धचैतन्याचें सीर
कां करुनि गेलासि जोहर : सकळ धर्मांचें २८४०

आजि आर्त्ति जाली अनाथ : कां मोकलीले शरणांगत
आतां जीवाचें आत्महीन : कवणें करावें २८४१

तुं धर्माचा कैवारी : वेगळा नव्हेसि क्षेणभरी
तो दुखाचां मांहापुरीं . कां लोटिला २८४२

परज्ञानाचा पडिला धर्मसखा : परशास्त्राचा बाहिया गेला देखा
ऐस्वर्या पाठि देउनि परमपुरुखा : कां बीजें केलें २८४३

सविया दुर्घटु दुरंधरू : केवि तरिजैल भवसागरु
जीउ कासे लावुनि पैलपारु : कवण उतरील २८४४

स्वयंप्रकासाची दीवटी वीझाली : सत्वाची गगनगंगा आटली
वैराग्याची वेलि वाळली : जीवनेवीण २८४५

तु जालया वीमुख : सांमर्थ्य सरलें नीसेख
पराधाचेसि देउनि दुख : कां उदास घरीलें २८४६

पश्यतीयेचि कुंठली धांव : वैखरी वीसरली हावभाव
मध्मीमीयेसीं[१] मांडिले माहार्णव : मरणावस्था २८४७

त्यागाचा पाठिरखा गेला : वीरामांचा टीळा पूसीला
श्रघेसि अपमृत्य घडला : तुझेनि वीयोगें २८४८

---

१ कग मध्यमेसि.

शांतिची साउली मोडली : नीवृति कवणा नीरोविली
कां क्षेमा उन्हीं बैसवीली : रजस्तमांचीये २८४९

आजि परधर्माचा पुरला अंतु : अध्यात्मे केला आत्मघातु
तपश्चर्या सांडिला साधातु : वीरक्तीचा २८५०

धैर्या दीधला देशवटा : कां मृत्युलोकु केला हींपुटा
महाराष्ट्रीं जाला राज्यलोटा - सुखसांमराज्याचा २८५१

आजि कैवल्यरत्नें अद्रीष्ट जालें : दैवंराहाटीचें छत्र पडीलें
कां जीउउद्धरणाचें वेंसन साडिलें : जीवीतनाथा २८५२

मोक्षद्रुम उमळलाँ : संताचा वीसांवा वीसवला
आधारस्तंभ मोडला : योगीजनाचा २८५३

सर्व शास्त्राचें रहस्य गेलें : देवाचें प्राणदुर्ग पडीलें
अवचीतें आकाश आदोळलें : सनकादीकावरी २८५४

वेदांचें मोडलें माहेर : उपनीखेदा दुखें जालें थोर
नीगमाआगमाचें जिव्हार : तुंचि जाणसी २८५५

तुझी वेल्हाळ श्रीमूर्त्ती : इंद्रियांमनातें नीववीती
तें कें देखैन लक्ष्मीपती परमात्मया २८५६

तुझे कृपाळु लोचन : जें जीवांसि देती कैवल्यदांन
श्रीमुख सदा प्रसन्नवदन : प्रहसीत मनोहर २८५७

तुंजवीण भक्तवछ्ळा : कवणें कराबी सबीज लीळा
कवणां चिंतीला पावैल सळा : सरणांगताचेया २८५८

---

१ कग. कैवल्य. २ कग. अदृष्ट. ३ कग. उन्मळला. ४ कखग ॥

तुं साधांचा सोएरा : नीवारीसी याजत वारा
तुजवांचुनि दातारा : नाभि कवण म्हणैल २८६९

तुआं श्रीकंठीची कंठमाळ देउनि : श्लाग्य केलें कैवल्यदांनी
तया सुखासि वीलो पाडुनि : कां वेगु केला २८७०

तुआं देवें लोभापरें : तांबोळ दीधलें श्रीकरें
बोलसी गुजाचीं उत्तरें : आत्तांप्रती २८७१

तया साधांची साधवृती : कवणें ओळखावी ये क्षीती
तुजवांचौनि कैवल्यपती : आणीक आथीचि ना २८७२

मुनीयां देउनि क्षेमांळींगन : केलें आउवेचें कर्मक्षाळन
आतां तीयेचें आभारण : कवणांसि घातलें २८७३

तुआं तया दीधला वरू : म्हणसी देखत असाल स्यामगौरू
तो वेगांचि कां सांडिला पुढारू : चैतन्यनाथा २८७४

तुआ स्वीकरुनि रंगपुजा : उदो म्हणवीसी आपुलीयां भूजा
तया भावासि पात्र प्रभुराजा : कवण होइल २८७५

तुं संतोखें परमपुरुखा : आउवेतें म्हणसी नायका
तरी तीयेची चैतन्यकळीका : कां खुडीली २८७६

कवणाचां आभारीं मायापती : घातली हंसराजें देंमती
कवण निरूपील परम प्रीती : परमार्गाची २८७७

तुआं जा भणौनि पाठवीली : परी तया न वचवेचि पाउली
मग राहावया अनोज्ञा दीधली : आपणयांजवळी २८७८

तया संन्निधाना केली वीतुटी : कां आम्हां आणली कुटी
कां बैसवीलें तळपटीं : सोभागातें २८७९

तुआं बापें कैवल्यपाळें : तयाचे सीधी नेले ळळे
आता आनदाची क्रीडा केळें : कवण देइल २८८०

ब्रम्हसुखाचीये पालखती : कवणु बैसवीला लक्ष्मीपती
तुजवांचौनि रती अनभुती : कवण देइल २८८१

आहा जगदात्मयां जगद्वंधु . कां मांनिला माझा निरोधु
का वीसरलासि कृपासींधु : मज अनाथातें २८८२

आता अज्ञानाचीया आधाराआंतु · भांबावलयां जीवां न दिसे परपथु
तयां ज्ञानचद्राचा उदो प्रस्तुत · कवण करील २८८३

मनोर्थांचीये साजवेळे : अधर्म–अहंकाराचेनि बळें
गावघेणी करीतील[1] चोरकुळें[2] : इद्रियाचीं २८८४

तुज बीजें केलया कैवल्यपती : वीखयाचीया नायकवडी बहुती
वीकारा मीळौनि घाला घालिती : योगीयांवरी २८८५

कामक्रोधाचीं वव्हाणें : संताररि उठीती थोरे मानें
तीयें तुजवीण सवरावीं कवणें : अनाथनाथा २८८६

अभिलाखु पाचारनियां भंगी आचाराचीया चरीया
आता रीगौनि देहा-धवळेया · मारील जीवजातातें २८९०

मुक्तीचीये[1] दारवठा भद्रजाती लागला अनादिअवीद्या हस्ती
तो कृपेची घेउनि काती करण वीदारिल २८९१

लोभ-प्रपंचाचीया हाउली
भीतरि जाउनि करीती स्वरततेची होळी
*धर्माची जाली आखुळी तुज देवेंवीण* २८९२

ये चराचरीं मज पाहता कव्हणी नाहीं साह्यकरीता
तुजवाचौनि आदिनाथा दुजा न दीसे २८९३

मज सावध करूनि आपण तु बोल्सी ब्रम्हवीद्यानीरूपण
तया लोभासि प्रभु दूखण का लागिलें २८९४

आता बैसेन करणापुढा करणा ओळगवीन कापुरवीडा
करण म्हणैल वानरा बापुडा तु कृपाळुवाचौनिया[2] २८९५

तुज करणाकरा करणातें म्हणेन 'जी दातारा'
करणाचे गुंफैन अळंकार पुजेलागी २८९६

तु अतरलया परमानंदु मज करण देइल ताटप्रसादु
करण सांवैल सुखसवादु प्रभुराया २८९७

तु मातें पुससी वीचारु म्हणसी करणीकडे बीजें करू
तो माझा श्रींधारु का वीघडीला २८९८

तु माझया खादावरी हातु ठेउनि बीजें करीसी जगनाथु
' तया सुखासि का पुरवीला अतु वेळु न लगता २८९९

---

१ वग भवती'

मीं ओळगवीं आंगीटोपरें : तैं तुं बाहे पसरीसी आदरें
तें आपुलेपण श्रीचक्रधरें : तूआं कां सांडिलें ? २९००

तुं सपांती मजवीण : कहीं न करीसी आरोगण
आतां कां केलें कठीण : मातें न बोलावीसी २९०१

आतां तुझा वियोगीं : मज कवण देइल अंगी
तांबोळाचां प्रसंगीं : कवणासि हात पसरीन २९०२

तुआं स्नेह सांडीलें नीसेख : माझी कवण हरील ताहानभुक
कवणाचें देखैन मुख : तुझीयासारखें २९०३

मीयां सतांमहंतांची केली नीदा : कीं अवतारातें तुकीं सदा
भणौनि तुआं कैवल्यकंदा : मातें अव्हेरीलें २९०४

कीं ज्ञानीयांभक्तांचां अर्थी : मीयां चाळिली पुरुखेसीं खंती
कीं ईश्वरा ननुसरेचि उचीतीं : भणौनि उपेक्षीलें २९०५

कीं तुझा आज्ञाभंगु केला : कीं कव्हणासि कानवाथर जालां
कीं गोमटया आड आलां : आर्त्तांचिया २९०६

कव्हणाचे बोलीलां दोख : कीं कव्हणा सपादिलें असुख
कीं मनीं भाविले उल्लेख : अन्यथाज्ञानाचे २९०७

कीं माझी आहाच प्रवृती : भय उपजवीलें सर्वभूतीं
कीं बोलों नेणेंचि परमप्रीती : भणौनि नीष्टुर केलें २९०८

कीं कव्हणाचें अंतःकरण : शब्दीं केलें खेदखीनें
कीं मुखें बोलिला कठीण : जेणें पुढीलां दुख होए २९०९

---

१ घ. सताची. २ क. °खीन. घ. °क्षीण.

कीं तुझीय प्रवृती : वीखो नव्हेंचि मायापती
भणौनि पावलां अपकीर्त्ती : असंनिधानाची २९१०

तुजें[1] माझा अभिमानु श्रीचक्रपाणी : बोलसी ते वाउगी सजोगणी[2]
एऱ्हवीं दुखाचां डोहीं लोटुनी : बीजें न करीतासी २९११

तुजें[3] माझा स्नेह वसुदेवा : बोलसी ते लटकी भाव
एऱ्हवीं एकलया सदासीवा : जांओ नावडतें[4] २९१२

तुंज मजवीण सदासर्वदा : बीजें न करीसी परमांनंदा
तया लोभा कैवल्यकंदा : बोलु कां लाविला २९१३

आतां तुझी मूर्त्ति न दीसे देवा : कवणाचें करीन दास्यसेवा
कवणातें पुसों ठेवा : परवस्तुनीधानांचा २९१४

परज्ञान–परशास्त्रोची खुण : तुजवांचौनि सांगैल कवण
जें कैवल्यस्वरूप नीराकार नीर्गुण : केवि जाणावें २९१५

तुं म्हणवीसि सर्वात्मा : तरी कां विसवलासि आम्हां
काइ सर्वातीत हे श्रुति पुरुखोत्तमा : साच केली २९१६

हें सुणें सांडौनि सकळ : कवणा जालासि उतावेळ
कवणा नीरोवीलें वेलाउळ : परमोक्षाचें २९१७

व्रम्हवीधेचां भांडारीं : कवण बैसवीला व्यापारी
वेधबोधाचा अधीकारी : कवण केला २९१८

मुगुती–सामराज्याची सता : कवणासि दीधली कैवल्यनाथा
जीवउद्धरणाचें वेसन नीर्वाळिता : कवणासि केलें २९१९

---

१ कग. तु. २ क. सगोजणी. ३ क. तुं. ४ ख. नावडे.

ज्ञानविज्ञानाचां भद्रीं : कवण बैसवीला मंत्री
आनंदईस्वर्याची[1] चाउरी : कवणासि घातली २९२०

सुखसामर्थ्याचें छत्र : कवणावरि धरीलें नीरंतर
प्रकाशाची मुदी मनोहर : सुदली कवणाचां हातीं २९२१

खड्गुणांचिया भांडारा : कवण पुरोहीत केला चक्रधरा
कवण बोलैल आचारवीचारा : सकळ शास्त्रातें २९२२

आतां चातुर्याचीये सभे देखतां : कवणें बोलावें पांडीत्य
भावातें भोगी संगीत : तुझेनि बळें २९२३

श्रींधारू साहीत्यातें नीववीता : आनंदु आर्तीसी सुखीये करीता
वीचारू वेधासि ये उचीता : तया तुचि कारण २९२४

उदार्य दयेतें दात्री : सौभाग्य सुंदर्यातें[2] मीरवी
लावण्यलक्षमी सविया सुहावी : तुंआंचि केली २९२५

कृपा कारुण्यासी करी खेळु : प्रेम प्रीतीसीं दे आंगमेळु
अनुरागु आवडीसीं आणी उचंबळु : तुझेनि योगें २९२६

ज्ञान परज्ञानेंसी करी गोष्टी : शास्त्र परशास्त्रातें पाहे दृष्टी
बोधप्रबोधासीं ये तुष्टिपुष्टी : तुतें देखौनि २९२७

अनभुति अष्टभोगातें अनुभवी : कळाकौसल्यातें कुशळ्ता सीकवी
भावप्रभावा होए दीवाळी नीचनवी : कैवल्यसुखाची २९२८

परीमळ मळयानीळातें इछी : रसराओ नवरसांतें गीवसी
वीखो विळासातें वाहे मानसीं : तयां तुंचि आदि २९२९

---

१ कग. अनादि ऐस्वर्याची. ख. अनादि°. २ कखग. सौंदर्याते.

सेहाणीव जाणीवेतें उमाणी : कंदर्प कामियाची पुरवी आइणी
विवेक वित्पतीसी करी उघाणी . तुज राज्ये करीतां २९३०

धर्मु परधर्माचा धरी हातु : सीधांतु परसीधांतातें पुसे मातु
भेदु प्रभेदातें प्रीयं प्राचारीतु : आपुलेपणें २९३१

गहनता गांभीर्यासीं करी बीरारे : मान महीमेचीये बैसे धुरे
वासु सुवासातें सेवी आदरें : तुझीया इछा २९३२

प्रेत्न परीछेदातें आंवरी : वैराग्य वीरांमातें सावरी[1]
सयम सत्त्वाचा आभारीं : तुंआचि घातला २९३३

चाड चर्येतें[2] न सडी : तप त्रसातें वीतंडी
श्रधा सत्चोल्लतेसीं करी कुरवडी : तुझयाचि अज्ञा २९३४

मति उन्मेखातें वाखाणी : सांमग्री सांमर्थ्यासीं ये उचलणी
बुधि भक्तीसी करी ओवाळणी : अष्टमासीधीची[3] २९३५

रूप तारुण्यातें नीहाळी : तेज प्रकासासीं करी रळी
अर्थ प्रमयासी दावी नव्हाळी . शब्दसुखाची २९३६

शांति क्षेमेतें परणी : ध्यान तादात्म होए स्मरणीं
तुचि ठसावेंसि अंतःकरणीं . योगियांचां २९३७

आठवण चींतनीं बैसे : नांममूर्त्ती जवळीचि असे
साध्य साधनासि प्रतक्ष दीसे तुझीया लीळा २९३८

तुं सर्वा आधारु जगजीवना : कां अंगिकारु सांडिला कमळनयना
काइ नीत्य नीराभिमानु या वचना : साह्य दीधलें २९३९

---

१ कखग. सावध करी. २ कग. चातुर्यातें. ३ कखग. 'माहा'

तुं महंताचा महंतु : ब्रह्मादीकां न कळे अंतु
आगमा न टके प्रांतु : तुझया स्वरूपाचा २९४०

तु सकळ प्रमाणां आगमू : सर्व शास्त्रां पडे भ्रमु
स्मृती उपनला श्रमु : तुतें जांणतीची ना २९४१

तुझया रूपाचें चांदिणें पवीत्र : पाहातां तरळेजती लोकत्रयाचे नेत्र
भांब्रावलें तर्कशास्त्र : वास न पाहावें २९४२

तुं सकळ सीधांतां आगोचरू : जेथ वेधवंतीए नाहीं अवस्वरु
तेथ रीगों न ल्हाय गजरु : काव्यांनाटकांचा २९४३

तु चहु वेदा नीर्धारितां : ठाउवा नव्हेसि सर्वथा
सांख्या मुख्यकरुनि सकळ देवतां : भ्रांति पडे २९४४

जो अठरांहीं पुराणां : न नीहाळे साहीं दरीसना
तो तुं कैवल्यदुर्गींचा राणां : दृष्टें[1] जालासी २९४५

तु आगाध अनंतु : अपरांपरु अव्यक्तु
आंनंदें सदोदीतु : आत्मरंमणु २९४६

तु सर्वसाक्ष सर्वात्मां : नेणवेसि सकळ साधनां सर्व धर्मीं
तो तु गोचरू जालासि आम्हां : कृपावसें २९४७

ऐसा तु कवणे पर्थे : सांडौनि गेलासि मार्ते
परी मी अधम आझुनि[2] जीतें : तुझां वीयोगीं २९४८

तुझया वीयोगाचेनि वीस्वानरें : आझुनि न जळेतीं ब्रह्मरंध्रें
कां अष्टदळकमळें संकुमारे : सीळावति नां २९४९

---

१ फग. दृष्ट. २ फग. आझुई.

हें सहश्रदळांचीं पांतीं : आझुनि कां न कर्पतीं
कां आभाओ नव्हे प्रकृती : माहां कठीण हे २९५०

नवां नाडीची येरझार न कुंठे : कां खडुचक्रांची माळ न तुटे
कां चोळाखा न फुटे : प्रपंचाचा २९५१

इंद्रीयाचीये सेंजे आझुनी · कां तुझ्रभे यज्ञाग्नी
कां वाहात्री कोठें जळोनी · आभाओ नव्हती २९५२

तुझया विरहानळाचा भडका : माझां ह्रदयभुवनीं नुठी देखा
काइ मांदि पडीलें अग्नीपुरुखा : जैसे खांडोवनीं २९५३

कीं योगियाचीं ह्रदयवनें जाळितां . श्रमु पातला मज पांतां
कीं तुझेनि वीरहें दुचीता : तोही जाला २९५४

कां पांचां भुतांचा न सुटे बांधा : गुणत्रयाचा न फीटे सांदा
कां प्राणलींग परमानंदा : आजुनि न फुटे २९५५

मनपवनातें उल्हाटौनि[1] · कां न चले शक्ति कुंडलनी
कां मेरुसीखरें फोडुनी : सूक्षमना स्थीर नव्हे २९५६

काइ मोडली इडापिंगळाची वाट : कां आझुनि न टकी गोल्हांट
कीं तीयेही दुख जालें अचाट : तुज वीजें केलयां २९५७

कीं माझी वाचीतां जन्मपत्रीका : काळासि ठाइ न पडेचि देखा
कीं तुझीया आज्ञा परमपुरुखा : मातें आठवीचि ना २९५८

कीं तो माहांकाळें ग्रसीला : भणौनि माझें नांव वीसरला
कीं यमपुरीये आणिक वैसवीला : तो लोटुनियां २९५९

---

१ फग. उलाठौनि.

कीं तयाचे न वाहेचि शस्त्र : भणौनि देह न वचेचि वेगवत्तर
की सत्रीयां कठीण नीव्रीडतर : भणौनि अव्हेरिलें २९६०

कीं तो हातियरुचि मोडका : भणौनि मातें न हाणेचि आदिपुरुखा
कीं तुझी[१] मनीं धरुनि शंका : घाओ न घलीचि २९६१

कीं तुझेया विरहवेथा : अंतकु सरला आदिनाथा
एऱ्हवीं माझी से करीता : ऐसा सवैं २९६२

कीं तुझीये वीरहाग्नीची उक : न सहावेचि भयानक
भणौनि यमपुरी असेख : नीर्वोस जाली २९६३

कीं तें मरणेंचि मेलें : आयुरया शरण गेले
भणौनि हें देह उरलें : तुझां असनिधानीं २९६४

जी तुं नसतां परमात्मा : भुइं भार जीणें आत्मयारामा
तुआं उपाओ सांगितला आम्हां : तो करवेचि ना २९६५

आतां कवणां शरण जाओ : तुज कव्हणीकडे पाहों
कवण वसवीला ठाओ : जगदात्मया २९६६

तुझीं आंगसीकें करीं प्रावर्ण : तरी मायामोहो जीवीं शंके आपण
कामक्रोध दोन्हीं पावती मरण : आपेंआप २९६७

तुझें तांबोळ मुखीं घालीं : तरी आशात्रीष्णा करी आदिमेली
फळवासनेचा अंकुर समुळीं : उपडौनि सांडी २९६८

तुझी मुकुटमाळ बांधें सीरीं : तरी मदमछरातें जीतें धरीं
रागद्वेख दोन्ही नाहीं संसारीं : ऐसें होए २९६९

---

१ कग. तयाची.

तुझा गळदंडा घालीं गळां : तरी अविद्येचा पुरवी सोहळा
घायें हाणौनि करी वेगळा : संसारसत्र हा २९७०

तुझा उचीष्ट प्रसादु घालीं मुखीं : तरी अहंकारातें न लेखीं
डंब्रप्रपंच दोन्हीं कवतीकीं : उपडौनि सांडीं २९७१

तुझें अनुलेपन लावीं ललाटीं : तरी वीघ्नजाति न ये दृष्टी
पाठिमोरी करीं सकळ सृष्टी : तुझेनि बळें २९७२

तो तुं मातें सांडौनि : कां गेलासि कैवल्यदांनी
आतां कैसें वर्तेल मेदनीं : तुजावीण २९७३

आहा वज्रकठीणा जीवा : कां वीसंबलासि सदासीवा
जो जीवाला नीचनवा : चराचरासी २९७४

## नामदेवाची मूर्च्छावस्था

ऐसा जाला दुखक्रांतु : आपणयातें न सभाळितु
भूमीवरि पडीला मूर्छागतु . अरण्यामध्यें २९७५

तो मज कैसा गमला : जैसा विरहो अवस्तेसि भेटी आला
कीं आत्माआनंदु आतला : परमात्मस्वरूपीं[१] २९७६

कीं ते उतकंठा एकवटली : अनास्था आवडीसि मिळाली
कीं स्वस्तता सुखीं लया गेली : देहभाओ वीसरौनियां २९७७

कीं सत्वाचीये मुसे : अनुरागु आटिला शांतिरसें
कीं देओ स्मरावया दोसें : नीश्चलु जाला २९७८

कीं मनाइंद्रियातें त्यजुनी : एकाग्र जाला जगदेस्वरचींतनीं
की श्रमेंतें न सेंडीत वनीं : शयन केलें २९७९

---

१ कग. परमस्वरूपी.

कीं ते ध्यानस्त झाली आर्ती : चाडेतें न वीसंवे परमप्रीती
कीं आठवणेसीं नीजैली नीवृती : परमानंदी २९८०

कीं तो वीयोगवीखें व्यापिला गाटा : कीं सोखसमुद्रीं[1] खेळे जळक्रीडा
नातरि एकांत पाहिला फुडा : अनुष्ठानालागी २९८१

कीं तो करुणारसु मुराला : भाओ भगतीसि योगु पातला
कीं मनोद्वंद्वांअतीतु ठेला : आत्मनाथें २९८२

जैसा प्रपंचा पारंगतु : आत्मा ब्रंह्मीं[2] होए भुतु
तैसा स्थीर केला मनोरथु : योगिराजें २९८३

ऐसां[3] देसाचां सेवटीं भूमंडळीं : येकला जन्म क्षेपी झांडातळीं
तव देखिलें गोपाळीं : नागार्जुनातें २९८४

ते वनें उपवनें : चारीत आले गोधनें
मुखीं पीळीलीं कुरंधनें : पुण्यपुरुखाचां २९८५

तया गोपाळाचें सदैवपण : देओचि जांणे आपण
जो परमार्गासि रक्षण : तेथ विनयोगा गेले २९८६

देवासि ज्ञानीयांभक्तांचा अभिमानु थोरु
भणौनि क्रीयेचा केला अंगिकारू
श्रीमुखें बोधु देइल दातारु : हें नीभ्रांत जाणा २९८७

तयासि हेतुरहीत घडलें भजन : तें ज्ञानासहीत प्रेमासि साधन
ईस्वराचें पुरैल वेसन : पात्रादिभेदें २९८८

देखौनि अवस्तेचा नीर्वाळा : घ्रणा उपनली कैवल्यपाळा
मग पडीताळुं पाठवीलीया अनुकुळा : गोपाळ्वेखें २९८९

---

१ कग. सूख. २ कग. ब्रह्मपदी. ख. ब्रह्मरंद्री. ३ कखग. तैसा

## महदंबेकडून शोध

तवं इतुकां अवसरीं : महंता नात्रांची म्हातारी
ते श्रीप्रभुसि वीनंती करी : जी "नागदेओ कोठे गेला २९९०

आइकें आत्मयारामा : तो देवें नीरोवीला तुम्हां
कें सांडुनि गेला आम्हां : कवणीकडे २९९१

गोसावीं तयाचां आभारीं . मज घातलें सर्वप्रकारीं
न पुसत गेला आता काइ करीं : प्रभुराया २९९२

मीं द्रे दरकुटे डोंगर : सीळातळें वाळुवंटें गीरीवर
कपाटें कोहर्के[1] अपार : कमौनि आलियें २९९३

परि नागदयाचें सारिखें : मी कव्हणीं ठाइं न देखें
आतां काइ करावें तें परंमपुरुखें : तुआं सांघावें" २९९४

तवं आवोळणया[2] श्रीमूर्त्ती . सुधि सांघीतली नीरुती
"मेली जाए भानखेडयायेउती"
भणौनि अनोज्ञा दीधली २९९५

तो अटवीएचा अभ्यंतरीं : पडीलासे डोंगरीं
मग परेशु भणौनिया शब्दावरी : नीगती जाली २९९६

मार्गीं चालतां उल्हासें : ग्रामजनांतें पुसे बहुतें आवेसें
"आलया कव्हणी वेडेंपीसें : देखिलें नाहीं" २९९७

"आइ वेडें ऐसें दुचीतें : जात देखिलें एणें पंथें
परी कोणीकडे गेलें हें नीरुतें : ठाउकें नाही" २९९८

---

१ का. कुहुवें. २ का. 'णोया.

तेथौनि साउमीं नीगालीं : वाट कर्मुनी डोंगरासि आलीं
तव गोपाळांसीं भेटि जाली : अदृष्टहेतु २९९९

मग तयां गोपाळांतें पुसीलें : "आले हो कव्हणी माणुस नाही देखलें"
तवं ठाऊकें सांघीतलें : सत्रीवर ३०००

"पैल[1] रूइपासील दरडी : तेय पडली असे कोरडी
आंम्हीं नीच कुलंघनें तोंडीं : पीळीत असों ३००१

श्रीचक्रधरु ऐसें वचन : बोले आपणया आपण
परि तें काह्याचें वचन : ऐसें जाणिजे ना" ३००२

तयांचें आइकौनि उत्तर : सोइंचि नींगाली वेगवत्तर
तव पुढां देखिलें पुण्यशरीर : अवधुताचें ३००३

तो अवधुत मृत्यासारिखा दीसे : परी जीतया संसारातें उतटी अनायासें
देखौनि दांतखीळी बैसे : महाकाळाची ३००४

माहादाइसीं नार्गींद्रातें देखिलें : तें मज कैसें गमलें
आदरें सांघैन भावें सखोलें : विन्हया[2] पुरुखांसीं ३००५

जैमी ब्रह्मवीद्येचा यत्रीं : वोढुनि काढिजे वैराग्याची सरी
तैसे भाव दीसती देहावरी : योगींद्राचया ३००६

कीं प्रबोधाचया आंगिठां सयमें : माहांतपा ताव दीधला वीरामें
अवस्था ओपसलें लावुनि आणिला महीमें
जीव-जांबुनदु ३००७

ना तरी वीरहाग्नीचें पुट : देउनि कीड केलें चोखट
तैसा अंतरात्मा अवीनास अविट : नीर्मळ जाला ३००८

---

१ ख्ग. पैली. २ कग. विरहिया.

कीं नीर्नेदें अनुतापें उखारलें ईश्वरध्यानाचीया चोळा रगलें
कीं अनुरागाचा मोझा काढिलें आत्मस्वरूप ३००९

उमटलें उत्कठेचें वाणें लीहीलीं भावभक्तीचीं लक्षणें
नीफजवीलें आर्तिपरायणें, श्रीचक्रधरालागी ३०१०

चाड-श्रधेचा पाल्वीं मध्यें आवडि भुमीका बरवी
ते दुटी नीर्वाळ्ली सवीया सुहावी जे देवायोग्य ३०११

जे वस्तु नीराकार नीर्गुण तो आपणपें करी प्रावर्ण
नीरंतर पागुरे आपण अहर्नीशीं ३०१२

ते परमप्रीती सर्वकाळीं कहीं न करी दृष्टी वेगळी
अखड असे आगाजवळी नीरंतर ३२१३

ऐसया शब्दांचां सेवटीं : उचलुनि वाइलें पाठीं
आणिलें थोरी माहाकष्टीं : ग्रामा एकासी ३०१९

तेथ पय आपजवीलें[1] : भटां भीतरीं प्रवेसन केलें
मग नावेक सावध जाले : नीजकींकर ३०२०

ग्रामीचयां लोकांसि वीस्मो पडे : म्हणती "या वाटा गेलें हें वेडें
चक्रधरु दया म्हणे वापुडे : घरोघरीं" ३०२१

एरीं म्हणीतलें "बा देओ सांडौनि गेला : भणौनि हा वेडापीसा आला
आपणयांतें वीसरला : कांहीं सांभाळी[2] ना" ३०२२

मग पथु कर्मुनि पुढारा : उभे वर्गे आलीं रीद्धपुरा
भेटलीं परदस्या अवतारा : श्रीप्रभूसीं ३०२३

जो आत्मरमणु आगाधु : भवहरु रससीधु
तो अनाथां जीवां अनमीत्तबंधु : अनादिचा ३०२४

तो भक्तजनांसहीतु : क्रीडे परमेस्वरपुरांतु
वीमळां जीवांतें उद्धरीतु : मोक्षदाता ३०२५

तयाचें आगाधपण : जाणें चक्रधरु आपण
लीळावर्से ब्रह्म नीर्गुण : मूर्त्त जालें ३०२६

तया साष्टांगीं घालुनि दंडवतें : दास्य करीती सेवकजनें समस्तें
परि नागार्जुन श्रीचक्रधरातें : वीसरेचि ना ३०२७

तया वीलयसुखाचा वारा : द्रीष्टि न साहे करी उबारा
नवरसाचीया मोहरा : उभा न ठके ३०२८

---

१ ग. पाजवीले. २ कखग. 'चि

कीं नीर्वेदें अनुतापें उखारलें : ईश्वरध्यानाचीया चोळा रंगलें
कीं अनुरागाचां वोशां काढिलें : आत्मस्वरूप ३००९

उमटलें उत्कंठेचें वाणें : लीहीलीं भावभक्तीचीं लक्षणें
नीफजवीलें आर्त्तिपरायणें : श्रीचक्रधरालागी ३०१०

चाड-श्रधेचां पालवीं : मध्यें आवडि भुमीका बरवी
ते दुटी नीर्वाळली सखीयां सुहावी : जे देवायोग्य ३०११

जे वस्तु नीराकार नीर्गुण : तो आपणपें करी प्रावर्ण
नीरंतर पांगुरे आपण : अहर्नीशीं ३०१२

ते परमप्रीती सर्वकाळीं : कहीं न करी दृष्टी वेगळी
अखंड असे आंगाजवळी : नीरंतर ३२१३

देवाचेनि संन्निधानेंवीण : जीव-ज्योति झीळमीळीत दीसे क्षीण
ह्रदइ एकवटले पंचप्राण . बाहीर नीगावेया ३०१४

आवांगीं वोळंबे लागले : ते हातेंकरनि माहादाइसीं झाडिले
मग उचलुनि पोटेंसीं धरीलें : नागार्जुनातें ३०१५

ऐसी देखौनि आचारचर्या : सदगदा वाचा बोलिलें म्हातारिया
"म्हणे नागदेया नागदेया : तुज गोसावी पाचारितातीं" ३०१६

तवं तो उघडुनि लोचन : पुसे "गोसावि ते कवण"
एरि म्हणे "श्रीप्रभु ब्रह्मनीर्गुण : परद्रीस्यां आत्मारामु" ३०१७

यावरि बोलिला योगेश्वरु : म्हणे "काइ करीसील परद्रीस्यं अवतारु
माझा होआवा श्रीचक्रधरु : जो सकळगुणभरीत" ३०१८

---

१ फग. 'दरयां.

ऐसया शब्दांचां सेवटीं : उचलुनि घाइलें पाठीं
आणिलें थोरी माहाकष्टीं ग्रामा एकासी ३०१९

तेथ पथ आपजवीलें[1] : भटां भीतरीं प्रवेसन केलें
मग नावेक सावध जाले : नीजकौंकर ३०२०

ग्रांमीचयां लोकासि वीस्मो पडे · म्हणती "या वाटा गेलें हें वेडें
चक्रधरु दया म्हणे वापुडे : घरोघरीं" ३०२१

एरीं म्हणीतलें "वा देओ सांडौनि गेला : भणौनि हा वेडापीसा आला
आपणयातें वीसरला : कांहीं सांभाळी[2] ना" , ३०२२

मग पथु कर्मुनि पुढारा : उभे वर्गे आलीं रीद्धपुरा
भेटलीं परदया अवतारा श्रीप्रभुसीं ३०२३

जो आत्मरमणु आगाधु : भवहरु रससीधु
तो अनाथां जीवा अनमीत्तबंधु : अनादिचा ३०२४

तो भक्तजनांसहीतु : क्रीडे परमेश्वरपुरांतु
वीमळां जीवांतें उद्धरीतु : मोक्षदाता ३०२५

तयाचें आगाधपण : जाणें चक्रधरु आपण
लीळावर्से ब्रह्म नीर्गुण : मूर्त्त जालें ३०२६

तया साष्टांगीं घालुनि दंडवतें : दास्य करीती सेवकजनें समस्तें
परि नागार्जुन श्रीचक्रधरातें : वीसरेचि ना ३०२७

तया वीखयसुखाचा वारा : द्रीष्टि न साहे करी उवारा
नवरसाचीया मोहरा : उभा न ठके ३०२८

---

१ ग पाजवीले. २ घसग· 'चि

तया इंद्रपदाचें असुख : अष्टभोगीं उसळे तीडीक
कैलास वैकुंठ सत्यलोक : मनीं आठवीना[1] ३०२९

तो नेत्रीं न पाहे अळुमाळु : कानीं नायके पुण्यफळु
हावभावीं उठी कपाळु : आंगीं दाहो करीती ३०३०

तया रीधीसीधी सकळा : दाविलया न मनेति डोळा
आधीनीकाचा घे कांटाळा : सीसीं वैसे ३०३१

तया ब्रह्मसुखाची अनावडी : चैतन्यसुख नाहीं पाडीं
वीश्वक्षीराब्धी वापुडीं : म्हणौनि वास न पाहे ३०३२

तया सीतळ मत्राळ डाजे आंगीं : नृत्यवाद्यें नाइकें भ्रूभंगीं
इत्यादि सुखें वाउगीं : इछी ना ३०३३

तया वीकाराचेनि नांवें : दृष्टी न मनें जीवेंभावें
संगित कानीं आइकावें : ऐसी चाड नाहीं ३०३४

तया वीळासाची वासना : कहीं नुपजे नागार्जुना
श्रीधारु सेउं नांवडे मनां कव्हणीं काळीं ३०३५

तया अपरसुखाची धडाडी : न भोगी नेघे गोडी
जैसा मीनु चडफडी : जीवनालागी ३०३६

तैसा देवाकारणें नागार्जुन : आपणपयातें गेला वीसरौन
जैं मीळे जगजीवन : तैं सावधु होए ३०३७

तो कैवल्यनाथु श्रीचक्रपाणी : दृष्टीं देखिजे ध्यानपरायणीं
तैंचि सुख होए अंत:करणीं : तयाचेनि योगें ३०३८

---

[1] क्रग. नाठवी.

जो परमानंदचंद्राचें चांदिणें : वांचौनि आन न करी पारणें
सुखीया नव्हे पदार्थे कव्हणें : जीवचकोरू तो ३०३९

जो परब्रह्ममेघांचें उदक : वांचौनि न सेवी अन्यत्र सुख
आणिकां न पसरी मुख : आर्तचातक तो ३०४०

जो परकैवल्य-मानसरोवरीं : आंनदतरगेंसीं क्रीडा करी
तो न रमे आणिके अवतारीं : जीवराजहंसु ३०४१

## उपसंहार

तया नागार्जुनाचेनि प्रसादें : परमार्गी प्रवेशू ईश्वरबोधें
धर्मी दक्ष केलीं भक्तिवृंदें : मुनी वेधवंतु ३०४२

हा ज्ञानभक्तिवैराग्याचा आवांका : मीयां बोलिला सप्रेमळ वाणी देखां
आइकतां पाविजे परमसुखा : परब्रह्मांतें ३०४३

हा सकळ शास्त्राचा सारोधारु : यापरता नाहीं वस्तुविचारु
ईश्वरस्वरूपाचा नीर्धारु : नेणीजे आणिके कथेसी ३०४४

हा परशास्त्राचा सीधांतु : नीत्यदीनी लीळेचा मुख्य हेतु
मीयां प्रांजळु केला प्रमेयेअर्थु : पाठ मूर्तिज्ञानाचा ३०४५

हें साध्यसाधनांचें कारण : केवळा गाभेयाचें स्मरण
चींतीतां नीवारे जन्ममरण : लाहीजे कैवल्यसुख ३०४६

तया सुखाची गोडी नीरंतरीं : सेविजे सदैवीं अनुचरीं
जे सदा विनटले चक्रधरीं : अहर्निसीं ३०४७

तया श्रीचक्रधराची श्रीमूर्त्ती : जे आवडी अखंड अवलोकीती
तेचि तया सुखातें पावती : आर्त्तजन ३०४८

तो सुखवीसेख नीचनवा : अनुभवीतां अधीकु बरवा
जो प्राप्त जाला सदैवां : ब्रह्मवीदांसीं ३०४९

ऐसा साळंकृत सर्वेश्वरू : नागार्जुनाचा दातारू
हृदइं ध्याइला श्रीचक्रधरू : जो जीवन संतार्चे ३०५०

तो सुभमंगळाकारू सवीजु : नागांबीकेचा आत्मा नीजू
मीयां वर्णिला म्हणे मुनि केशिराजू : प्रभू स्वामि माझा ३०५१

इती मुर्त्तिप्रकाश समाप्त ॥ * * * * * ॥ शके ॥ १२१० ॥ विजय नाम संवत्सर : फाल्गुन मास दसमी वार ब्रहस्पति : नक्षेत्र अनराधा : सोभाग नाम योग : बाळव नाम करण . तदीनी केशोवासातें वेव्हारासि धरूनि नेलें : तैं मुर्तिप्रकाश ग्रंथ आणि अवस्थाभूत गीत आणि रत्नमाळा : हे तीन्हीं ठाए ते देसीं केले ॥ * * * * * * * * * ॥

शके ॥ १५ ॥ ४७ ॥ क्रोधन नाम संवत्सरे भाद्रपद मा शूद्ध चौथि वार शूक्र तदीनी मुर्त्तिप्रकाश ग्रथ अवस्थाभूत गीत ग्राम पींसाउर तत्र स्थळी समाप्त ॥ शुभं भवतू ॥ हस्ताक्षेर रामद मुनि कोठी गोमराजशूत याचे ॥ भग्निपुष्टिकटीग्रीवा तांव्रपुष्टीरधोमुखं कष्टेनि लीख्यते शास्त्रं यत्नेन प्रतिपाळिते ॥ * * * * ॥

# अर्थ-निर्णायक टीपा

७. **सह्याचळ :** सह्य पर्वत मातापुर (=माहूर) येथे दत्तात्रेयाचे निवासस्थान म्हणून प्रसिद्ध असलेला डोंगर 'सह्याचळ' म्हणून प्रसिद्ध आहे. पहा : 'सह्याचळाचिये चुळुके : जयाचे प्रभामडळ फाके : तो श्रीदत्तु लल्लाट-फळकें : नमस्करीतु असे.' (उगी. १); 'जैसे सैह्याद्रीं श्रीदत्तात्रेय प्रभु.' (सिस. पचकृष्ण. २)

**मातापुर :** माहूर शहर. (जिल्हा नांदेड. महाराष्ट्र राज्य).

१०. **मातांगवेखा** *: मागाचा वेष धारण करून दत्तात्रेयप्रभु* नेहमी पारध करीत हिंडत असतात, अशी समजूत आहे. म्हणून त्याना 'मातागवेख' असे म्हटले आहे.

१३. **अवरदृश्या :** हा उल्लेख महानुभावाच्या पचकृष्णापैकी श्री. चक्रपाणी अवताराचा आहे. 'महानुभावानी परमेश्वरावताराचे प्रामुख्याने तीन प्रकार मानले आहेत. १ परदृश्यावतार. २ अवरदृश्यावतार. ३ उभय-दृश्यावतार. पर (=ब्रह्मविद्या) जाणणारा तो परदृश्या; अवर (देवता सबधाचे, ऐहिक) जाणणारा तो अवरदृश्या; आणि हे दोन्ही जाणणारा तो उभयदृश्या. श्रीचक्रपाणी हे अवरदृश्यावतार होते, असे येथे म्हटले आहे. वस्तुतः ते उभयदृश्यावतार असून त्यानी 'पर' आच्छादून 'अवर' प्रकट केले होते म्हणून त्याना आच्छादनीचा अवरदृश्यावतार म्हणणे अधिक

**२२ आर्यनागर** पहा 'श्रीप्रभु आर्य ह आर्यनागर श्रीकृष्ण चक्रवर्ती ते नागर' (सिद्द वि. ८०).

**३३ नागार्जुन** नागदेवाचार्य. चक्रधराच पट्टशिष्य. महाराष्ट्र राज्यातील बीड जिल्ह्यात गोदावरीच्या दक्षिण थडीवरील 'पुरी' (आजचे नाव पाढरी) या गावी राहणारे. वडिलांचे नाव माधवभट, आइच नाव आबाइसा. नागदेव हे पूर्वायुष्यात अत्यत व्यसनी होते. पण 'रामदव' नावाच्या एका सत्पुरुषाच्यामुळ ते सदाचरणी बनले. रामदवाबरोबरच त्याना श्रीचक्रधर स्वामींच अनेकदा दर्शन घडले त्यानतर त्यानी स्वामीपासून अनुग्रह घेतला. तेव्हापासून तो श्रीचक्रधर स्वामीच्या प्रयाणापर्यंत नागदेव हे त्याच्याजवळच होते. स्वामींच्या मागे महानुभावपथाचा प्रचार व प्रसार नागदेवानीच केला मृत्युशक सुमारे १२२८ श्रीकृष्णाचा जसा अर्जुन त्याप्रमाणे चक्रधराचे शनी शिष्य नागदेव असल्यामुळे त्याना 'नागार्जुन'

चेष्टा' (सिद्ध. आ. २८) हे ते चतुर्विध स्मरण होय. 'ऐसा परमेश्वरू : तयाचे नाम : लीळा : मूर्ति : चेष्टा : देहपर्यंत आठवीजे : ध्याइजे : तै या सवसारापासौनि मुजीजे' (मूर्तिज्ञान) असे चक्रधरस्वामींनी सांगितले आहे. **नाम**–कोणत्याहि व्यक्त परमेश्वरावताराने स्वीकारलेले. उदा : श्रीदत्तात्रय, श्रीकृष्ण, श्रीचक्रधर वगैरे. **लीळा** : परमेश्वरावताराने चेतनाबरोबर ज्या सहेतुक क्रीडा केल्या त्याना लीळा असे म्हणतात. **चेष्टा** . परमेश्वरावताराने जड पदार्थाबरोबर ज्या अहेतुक क्रीडा केल्या त्याना चेष्टा असे म्हणतात.

**५७. चतुर्विधें कर्मफळें** : जीवाने केलेल्या बऱ्यावाईट कृत्याचे भोग म्हणून त्याला चार प्रकारची फळे प्राप्त होतात. 'स्वर्ग : नरक : कर्मभूमि : मोक्ष : यातें चतुर्विध कर्मफळ बोलिजे' (सिद्ध. सस. २५). यापैकी स्वर्ग व मोक्ष ही देवताफळे होत. इद्रादिकापासून तो यक्षिणीपर्यंत देवताच्या ब्रह्मांडस्थाना 'स्वर्ग–फळ' असे म्हणतात ('इद्रादिकाचीं फळे तो स्वर्गु बोलिजे' सिद्ध. विमा. १७९) आणि ब्रह्मादि देवतापासून तो वर मायेपर्यंत देवताच्या ब्रह्मांडस्थाना 'मोक्षफळ' असे नाव देतात. ('कैलास : वैकुंठ तो मोक्षु बोलिजे' सिद्ध विमा. १७९). कर्मभूमि म्हणजे मनुष्यदेह आणि नरक म्हणजे मनुष्यदेहाखालील पशुतिर्यंचादि सगळ्या पापयोनी.

**६०. जैसा काग सुकर** : चक्रधरांनी हा दृष्टात पुढीलप्रमाणे सांगितला आहे. 'काउळा असे : तो चाचुकरूनि अमेध्य ऐसा सारी : ऐसा सारी : तयातु सार नीवडी' तयातु कैचें सार : तेथिचें सार तेंही अमेध्यचि की : सूकर असे : तो बोटीभातु चुटि खोवी : तुयातु सार नीवडी : तयातु कैचें सार : तेथिचें सार तेंही बोडीचि की' (दृपा. १७)

**६५. अनादि अविद्या** · जीव स्वरूपात मुळापासून असलेला एक दोष. 'जीवाचा माथा अनादि अविद्या गा' (सिद्ध. विमा. ३४). या अनादि अविद्येपासून मुक्त होणे म्हणजेच 'केवल्य' स्वरूप होणे होय.

**६६. राज्य सांडौनि** : चक्रधरस्वामी (हरिपाळदेवाच्या देहातील ईश्वरावतार) हे मूळचे हरिपाळदेव. हरिपाळदेवाच्या मृतशरीरात प्रवेश करून त्यानी अवतार स्वीकारला. त्यानतर काही दिवस त्यानी भरवस येथेच

राज्य केले. पुढे द्यूतात हरलेले द्रव्य फेडण्यासाठी त्यानी आपली पत्नी कमळाइसा हिला तिचे दागिने मागितले, पण ते तिने दिले नाहीत. त्यामुळे हरिपाळदेव उदास वृत्तीने राहू लागले. कालांतराने रामयात्रेच्या निमित्ताने ते भरवस नगर सोडून व आपल्या मातापित्याचा आणि बायकामुलाचा त्याग करून महाराष्ट्रात आले. हा प्रसंग येथे उल्लेखिलेला आहे.

६७. **पुरें पाटणें** : ' विकार विकल्पु सपूर्ण असे तया गावातें '**पुर**' बोलीजे । विकारमिश्रितु विकल्प असे तयातें **पाटन** बोलीजे ' (सूत्रस्थ. ५१). ' तीर्थक्षेत्रव्रतदान ये चारि असति तया गावातें **पुर** ऐसे म्हणीजे ' क्षत्र नाही आन येरें तीन्ही असति तया गावातें **पाटण** एस म्हणीजे तीर्थ आहे आन एर तीन्ही नाहीति तया गावातें **नगर** ऐसे बोलिजे ' ( उगी. टीप १८१ ).

६६. **अमेध्यतुल्य** ' पहा 'अमेध्यतुल्य विजो : तो कचणासि दुर्लभु : जे कृमितुल्य पुरुषु : तेयासिचि कीं ' (सिद्ध. आ. २४८).

९५ **तीहीं तापांचां** ' ताप म्हणजे दु:ख तीन प्रकारची मानलेली आहेत. (१) आध्यात्मिक – मानसिक दु:खे (२) आधिभौतिक = प्राणी मात्र किंवा सृष्ट पदार्थापासून झालेली दु:खे. (३) आधिदैविक = दैवयोगामुळे प्राप्त झालेली दु:खे.

९९ **खूतले रंग** : खुतले = एखाद्या ठिकाणी रुतून बसलेले, ' निश्चे पिलेले ', स्थिर झालेले, अथवा निश्चळपणे झळकणारे किंवा स्फुरणारे. पहा : ' डोळेयाचा ठाईं स्वतसीधा दोनि सामग्रीया . तेजसामग्री आणि भेदसामग्री तेजसामग्री वाढवी तरि रत्नाचीये गर्भीचे **खूतले** रंग देखे भेदसामग्री वाढवी तरि काहींचि न देखे ' (दृष्टा. १४). ' ठीकत्राणिया पारखि न सीके : तरि रत्नाचे **खुतले** रंग केवि देखे ' (उगी. ७३१). तुळा : ' धृपणु चिंति ठेवा आपुला । तैसा द्रष्टु परावेया मोला । नव्हे जैसा **खुतला** माखेयासि ' ( ज्ञा. १८–६५१).

१००. **परा वाचा** : ' परा पश्यती : मध्यमा : वैखरी ' ( सिद्ध. वि. १५ ) हे वाचेचे चार प्रकार असून परा वाणी ही त्यात सर्वश्रेष्ठ होय.

परमेश्वराच्या ठिकाणी ही परा वाणी असते. पहा : 'चैतन्योद्‌भव **परा** : यनोद्‌भवा वैखरी ' 'वैखरीद्वारे परेचा व्यापारू ' 'सिद्धाचा ठाइ पश्यती : देवाचा ठाइ मध्यमा : मनुष्याचा ठाइ वैखरी ' (सिस्. वि. १६–१८). पहा : ' जे आर्तवच्छानटनी : तापोपशम कादिंबिनी : ते नमस्करू अमृतसजीवनी : श्रीदेववाणी ॥ जे वेदाचा उगऊ : पूर्णबोधाचा बीऊ . ब्रह्मबीचे प्रसऊ : जे **परा वाचा** ' ( ऋन. १–२).

१०३. **खडु रस** ' स. षट् या शब्दाचे खडु असे मराठी रूप यादव कालीन मराठीत अनेक ठिकाणी आढळते. पहा . 'श्रीकृष्ण पावेया दोसें : मुनी खडपद जाले ' ( वछा. १६१ ) ' एक खडचक्राचेनि उजुकारें : पवनाचेनि उर्ढ सचारें : मेरुचि तिन्हीं सिखरें : रुचिताती ' ( वछा. १५१ ) वगैरे. **खडुरस** = षड्रस. कटु, अम्ल, मधुर, लवण, तिक्त, आणि कषाय, हे सहा रस.

१०८. **आदिलक्ष्मी आद्याशक्ती** : हे शब्द ' माया ' नामक देवतेसाठी वापरलेले आहेत. महानुभावाच्या मते सर्व देवता ह्या परमेश्वराच्या शक्ति असून त्यात माया ही सर्वश्रेष्ठ देवता होय. ती सर्व देवताची स्वामिनी व परमेश्वराची सर्वप्रथम शक्ति असल्यामुळे तिला आद्या शक्ती म्हणतात. पहा : 'आद्याशक्ति माया ' ( सिस्. निमा. १५७ ). परमेश्वराची ही जणु अर्धांगी असल्यामुळे तिला 'आदिलक्ष्मी ' असेहि संबोधतात.

**रसफळांचा घडु** : पहा ' ' तिया सतोसें गाइला : अमृताभिषेकू केला : हातीं परियळ दीधला : **रसफळांचा** ' (नरुख. ११ )

११३. **उदार्य तुळापुरखीं बैसलें** : तुळापुरुष म्ह० पुरुषाच्या भारभार वजनाच्या सोन्यानाण्यापासून किंवा जडजवाहिरापासून तयार केलेली पुरुषाकृति अथवा तेवढया वजनाचे द्रव्य. **तुळापुरुखीं बसणें** : आपल्या भारभार जडजवाहीर दान देण्यासाठी तुळेत बसणे. मूर्तिमत औदार्य हे आपल्या वजनाइतके दान देण्यासाठी ज्या ठिकाणी तुळेत बसले आहे असा हा मूर्तिप्रकाश ग्रंथ, ही कल्पना. **हातवसीलें** : हस्तगत केले; जिंकून घेतले. हातवसणे हा शब्द हातात शस्त्र घेऊन चालून जाणे अशा अर्थानेहि वापरला

जातो. उदा 'पेजा साडुनि श्रीचक्रधरा . तुवा **हातवसीलें** जेयाचेया मैवारा : तेया पार्था धनुर्धरा . का वीसरता' 'जेताचेया चाडा' सर्वदे या **हातवसुं** नैय' (उमी. ११८, २४०). हा अर्थ प्रस्तुत ओवीत लागू पडत नाही. 'हस्तगत करणे' या अर्थानेहि हा शब्द वापरला जातो. उदा 'लोकि तन्हीं आथि ऐस ज दूरौनि कळसु दीसे। भेटीचि **हातवसे**। देवतेचिये' (ज्ञा. १८-३१), 'ते निष्ठा जेथ **हातवसे**। तेथ भक्ति माझी उल्हासे' (ज्ञा. १८-१२४२) हा दुसरा अर्थ या ठिकाणी योग्यपणे लागू पडतो.

१११६. **कोमळ** : परमेश्वरापासून ज्ञान झाल्यावर जो अनुसरून आचरण करण्याला सुरवात करतो तो आरंभीच्या अवस्थेतील ज्ञानी पुरुष. त्याला '**कोमळ**' ज्ञानी असे म्हणतात. पहा '**कोमळ** ज्ञानीं निरो विघ्न' (सिद्ध आ. १६).

११७. **नवरसांचा** शृंगारहास्यकरुणरौद्रवीरभयानका । बीभत्साद्भुतसंज्ञौ चेत्यष्टौ नाट्ये रसा स्मृता ॥ निर्वेदस्थायिभावोऽस्ति शांतोपिऽनवमो रस' (काव्यप्रकाश). साहित्यशास्त्रात मानलेले नऊ रस. शृंगार, हास्य, करुण, रौद्र, वीर, भयानक, बीभत्स, अद्भुत आणि शांत.

१२१. **माहा-पातकांसीं** : 'ब्रह्महत्या सुरापान स्तेय गुर्वंगनागम. । महांति पातकान्याहुस्तत्संसर्गश्च पंचमम्' ही पाच महापातके.

१२४. सनिपात हाच भैरव (भीतिदायक दैवत) त्यापासून वाटणाऱ्या भीतीचे भंजन करणारा, ती भीति निवारण करणारा. **सानिपात** = कफ, वात आणि पित्त या त्रिदोषाचा एकदम उद्भव झाला म्हणजे त्याला सनिपात म्हणतात.

१३२. **सबदवेधीया रसु** : चक्रधरनिरूपित पुढील दृष्टांतावरून याची कल्पना येईल 'कव्हणा एका महामेयाचिय आधारीयसि **शब्द-वेधीया रसु** असे तो वाग्य ज्ञातु असे : रात्रीं नगरातु तोव तारें घडत असे : रसात स्पर्शोनि शब्दु ये मागुता तेथनि निघ्या जाय तोव तार असे ते सोने होय' (दृपा. ७). केशिराजांस रसत च अन्यत्र याच वर्णन

करतात 'आलापत कनकता नयतेऽष्टलोह। स शब्दवेधिसु रस-गतयोजनेऽपि' (हस्तो.) यावरून लोखंडादि धातूंच्या आवाजाच्या स्पर्शानेहि त्यांचे सोने करणारा असा हा रस होय, हे स्पष्ट होईल. दैवां दैव : दैवांचेहि दैव. फार मोठी भाग्याची गोष्ट.

१३४. यापुढे कवितेवर अथवा आपल्या ग्रंथावर कवीने निरनिराळ्या रसांची, औषधि-रसायनांची कल्पना केली आहे. सशरीरावर रोगाची कल्पना केली आहे. या सर्व रसांची कार्ये ज्या ब्रह्मरसात दिसतात तो चांगल्या भावनेने तयार करून मूर्तिप्रकाशाच्या रूपाने समोर ठेवला आहे, हा एकंदर भावार्थ.

१३५. धनंजय . अग्निप्रमाणे असणारा एक रस.

१३६. देवदंत . या नावाचे एक औषधि-रसायन.

१३७ रसाधिपति रसराज='रस-रुद्र' या नावाचे रसायन.

१४१. हीरण्यगर्भ नावाचा रस. क्वचित जास्त घेतला तरी त्यामुळे अपाय होत नाही.

१४२. अनंदभैरउ रस' सात मात्रा घेतल्या म्हणजे अनंता जन्माचा (जुना) रोग नाहीसा होतो.

१४३ उदयोवसंतु : नावाचा रस. मानसचारें—एक मात्रा देताक्षणीच.

१४५. भावना . (१) पुट, लेप. औषध तयार कराना त्याला 'भावन' किंवा 'भावना' देतात. म्हणजे पुटे देतात. (२) अंतःकरणातील इच्छा. या दोन्ही अर्थांनी हा शब्द येथे वापरलेला आहे.

१६६. अष्टभोग : 'सुगंधवनितावस्त्र गीतताम्बूलभोजन। शय्या च भुवन चैव अष्टभोगा प्रकीर्तिता।'

१६७ नवां नीधीचां : 'महापद्मश्च पद्मश्च शंखो मकरकच्छपौ। मुकुन्दकुन्दनीलाश्च खर्वश्च निधयो नव' हे कुबेराचे नऊ निधी.

१८७. नवरत्न 'मुक्तामाणिक्यवैदूर्यगोमेदा वज्रविद्रुमौ। पद्मरागो मरकत नीलश्चेति यथाक्रमम्।'

**१९१. वेदांत :** वेदाच्या शेवटच्या भागात, उपनिषदादिकात आलेले तत्त्वज्ञान. **तर्क :** तर्कशास्त्र. न्यायशास्त्र. **निगम :** वेदाचा अर्थ स्पष्ट करून सांगणारे, त्यांना उपोद्‌बलक शास्त्र. **आगम :** शिव आणि शक्ति यांच्या उपासनेचे प्रतिपादन करणारे मंत्रतंत्रयुक्त असे एक गूढ शास्त्र. 'आगतं पंचवक्त्रात्तु गतं च गिरिजानने । मतं च वासुदेवस्य तस्मादागममुच्यते । '

**२९८. सारसें** – कमळे ज्याप्रमाणे सूर्यासाठी स्वाभाविकपणेच श्रद्धाळू असतात, म्ह० त्याच्या दर्शनाची इच्छा बाळगून असतात त्याप्रमाणे.

२१५. पहा : 'देवें वन प्रिति पाइलें । म्हणौनि **श्रीमंत पावन जालें** ' ( वछा. १२५).

**२१८. तराय :** लहर; टवटवी; उत्कर्ष. पहा : 'मकरंदा दशा उठैली · चांदिनेयासि **तराये** जाली : पाणियासि छाया दुनावली : परीमळाची' (शिशु. ६२७); 'विवेका **तराये** जाली : प्रबोधा दसा उठैली . नवल जीणि जाली : वैराग्यासि ' ( उगी. ४४).

**संगति**—हा शब्द ' संगीत ' असावा असे वाटते. कोणत्याहि पोथीत तसा पाठ नाही हे खरे आहे; तथापि अर्थदृष्ट्या विचार केला असता ' संगति ' शब्दाचा योग्य अर्थ लागत नाही. ' संगीत ' या शब्दाने मात्र तो लागतो. संगीत आणि शब्द यांचा योग सुप्रसिद्ध आहे.

**२६०. श्रीप्रभूचे पोवाडे** वस्तुत श्रीप्रभु हा शब्द श्रीगोविंदप्रभु यांच्यासाठी वापरला जातो. पण येथे तो सर्वसामान्य अर्थाने वापरला आहे. प्रभु = परमेश्वर. श्रीप्रभु = श्रीपरमेश्वर. त्याचे पवाडे = लीळाचरित्रे.

**२६१. नामींचि वर्त्त :** केवळ नाव ऐकूनहि वेध उत्पन्न होणे हा विशेष फक्त चक्रधरावताराचाच होय. पहा ' श्रीकृष्णीं शता सहस्रा वेधु : एथिचा नामींचि वेधु ' ( सिद्ध. सि. ९१).

२६६. पाताळामध्ये उत्तम भोग भोगावयाला सापडतात; पण तेथे कर्मनिष्पत्ति नसल्यामुळे कोणताहि परलोक – ईश्वराचे किंवा देवतांची स्थाने

प्राप्त होऊ शकत नाहीत. पाताळ ही भोगभूमि आहे म्हणून तेथे भोगाचे निमानणे आहे; पण नवीन कर्मनिष्पत्ति नाही.

२६७. कैलास, वैकुंठ व सत्यलोकात राहूनहि कधी परमार्थाचा–सर्वश्रेष्ठ अर्थ जो ईश्वराचा आनंद तो मिळ शकत नाही.

**२६८. नीत्य नरकांचें अनुसंधान :** प्रतिष्ठान = पैठण शहर हे वाराणशी=काशीच्या योग्यतेचे आहे हे खरे. पण तेथे (प्रतिष्ठान येथे) नित्यनरकाचा संबंध जोडला होता. त्या ठिकाणाचा नित्यनरकाशी असलेला संबंध सुटू शकत नाही. परमेश्वरावताराच्या हननाने नित्यनरक प्राप्त होतात. चक्रधर स्वामींना पैठण येथे आणून तेथे त्याचा अवयवछेद केला गेला, तदनंतर तेथील काही प्रतिष्ठित लोकांनी त्याच्या वधाचाहि प्रयत्न केला होता, या गोष्टीला अनुलक्षून हा उल्लेख येथे केलेला आहे-

२६९. प्रतिष्ठान नगरामध्ये चक्रधर स्वामीविषयी निरनिराळ्या प्रकारची बुद्धि बाळगणारे लोक होते. काहींची 'वोखटी वासना' (दुष्ट बुद्धी–विपरीत भावना) होती. उदा : सारंगपंडित. काही जण 'उत्तम साधना'ला (=परमेश्वराच्या प्रेमाला) पात्र झाले होते. उदा : नागाम्बिका. काही जण त्याना ठार मारण्याला प्रवृत्त झाले होते. त्याचे तर नावहि घेऊ नये.

**२७०. माहासामर्थ्यें :** चक्रधराच्या ठिकाणी असलेली अलौकिक सामर्थ्ये, शक्ति.

**२७८. सर्वे दोखीं सबळ :** सर्व प्रकारची पापे आचरण्यात समर्थ.

२८०. परमेश्वराला आपले सर्व जीवित अर्पण करणे हा ईश्वर प्राप्तीचा खरा मार्ग आहे. पण काही लोक याप्रमाणे आपला सगळा जन्म ईश्वराला – ईश्वराच्या सेवेला देऊ शकत नाहीत. त्याचा उल्लेख या ठिकाणी केलेला आहे.

**२८४. वृधासंगमीं :** वृधासंगम या स्थानी असताना चक्रधराना अत्यंत त्रास झाला. येथे असतानाच त्याना पकडून नेण्यासाठी पाईक आले, त्यानी त्याचा मठ लुटला व ते स्वामींना पैठण येथे घेऊन गेले. हा प्रसंग

लीळाचरित्र उत्तरार्धातील ४४६व्या 'शस्त्रधर आगमनी भगोमाया आवेशु' या लीळेत आलेला आहे. मूर्तिप्रकाशकाराने तोच प्रसंग पुढे काव्यमय रीतीने वर्णन केलेला आहे.

२८९. पहा. 'भट बाहिरि निगाले : तव जगतीबाहिरि पाइक देखिले आणि गोसावीया पुढां साचितले : जी जी पाइक आले भट जगती बाहिरि नीगाले : एकांते चडकणा हाणितले : घोडणखांडे हिरितल पाठी लागले गेले वेळा दोनि तीनि सरिसे केले : गोसावी बीजे केले मग म्हणीतले वानरेया : वानरेया म्हणौनि बोलाविले : हा गा तुजकरवि एथौनि करविल ते उगेचि राहिले : हा गा तुजकरवि एथौनि करविल ते उगेचि ठेल ठेविसि ना तरि एथिची आण : जरि प्रवृत्ति होय तरि एकमेका झुझाचि मरति' (लीळाचरित्र, उत्तरार्ध ४४६).

२९१. दृष्टी सुनि : दृष्टीत घालून, पाहून.

२९३. वानरेया : नागदेवा ! चक्रस्वामी नागदेवाचार्यांना 'वानरेश' म्हणून म्हणत. एकवेळ पूजा करण्यासाठी झाडाच्या डहाळ्या, पान वगैरे पाहिजे होती. ती काढण्यासाठी नागदेवाचार्य झाडावर चढले. वानर ज्याप्रमाणे एका डहाळीवरून दुसऱ्या डहाळीवर उडी मारुन जातो त्याप्रमाणे नागदेवहि जाऊ लागले. ते पाहून स्वामींनी बाइसाजवळ कौतुकाने उद्गार काढिले की 'बाई, पहा नागदेव कसा एखाद्या वानरासारखा दिसतो, नाही का ?' तेव्हापासून ते नागदेवाचार्यांना मधून मधून वानरा किंवा वानरेशा म्हणून संबोधीत.

२९४. पहा : 'प्रऱ्हादाचेया कैवारा भून एक अवतरले तेयाचेया कोपापुरते चराचर विश्व न पुरे' (सिद्ध ऱि. ७१).

२९८. २९८ ते ३०० या ओव्यात उल्लेखिलेला बाइसाच्या देह त्यागाचा प्रसंग लीळाचरित्र, उत्तरार्ध, लीळा ४४७ मध्ये वर्णन केलेला आहे.

३०२. या ओवीतील उल्लेख पुढील प्रमाणे आहे. 'माहन उपरमीं लखुदादेसा व्यापारू कथन ॥ गोसावीयाची श्रीमूर्ति पुरर्मली दर्शनि महदाइसीं गोसावीयान वीनवीले . जी जी . मी गोसावीयासि माहन परिन :

सर्वज्ञ म्हणीतल नाइसा मागा मादण ऐस हे परिभापही नेणे ' (लीळाचरित्र, उत्त. ४८४).

३०४. एळापूर म्हणजे सध्याचे वेरूळ. महाराष्ट्र राज्यातील औरंगाबाद जिल्ह्यात वेरूळची लेणी म्हणून प्रसिद्धच आहेत

३०७. चंद्राची सतरावी कळा : पूर्ण चंद्रबिंब या ओवीत उल्लेखिलेल्या प्रसंगासाठी लीळाचरित्र, पूर्वार्ध, भाग २, पृ. २८ वरील ' तथा तप्तदराकळा निरूपण ' ही लीळा पहा.

३०८. *एळापूर येथे असताना चक्रधरानी सारंग पंडिताला, आपल्या* विज्ञानसामर्थ्याने तेथेच श्रीप्रभू ( गोविंदप्रभू )ची मूर्ति दाखविली पहा. लीळाचरित्र, पूर्वार्ध, भाग २, पृ. ३०. ' तथा श्रीप्रभु दाखविणे ' ही लीळा.

३०९ स्वयंप्रकासाचेनि बळें एळापुरला चक्रधरस्वामी चतुर्वी *याच्या मठात असताना एके दिवशी* ' उपाध्ये भीतरि आले तव आधारू पडिला असे उपाधीं मना म्हणीतल नाइसें वाति लाविती का तरि मी गोसावीयात देखता सर्वज्ञ म्हणीतलें नव्हिं ह माइ दीवेन देखिजे हं आपणयात दाखवी तेव्हळिसिचि देखीजे की ।। दुसरी वासना ईश्वरू काइ गा अन्यप्रकाशक तो स्वयप्रकाशु की ' ( लीळाचरित्र, पूर्वार्ध, भा. २. पृ. २४ ).

३१७. दैवी येतार ऐतार = श्रेष्ठ किंवा उचलून आलेली दैवी = अलौकिक सुंदरता-सौंदर्य. पहा ' सौंदय देखौनि येतार श्रीमूर्ती घेघले मुनीश्वर ' ( रुक्म. ३३४) पहा. ' एथिचेया सारिखे अन्यत्र आति परि एथिची दैवी ते क्वापि नाहीं ' ( सिसु वि १०२ ).

३१९. पहा लीळाचरित्र, पूर्वार्ध, भाग २, पृ ३५, ' ब्रह्मसानी विपसत्रन ' आणि ' तथा वीरसशक्तिस्वीकारू ' ह्या लीळा.

३२४. मदमत्सराकडन ( मदमटरी ) जगतिवासें अन्यथा नव्हीजे = मदमत्सराकडून तो निराळा ( मूळ प्रकृतीपासून भिन्न ) केला जाऊ शकत नाही. आपला सात्त्विकपणा तो सोडत नाही.

**३२७. आंधारीं रचुनि आसन :** लीळाचरित्र, भा. २, पृ. ३५. 'तथा बीलशक्तिस्वीकारू' ही लीळा पहा.

**३२९. विश्रांत चैतन्य :** परमेश्वरावताराच्या शरीरात विश्रांत असलेले चैतन्य = माया.

**३३२.** पहा : 'बाइ : हें काइ ऐसेंचि जाइल : एथौनि एकातें निमित्य करील : आणि या राष्टरा बोलु लावीजैल : मग जाइजैल कीं बाइ' (३२७ व्या ओवीतील लीळाचरित्रांतर्गत लीळा पहा).

**३३५.** पहा : 'भट असंनिधान धर्म नीरूपण ॥ सर्वेज्ञें म्हणीतलें : वानरेया **असंनिधानधर्म जीज्ञासा गा**' (लीळाचरित्र, उत्त. ४७८). **असन्निधान धर्म :** परमेश्वराच्या सान्निध्यात नसतांना, त्याच्या वियोगी ज्ञानियाने कोणता आचारधर्म पाळावा ? या आचारधर्मालाच असन्निधानधर्म म्हणतात.

**३४२. संबंधमात्राचें स्थान :** ज्या स्थानाला चक्रधरांचा संबंध घडला असे स्थान.

**३४७.** जीवाने एखादे बरेवाईट कर्म केले म्हणजे त्याचे एक चिन्ह *जीवस्वरूपावर लागत असते. हाच 'लेप' होय. या लेपानुसार यथाक्रम व* योग्य वेळी देवता त्या जीवाला त्या कर्माचे फळ भोगवितात. पण, कोणत्याहि *कर्माने एखाद्या फळाचा लेप ज्याने जोडलेला नाही त्या* '**निर्लेप**' *जीवाला* गोविंदप्रभु स्वेच्छेने ते फळ प्राप्त करून देत असत, हा त्यांचा विशेष होय. ओवीचा उत्तरार्ध पहा : 'कृमीतें ब्रह्मा कीजे ऐसी श्रीप्रभूची लीळा' (*सिद्ध.* वि. २१३) 'नेणिजे श्रीप्रभूची लीळा : कव्हणीं वेळीं कव्हणां जीवां काइ देति' (*सिद्ध.* वि. २१४).

**३४८. परमेश्वरपुर :** रितपुर येथे प्रत्यक्ष परमेश्वरावतार असलेले गोविंदप्रभु राहत म्हणून चक्रधरस्वामी त्या गावाला 'परमेश्वरपुर' या नावाने संबोधीत.

**३५१. समळां जीवां :** पहा : 'तेथ समळां जीवां अधिकारु नाहीं' (सिद्ध. वि. २१८)

**३५२. दोहीं साधनांची** : परमेश्वरप्राप्तीची साधने दोन. १ ज्ञान, व २ प्रेम. या दोन्ही साधनांचा संचार गोविंदप्रभु करीत नसत. असा उल्लेख वर ३५१ व्या ओवीत आलेला आहे. **उभय शक्ति** : अवर शक्ति आणि पर शक्ति याचा स्वीकार म्हणून उभयदृश्यावतार. मागे ओ. १३ वरील टीपपहा.

**३७८. प्रवृती वीखो जाले** : परमेश्वराच्या प्रवृत्तीला : इच्छेला विषय जाले : झाले. परमेश्वराने ज्यांच्या विषयी कांहीं एक विखो : इच्छा दाखविली, आस्था दाखविली असे झाले. **वीनयोगा गेले** : उपयोगा गेले, परमेश्वराच्या उपयोगी पडले, त्याच्या कामी आले. ईश्वरसेवेला लागले.

**३९०. सपींड** : पिंड = घरासमोर असलेला भाग, असा एक अर्थ आहे. त्यावरून सपिंड = महाद्वारासहित, असा अर्थ होईल.

**३९८. वस्तुसंबंधे** : परमेश्वरावताराच्या संबंधाने, स्पर्शाने. वस्तु = परमेश्वर, त्याचा संबंध. पहा : '**वस्तुसंबंधे** जडां अजडा भले' (सिवृ. वि. १७३). '**वस्तुसंबंधे** *तिर्यंचा योनि मोक्षु*' (*सिवृ. वि. १७२.*)

**४०२. सारस्वत—त्रीयंबक** : पहा : 'ते देवी कविकुळदीपकु : की *साहित्यसृष्टीचा चाळकु : की सारस्वत-गंगेचा त्रियंबकु : कुमारिवेशे*' (रुक्व. ६).

**४०४. छिन्नपाप** : हे स्वतंत्र गाव नाही. डोमेग्राम (आजचे नाव कमालपूर) येथील गोदावरीच्या काठावरील खडक. हा संबंधी पाषाण म्हणून 'छिन्न' केलेला आहे—भक्तांनी फोडून फोडून नेलेला आहे. म्हणून त्या स्थानाला 'छिन्नस्थळी' असे नाव आहे छिन्नस्थळीजवळच, 'छिन्नपाप' आहे. ज्या स्थानामुळे पाप छिन्न होते, नाहीसे होते असे स्थान; असा *याचा अर्थ पुढील ओवीत दिलेला आहे तो पहावा.*

**४०७. भांडेभेदन** : 'छिन्नपाप' स्थानाजवळील दुसरे एक स्थान. *एके दिवशी चक्रधरांनी बाइसांना सांगितले की 'बाई : आजि कांहीं करूं* नको : आजि महात्मेयाचे भीक्षान्न भोजन कीजैल" तरीहि बाइसाने महदाइसेला थोडासा भात करून आणायला सांगितलेच. स्वामी नदीवर गेले होते. तेथे,

महदाइसा भाड्यात भात घेऊन आली. हे लक्ष्यात येताच चक्रधरांनी 'भरणुके चिमग्नेइनि हाणीतलें...भरणुके टीक्रीया जालें : आवघा भात सांडला...' हा माहेंभेदनाचा प्रसंग 'मांडेभेदनीं भिक्षान्न आरोगण' या लीळेत आलेला आहे. (लीळाचरित्र, उत्तरार्ध ८३) तो पहावा.

**४१०. फळनि पिंडप्रदान** : एका सोमवतीयेच्या दिवशी इतराचे पाहून आउसाने ब्राह्मणाकडून पिंडप्रदानाची व्यवस्था केली. चक्रधरांनी तिला त्यापासून निवृत्त केले. नंतर भिक्षा मागून ती पुष्कळसा भात चक्रधराच्याकडे घेऊन आली. त्यावेळी उपाध्याकडून त्या भाताचे पिंड करून स्वामीनी आणि भक्तानी सेवन केले. त्यामुळे 'आउवेचे पीड प्रदान एथौनि चरितार्थ गा' असे स्वामीनी म्हटले. विस्तृत माहितीसाठी लीळाचरित्र, उत्त. ८१वी 'आउ पींड उपाहार स्वीकारू' ही आख्यायिका पहा.

**४११. जांवचा मागणें** : माड्या मागणे. माड्यापासून आपला जन्म व्हावा अशी प्रार्थना करणे. **देवता वोळगु आलिया** : पहा : 'देवद्रोणी गोसावीया पूजास्वीकार' (लीळाचरित्र, उत्त. ८२) **देवद्र(द्रो)णी** : छिन्नपापजवळील एक स्थान.

**४१९.** 'जो कृपा झळवीनि जीवा परज्ञान–पीयूख सपादी' असा अन्वय.

**४३३. अष्ट-माहा सीधी** : अणिमा लघिमा प्राप्तिः प्राकाम्य महिमा तथा । ईशित्व च वशित्वं च तथा कामावसायिता ।

**४४०.** पहा : 'मदवीएचा सेला : वनश्रीया वेढिला : ना तो वसतें वर्तु वाइला : नीळोत्पळाचा' (शिशु. २५१)

**४४३. स्यामा** : स्यामा स्त्री. हिचे वर्णन पुढीलप्रमाणे केलेले आढळते : 'शीते सुखोष्णसर्वांगी ग्रीष्मे या सुखशीतला । तप्तकांचनवर्णाभा सा स्त्री श्यामेति कथ्यते ॥'

**४४७. सेवा-संबंधें** : परमेश्वरावताराशी येणाऱ्या संबंधाचे पाच प्रकार आहेत. (१) ज्ञानलक्षण संबंध. (२) समवायलक्षण संबंध. (३)

मिळून जड व अजड माया त्या शरीरातील ३२ विभागात व्यापतात. तिसरी चिज्जड माया अंतःकरणचतुष्टयाच्या ठिकाणी व्यापते. याप्रमाणे माया परमेश्वराच्या शरीरात व्यापलेली असूनहि तिला परमेश्वराची संगति लाभत नाही. म्हणून, जड माया जणु ईश्वरी इच्छेमुळेच तीन मठाच्या रूपाने व्यक्त झाली, अशी कल्पना.

४८२. **प्रवृत्ति चोळगे** : पहा : 'माया परमेश्वराची **प्रवृत्ति चोगळे**' (सिद्ध. संहार १५; ससरण २७).

४९२. **कणवेचा सेंभु** : कणवेचा = दयेचा. सैंभ=स्वयंभू मूर्ति; दयेचा मूर्तिमंत अवतार. पहा : 'कीं ते सुरांची सैंभ : कीं परिमळाची अक्षोभ' (नरुस्व. ८७)

४९४. पहा : 'एथ प्रवृत्ति जाली तरि स्तंभा एकातें निमित्त करौनि उद्धरीजैल' ( सिद्ध, वि. ११४ ).

५०१. **उपराळां** : वर. हा शब्द नरेद्राच्या रु. स्वयंवरात 'उपर वाळा' असा आहे. पहा : 'ऐसा उदयाचळिचा **उपरवाळां** ' उपहुड जाला चंद्रमंडळा' ( नरुस्व. ४९१ ); 'भवर आंब्रेयाचा **उपरवाळा** ' गाति मधुकरी रागनाहाळा ' ( नरुस्व. ८०८ ). मूर्तिप्रकाशाच्या सर्व पोथ्यात मात्र 'उपराळा' असेच आहे.

५२०. **मायावेखाची बुंथि** ' अव्यक्त परमेश्वर व्यक्त होताना, अवतार घेताना जे शरीर धारण करतो ते मायाव्याप्त असते. ( ४५७ व ४६३ या ओव्यांवरील टीपा पहा ) म्हणून, परमेश्वर अवतरताना माया वेषाचे आच्छादन, खोळ घेता असे म्हटले जाते. पहा 'घेउनि चैतन्याची गवसणी : द्वारका केली महातीर्थ चरणी ' ( शिशु. ३ ). **वयस्तंवनी विद्या** ' वय रोखणारी, वाढू न देणारी विद्या. ही विद्या चक्रधरांनी काती नगरातील उधळीनाथ नावाच्या विद्यावंतापासून स्वीकारली होती. ( पहा : लीळाचरित्र, एकांक १० वी लिळा ).

५२१. या ओवीवरून मूर्तिप्रकाशकाराच्या मते वयस्तंवनी विद्या वीकारण्याच्या वेळी चक्रधराचे वय २७ वर्षांचे असावे असे दिसते.

५६६. **लवणभंजनाची भाक** : आदराची व नम्रतेची भाषा. लवणभजन = 'पूज्यतेचे व नम्रतेचे मोठे आडबर करणे; लवून नमस्कार करून पूज्यतादर्शक शब्दानी सबोधणे, बोलणे' ( म. शब्दकोश ). भाक = भाष; भाषा. जगमोहना ( चक्रधरासमोर ) कळा ( कलेने ) लवणभजनाची ( नम्रतेची ) भाषा कशी वापरली ? ( ते वर वर्णन केलेले आहे). नतर ती ( कळा ) आपल्या नृत्याने त्याचे रजन करू लागली.

५६७. ५६७ व ५६८ या ओव्यात कलेने नृत्यप्रसगी केलेल्या नेत्र विभ्रमाचे व हस्तविभ्रमाचे वर्णन आलेले आहे. ५६७ ओवीच्या पहिल्या दोन चरणात तिने दृष्टीचे ( नेत्राचे ) जे प्रकार दाखविले त्याची नावे आली आहेत. **कांमवाणाची वाहांटुळी** : वावटळ जशी आपल्याच भोवती भ्रमण करीत असते त्याप्रमाणे ती कळा नृत्यप्रसगी आपल्याच भोवती गिरक्या घेत होती. कळेला मदनाची वावटळ म्हटलेले आहे.

५६८. **हस्तक-मस्तकांचा आवो** : हस्तक=नृत्यप्रसगी करावयाच्या हाताच्या क्रिया. पहा : 'ते पात्रा राओ पात्रा गुरु : दावी हस्तकाचा विवरू : तेथ जिन्हारीं सोंचे कुमरु · वीभाडकाचा' ( उगी. ४५४ ) 'सयूत हस्तकाचेनि मीसे : आठा आगाचा हुडा उझसे' ( उगी. ४७८ ). हस्तकाचा आवो = हस्तक्रियाची ठेवण. मस्तकाचा आवो=मस्तकाचे हावभाव.

५७५. ५७२ ते ५८० ओव्यात चक्रधराच्या पायाच्या टाकाचे वर्णन आले आहे. त्याच्या चरणाच्या टाका ( टाचा ) म्हणजेच दोन टाकानी अधिक ( वजनाने अधिक ) असे खरे नाणे होय. म्हणून नागार्जुन-हाच राजा त्याने ते हृदयी धारण केले.

५७९. **कर्म-कानवाथर** : मनुष्याने केलेली कर्मे हाच एक कानवाथर =कानवा नावाचा दगड. कानवाथराचा हा दृष्टात पुढीलप्रमाणे : 'कानवाथरु असे : तो सीरसाळेयातें व्यापौनि राहीला असे : तयासि टाकी लागेना : ऐसाही लागीजे तरि उसळौनि पैन्हा पडे · एकाधा एकु तयावरि कोळें जाळी : वरि कुळथवणियें सींपे : मग टाकी लावीं तरि लागे : एल्हडाल्या चस्तळीया

नीगति : तीया पुरीजति : तीया ऐसीयाचि साडीजति तरि पावो तोडीति : तयासि वना नाही : पाटा नाही। तळीं सीरसाळा नीगे : तयाची लींगे होति : प्रतिमा होति : जे कीजे ते होए' दार्ष्टांतिक–तेसे जीव जीवासि कानवाथर होउनि लागले असति : मग परमेश्वर कानवाथर फेडौनि आपुलेयातें रासति। तैसें आपण कव्हणाहीं कानवाथरा होआवें ना : आपणयासि कव्हणी कानवाथरु लागो देयावा ना' (दृपा. २९).

**६४८. चहु दानांचें** : सामान्येकरून परमेश्वराकडून चार दाने दिली जातात. ('परमेश्वरा पासौनि चतुर्विध दान आति :' सिद्ध. विमा. १४४) १ लीळादान. २ संबंधदान. ३ ग्रहणादान, व ४ कैवल्यदान. (लीळादान : वस्तुसंबंध : एक घेउनि एक देती : कैवल्यदान : सिद्ध. वि. १७६). **लीळादान** म्हणजे कोणतीहि गोष्ट अनार्जित–जीवाने जोडलेली नसताना देणे. ('अनार्जित ते लीळा' सिद्ध. विमा. ६६). परमेश्वरावताराच्या संबंधामुळे मिळणारे दान ते **संबंधदान.** एक घेऊन एक देणे हे **ग्रहणादान** होय. म्हणजे जीवाचे अर्जित घेऊन जीवालाच द्यावयाचे. आणि **कैवल्यदान** म्हणजे जीवस्वरूपीची अविद्या छेदून त्याला ईश्वरस्वरूपात रममाण करणे.

**६८३. चैतन्ये वीस्वेचीं पदें** : चैतन्य नामक देवतेचे = मायचे स्थान आणि विश्व नामक देवतेचे स्थान.

**६८४.** नार्सींगे भुजाना बाधीत असत असे यावरून दिसते. अर्थात् केवळ माथ्यावर बाधले जाणारे तेच नासिंग असे नव्हे.

**६८६. सच्चिदानंद स्वरूप** : 'सत् शब्दें ब्रह्म बोलिजे : चित् शब्दें माया बोलिजे : आनंद शब्दें ईश्वरु बोलिजे ब्रह्म माया. ईश्वरु ऐसा त्र्यंश परमेश्वरू एकु आति.' (सिद्ध. महा. ३). अर्थात् **सच्चिदानंद स्वरूप** = ब्रह्म + माया + ईश्वर यानी बनलेले परमेश्वराचे त्र्यंशात्मक स्वरूप.

**६८७. अंसुसहीत** : तीन अंशानी युक्त. हे तीन अंश म्हणजे ब्रह्म + माया + ईश्वर.

**६८८. तिन्हीं उल्लेख** . त्र्यंश परमेश्वराच्या ठिकाणी तीन उल्लेख होतात. १ **संसरणाचा** म्ह० सृष्टि निर्माण करण्याचा. २ **उद्धरणाचा** म्ह०

जीवाचा उद्धार करण्याचा. ३ संहाराचा म्ह० सृष्टीचा सहार करण्याचा. उल्लेख = इच्छा; प्रवृत्ति. हे तिन्ही उल्लेख परमेश्वराच्या त्र्यशात्मक स्वरूपातच होतात.

**६९१. फडदर्रले :** पहा : ' जिंव्हा चराचरांचे नि मिसे : **फडतर्रलें चिद्दप** पढीयासे : म्हणौनि मी न हे ऐसें : काहींचि नाही (उगी. ७००).

**६९२. तीयचें फळ मोक्षासमान :** मायेचे फळ मोक्षफळाच्या योग्यतेचे समजले जाते. पहा : ' चैतन्यफळ मोक्षतुल्य : परि तेथ च्युति हा दोषु ' (सिद्. नि. १२). अर्थात् मोक्षफळ हे अच्युत आहे. तेथून पतन नाही. पण चैतन्यफळाचा भोग सपल्यावर मात्र पुन्हा पतन आहेच. या दृष्टीने ते हीनफळ होय.

६९८. ते ७०३ या ओव्यात ईश्वरस्वरूपाचे **विरुद्धगुणधर्मित्व** वर्णन केलेले आहे. पहा : ' **विरुद्धा धर्मा** समावेश ईश्वरींचि आति ' (सिद्. सिमा. १०) उदा. "तव म्हणे सर्वज्ञराओ : आर्डेक माझिया स्वरूपाचा प्रभाओ : तेथ भाओ आभाओ : ऐ दोन्हीं नाहीं ॥ ते सत ना असत : निर्गुण ना गुणवत अरूप ना रूपवत : जाण स्वरूप माझें ॥ ते कर्ते ना अकर्ते : भोक्ते ना अभोक्ते : देखते ना अदेखते : तेथ काही म्हणों नये ॥ ऐसे **विरूध धर्म** केवि घडति : तेथ हेचि उपपति : जे मी वीचीत्र शक्ति म्हणौनिया" (उगी. ६५२-६५५.)

**७०६. श्रीअंशा ईश्वरातें :** मागे ६८६ या ओवीवरील टीप पहा.

**७०७ सायोज्यता :** मुक्ति चार प्रकारच्या आहेत. समीपता, *सलोकता, सरूपता व सायुज्यता. त्यापैकी ही चौथी मुक्ति होय.* चैतन्य देवतेला परमेश्वराच्या सान्निध्यामुळे सायुज्यता मुक्ति मिळाली म्हणून इतर सर्व देवताचा समूह तिच्या स्वाधीन असतो.

**७२०. सील्या वीद्यांचा :** देवताच्या विद्याचे दोन थोरे केलेले आहेत. (१) स्थूळा ऊर्फ अपरोक्ष विद्या; (२) शिल्पा ऊर्फ आणव विद्या. ज्या विद्या झाल्याने विद्यावताला मळ व पिंडस्था निरतर प्रत्यक्ष दिसतात

त्याना अपरोक्ष किंवा स्थूळ विद्या म्हणतात. या विद्याच्या थोर्यात चैतन्य, निदव, अग्नभैरव, शपनाम्या व सत्यकैलासवैकुंठीच हरिहरब्रह्मादिक देवताच्या विद्याचा समावेश होतो. स्वर्ग, अंतराळ, अष्टी देवयोनि व कर्मभूमि या देवताच्या विद्याना 'शिल्प' विद्या म्हणतात. त्यानाच आणव विद्या असेहि नाव आहे. या विद्या झाल्याने विद्यनताना विद्या प्रकाशतात, पण त्याना तूर्सार असते. मात्र या विद्यावताना महिनापधरा दिवस विद्येचा भर जेव्हा असतो तेव्हाच त्याची पिंडस्था प्रकाशते. (पहा. महानुभाव तत्त्वज्ञान, पृ २५८).

**७७९ कृपेसि ईश्वरू ' दाना नेदिती** . ज्ञानी पुरुषाला विशेषज्ञान झाल्यानतर परमेश्वर त्याला आपल्या जवळील सर्व शक्ति दान म्हणून देतात. पण माया व कृपा ह्या दोन शक्ति मात्र देत नाहीत पहा 'मायाकृपाव्यतिरिक्त परमेश्वरू तेयासि सकळाही शक्ति दाना करीति ' (सिद्ध उद्ध. ५०) ज्ञानियाला परमेश्वर माया व कृपा या शक्ति का देत नाहीत याचे कारण पक्षकाराने पुढीलप्रमाणे सांगितले आहे. "मायाकृपाव्यतिरिक्त म्हणजे या दोन्ही वेगळिया करूनि का ज दिधलेया दुसरा ईश्वर होईल जीवात उद्धरों लागल म्हणौनि अन्या यथा राजो सप्तांग राज्य द परि उपभोग्य स्त्री नेंगे तथा या दोन्ही पतिव्रता" (लक्षणस्थळ ५०)

**७८१. मगन** . गहनता, मोठेपणा थोरवी पहा 'तें मुक्तीमि सौभाग्य आल ब्रह्मविद्य दैव उदेलें ' चाग **मगण** वाढिनल शांतिच प ' (उगी ४३).

**७८४. वस्य न करीती** कृपने जर आपल्या गुणानी श्रीचक्रपाणीला =परमेश्वराला वश केल नसत तर त म्ह० केवल्यदान देणारे परमेश्वर सृष्टीमध्ये कसे आले असते ? सारांश, कृपला वश झाल्यामळेच परमेश्वर सृष्टीत अवतार धारण करतात पहा 'सृष्टीम य कर्तृण करण मृग्विजेना एकें परमेश्वरेंवीण तोचि परमेश्वरु निरंगो निराकारु अस परि **कृपावशें सावेंगो साकार होए अवतरे** आपुल सनिधान द त दास्य मोचक ' (सिद्ध पूर्वी)

७२०. **मी माझें म्हणें** : निर्विकल्प व निःसंग परमेश्वर देखील कृपेमुळे 'मी' 'माझे' असे म्हणावयाला लागला. अर्थात् त्याने सगुण साकार रूप (अवतार) धारण केले, हे केवळ कृपेचे कार्य होय.

७२१. **विरो नव्हे सर्व भुतां** : सर्व प्राणीमात्रांचा विषय होऊ शकत नाही; निराकार असल्यामुळे जे ईश्वरस्वरूप प्राणीमात्राना दिसू शकत नाही–(त्याच्या इंद्रियांचा विषय होऊ शकत नाही) असे–(तेच कृपावश होऊन प्रत्यक्ष झाले).

७२२. **शुद्धबुद्ध** : अज्ञान, अधीनत्व इत्यादि दोषरूप बंधनापासून ईश्वरस्वरूप मुक्त असते म्हणून ते 'शुद्ध' होय. आणि बुद्ध = ज्ञानमय (आणि म्हणून अज्ञानबंधनापासून मुक्त)

८०१. **असळग नव्हे मनावाचे** : **असळग**=अतिशय सलगी करण्याला पात्र. ईश्वरस्वरूप हे मनावाचे (मनाला आणि वाचेला) असळग (सलगी करण्याला पात्र) नव्हे. मन आणि वाचा ईश्वरस्वरूपाबरोबर सलगी करू शकत नाहीत; त्याच्याजवळ जाऊन पोचू शकत नाहीत. म्हणजेच ईश्वर-स्वरूपाची मनाला कल्पनाहि करता येत नाही; आणि वाचेला ते वर्णन करता येत नाही. **असळग** : पहा : 'जो अप्राप्यू योगिया : तो धरू पाति तीया कामिनीया : नाए जीवींची हाव प्राणिया : कवणु न करी ॥ **असळगु** ऐसा आनटे : पुण सीउ नए कव्हणीकडे : ते रूप श्रुती नातुडे : तयाचा पाडु वादसा' (शिशु. ६८२, ६८३) 'तापसपणे निलागु : अग्नु नव्हे **आसळगु** : तैसा होआवा नीसगु : यज्ञानतीष्टू' (उगी. २८५).

८०५. अव्यक्त ईश्वरस्वरूपात कृपा प्रेमलहरी निर्माण करते. जीवांच्या प्रेमामुळे त्यांच्या उद्धारासाठी अवतार धारण करण्याची प्रवृत्ति ईश्वराला कृपेमुळे होते. ही प्रवृत्ति झाल्यावर जणु कृपा व्यक्तस्वरूपातील चैतन्याला म्ह० मायेला उद्देशून बोलते, अशी कल्पना कवीने येथे केलेली आहे

८०८. **चेतनामाजि** : चेतना शक्तीमध्ये. परमेश्वर हा सर्वशक्ति-युक्त होय. परमेश्वराच्या ह्या शक्ति कोणत्या ? 'शक्तिशब्दे सकळही

देवता सकळही गुण सकळही धर्म ज्ञान विज्ञान हे सर्व शक्तिशब्दे बोलिजेति ' ( सिद्ध मवा. ६ ) या वचनात चक्रधरांनीच सर्व शक्तींचा निर्देश केलेला आहे. या शक्तीचे दोन विभाग आहेत. १ चेतना शक्ति, आणि २. जडा शक्ति. सर्व देवता ह्या चेतना शक्ति होत इतर सर्व शक्ति ह्या जडा शक्ति होत. अर्थात्, चेतना माजि= सर्व देवतामध्ये.

८०९. **ज्ञान** 'ज जेस असे त तैस जाणिजे त **ज्ञान** ' (सिद्ध वि १४७) **विज्ञान** '*विज्ञान म्हणजे विपरीत ज्ञान* **विज्ञान** *तर विपरीत* म्हणजे काइ ना भावाचा अभाव करण आन अभावा भाव दाखवण ' (विचारसद ८१).

८३१. **शुद्ध चेतन्याचा** मायेच्या स्वरूपाचे अनेक भाग आहेत उदा हरित माया, तमोमाया वगैरे परमेश्वरावताराच्या शरीरात व्यापणारी त्रिविध माया ही अव्यक्त मायेच्या उरीच्या भावातील असते हिलाच '**शुद्ध चेतन्य** ' असे म्हणतात परमेश्वराचा आपादमस्तक संपूर्ण शरीर या शुद्ध चैतन्यान पूर्णपणे व्यापलेले असत. (पहा 'नख चर्म रोमादि करौनि शुद्ध चेतन्यचि त ' सिद्ध उद्ध. ७)

८३३. **परावरदृश्या** पर आणि अवर पाहणारा अवतार, म्हणजेच उभयदृश्यावतार.

८३७ **जडा चेतना शक्तींसीं** ८०८ *व्या ओवीवरील टीप* पहा ८३९ ते ८४० या ओव्यात परमेश्वराच्या जडा शक्तींची नावे आल्ली आहेत

८४९ **अष्टमा सीधी** अष्ट महासिद्धी

८५०. **पुरंधर** पुरदर = इंद्र पण पुढील चरणात पुन्हा इंद्राचा उल्लेख आलेलाच आहे त्यामुळ हा पुनरुक्तीचा दोष वाटतो.

८५२ **तेथ सम सारिखीया** सर्वशक्तीसहित म्ह० जडा व चेतनाशक्तिसहित परमेश्वर कर्मभूमीत अवतार घेताल यापैकी चेतनाशक्ति म्ह० सर्व देवता ओळगण्या होऊन, सेविका होऊन परमेश्वराजवळ

अदृश्य रूपाने वावरत असतात. देवताचा सामान्य नियम असा आहे की एरवीच्या ब्रह्मादव्यापारात त्याच्यामध्ये उचनिच क्रम असतो; आणि निंच देवता उच देवतेच्या आश्रित असते. पण हा नियम परमेश्वरसेवेसाठी ओळगण्या होऊन आलेल्या देवताना म्ह० ओळगण्याच्या रूपातील देवताना लागू नाही. अवताराच्या वेळी त्रिविध माया परमेश्वरावताराचे शरीर व्यापते. शिवाय मायेची ओळगणी ही परमेश्वराच्या मायापुराचा अभिमान घेते, ही गोष्ट खरी. पण इतर देवताच्या ओळगण्यावर तिचा अधिकार चालू असत नाही. तेथे सर्व देवताच्या ओळगण्या सारख्याच असतात. त्याच्यात उचनिचपणा नसतो; त्या परस्पराधीन नसतात. जी योग्यता यक्षिणीच्य ओळगणीची तीच योग्यता मायेच्या ओळगणीची. ह्या सर्व ओळगण्या तेथे परमेश्वरावताराच्या आधीन राहून त्याच्याच आज्ञेने वागतात. पहा : 'माया पुरीं इतरशक्तितुल्य माया' 'ब्रह्मादी शक्तिअधीनु शक्तिव्यापारु : मायापुरी ईश्वराधीनु शक्तिव्यापारु' (सिद्ध. उद्ध. १०; ९)

**८५७. साधनप्रतीतीप्रापकु : साध्य पाववीता :** परमेश्वरावतार अधिकारी जीवाला बोध देतो. असा बोध ज्याला झालेला आहे त्याला ज्ञानी म्हणतात. या बोधदात्या परमेश्वरावतारावर बुद्धि म्ह. श्रद्धा असते. हा ईश्वर व मी जीव अशी प्रतीती त्याला येते. शास्त्रश्रवणानतर हा परमेश्वरावतार आपला 'साधनदाता' आहे, कारण याने आपणाला बोध दिला आहे; हा आपले 'साधन' आहे, कारण याच्या सेवादास्याने आपण ब्रह्मस्वरूपात पावन होऊ; हा आपला 'प्रापक' आहे म्ह० ब्रह्मस्वरूपात आपणाला पावन करणारा आहे असे त्याला कळते. (भक्ताची स्थिति मात्र निराळी असते. त्याला तो परमेश्वरावतार आपले साधन आणि साध्य दोन्ही वाटते, कारण परमेश्वरावताराच्या शरीरातील ईश्वरस्वरूप त्याला दिसत असते.)

**८५८. मनुस्यदेहायुक्तां :** ज्याना 'युक्त' मनुष्यदेह प्राप्त झाला आहे अशा अधिकारी जीवाना. 'युक्त' देह म्ह० सर्व अवयवानी युक्त. एखादुसरा अवयव उणा असला तर मनुष्य बोधाला पात्र होत नाही, असे महानुभाव मानतात.

**८५८. बोधाची स्वस्तता** : परमेश्वरावतारापासून बोध झाल्यानंतर बोधवताला म्ह० ज्ञानी पुरुषाला अत्यंत स्वस्थता लाभते. मायेच्या विद्यावता पेक्षाहि त्याची स्वस्थता अधिक योग्यतेची असते. पहा : 'एणें बोधें बोधवता जे स्वस्थता आति ते चैतन्यविद्यावता नाही' ( सिद्ध. वि. १४५ ).

**अनुसरति** : अनुसरणे म्ह० सर्वसंगपरित्याग करून परमेश्वरसेवा करणे. अनुसरणाची व्याख्या चक्रधरानी पुढीलप्रमाणे केलेली आहे. "एथ अधीनु होइजे : एथौनि भणितलें कीजे ते अनुसरण" ( सिद्ध. आ. २८३ ).

**८५९. सत्ताज्ञान** ( सत्ताज्ञान ) : अपरोक्ष ज्ञान. पहा : 'अनुसरौनि सन्निधान करी : यापरी योग्य होए : तयासि परमेश्वरु **सत्ताज्ञान** दान करीति' (सिद्ध. उद्ध. २९) '**सत्ताज्ञान** तेंचि **अपरोक्ष ज्ञान**' (सिद्ध. उद्ध. ३३). ४५९ व्या ओवीवरील टीप पहा.

**८६१. सकळ मळांचें परीसारण** : पहा 'कव्हणी एकी अवसरीं सकळही मळाचें परिसारण करौनि परमेश्वरु जीवीं आपुली सत्ताशक्ति संचरीति : मग मागौतें मळ घालिती' ( सिद्ध. उद्ध. ३० )

**८६२. बहुरूपता या वचनासी** : हे वचन पुढीलप्रमाणे 'अपरोक्ष ज्ञानियासि बहुरुपता बहुकामता होए' ( सिद्ध. वि. १२९ ) 'बहुरुपतेनें कर्म क्षाळावयाचें म्हणजे त्या लेपाचा देह आपण धारण करून तो अत्यल्पावधीत भोगून टाकून द्यावयाचा.' 'बहुकामता करावयाची म्हणजे त्या त्या देवता फळाची किंवा नरकफळाची क्षणभर मनाशी 'काम' म्ह० कल्पना करायची व ते फळ उपभोगून क्षाळायचें.' विशेष माहितीसाठी महानुभाव तत्त्वज्ञान पा. ४६२ व ४६३ पहा

**८६३. मनोधर्मे करी धुनी** : हीच बहुकामना होय. वरील टीप पहा.

८६४. पहा : 'ब्रह्मादिक आपुलेया पदा नेयावेया एति : परि तो तयाची वास ही न पाहे' 'अष्टभैरव हाल्वीति डडळवीति . परि तो जैसा काही तैसाचि' (सिद्ध. उद्ध. ३८, ३९).

८६५. पहा : 'ब्रह्मतुल्य आनंद विघ्नत्वें प्रकटति' (सिद्ध. उद्ध. ४०).

८६७. पहा : 'यापरी योग्य होए : तेयासि परमेश्वरू सामान्यज्ञान दान करीति' ( सिमृ. उद्ध. ४२).

८६८. 'पुरुष = जीव; अवीद्या = (निम्न करणाऱ्या) देवता, आणि अनवार – परमेश्वर. या वस्तु कैवल्यदानी परमेश्वर प्रमाणित करतो, त्याची स्वरूपे यथातथ्य जाणवितो, त्यामुळे तो परमेश्वराला नीट पाहून केवळ त्याच्याच स्वाधीन होतो. पहा : 'विद्या अविद्या पुरुषु या तीहींतें विद्या प्रकाशी : मग तो नित्यअधीन होए' (सिमृ. उद्ध. ४१).

८६९. **धीकार श्रृष्टि** : ब्रह्मांडिकापालील सर्व स्त्रीदेवता. **ज्ञान-जगजेठी** : ज्ञानियाचा मल्ल.

८७०. **सुक्षम ( सूक्ष्म ) प्रपंच** : आकाराला आलेल्या कार्यप्रपंचाचे प्रकार दोन. १ सूक्ष्म प्रपंच; आणि २ स्थूळ प्रपंच. **सूक्ष्म प्रपंच** = 'जीव स्वरूप अत्यंत सूक्ष्म असल्यामुळे ते कोणत्याहि देवतेला दिसू शकत नाही. पण जीव ब्रह्मांडात आल्यानंतर त्याच्या निरनिराळ्या कर्मांप्रमाणे त्याला फळे देण्यासाठी जीवस्वरूप देवताना व्यक्त होणे अवश्य आहे. त्यासाठी जीवाला आपल्या स्वरूपावर प्रत्येक देवतेचा मळ घ्यावा लागतो. या देवता मळानाच सूक्ष्म प्रपंच असे म्हणतात. आणि मनुष्यमात्राना दृष्टिगोचर असलेली पृथ्वी, तिच्यावरील सर्व शरीरे, वस्तुजात वगैरेंच्या सृष्टीला **स्थूळ प्रपंच** हे नाव देतात' ( महा. तत्व. १४४ ).

८७१. पहा : 'तेण लाविलें तें तो फेडी : तेणें नाहीं लाविलें तें तेयाचेनि न फिटे' ( सिसू. उद्ध. ४५ ).

८७३. **दैवश्रृष्टि** : ब्रह्मादिक व त्याच्यावरील देवता. **माया कृपा-वाचौनि** : ७७९ व्या ओवीवरील टीप पहा.

८७४. **प्रमाणद्रव्य** : 'मायाकृपाव्यतिरिक्त सर्व जडाचेतना शक्तींचे ज्ञानियाला दान दिल्यावर, अर्थात् त्या त्याच्या अधीनत्वाने राहतात. म्हणजे असे की, चेतना शक्ति त्याला 'प्रमाण' मानतात; विशेषज्ञानिया हा ईश्वरा समान–पण ईश्वर नव्हे, या भावनेने त्याची सेवा करतात, त्याची

आज्ञा पालन करतात. आणि जड शक्ति अभावरूप असल्यामुळे, विशेष ज्ञानिया त्यांना 'द्रव्य' म्हणजे आश्रयभूत होतो' ..(मग तो सकळासिही प्रमाणद्रव्य होए: सिसू. उद्ध. ५१). महानु. तत्त्व. पा. ४८४–८५.

८७५. पहा : 'मग परमेश्वरु आपुलिया कृपाशक्ति करुनि तेयाची अनादि अविद्या छेदु करीति : मूळाविद्या छेदु करीति : अज्ञानछेदु करीति' (सिसू. उद्ध. ५४).

८७६. पहा : 'अज्ञानछेदेंकरुनि अन्यथाज्ञानत्रुटि होए : आत्र मळत्रुटि होए : जीवत्वत्रुटि होए' (सिसू. उद्ध. ५५).

८७७. पहा : 'साध्याचिया प्राप्ती साधन निवर्ते' 'ज्ञानिया ब्रह्मी मिसळे : बुडी दे' (सिसू. उद्ध. ५८; ६४). **साधन नीवृती—** ज्ञानियाला ब्रह्मस्वरूपात आणून सोडणारी एकूण तीन साधने असतात. एक, ज्याने त्याला अपरोक्षज्ञान दिले तो परमेश्वर अथवा ती श्रीमूर्ती; . ...अगदी आरंभी परमेश्वराने दिलेले ज्ञान हे दुसरे साधन, व या साधनाच्या आचरणामुळे प्राप्त झालेली योग्यता हे तिसरे साधन. ज्ञानियाला ब्रह्मानंद प्राप्त होण्यापूर्वी ही तिन्ही साधने निवृत्त होतात.' (महा. तत्त्व. ४९५ ).

८७९. ८५५ ते ८७७ या ओव्यात ज्ञानमार्गाने परमेश्वर ज्ञानियाचा उद्धार कसा करतो याचे वर्णन आले आहे. आता ८७९ पासून ८९२ पर्यंत प्रेम अथवा भक्तिमार्गाने भक्ताचा उद्धार कसा करतात त्याचे वर्णन आलेले आहे. प्रेम म्हणजेच भक्ति पहा 'एका प्रेम सचरीति' 'प्रेम बोलिजे : भक्ति बोलिजे' त्यामुळे 'प्रेमसंचारमात्रे विकारु : विकल्पु : स्वभावो : इये तीनि उच्छेदौनि जाति' ( सिसू. उद्ध. १३, १४, १५) **विकार**–इंद्रियाचे धर्म. **विकल्प :** 'अनीश्वरीं ईश्वरबुद्धि : मग पवित्र अपवित्र : शुचि अशुचि विटाळ एवमादिक कल्पी म्हणौनि विकल्प' (आस्थ. ५८). **स्वभाव :** क्षुत्पिपासा, मलमूत्र, शीतोष्ण व भयनिद्रा ही **देहद्वंद्वे** म्हणजेच अष्टस्वभाव

**८८२. संनिधानी चरितार्थे :** प्रेमसचारापासून तो अनुभूतिप्राप्तीपर्यंत भक्ताला परमेश्वराचे निरंतर सन्निधान लाभते. त्यामुळे त्या सन्निधानातच

त्याच्याकडून चारहि ज्ञानाची परिपूर्णता होते. ('भक्ताचे सकळही सन्निधानीं चरितार्थ होए.' सिम्. उद्ध. १६) **साध्य साधनाकारें आकारलें** : बोध देणारा परमेश्वरावतार हे आपले फक्त साधन आहे असे ज्ञानियाला वाटते (८५७ व्या ओवीवरील टीप पहा); तर भक्ताला प्रेमसंचार करणारा परमेश्वावतार हाच आपले साध्य व साधन आहे अशी प्रतीति येते, त्याच्या ठिकाणी आनंद उपभोगणे हेच आपले प्राप्य-प्राप्तव्य आहे आणि ते प्राप्त करून देणारा प्रापकहि तोच आहे अशी प्रतीति येते. ('भक्तासि श्रीमूर्तिवरी साध्य-साधन ऐसी प्रतीती : प्राप्य-प्रापक बोधु : सिम्. उद्ध. १७); इतकेच नाही तर 'साध्य साधनाकारें आकारलें : करचरणवत ब्रह्म हें : ऐसी भक्तासि प्रतीति' ( सिम्. उद्ध. १८ येते.

८८४ **वियोगीं उरों न सकें** : परमेश्वराचा वियोग झाला तर भक्त त्याच्या मागे शिल्लक राहत नाही, जिवत राहत नाही. पहा : 'भक्त वियोगीं नुरे' ( सिम्. उद्ध. १९)

८८७. पहा : 'भक्ता नित्य संबधु' ( सिम्. उद्ध. २०)

८८९. परमेश्वर भक्ताला जो आनंद देतात तो पोटाशी धरून, म्हणजे त्याला ईश्वरस्वरूपात मिसळवून ( पहा : 'भक्तासि आपणपें समोर देति :' सिम्. उद्ध. ६० ). उलट ईश्वराकडून ज्ञानियाला मिळणारा ब्रह्मानंद म्हणजे त्याने ज्ञानियाला पाठीशी घालणे होय. पाठीशी घातलेल्या शरणागतापेक्षा पोटाशी धरलेल्या आपल्या लाडक्या लेकरावर, अर्थात् भक्तावर, ईश्वराचे प्रेम स्वभावतःच अधिक असते हे यावरून दिसून येईल.

८९०. **रती अनुभूति** : '**रति** म्हणजे ज्यायोगे भक्ताला ईश्वरस्वरूपाच्या अनुभूतीचा आनंद उपभोगता येईल असे 'रमण करिते द्वार'. रसनाइंद्रियामुळे ज्याप्रमाणे आपण पदार्थ सेवन करू शकतो त्याप्रमाणे रतीमुळे भक्त ईश्वरानुभूति अनुभवू शकतो. ही रति दिल्यानंतर परमेश्वर भक्ताला आपली अनुभूति देतात. **अनुभूति** म्हणजे परमेश्वर स्वतः जो आनंद उपभोगतात तो. तोच ते भक्ताला देतात.

९०४. **सर्वकर्त्ता** : पहा : '**सर्वकर्ता तो**' ( सिम्. निर्. २१)

९०८. जड आणि अजड वस्तूंवरोवर, चराचरावरोवर चंद्र समानत्वाने वागतो.

**९११. जाति-विखया :** आदर्श विषयोपभोग घेणारा. 'जाति विखो' हा शब्द सूत्रपाठात पुढील अर्थाने आलेला आहे. '**जाति विखो** एकु आति : तो सेविलेयां तुष्टि पुष्टि रस श्रये इये च्यान्ही होति : जेसे गोघृत' '**जाति विखो** सेविलेया इंद्रियकाठिन्य निवर्ते : परि अतःकरणाचे काठिन्य न निवर्ते' ( सिसू. वि. १९२, १९३ ). यावरून 'जातिविखया' या *शब्दाचा वर केलेला अर्थ यथायोग्य असल्याचे दिसून येईल.*

**८१३. व्रतस्ता :** चंद्रकिरणाचे भोजन मिळाले पाहिजे म्हणून धरणे धरून बसणारा चकोर हा जणु 'व्रतस्त' = व्रतस्थ असतो. व्रतात उपवास करतात. त्याप्रमाणे चकोरहि, चंद्रकिरण भोजनास मिळत नाहीत तोपर्यंत उपाशी राहतो. उपवासाचे पारणे फेडतात त्याप्रमाणे चंद्रोदयानंतर चंद्र-किरणाचे सेवन करून चकोर आपल्या उपवासाचे पारणे फेडतो.

**९४०. सुत्र नीर्वचनाचें :** सिद्धात सत्रपाठातील 'निर्वचन' या नावाच्या प्रकरणातील सूत्र. ईश्वरस्वरूपाचे वर्णन केलेले असल्यामुळे या प्रकरणाला 'निर्वचन' हे नाव दिलेले आहे.

**९४५. व्यापारतें :** परमेश्वराचा व्यापार—कार्य करणारे चैतन्य=माया परमेश्वर प्रवृत्तीमुळे अनंत ब्रह्मांड रची.'

**९४८. त्रीवीधा परी :** सृष्टिमध्ये परमेश्वर तीन प्रकारानी अवतार घेतो. (१) गर्भ (२) पतित (३) दवडणे. **गर्भावतार** घेणे म्हणजे सामान्य मनुष्यव्यवस्थेप्रमाणे मातापितराच्या शुक्रशोणितापासून मातेच्या गर्भात वाढलेल्या पिंडात अवतरणे. **पतितावतार** म्ह० एखाद्या जीवाच्या पतितात=मृत देहात प्रवेश करून अवतार घेणे. उदा : चक्रधराचा अवतार हा पतितावतार होय. **दवडण्याचा अवतार** म्हणजे एखाद्या देहात आधीच व्यापून असलेल्या जीवाला त्या देहातून दवडायचे आणि मग तेथे अवतार घ्यायचा.

९४९. परमेश्वर स्वत: अवतार घेतो, त्यामुळे त्याच्या प्रवृत्तीने, एरवी 'स्वरूपी नित्य व निराकार' असलेल्या देवता व्यक्त होतात आणि जीवहि व्यक्त होतात. याच अर्थाने ईश्वर सर्वकर्ता आहे. एरवी जीव, ईश्वर, देवता हे तिन्ही पदार्थ अनादि आणि नित्य असल्यामुळे, मुळात नसलेले हे पदार्थ ईश्वर करतो असे नाही.

**९७०. अवीक्रीयू हें प्रमाण :** पहा : 'अविक्रियु तो' (सिद्ध. निर्व. ५)

**९७२. न घडतीं उत्तरें :** न घडणारी, अयथार्थ उत्तरे.

**९७७. परा पाठविली :** कृपानिधी परमेश्वराने आपल्यावर परा वाणीला पाठवले आहे आता आपले कसे होईल ? अर्थात्, परावाणीसमोर आपला टिकाव लागणार नाही, अशी भीति कामक्रोधादिकांच्या (षड्रिपूंच्या) समूहाला पडते.

**१०००. वारा भंगाणी** भगाणी = भगणी, नाश, दाणादाण. वारा भगाणी = वारा वाटानी दाणादाण.

**१०१४. मुर्सीजाति** मूर्च्छेत जातात, मूर्छित होतात. हा शब्द 'मुसीजति' असाहि असू शकेल. पण चारहि पोथ्यात तो 'मुसा जाति' असाच आहे.

**१०१६. घाटी खांचणें** हल्ला चढविणे.

**१०५४. पुरस्तेसी अभीमानु** ४५७ आणि ४६३ या ओव्यावरील टीपा पहा.

**१०५८. संसारेंसीं प्रजणें** ससारावर हत्यार उपसणे.

**१०६८ सन्निपातैला** पहा : 'क्व्हणा एकाचा पाइकु सनिपातैल असे : तो आपुलेया गासावीयासि म्हळीएची सीवी दे । तो तेयाच वोरवं नेघे . हीताचि प्रवर्ते । मग म्हण यात कव्हणी राखो का गा याते जे राखेल तेयासि मी एव्हडी सोनयाची रासि करीन । तचि सावध जालेयावरि जरि म्हणे तरि आव्हेरीती सुरीया हाणौनि मारूनि फेरी । दाष्टातिक तैस परमेस्वरात जीउ म्हण देवतात जीउ म्हण परि परमेस्वरु तेयाच वोरवें नेनौनि ज्ञान देति । तचि जरि ज्ञान जालेयावरि म्हणे तरि अव्हेरीति' (दृष्टा. ३६. 'सन्निपातैलयाचा दृष्टात.')

**१०७०. अवस्थान** हा शब्द 'अवसान' असा असावा असे अर्थाच्या अनुसधानावरून वाटते.

**१०७६.** विखयेवासना (विषयवासनेमुळे) आपुल्या सुखापासोनि अन्यथा (वेगळा – विसरलेला) नव्हे.

**१०७८.** ईश्वराबरोबर ज्याची तुलना करता येईल असा दुसरा कोण ताहि मोठा पदार्थ नाही. मग ईश्वराला दुसऱ्या कशासाठी विकरण्याचे, लोभाविष्ट होण्याचे कारण काय ?

**१०८३. विखये प्रेमिया** उभयदृश्या परमेस्वरावतारावर विषयबुद्धीने प्रेम करणारी स्त्री.

**१०८५. वेधीं लावणें** : आपल्या वेधशक्तीने पात्र व्यक्तीला आपल्याकडे ओढून घेणे; आपल्या ठिकाणी त्याची आसक्ति कायम ठेवणे.

**११०५. एक घेउनि एक देती** : पहा : 'मूर्ती परमेश्वरु एक घेउनि एक देती : अमूर्ती काहीचि नेघति' ( सिसू. वि. १२० ) मागे ६४८ ओवीवरील टीप पहा.

**११०६. जीवधर्म** : राग, द्वेष, कामक्रोध, व मदमत्सर ही मनोद्वंद्वे म्हणजेच जीवधर्म होत. **देहधर्म** : वाटणे, वळितपळित, अक्षमत्व, रोग व व्याधि ( जायते, स्थीयते, वर्धते, विपरिणमते, क्षीयते व म्रियते ) हे षड्‍विकार म्हणजे देहधर्म होत.

**१११०. स्त्रीएचेनि नांवें** : 'चित्रीची स्त्री न पाहावी' ( सिसू. आ. १० ). **'इंद्रियार्थ रखु न सेवावा'** ( सिसू. आ. ९८)

**१११४. 'हातें धरीजे काडी'** पहा : 'हातीं काडी धरीजे : हाही आदिरंथनि एकु विकारुचि की गा' (सिसू. आ. ४९)

**११२३.** पहा : 'तुम्हा मारिता पूजिता समानचि होआवा की गा' ( सिसू. आ. ६४ ). 'हा जनु तुमतें डोह्य डोह्य मारील : परि तुम्ही डोहचि ओडयावी की' ( सिसू. आ. ६३ )

**११५९. सर्वातीतु हे श्रुती** : पहा 'सर्वातीत तो' ( सिसू निर्व. २० )

**११६१. सो** : वेष, सोंग पहा : 'भावें सर्णा जोगियाचा **सो** सुये तेयाही एकु मळ आति' (सिसू. वि. १८०)

**११९२.** पहा : 'घटघटाभिमानीए अनुस्यूत' (सिसू. वि. ४)

**११९३.** पहा : 'यापरी माया जीवात जन्मौनि आपण उदासीन होए : परि सनाने न सडी' ( सिसू. सस. १० ) **जन्मौनि**=जन्मवून, जन्माला घालून.

११९८. पहा : 'गोसावी आसनीं उपविष्ट होति' नाटसे प्रश्नु करिति जी जी आम्ही सर्वभावें चिंतु ' सर्वज्ञ काइ चिंतिति : सर्वज्ञ म्हणितल नाट हं सकळ जीवात चिंती ' (पूजावसर ).

**१२०७. कासवीच्या दृष्टांतु** " कासवी असे ते थडियसि वीय आपण ऐल्याडि असे तीय पैलाडि असति तेथौनि तयात अत करणीं आठवी अमृतकळा अस त सचरे तयातन तीय वाढति ॥ दार्ष्टातिक ' तैस परमेश्वराचीय आठवणतन एक वध सचरेति जैस नित्यदीनीं लीळेचे पुरुषु मातागामि शतासहस्रा एकाटसासि " ( दृपा. ६)

१२०४ कासवीच्या मानतीन सकत असा आहे की ती एका काठा वर स्वत राहून, दुसऱ्या काठावर असलेल्या आपल्या पिलाकडे प्रमळ नजरेने पाहते. त्यामुळ त्याचे पालनपोषण व सवर्धन होते. अर्थात् तिच्या त्या प्रेमळ दृष्टीतून जणु अमृताची कळा बाहेर पडते आणि तिच्यावर त्या बाल्काचे पोषण होते पहा 'आगा मुसमेळेनिण । पीलेयाच पोखण करी जेनि निरीक्षण । कूर्मिच ' (ज्ञा. १३–१४०).

१२०५ **चैतन्या होय थीसावा** दु ख भोगणाऱ्या जीवाचा दु खभोग जेव्हा परमेश्वरावताराच्या शरीरातील पुरस्थ चैतन्याच्या ठिकाणी मायच्या ठिकाणी जव्हा विसावतो, स्थिर होतो, त दु ख जेव्हा परमेश्वरा वताराला कळते त्याच वेळी तो 'स्नेहे शळनौनि आठवी ' त्या जीवाचे चिंतन करतो–स्मरण करतो

१२१५. १२१५ ते १२२८ पर्यंत सृष्टिरचनेचे, विशेषत. जीवाने केलेल्या सूक्ष्म प्रपचाचे म्ह० मळरचनेचे वर्णन केलेले आहे.

**१२१५ आद्याशक्ती** : माया ही परमेश्वराची आद्य शक्ति, म्हणजे मुख्य शक्ति आहे. आपली सर्व कार्ये तो हिच्याच द्वारे करतो, किंवा, परमेश्वराचे सर्व व्यापार हीच करते म्हणून तिला 'व्यापारती' असे म्हटलेले आहे. पहा : 'आद्या शक्ति माया' (सिस्. विमा. १५७).

**१२१६. महं** : हा शब्द मुळात 'अह' असा आहे. 'परमेश्वर-प्रकृति माया तमोनिमग्ना जीवा चेतन्यमह ऐसे उपजवी' या व पुढील अनेक सूत्रात (सिस्. सस. ३, ५, ६) 'चैतन्यमह' 'विश्वमह' असे शब्द आलेले आहेत. त्यातील 'अह' ही अक्षरे 'मह' मानून येथे व पुढे अनेक ओव्यात वापरली आहेत. मह=अह. **धीकरौनियां** : विकरवून; जीवाच्या ठिकाणी विकार उत्पन्न करून.

**१२१७. 'चैतन्यमहं'** या अध्यासानेच जीव जागे होतात. 'मी चैतन्य=माया आहे' असे तो म्हणतो. त्याच वेळी अनियात्मक अशा जीवाला मळ ( शक्तिमळ किंवा आद्यमळ ) लागतो.

**१२१९. अधमति** : जीवाच्या ठिकाणी 'अधमति : अधगति ' अधरति' असे तीन दोष असतात. 'अधमति'मुळे त्याला अध.पाताची बुद्धि होते, 'अधगति' मुळे तो त्या अध पाताकडे जातो, अध पात स्वीकारतो, आणि 'अधरति' मुळे तो त्या अध पातात रममाण होतो. यानाच जीवस्वरूपातील 'मतित्रय' असे म्हणतात. पहा : ( महानु. तत्त्व. पा. २७, २८ ). **सुक्ष्म प्रपंच** : जीव जो सूक्ष्म प्रपच = मळ तयार करतो ( मागे ओ. ८७० वरील टीप पहा ) तो मायेने त्याला दिलेल्या सामर्थ्यामुळे.

**१२२०. विस्व-रूप** . आद्यमळानतर तो 'विश्वमह' म्हणतो, म्ह० विश्वनामक देवतेचा मळ तयार करून स्वीकारतो.

१२२२. अष्टधा प्रकृति : सर्व प्रपच हा अष्टधा प्रकृतीपासून तयार होतो. अष्टधा प्रकृति म्हणजे 'पाचे भूतें गुण त्रिविधा : हे भिन्न प्रकृति

अष्टधा : या आठांचा साधात याधा : प्रपचाचा' (ज्ञाप्र. ५७६) पहा '*सकळहि प्रपचु पचभौतिकु त्रिगुणात्मकु*' (सिद्. नि. ५९). **पांचे भूतें :** पृथ्वी, जल, आकाश, अग्नि, आणि वायु. **तीन गुण :** सत्त्व, रज व तम.

१२२३. **सप्त धातु** . 'रसास्त्रमांसमेदोऽस्थिमज्जान शुक्रसहिता'
१२२६. **निर्वाळणें** धुणे, अगावर घेणे. **मळ निर्वाळणें** जीव, स्वरूपावर मळ लावून घेणे. **चतुर्विधें कर्मफळें** मागे ५७ ओवीवरील टीप पहा.

१२२७. *नीउन* ' न्यून, नीच

१२२८. मागे ५७ व्या ओवीवरील टीप पहा या आधीच्या पूर्वार्धा पर्यंत सूक्ष्म व स्थूळ प्रपचरचनेचे वर्णन आलेले आहे. यानतर परमेश्वर अवतार का व कसा घेतो याच वर्णन व नतर ज्ञान व प्रेम या साधनाच्या द्वारा त्याने केलेल्या जीवोद्धरणाचे वर्णन कवीने केले आहे.

१२३१. **मनुष्यदेहायुक्तां जीवां** युक्त (सर्व अवयवानी परिपूर्ण) असा मनुष्यदेह धारण करणाऱ्या जीवाना.

१२४८ आनद, ऐश्वर्य, प्रकाश, सुख आणि सामर्थ्य हे पचप्रकार प्रत्येक देवतेच्या स्वरूपात असतात. ते ईश्वराचे अशभूत आहेत. या दृष्टीने विचार केला तर देवताच्या ठिकाणीहि परमेश्वर आत्मत्वाने कसा

**१२५८. उदरीं सांटवी** : पोटात घालते.

**१२६६.** चक्रधरानी जीवाच्या दोषाचे अनेक वचनात निरूपण केलेले आहे. उदा : 'जीवु सर्व दोषाचें आळ' (सिसृ नि. २०२); 'जीवु स्वार्थपरु' (सिसृ. वि. १९०); 'जीव जीवा उरले असति' (सिसृ. वि. १८९); 'जीवु भणिजे दोषदर्शिया गा' (सिसृ. विमा ४२). 'पोरु जीवु आपुल मानागमन न देखे : परि पुढीलाचें वेश्यागमन देखे' (सिसृ. आ. १७५); 'जीवाचा माथा अनादि अविद्या गा' (सिसृ. निमा. ३४) वगैरे.

**१२७०.** चक्रधराच्या मते देवता ह्या नित्यबद्ध आहेत; जीव बद्धमुक्त आहेत, आणि परमेश्वर नित्यमुक्त आहे. (नित्यबद्धा देवता : बद्धमुक्त जीवु : नित्यमुक्त परमेश्वरु ' सिसृ. वि. ४५ ) देवता नित्यबद्ध असल्यामळे त्या मुक्त होऊ शकत नाहीत, अर्थात् परमेश्वराच्या सन्श्रेष्ठ आनंदाला पात्र होऊ शकत नाहीत. ज्या दोषानी त्या बद्ध आहेत ते दोष परमेश्वरालाहि नासता येत नाहीत.

**१२७१.** अविनाश (कधीहि नाश होऊ न शकणाऱ्या अशा) दोषावेगळ्या.

**१२७२.** पहा : 'तेयाचा ठाइ एके सामर्थ्ये आति : तिये तरि एथौनिचि सिद्धि नेदजति की' (सिसृ. वि. २७१).

भणौनि गर्भु । खुनले रंगस्थानीं ज्ञानिया भक्ताची प्राप्ति : दोहींचा विभागु देऐ : अनुभूतीचा निशेपु शक्तीयुक्त देखे । (दृपा. १४ ).

१२८०. जीव दुःखभोग भोगत असतांना देव कसा वागतो ? सर्व भूतात आत्मत्वाने–सर्वात्मक भावाने असलेला परमेश्वर दुःखभोगाच्या वेळी 'सर्वातीत' कसा असू शकेल ? अशी शंका यापुढील ओवीत घेतलेली आहे. अर्थात्, जीवाच्या दुःखभोगाच्या वेळी सर्वात्मकतेमुळे ईश्वरालाहि दुःख होत असले पाहिजे. मग तो 'अतीत' आहे असे कसे म्हणता येईल?

१२९८. नीजस्वरूपींचें नीजवणें : जीवाला ब्रह्मस्वरूपात कसे निजवितात; तेथे त्याची स्थिति कोणती असते ते ( निजवणें ).

१३०२. शक्ति चकासि ( सर्व देवतांना ) तया सुखाचा ( त्या परमेश्वराच्या सुखाचा, ब्रह्मानंदाचा ) मोतु न टके ( प्राप्त करून घेता येत नाही. त्यांना तो मिळत नाही.

१३०५. जो आपल्या आनंदात रममाण झालेला ( आनद् तो : मिस्. निर्व. २ ) असूनहि 'सर्वात्मक'=जीवदेवताप्रपंचात आत्मत्वाने आहे. आणि 'सर्वात्मक' असूनहि त्यांच्या दुःखभोगात किंवा ओखट्या क्रियेच्या वेळी त्यांच्यापासून 'अतीत' म्ह० 'सर्वातीत' आहे. असा हा श्रुति विरोध ( ईश्वराच्या वचनातील विरोध ) आहे.

१३१६. समुद्रात अदृश्यरूपाने असलेला वडवानळ म्हणजे निजांशाने पाण्यात असलेला प्रतापी ( सबळ ) सूर्यच होय. अर्थात्, वडवानळ हा सूर्याचा अंश.

१३२४. शरीरात असलेला 'जठराग्नि' (पोटातील अग्नि ) हा भोजनाच्या वेळी अन्नाची इच्छा करतो. हा जठराग्नि म्हणजेहि सूर्याचाच एक अंश होय.

१३३७. पहा : 'जैसा काष्टांतु : अग्नि असे सर्वगतु : पुणु प्राणियांसि नव्हे हेतु : दृष्टादृष्टीं ॥ तोचि जेव्हळा होये प्रकटु : तेव्हठि भजनें जोडे अदृष्टु :

पाकनिष्पत्ती दृष्टु : एका होए ॥ तैसा परमेश्वरु : सर्वात्मा नीराकारु : परि जीवासि साकारु : उपग्रहु ॥ (उगी. २८९–२९१).

१३३९. अहेतुक भजन : मनात कोणत्याहि पुण्यप्राप्तीची इच्छा न ठेवता घातलेले भोजन (किंवा, केलेली सेवा). पहा : 'अहेतुक भूतभजन ज्ञानाप्रति साधन' (सिद्ध. वि. १६८).

१३४९. मुंगीए वीर : पहा : 'मुक्तीची चाट : तेण मुगिये वीरु न चिंतावे' (सिद्ध. आ. ६५).

१३५१. जडांची आकृती : जड पदार्थांना यदृच्छेने जो आकार आलेला असेल तोहि तो 'न भगी'. उदा : एखादी काडी एका विशिष्ट रीतीने पडली असेल तर ती तशीच राहू देतो. तो आकार भगत नाही.

१३५३. पहा : 'तुम्ही महात्मे कीं गा' तुम्हीं चतुर्विधा भूतग्रामा अभय देयावे कीं' (सिद्ध. आ. २३२).

१३५५. गुण वांतिवरि : वातिपर्यंत-वातीएवढा गुण. गुण शब्द या ठिकाणी श्लिष्ट आहे. गुण = (१) दोरा. (२) सदाचरण; चांगलेपणा.

१३४४. वर्मस्पर्श : पहा : 'वर्मस्पर्शें नरक : वर्मस्पर्शापसी वरि शिरच्छेदु चागु' (सिद्ध. आ. १७३)

१३६०. नीत्यानीत्य : नित्य पदार्थ आणि अनित्य पदार्थ.

१३६१. पहा : 'चैतन्यफळादिकरौनि सकळही फळें साधनें मूर्त ' (सिद्ध. वि १३)

१३६३. पहा : 'स्वदेशसंबधु त्याज्य : स्वग्रामसंबधु त्याज्य : संबधि याचा संबधु तो विशेषता त्याज्य' (सिद्ध. आ. १).

१३६६. विखए-वेवस्ता : मनाचे समाधान. पहा : 'पोरु जीवु चाटेयाचेया पेटेयावरि विषयव्यवस्था करी' (सिद्ध. आ. २०१).

१३७३. स्वस्तता घनवट : स्वस्थतेने दृढ. ज्याना चांगली मन शांति प्राप्त झालेली आहे असे.

**१३८१. कखायाचीये होमकुंडीं** : या ब्रह्मांडात सर्व प्राणीमात्र (जीवजात) मलिनतेच्या-पापाच्या (कषायाचीये) होमकुंडात पडलेले आहेत. पण तेथे, जो योगी पुरुष असेल त्याच्या हाताला चटकाहि (आहे) लागत नाही.

**१३८६. तीमों नेदी** : तिंबू देत नाही, ओले होऊ देत नाही.

**१३८८. अष्टभोग** : १६६व्या ओवीवरील टीप पहा. **राजध्वनी** : हा शब्द राजधानी असा असावा. पुढे 'ज्ञानिया देरे' यातील 'देरे' या क्रियापदावरूनहि पाहण्यासारखी वस्तु असावी असे स्पष्ट दिसते. त्यावरून असे वाटते की 'राजधानी'साठी 'राजध्वनी' शब्द चुकून पडला असावा. राजधानी=राजाच्या वसतीचे ठिकाण; राजवाडा.

**१३९७.** ज्ञानिया परमेश्वर जणु आपल्यासमोर आहे असे पाहतो.

**१३९८. अवगळा** : हा मायास्वरूपाचा एक विभाग तमोमायेच्या मर्यादेवर असतो. हे स्थान सुखदु:खरहित असे असून नवीन सृष्टिनिर्मितीच्या वेळी जीवांना ब्रह्मांडात ढकलण्यापूर्वी या स्थानात आणून ठेवतात.

**१४०७. वीरहिया पुरखु** : वीरहिया-विरही-पुरुष. परमेश्वराच्या असंनिधानात परमेश्वराच्या विरहाचे दु:ख करणारा ज्ञानी.

**१४१९. सडिवा** : सचार. पहा : 'विनयाचेया पाट्खा : सर्वे लागे श्रीधाराचा **सडिवा**' (उगी. १८०).

**१४२०. ते भिख्रु** (= ते अनुसरलेले ज्ञानी) **वासनींकेंसीं** (अनुसरणाची वासना बाळगणाऱ्या, पण अद्यापि न अनुसरलेल्या, अर्थात् अजून संसारात आसक्त असलेल्या बोधवताबरोबर) **सौरसु** (मैत्री, सुसंवाद) **काइ करतील ?**

**१४२२. जाणतजाणतां** : जाणता जाणता = ठाऊक असताना; जाणूनबुजून; मुद्दामहून.

**१४४०.** पहा : 'यापरी योग्य होए : तेयासि परमेश्वर सचानंदान करीति' (सिद्ध. उद्ध. २९)

**१४४२. फुटाणेकाराचा दृष्टांत :** चक्रधरांनी निरुपिलेला हा मूळ दृष्टांत पुढीलप्रमाणे : "कव्हणी एकु फुटाणेकारु असे : तो चणेयासि बोल दे : भीजति : मग एकि वाळु घाली ' ते फेडी । दुसरी वाळु घाली तेही फेडी । तीसरी वाळु घाली तेही फेडी । हीरवट आणि कठीणत्व हे दोन्ही दोष जाति : सुरे मृदत्व हे गुण एति : कुचुकरत टरल होए । मग गुळेंसी मक्षावेया योग्य होए ।।" दार्ष्टांतिक तेसें परमेश्वरु जीवांसि शब्द देतिः अपरोक्ष देति : सामान्यज्ञान देति : विशेष देउनि प्राप्तियोग्य करीति " (दृपा. ६६)

**१४५१. नीत्यानीत्य :** नित्य पदार्थ आणि अनित्य पदार्थ.

**१४५२.** ८६८ व्या ओवीवरील टीप पहा.

**१४५५.** ८७१ वी ओवी व त्यावरील टीप पहा.

**१४५६.** जीवाच्या स्वरूपात अनादि अविद्या असते. तिच्यामुळेच जीवाला अन्यथाज्ञान (खोटे ज्ञान. जीवदेवतानाच ईश्वर म्हणणे हे अन्यथा-ज्ञान होय) होते. मळकर्मालाहि हीच अविद्या कारण असते. जीव देवताचे जे अनेक मळ घेतो त्यात ' आदिमळ ' हा चैतन्यमायेच्या स्वरूपाचा असून तो सगळ्या मळाच्या आधी घेतला जातो म्हणून त्याला आदिमळ म्हणतात. तसेच पुढील मळाना तो ' आदि ' असतो म्हणूनहि आदिमळ होय.

**१४६०. मायारूपावांचौनि** ' मागे ७७९ व्या ओवीवरील टीप पहा.

**१४६१. प्रमाणद्रव्य** ' मागे ८७४ ओवीवरील टीप पहा.

**१४६७. ब्रह्मीं कीजे भूतु** ' ब्रह्मीभूतु कीजे. ब्रह्मीभूत केला जातो. त्याला ब्रह्मस्वरूपात मिसळवितात. त्यामुळे तोहि नेहमीसाठी 'अच्युत' होतो. कारण त्या ब्रह्मानंदातून त्याला पतन नाही.

**१४८०. प्राप्ति होए :** प्राप्त होए-अशा अर्थाने.

**१४९०. भव-वीनाश-रहीत :** भव = निर्माण होणे + विनाश = अंत होणे. या दोहोंपासून रहित-वेगळे. हेच वर्णन देवताचक्राच्या

सनधी भास्करभट्टाने पुढीलप्रमाणे केले आहे. पहा : 'तेहीं नित्य शास्वत मनवीनाशरहित : आनद सदोदित : शक्तिचक्र तें' (उगी. ५४५).

**१४८८. वेधु वीवेकापासौनि राजसु** ' विवेक=विचार; ज्ञान राजस=रजोगुणयुक्त, इतराना आपल्याकडे ओढून घेणारा. ईश्वराचा वेध (वेधशक्ति) हा विवेकापेक्षाहि (ज्ञानापेक्षाहि) परमेश्वराला वश करून घेण्याच्या बाबतीत अधिक राजस (विकारी, सुदर) आहे पण तरीहि तो स्वतः परमेश्वराला वश करून घेऊ शकत नाही. त्याला कृपेचे साह्य पाहिजेच.'

**१५०७. रति अनुभुति.** माग ८९० या ओवीवरील टीप पहा.

**१५११. अयोग्यता नासौनि** : जीवाच्या ठिकाणी ज्ञानप्राप्तीला येणारे अनेक अडथळे असतात. परमेश्वर ते दूर करतो आणि त्या अधिकारी जीवाला ज्ञानाला योग्य करतो. पहा : 'अयोग्यात योग्य करीति : योग्यासि परमेश्वरु ज्ञान देति' (सिसू. वि. ११७).

**१५१३.** चक्रधराचे प्रस्तुत वचन असे 'आद्यतीं दैव मध्यें पुरुषु' (सिसू. वि. ११६).

**१५१४.** अवतार घेताना परमेश्वराला 'सर्व धर्मांना' मान द्यावा लागतो, म्हणजे ते धर्म स्वीकारावे लागतात, तरच तो अवतार जीवाना ज्ञान व प्रेम देण्याला समर्थ होतो, एरवी नाही.

**१५१६.** परमेश्वरावतार जे धर्म स्वीकारतो ते त्याच्या ठिकाणी मायेच्या सनधाने असतात, म्ह० अवताराच्या शरीरात व्यापलेल्या मायेच्या आश्रयाने ते धर्म असतात. त्याचे कार्यहि मायेच्या द्वारेच होते पहा : 'ऐश्वर्यादि करौनि सकळही धर्म मायासनधेचि तेथ' (सिसू निर्वि १८).

**१५३४. आनंदाचीं भोजें नाचे** ' आनंदाच्या उत्कर्षाने (लहराने-भराने)=अत्यत आनदाने नाच.

**१५४६.** परा म्हणजे जणु ब्रह्मविद्येची दूतिका (मध्यस्थी करणारी सेविका) अशी कल्पना.

१५५०. ओवी १५१६ व त्यावरील टीप पहावी.

**१५६०. माया संबंधु पातली :** पहा : 'केवळाचि नित्यसंबंधें माया असे' 'माया जेथ संबंधाते पातली असे : तेथचि न पवे' (सिद्ध. निर्व. १५, १६). या दोन वचनांवरून परमेश्वराच्या ठिकाणी असलेल्या विरुद्धधर्मांचे उदाहरण लक्ष्यात येईल. त्र्यंशातील केवळ ईश्वरस्वरूपाच्या ठिकाणी माया निरंतर असते; त्या ईश्वरस्वरूपाशी तिचा नित्य संबंध असतो. पण तो कसा ? तर ती त्या स्वरूपाशी संबद्ध असतांहि तिला त्या स्वरूपाचा आनंद मात्र उपभोगता येत नाही. त्या स्वरूपाला ती पावत नाही, मिळू शकत नाही; ती त्याला पाहूहि शकत नाही.

**१५७०. पातली :** 'माया जेथ संबंधाते पातली' ह्या विरुद्ध श्रुतीचे ( ईश्वरवचनाचे ) आता 'ज्ञान करूं' = माहिती करून देऊ.

**१५७१.** ब्रह्म + माया + ईश्वर ही तीन्ही स्वरूपे जेथे जेथे एकत्र झालेली असतात त्या त्र्यंशातील ईश्वराच्या केवळ स्वरूपाशी मायेचा संबंध असतो. त्र्यंशात परमेश्वराला झालेल्या उल्लेखाप्रमाणे म्ह० प्रवृत्तीनुसार माया सगळे कार्य करते, हा भावार्थ.

**१५८२.** १५८२ व १५८३ या ओव्यात उल्लेखिलेले प्रमाण पुढीलप्रमाणे : 'सृष्टीमध्यें कव्हणे करणे मृचिजेना एके परमेश्वरेवीण : तोचि परमेस्वरु निर्वेवो निराकारु असे : परि कृपावशे सवेवो साकारु होए : अवतरे : आपुले सन्निधान दे : ते दासमोचक' (सिद्ध. पूर्वी)

**१५९२. महावाक्य : निर्वचन :** चक्रधरनिरूपित सिद्धांत-सूत्रपाठातील ही दोन स्वतंत्र प्रकरणे आहेत. या दोन्ही प्रकरणात ईश्वर-स्वरूपाचे वर्णन आलेले आहे.

**१५९३.** परमेश्वर चराचरामध्ये नित्यत्वाने साक्षीभूत होऊन राहिलेला असल्यामुळे तो सर्वात्मक होय. (हेच त्याचे आत्मत्व) ओ. १५९४; आणि तो कृपावश होऊन (जीवाच्या ओळख्या क्रियेचा) अभिमान घेत नाही, हे त्याचे अविक्रियत्व होय. ओ. १५९३. असे हे विरुद्धधर्मांचे

स्पष्टीकरण आहे. त्याच्या आत्मत्वाचे वर्णन, आत्मत्वाच्या कार्याचे वर्णन पुढे १५९९ ते १६०० ह्या ओव्यात आलेले आहे.

**१५९७. कृपा कारुण्य :** परमेश्वराच्या ठिकाणी असलेल्या अनंत गुणांपैकी प्रमुख गुणाचा उल्लेख 'महावाक्य' प्रकरणातील पुढील वचनात आलेला आहे. 'सौंदर्य : लावण्य : औदार्य : सौभाग्य : दया : मया : कृपा : करुणा : एवमादिक अनंत **गुण** बोलिजेति' ( सिद्ध. महा. ८ ); परमेश्वराचे धर्म पुढीलप्रमाणे आहेत. 'नित्यत्व . व्यापकत्व : सर्वात्मकत्व : सर्वकर्तृत्व : सर्वसाक्षित्व : एवमादिक अनंत **धर्म** बोलिजेति' (सिद्ध. महा. ९) हेच धर्म 'निर्वचन' प्रकरणात 'अविनिशु तो' 'सर्वात्मकु तो' 'सर्वातीत तो' 'सर्वकर्ता तो' 'सर्वसाक्षी तो' इत्यादि वचनात आलेले आहेत

**१६०१.** परमेश्वराचे धर्म त्याच्या अव्यक्त स्वरूपात 'कृपेचेनि योगें' असतात तर व्यक्त स्वरूपात मायाप्रधानें असतात.

**१६०३.** जीवाला ज्ञान व प्रेम याचे अधिकार जोडण्याला भजन ( भोजन, अन्नदान ) हे एक मुख्य साधन होय. भजनाचे प्रमुख प्रकार दोन : १ भूतभजन, २ पुरभजन. **भूतभजन** म्हणजे भूताच्या ( मनुष्य-प्राण्याच्या, त्याचप्रमाणे देवतावतार व अवतरात पडणारे ईश्वरावतार ) ठिकाणी घडलेले भजन; आणि **पुरभजन** म्हणजे परमेश्वरावताराच्या ठिकाणी घडलेले भजन. सहेतुक भूतभजनाने मनुष्यदेहाचा लेप लागतो, तर अहेतुक भूतभजनाने ज्ञानाधिकार प्राप्त होतो. त्याप्रमाणे अहेतुक पुरभजनाने प्रेमाधिकार निघतो. ( 'अहेतुक भूतभजन ज्ञानाप्रति साधन' 'अहेतुक मायापुरभजन प्रेमाप्रति साधन' सिद्ध. वि. १६८ व १६९ ). पुरभजन हे परमेश्वरावताराला घातलेले असते. पण त्या अवताराचा देह तर मायाव्याप्त असतो. त्यामुळे त्या भजनाचा स्वीकार मायेकडून होतो. म्हणून पुरभजनाच्या वेळी 'तेथ मायाचि पुढा होए प्रधान' असे या ओवीत म्हटलेले आहे. या मायापुराला घातलेल्या भजनाचा स्वीकार ईश्वर करतो व त्यामुळे भजन घालणाऱ्याला ईश्वरप्राप्तीचे श्रेष्ठ साधन असलेला प्रेमाधिकार निघतो.

१६०६. **जडाचेतनांमाजि :** मागे ८०८ व्या ओवीवरील टीप पहा.

१६०७. **अवीद्या न तुटे कृपेवीण :** विशेषज्ञानियाच्या अयोग्यतेचा नाश झाल्यावर त्याला मोक्ष देण्याचा हेतु मनात धरून परमेश्वर कृपाशक्तीचा अंगीकार करतात व विशेषज्ञानियाच्या जीवस्वरूपी तिचा संचार करतात. त्या कृपाशक्तीच्या अणीने त्याच्या मूळ अविद्येचा ते छेद करतात. पहा : 'मग परमेश्वरु आपुलिया कृपाशक्तिकरुनि तयाची अनादि अविद्या छेदु करीति' (सिद्ध. उद्ध. ५४).

१६३६. पहा : 'तेया कहीं नाहि कामाठि : जन्ममरणाची' (उगी. ८२२).

१६३८. पहा : '**स्वभावो** प्रकटे तें जीव मुचे' (सिद्ध. वि. १३४) स्वभाव या शब्दाचा अर्थ पक्षकारानी पुढील प्रमाणे केलेला आहे. "स्वभाव म्हणजे दास्य : स्वशब्दे आपणपेयाचा सद्भावो : ईश्वर ते जिणे : येर मरण ॥ जीवाचा स्वधर्म ईश्वर ..स्व म्हणजे जीवभावो म्हणजे तयाचें जिण : ते काइ : ना ईश्वर प्रकटे म्हणजे अवतरोनि दास्य दे : तें मुंचे म्हणजे संसारा पासौनि सुटे" (विचारस्थळ १३४) म्हणजे परमेश्वर हाच जेव्हा जीवाचा स्वभाव होऊन राहतो त्यावेळी तो संसारापासून सुटतो, एरवी नाही. पहा : 'तयाचा तोचि स्वभावो : ज मी प्रगट सर्वज्ञराओ' (पुढे ओ. २१२६).

१६६२. **व्यक्ती आवडे :** व्यक्त झाल्यावर, परमेश्वरावतारात त्याला शृंगार आवडतो.

१६६५. **पारु हो म्हणे :** दूर हो, पलीकडे जा, असे म्हणतो; म्हणजे त्याचा धिक्कार करतो. त्याला कमी लेखतो.

१६७२. **आंगें आठाइती :** 'आठाइती' शब्दाचा वापर अन्यत्र आढळला नाही. त्यामुळे त्याचा अर्थ करणे थोडे कठीण आहे. तथापि 'आगे आठाइती' यातील 'आग' या शब्दाच्या अनुरोधाने विचार केल्यास 'अंगानी सुंदर' असा अर्थ दिसतो. आठाइत=अष्टांगानी (शरीराची आठ अंगे) आयता=तयार; सिद्ध, अर्थात जिची आठहि अंगे तयार

**१७३९. पंधरां रसांसीं** : हे पधरा रस कोणते? बहुधा साहित्य शास्त्रातील ९ रस व पाकशास्त्रातील ६ रस मिळून पधरा रस येथे अभिप्रेत असावेत.

**१७४९. कोपा आगळा** : कोपाने=रागाने विशेष असा, अत्यत क्रुद्ध होणारा असा महाकाळ पण तो देखील 'कपांनि जाय' = पोळेल. जणु त्याच्या अत करणाला चटका बसेल.

**१७५१. आमुलेपण** : आमुल = नवरा, पति, या अर्थाने हा शब्द रूढ आहे. पहा : 'प्रकृतिपुरुषाची कुळवाडी। सारता द्वैत असंघडी। जे आतुली जोडी। **आमुला** साये' ( ज्ञा. १३-९७२ ). यावरून आमुले पण = नवरेपणा म्हणजे मोठेपणा, सामर्थ्यसपन्नता, असा अर्थ शोभून दिसेल.

**१७५२. सात्त्विक** · अष्ट सात्त्विक भाव. १ स्तभ=आश्चर्यचकित होऊन उभे राहणे; २ स्वेद = घाम, ३ रोमाच = अगावरील केस उभे राहणे; ४ स्वरभग = वाणीमध्ये कप, ५ वेपथु = शरीर थरथर कापणे; ६ वैवर्ण्य = चेहरा निस्तेज होणे, ७ अश्रु = आसवे, आणि ८ प्रलय = अश्रूचा प्रवाह.

**१७८९. घाते वाफे पेरिलयां** · पेरणीच्या योग्य दिवसात ( घाते ) शेतात पावसानतर उन्हाने वाफ झाल्यानतर ( जमीन थोडी ऊष्ण झाल्या नतर, वस्तुत शेतात असलेल्या पाण्याची-ओलाव्याची वाफ झाल्यानतर ) पेरिल्या=पेरणी केली तर. **घात** = शेतीच्या कामाची योग्य वेळ; प्रस्तुत ठिकाणी पेरणीची योग्य वेळ. **वाफ** : ओलाव्यानतर जमिनीत सूर्याच्या उन्हाने तयार झालेली वाफ. पहा · 'नातरि विधीचेये **वापे**। सत्क्रिया मिं आरोपे। जन्मशतमापे। मुसचि मविजे' ( ज्ञा. १३-३२ ) 'जालेया सुबीजप्रसगु। पडे क्षेत्रा **वापेचा** पागु' ( ज्ञा. १७-२६६ ). या ओवीचा अर्थ नीट लक्षात यण्यासाठी चक्रधरानी दिलेला पुढील दृष्टात पहा: 'ऐसी एक सुक्षेत्र असति भुमी बीया मेळापकू कीजे। आणि भारू आथीनि पीकति। एकी वासना · धुमरीसी उठीति। एके नागरेन्हीं उत्पजनति · **घाते वापे पेरीजति** · परि तेयें गाही न निगे' ( लीच. एकाक. २५ ) **वीं घुडे**: नी वाया जाते.

**१७३९. पंधरां रसांसीं** . हे पधरा रस कोणते ? बहुधा साहित्य शास्त्रातील ९ रस व पाश्चात्यशास्त्रातील ६ रस मिळून पधरा रस येथे अभिप्रेत असावेत.

**१७४९. कोपा आगळा** ' कोपाने=रागाने विशेष असा, अत्यत क्रुद्ध होणारा असा महाकाळ पण तो देखील ' कपोंनि जाय ' = पोळेल. जणु त्याच्या अत करणाला चटका बसेल.

**१७५१. आमुलेपण** ' आमुल = नवरा, पति, या अर्थाने हा शब्द रूढ आहे. पहा ' प्रकृतिपुरुषाची कुळवाडी। सावता ऐसे असघडी। जे आमुली जोडी। आमुला साये ' ( ज्ञा. १३-९७२ ). यावरून आमुलेपण = नवरेपणा म्हणजे मोठेपणा, सामर्थ्यसपन्नता, असा अर्थ शोभून दिसेल.

**१७५२. सात्त्विक** ' अष्ट सात्त्विक भाव. १ स्तभ = आश्चर्यचकित होऊन उभे राहणे, २ स्वेद = घाम, ३ रोमाच = अगावरील केस उभे राहणे; ४ स्वरभग = वाणीमध्ये कप, ५ वेपथु = शरीर थरथर कापणे, ६ वैवर्ण्य = चेहरा निस्तेज होणे, ७ अश्रु = आसवे, आणि ८ प्रलय = अश्रूचा प्रवाह.

**१७५९. घाते वाफे पेरिलयां** ' पेरणीच्या योग्य दिवसात ( घाते ) शेतात पावसानतर उन्हाने वाफ झाल्यानतर ( जमीन थोडी ऊष्ण झाल्या नतर, वस्तुत शेतात असलेल्या पाण्याची-ओलाव्याची वाफ झाल्यानतर ) पेरिल्या=पेरणी केली तर. **घात** = शेतीच्या कामाची योग्य वेळ, प्रस्तुत ठिकाणी पेरणीची योग्य वेळ. **वाफ** . ओलाव्यानतर जमिनीत सूर्याच्या उन्हाने तयार झालेली वाफ. पहा ' 'नातरि विधीचेये **वापे**। सत्क्रिया तें आरोपे। जन्मशतमाप। सुपचि मविजे ' ( ज्ञा. १३-३२ ) 'जालेया सुबीजप्रसगु। पडे क्षेत्रा **वापेचा** पागु ' ( ज्ञा. १७-२६६ ) या ओवीचा अर्थ नीट लक्षात यण्यासाठी चक्रधरानी दिलेला पुढील दृष्टात पहा : 'ऐसी एकें सुक्षेत्र असति भुमी नीया मेळापरू कीजे। आणि मारू आथोनि पोकति। एकी वासना . घुमरीसी उठीति। एके नागरवेन्हीं उल्पीजति **घाते वापे पेरीजति** . परि तेथ बीहीं न निगे ' ( लीच. एकाक. २५ ) **बीं बुडे** : बी वाया जाते.

१७६१ **कुंभचास** : चास=तास, नागराची किंवा पिकाची ओळ. पहा : ' जेया अमृतलेसाठिं सायास । तेयाचा पाउसाळा केला च्यारी मास । पृथिवी वाहोनि **चासेंचास** । चिंतामणि पेरिले ' ( ज्ञा. ११–५७२)

१७८१. **यक्षकर्दम** : कुंकुमागरुकस्तूरीकर्पूर चंदन यथा
महासुगंधमित्युक्तं नामतो यक्षकर्दमः ॥

१७८३. **सोमकांत** . चंद्रकिरणांनी पाझरणारा एक पाषाण.

१७८४. **द्रावकः** द्रवविणारा गोटा=लोहकांत मणि याचा आणि लोखंडाचा संयोग झाला म्हणजे लोखंड पाझरते असे म्हणतात. पहा.—' भेटति **द्रावक** गोटे : तरि लोहासि झरा फुटे : **सोमकांता** गळति थेंटे : चंद्रकरातव ' ( उगी. १७ ); ' तेंहीं भटोबासासि पुसिलं : लोहोबध गाडा जडीला असे तो उजडे ऐसें काहीं असे ? ' भटोबासीं म्हणीतलें : ' असे : **द्रावकु** भेटे : तरि लोहासि झरा फुटे ' ( स्मृस्थ. ९८ )

१७९२. **घुमरीसीं उठी** ( मागे १७६० ओवीवरील टीपेत लीळाचरित्रातील उतारा पहा ) विपुलतेनें, उत्कर्षानें वर येते. (उठी). पहा : ' ऐसीसी जे शरीरीं । राहाटिची पडे उझिरी । तें शरीर तप **घुमरी** । आलें जाण ' ( ज्ञा. १७–२१२).

१७९७. आश्विन महिन्यातील चंद्रमंडळाच्या किरणांनी मळयाचळ पर्वत सार्द्र व द्रवीभूत होतो आणि नंतर चंद्रविकासी कमळे आपल्या विपुल सुगंधानी फुलतात तेव्हा कोठे बावने=उत्कृष्ट चंदन तयार होते, असा भावार्थ.

१८३१. **सेवसैया नीर्धारीतां** : शेषयायी भगवानाने त्याचा निर्धार करण्याचा, निर्णय करण्याचा प्रयत्न केला तर—

१८४०. **शृंगारु सरता केला** : विन्ही लोकात शृंगाराला मान्यता मिळवून दिली.

१८४९. **नीर्वाळलेयां जीवातें** : शुद्ध झालेल्या जीवाना (ब्रह्मस्वरूपीं मेळवी) चक्रधराचे स्नायोच्छ्वास म्हणजे जणु डुल्लत डुल्लत येणारी कृपाच.

**१८५३. सूत्रादिकीं :** शुक आदिकरून सर्वांनी.

**१८५४. भेदु-अभेदु ऐसा विचार :** साध्यप्राप्तीनंतर भक्ताला जो आनंद अनुभवायला मिळतो त्याचे या ओवीत वर्णन आहे. भक्ताला परमेश्वर आपल्या स्वरूपात पण आपल्यासमोर आनंद भोगवितात. (पहा : 'भक्तासि आपणप समोर देति :' सिसू. उद्ध. ६० ) तेथे तो (भक्त) ईश्वर-स्वरूपाचा आनंद भेदाने अनुभवतो की अभेदाने ? म्ह० आपल्या जीव स्वरूपाची जाणीव कायम ठेवून की ती विसरून ? ज्ञानिया ब्रह्मानंद भोगतो तो आत्मस्वरूपाची जाणीव नाहीशी होऊन. भक्ताला मात्र साध्यानंदाच्या अनुभवाच्या वेळीहि आपल्या जीवस्वरूपाची, ईश्वराहून आपल्या वेगळेपणाची जाणीव कायम असते. तथापि तो भेदाने आनंदोपभोग घेतो की अभेदाने, याचा विचारहि करण्याचे कारण नाही असे चक्रधरांनी म्हटले आहे. पहा : ' भक्त भेद अनुभवी कीं अभेदें अनुभवी : ऐसा विकल्प तेथ करों न ए ' ( सिसू. उद्ध ६५ ). तीच कल्पना या ओवीतहि व्यक्त केलेली आहे.

**१८५५. अतींद्रीयाचा :** अतींद्रियत्वाचा.

**१८६४. सकळ शास्त्रीं देखणें**=डोळस; उत्तम रीतीने पाहणारे = सगळी शास्त्रे जाणणारे.

**१८७५. अन्मीख राहुनि :** अनिमिष राहून; डोळ्याची पाती एकमेकांना लागू न देता राहून; सतत जागृतपणाने.

**१८७६. माथा खोलवी :** आपले मस्तक नम्र करते; मस्तक वाकविते. **खोलवणें**=नमस्कारपूर्वक नम्र करणे.

**१८८५. अनियाळे :** तीक्ष्ण.

**१८८७. साळांका :** चक्रधराची एकेक भिवई म्हणजे जणु डोळ्यात अञ्जन घालणारी शलाकाच, अशी कल्पना. पराशक्तीचे अञ्जन, पराशक्ति हेच अञ्जन.

**१८८९. चांचरी जाणें :** वाकडे चालणे; अडखळत चालणे. पहा : ' पैसी कुसुमरज माजिरी : भलेतेही जात चांचरी : तेथ विरहिणी गेलिया

पामरी : ते काइ सारी' (नरुस्व. ७६९). चक्रधराच्या वाकड्या भिवया म्हणजे मुनीरूपी मलयमारुत आपल्या स्थूळपणामुळे–परिपुष्टतेमुळे चाचरी गेले आहेत; वाकडे वाकडे चालत आहेत.

१८९३. **अवेव-शूधी** सर्व अवयवाची शुद्धी, सरळपणा; उत्तमपणा. ती वर्णन करीत असता चक्रधराच्या डोळ्यावरील कांदेचे स्मरण कवीला झालेले आहे. **कांदी स्वीकरीली** : अवतारस्वीकारानंतर पण भरवस नगराचा त्याग करण्यापूर्वी श्रीचक्रधरस्वामी हरिपाळदेव म्हणून कालक्रमणा करीत असताना यादवानी गुजराथेवर स्वारी केली होती. त्या स्वारीत हरिपाळदेवानी गुजरातच्या राजातर्फे विरोध केला होता. त्यानी एक वेळ यादवाचे सैन्य मोठ्या पराक्रमाने पिटाळून लावले होते. या लढाईत त्याच्या डाव्या भिवईजवळ एक बाण लागला. त्याचा व्रण तेथे नंतर कायम राहिला. हा व्रण म्हणजेच **कांदी**.

१९०७. **त्रियंच हननीं श्रीकरू** : तिर्यच=आडव्या गतीने चालणारे प्राणी. उदा. जनावरे; कारण, ती आडवी चालतात (आणि मनुष्य उभा चालतो). एकवेळ पइठुली यथे असताना आडसाने मठात शिरलेल्या कुत्र्याला दगडाने मारले. त्यावेळी चक्रधरानी एकदम आपल्या दोन्ही हातानी आपले डोके धरले. जणु तो दगड त्याना लागला होता व त्यामुळे त्याना दुःख झाले होते. यावरून त्यांचे सवव्यापकत्व उत्तम प्रकारे दिसून येते. पहा : 'आड स्वानहननीं मुकुट धरण' ही लीळा. (लीळा चरित्र, उत्तरार्ध, ५०)

१९०८. **कुरुळावळी** : कुरळ्या केसाची पंक्ति. कुरळा केशकलाप.

१९११. **भोजें नांचवीन** : आनंदाने, कौतुकाने नाचवीन. पहा : 'आता सुमन देतु अवधान : धुमकुसें साहित्याचेन . जग **भोजें नाचवीन** आनंदाचा' (नरुस्व. ४३); 'हं असो मोहें मानिजे । एयातें अहंकार घेपे दीजे । जेणें जग चापुर्लि भोजें । नाचविजत असे' (ज्ञा. ३–२४९)

१९१५. **महानव वेव** : देवताचे निरनिराळ्या दृष्टींनी वर्गीकरण केलेले आहे. त्यातील एका वर्गीकरणाप्रमाणे सर्व देवताचे ४. भेद करिते

आहेत. १. **शांभव देवता.** याचे दोन पोटविभाग. (अ) शुद्ध शाभव, म्ह. चैतन्य माया; आणि (आ) समळ शाभव, म्ह. विश्व देवता. २. **शाक्तेय देवता** म्हणजे अष्टभैरव. ३. **महाणव** = शेषशाय्याच्या थोऱ्यातील ११ लक्ष देवता आणि ब्रह्माविष्णुमहादेव ( सत्य, कैलास, वैकुंठ ) यांच्या थोऱ्यातील ९ कोटी देवता. ४ **आणव देवता** = स्वर्ग, अंतराळ, अष्टदेवयोनि व कर्मभूमि या चार स्थानातील एकूण ७२ कोटी देवता. **माहाणव देवता** = याना 'महाणव' म्हणण्याचे कारण असे की त्यांच्या वियामुळे देवताफळाला गेलेले पळिये आपापल्या देवतेच्या स्वरूपमर्यादेतील जीवाना 'महा + अणु' = अत्यंत सूक्ष्म मळ, त्याच्या आधारे पाहतात; ( **आणव देवतांना** 'आणव' नाव पडण्याचे कारण त्यांच्या साध्यसाधनातील सुरे अणुप्रमाणे अत्यल्प असतात ) महाणव देवताचा वियाद्वारा प्राप्त होणारा वेध तो **महाणव वेध.**

१९१५. **आनव वेध** : वरच्या ओवीवरील टीप पहा.

१९१९. **सीसी रीतुतें** : शिशिर ऋतूला.

१९२५. **पाओनि न पवे** : मागे १५६० ओवीवरील टीप पहा.

१९३०. **शुद्ध वेध** : १९१४ व्या ओवीवरील टीप पहा. शुद्ध वेध = शुद्ध चैतन्य ( माया ) देवतेच्या वियेमुळे प्राप्त होणारा वेध.

१९३४. **चक्राक्ष देवता** : चक्राख्य देवता = श्रीचक्रधर.

१९३६. **सपंढरू** : पाढऱ्या रंगासहित, उत्तम शुभ्र वर्णाचा (स. स + पण्डुर ).

१९४१. **प्रसाद** : परमेश्वराने प्रसन्न होऊन दिलेली वस्तु.

१९४४. **जळघोष नीवारणीं** : सद्गुरुश्री येथे असताना चक्रधर स्वामी एके दिवशी सकाळी 'पिंड' नावाच्या स्थानाजवळ ( नदीतीरावरील एक उंच टेकाड ) आसनावर बसून निरूपण करीत असत. जवळ नदीच्या प्रवाहाचा खळखळाट चालू होता. त्याच्या आवाजामुळे त्यांचे निरूपण शिष्यांना ऐकू

जात नव्हते. तेव्हा त्यानी आपल्या आगावरील फुटा काढून तो त्या सळाळावर आच्छादन म्हणून घालायला आउसेला सांगितले. तिने तसे केले. तेव्हा लागलीच पाण्याच्या सळसळाटाचा आवाज थानला. ही लीळा या ठिकाणी अभिप्रेत आहे. पहा : लीळाचरित्र, उत्तरार्ध, लीळा ८० 'आउ फुटाक्षेपणी जळघोषू निवारण '.

**१९४५. फुटा दान दीधला :** चक्रधरानी एक वस्त्र श्रीगोविंद प्रभूच्या सेवेला म्हणून पाठविले होते. तेच श्रीप्रभूनी पुन्हा चक्रधराकडे पाठविले. ते नमस्कारपूर्वक स्वीकारून नतर त्यानी ते इद्रभट नावाच्या आपल्या एका शिष्याला प्रसाद म्हणून दान दिले. पहा : 'इद्रभटा फुटा विधान पूर्वक प्रसाददान ' ( लीच. उत्त. १७ ).

**१९५४. चैतन्य वीदेह पराशक्ती** ' ही सर्व मायेचीच नावे होत. पहा : ' चैतन्य : माया : विदेह : पराशक्ति ' ( सिद्ध नि. १ ) अर्थात्, या सर्व शब्दानी ( विशेषणानी ) सूचित होणारी देवता एकच आणि ती म्हणजे माया.

**१९६४. नीर्नधी :** अवधि-मर्यादा न ठेवता (=पूर्णपणे, अनन्य भावाने ) '**सौंदर्य तुर्ते वोळगे** '=सौंदर्य तुझी सेवा करते.

१९८०. ईश्वराहाटी : ईश्वरप्राप्तिविषयक कर्मांचा मार्ग.

१९९०. झणें जासीं · जाऊ नकोस. झणें हा शब्द नेहमी निषेधाच्या अर्थाने येतो. सं. नोचेत् > चेलो > झणं असा हा व्युत्पादतात. अवधी भाषेत याच अर्थाने 'झिन्' 'जिन्' हा शब्द वापरला जातो. उदा : यह काम झिन् करे = हे काम करू नकोस.

१९९५. अंतर आत्मयां : अंतरात्मया; अंतरात्म्यामध्ये.

१९९६. कृष्ण : मंजीष्ठ हरितु : पीतु . ही भिन्न भिन्न थोयातील देवताच्या वर्णांची नावे आहेत. पहा : 'हरीता · पीता : श्वेता : मजिष्ठा : कृष्णा : मूर्ति प्रकाशेति' (सिद्ध नि. ६७). मायेचा वर्ण हरित; विश्वाचा पीत; अष्ट भैरवाचा श्वेत; शेषशाय्या आणि ब्रह्मादिक याचा माजिष्ट (=आरक्त) आणि इंद्रादिकापासून तो कर्मभूमीपर्यंतच्या चाराहि स्थानातील देवताचा वर्ण कृष्ण.

२०००. जीवांवर योजां काढिलें : तिंरा जीवरूपी वस्त्र (अम्बर) केवळ वेधाच्या (केवल्यस्वरूपाचा वेध) योजा=रसात, रगात (रगून) काढले.

२००३. जीव नित्य केवळ हें प्रमाण : पहा : 'नित्य · केवळ · अनादि अविद्यायुक्त वस्तु एकु आति ते जीव शब्दे बोलिजे' (सिद्ध. महा. २).

२०१९. द्या अवस्था = दयावस्था.

२०२३. देवें आपणपें . ते वचन : पहा : 'भक्तासि आपणपे समोर देति' (सिद्ध. उद्ध. ६०).

२०२७. हरीत पीत देवतांचे अवतार : वर १९९६ व्या ओवी वरील टीप पहा.

२०४१. चैतन्यपुर : ईश्वरावताराने धारण केलेले मायापुर; माया व्याप्त शरीर.

**२०४३. पस्यात पाहारु :** मोठ्या पहाटेची वेळ. हिच्यावर परमेश्वराला झालेल्या सृष्टिरचनेच्या उल्लेखाची कल्पना करून नंतर सपूर्ण सृष्टिरचनेची हकीकत सांगितली आहे. हळूहळू होत असलेली पाहाट आणि जीवाने केलेली प्रपंचरचना यातील साम्य हा पुढील ओव्यांचा वर्ण्यविषय आहे.

**२०४५.** मायेच्या तमोविभागात जीव असतात ते ती ब्रह्मांडात लोटते. या क्रियेचे साम्य स्त्रीची गर्भसंभूति आणि नंतर प्रसूति याशी कल्पून पुढील वर्णन आहे.

**२०४६.** 'चैतन्यमह' असे म्हणून जीवाचे जे विकरणे तेच मायेचे डोहळे. यथाकाळ व्हावयाचे ते संस्कार ( गर्भाधान वगैरे ) झालेले नसले तर स्त्री गर्भवती होऊन तिला आठवा महिना लागला म्हणजे '**आठांगुळें**' नावाचा विधि करतात. तो केल्याने, पूर्वी करावयाचे राहिलेले विधि केल्यासारखे होतात. (२०४७) पहा 'मग जीवाचेनि मेळ विकर लेपणाचें **आठांगुळें** केलें : मग उपनलें एकें वेळ ' अवघेचि ' (शिशु ९०)

**२०४८.** आपल्या ममतारूपी मांडीवर घेऊन जीवरूपी बाळकाला माया अन्यथाज्ञानरूपी दूध (पेहें) पाजते, अज्ञानरूपी पांघरूण त्याच्या अंगावर घालते आणि नंतर प्रकृतिरूपी धाया=दाई, तिच्या स्वाधीन त्या जीव-बाळकाला करते.

२०५६ **नवरस नाटक** नवरसांनी पूर्ण असे नाटक. 'वज्रहरण' काव्यात ५१ ते ५७ या ओव्यात आलेले 'ऐसे नवरस नाटक देऊन केले जनमोहक' हे वर्णन पाहा.

२०५७ **सतीसां दृष्टीचा मेळावा** : भारतीय नाट्यशास्त्रात भरत मुनींनी दृष्टीचे ३६ प्रकार सांगितलेले आहेत. त्यात आठ रस, ८ स्थायी व २० संचारिणी दृष्टींचा समावेश होतो. **रसदृष्टि** : कांता, भयानका, हास्या, करुणा, अद्भुता, वीरा, बीभत्सा व शांता. **स्थायी दृष्टी** : स्निग्धा, हृष्टा, दीना, क्रुद्धा, दीप्ता, भयान्विता, जुगुप्सिता व विस्मिता. **संचारिणी दृष्टी** शून्या, लज्जिता, म्लाना, विषण्णा, शंकिता, मुकुला, कुंचिता, जिह्मा, अभितप्ता, ललिता, वितर्किता, अर्धमुकुला, विभ्रांता, विप्लुता, आकेकरा, विकसिता, मध्यममदा, अर्धममदा, त्रस्ता व (?) या 'छत्तीस दृष्टि' कवीने (मूर्तिप्रकाशकाराने) पुढे २१५८ ते २१७५ या ओव्यात निराळ्या वर्णन केलेल्या आहेत. त्या पहाव्यात.

२०६०. **संयुक्त हस्तक** दोन्ही हातांनी मिळून करावयाच्या क्रिया (नृत्य प्रसंगी). याचे १३ प्रकार आहेत अंजलि, कपोतक, कर्कटक, स्वस्तिक, वर्धमानक, उत्संग, निषध, दोलाहस्त, पुष्पपुट, मकर, गजदन्त, अवहित्थ व वर्धमान (भारतीय नाट्यशास्त्र, पृष्ठ ६०). **हंसपक्ष** : आंगठ्याशिवाय सर्व बोटे खाली वाकवून आंगठा वाकडा करून कोणत्याहि नोंगस न चिकटविता दूर ठेवावा. **त्रिपताका** पताका = हाताची सर्व बोटे सरळ पसरून आंगठा किंचित् आखडणे. त्रिपताका=पताक हात वर करून त्यातील अनामिका (करंगळीजवळचे बोट) वाकवली म्हणजे त्रिपताका हात होतो. **मृगसीरू** : म्ह० मृगशीर्ष हाताचा पंजा करून हात उभा ठेवला म्हणजे सर्वशीर्ष हस्त होतो. वरील स्थितीतच आंगठा व करंगळी ताठस करून सरळ उंच पसरावीत आणि मधली तीन बोटे खाली वाकवावी म्हणजे आंगठा व करंगळी हरिणाच्या शिंगाप्रमाणे दिसतात. हाच मृगशीर्ष. **सूचिकामुख** : पाच बोटांपैकी फक्त मध्यमा तळहातापर्यंत वाकवून करंगळी व अनामिका किंचित् वक्र करून, उभ्या आंगठ्यामोवती तर्जनी विळखा घालून टेकली म्हणजे 'पद्मामुख' होतो आणि पद्मामुखातील तर्जनी

आंगठ्यामोंवती न फिरविता समोर करून ठेवली म्हणजे ती मुद्रा (सुचि) प्रमाणे दिसते. हाच सुचिमुरा.

**२०६१. खटीकामुरु :** वरील ओवीतील सूचिकामुद्रावरील टीप पहा. **नीतंबक** : दोन्ही हात पताका हस्ताप्रमाणे (वरील ओवीतील त्रिपताकेवरील टीप पहा) करून ते स्वस्तिकाकार करावे. डावा हात उजव्या गात्रावर व उजवा डाव्यावर ठेवून दोन्ही हाताची बोटे सायाबाहेर घ्यावी; अथवा, दोन्ही भुज डोक्यावर टेकून त्यांचे पंजे व हाताची बोटे समोरासमोर येतील असे ठेवावे व माड्या हालवाव्या व पायाचे स्वस्तिक करावे. हाच नितंबक होय. **मुष्टिक** . सर्व बोटे मिळून तळहातास चिकटवून त्यावर आंगठा ठेवावा. (वस्तु स्पर्शिताना मूठ जशी घट्ट वळून ठेवतात तसा)

**२०६२. भवरी :** गिरकी. (नृत्यप्रसंगी घेतात ती).

**२०८०.** माझेनि सन्निधानें (माझे सन्निधान करून) कर्मक्षाळण करावी.

**२०८२. जन्मजीवीत द्यावें** . 'जन्मजीवित परमेश्वरा देयाव' (सिद्ध. आ. ६८)

**२०८४. इसणत्रय** . ईषणात्रय. लोकेषणा, दारेषणा व वित्तेषणा. (अथवा पुत्रेषणा).

**२०८५. यमनेम :** यम, नियम, योगातील साधने.

**२०८९. कीटकीचीया परी** हा दृष्टांत २०९०–२०९२ ओव्यात वर्णन केलेला आहे. **भींगरुटीएचा दृष्टांत** म्हणून चक्रधरानी तो पुढील प्रमाणे सांगितलेला आहे. "*भींगरुटी असे : ते कीन्कीतें पाहे : धरी : कागा रोत्री : नेउनि आपुलेया घरातु घाली . दार लीपौनि जाए । एउनि मागुती माते पाइल म्हणौनि भेण तीएत चींती : चिंतीत चिंतीता तीसीहि पाग नीगति : तेही तीएसारीखी होए*" दार्ष्टांतिक : "*तैसे परमेस्वरु सनिधान देती : असनिधान धर्म नीरुपिती : मग असनिधान देति : ईस्वरा चेया वियोगातव ईस्वरातें चिंतीत चिंतीता ईस्वरासारिसा होए*" (दृपा. ९६).

**२०९१. मानसीकें** : मनातल्या दुःखानें; दुःखाच्या घ्यासानें.

**२०९४.** निर्विकल्पत्व ( शुचि अशुचि, श्रेष्ठ कनिष्ठ इत्यादि भावना सोडून देणें ) हेंच सडासंमार्जन.

**२०९५. चाड**=इच्छा हाच **चौक**=चारहि बाजूंनी बांधलेला ( वेष्टिलेला ) असा चौकोनी भाग; घराचें अंगण.

**२१०१. जन्माचें वस्त्र** : जन्म हेंच वस्त्र.

**२१२६. तयाचां तोचि स्वभाओ** : मागें १६३८ या ओवीवरील टीप पहा.

**२१२७. नित्यसंबंधु हे खूण** : पहा : ' भक्ता नित्य संबंधु ' (सिद्ध. उद्ध. २० )

**२१३२. असेख देवताचक्र** : पहा : ' मायारूपाव्यतिरिक्त परमेश्वरु तयासि सकळांहि शक्ति दाना करीति ' ( सिद्ध. उद्ध. ५० ).

**२१३४. दावणा मीरवणा अळंकारु** : दाखवावयाचा व मिरवावयाचा अलंकार म्हणजे माझा भक्त.

**२१३७. कर्मधर्मवीखयादिक** : पहा : ' कर्म : धर्म : विधि : निषेधो : परित्यजौनि परमेश्वरां शरण रिगावें ' ( सिद्ध. आ. ५६ ).

**२१४३. जीन्हारवेन्हीं** : अंतःकरणापर्यंत. संगीताचा मार थेट अंतःकरणाला जाऊन भिडतो.

**२१४५. सप्त दीपावळी** : ' जंबुप्लक्षाव्हयौ द्वीपौ शाल्मलश्चापरो द्विपः । कुशक्रौञ्चौ तथा शाकः पुष्करश्चैव सप्तमः ' काहींच्या मतें ही द्वीपें अठरा असावीत असें वाटतें. उदा : ' नवद्वयद्वीप पृथग्जयश्रियां ' ( नैषध ) व ' अष्टादशद्वीपनिखातयूपः ' (रघु. ६–३८) ही अवतरणें पहा. तथापि कालिदासानेंच ' पुरा सप्तद्वीपां जयति वसुधामप्रतिरथः ' असेंहि म्हटलेलें आहे.

**२१४९ वाग दाटुनि** आपल्या हातातील लगाम बळकट धरून तो अनुरागाला हाणतो—पिटून काढतो

**२१५० आचारवीरातें चेंपुनि** ( चापून, दडवून ) समुठी ( आपल्या घट्ट मुठीत ) घोंपी ( घाली )=आचारवीराना आपल्या मुठीत घालते आणि घट्ट धरून ठेवते.

**२१५१ काढावा काढिती** पळ काढतात **वळाणें**–वळणे = समूह. पहा 'श्रीकृष्ण कीर्तीचि होइल आइक्वण म्हणौनि कालिंदिया केलें उपेण कण्ळतरगाचीं वळण तैसीं दीसताती ' ( नरुस्व ११३ ).

**२१५३. कोरसीया कांनाडी** आपल्या तिरप्या व तीक्ष्ण दृष्टीच्या (कोरसीया) कानाडी = बाणाने, तो परिच्छेदाचे सीर पाडी = शिरच्छेद करतो.

**२१५५ निर्वेद अनुताप** परमेश्वराच्या वियोगात ज्ञानी पुरुषाला जे दु ख होते किंवा तो जे दु ख करतो त्याला चतुर्विध दु ख म्हणतात. दु खाचे हे चार प्रकार पुढीलप्रमाणे (१) **आर्त**–परमेश्वर लौकर भेटावा अशी दु खपूर्वक मानसिक उत्कटा धारण करणे (२) **निर्वेद** जन्माजन्मातरी केलेल्या पापाबद्दल आणि देवताविषयक केलेल्या पुण्यकृत्याबद्दलहि दु ख करणे (३) **अनुताप**—याच जन्मातील निरनिराळ्या अपराधाबद्दल पश्चात्तापपूर्वक दु ख करणे. आणि (४) **अनुशोच**—कृतकर्मांबद्दल पश्चात्ताप करून ' माझ्या हातून दोष तर घडला, आता मी जिवत तरी कसा राहीन ! हा माझा दोष कसा नरे फिरेल ! असे ' पुढील अपराधाबद्दल दु खपूर्वक शोक करीत राहणे' याला ' अनुशोच ' म्हणतात **नीर्वेद अनुतापापासौनि** वरील टीप पहा

**२१५६ वीखयवीर** विषयाचा नाश करणारे वीर पुरुष अत करणात विषयाविषयीं पूर्णपणे विरक्ति असून नाह्याचरण करण्यात निपुण असलेल्या वीर पुरुष पहा ' नरवीरु आति परि विषयवीर नाही ' ( सिद्ध. आ. १८ ).

**२१६२. शास्त्रावस्त्रे** शस्त्र+वस्त्र = शस्त्रावस्त्र २१५८ ते २१७५ या ओव्यांमध्ये छत्तीस दृष्टींचा निर्देश केलेला आहे. एसक दृष्टि

म्हणजे एकेक चेतन स्त्री कल्पून तिच्यामुळे निरक्ताचा कसा नाश होतो ते वर्णिले आहे. भरतमुनींनी नाट्यशास्त्रात सांगितलेल्या ३६ दृष्टी यापूर्वीच्या टीपात निर्दिष्ट केल्या आहेत. (२०५७ व्या ओवीवरील टीप पहा). या दृष्टींचा व कवीने वर्णिलेल्या ३६ दृष्टींचा अनेक बाबतीत मेळ नसत नाही. असो. कवीने वर्णन केलेल्या ३६ दृष्टी पुढीलप्रमाणे.

(१) अनियाळी, ओ. २१५८; (२) तीख (तीक्ष्णा); (३) तार (तारा), ओ. २१५९; (४) चचळा, (५) चपळा; (६) कातरा; ओ. २१६०; (७) सरळा, ओ. २१६१; (८) तरळा; (९) मदनमना, ओ. २१६२; (१०) वेमळी (ळा), ओ. २१६३; (११) प्रसन्नता, ओ. २१६४; (१२) सहजा; (१३) घोसाळी, ओ. २१६५; (१४) मदा; (१५) मदन उल्हासा; (१६) कुटिळा (ला), ओ. २१६६; (१७) अमृतवदना; (१८) चट्टिका, ओ. २१६७; (१९) सौम्या, (२०) ध्यानस्ता, (२१) मलजा, ओ. २१६८; (२२) आकुंचिता, (२३) उचिता, ओ. २१६९; (२४) निर्मळा, (२५) स्तरा, ओ. २१७०; (२६) ललिता, (२७) हास्या, (२८) अवज्ञा, ओ. २१७१; (२९) मकुळि(ता), (३०) पसरा (प्रसरा) ओ. २१७२; (३१) धीरा, (३२) उच्चिष्टा, (३३) क्राता, ओ. २१७३; (३४) कातरा, ओ. २१७४; (३५) स्थीरा, आणि (३६) दैन्या. ओ. २१७५.

**२१७९. असंत कर्मा असेपा** : पहा : 'विशो अनता तापासि आश्रयो : नरकासि हेतु' (सिद्ध. आमा. ९७)

**२१८१. पेला देता**—वाद, उत्कर्ष प्राप्त करून देणारा. **पेला**= वाद, उत्कर्ष. पहा : 'पाठिं रूपपत्र **पलोवेलि** । चशु लात्र तें काडे घाली । तेहळिं व्यामोहता भली । पाहाळीं जाए' (शा. १५–१०१).

**२१९३. न म्हणावा वापुडा** : पहा : 'ऐसा विशो **वापुडा** : जो सेवितगाता आपुलेया मोहरा न करी' (सिद्ध. आ. ५) 'विषयसंबधमात्रें बीजु काद गा जातु असे : परि सेवितगाता तियें एकी **गडदरां घाली** : जेय फाइसेनिही उसत नाही' (सिद्ध. आ. १०).

**२१९५ चीनही वारिलें** पहा 'चित्रीची स्त्री न पाहावी (सिद्ध आ १०)

**२१९९ त्राणी** आश्रयस्थान मर्यादा पहा 'सकळा जाणणयासि त्राणी। तिये जाणिवेची जे खाणि। तया ज्ञानियाची आणि। जेयात अक्षर म्हणिपे' (ज्ञा ८-१००)

**२२०२ पुटिकाळी** काळे वर्तुळे **पुटि**=वर्तुळ पहा 'हे परमाची परमश्री अमृताची माहाश्री ना हे उकल्ली **पुटि** क्रोध-भुजंगाची' (उगी ७५६)

**२२०४ खाणोरी अनगाचें** मदनाच मारेकरी मदनाने आपल्या कडून पुढे पाठवलेले लुटारू किंवा दरोडेखोर (म्हणजे ते कटाक्ष) पहा 'किं कामतत्त्वाची भारदोरी बांधता पांचासरी ना तो उघडा **खाणोरी अनगाचा**' (शिशु २६३)

**२२०८ शर साडी** बाण जोडतो सांदी असा पाठ घेतला तर **शर सांदी**=बाण जोडतो (धनुष्यावर)

**२२१९ ओद** लहर उत्कर्ष वाऱ्याच्या लहरामळे मलय पर्वतावरील कुसुमे प्रफुल्ल होतात पहा 'अश्विनाचेनि वारें मलयाचळ भरे **वोदें** तेथ फुटति कुसुमें तिये वावन वोळिजति' (नरुस्व ७२८)

२२२२ काम कादंबेली=मदनवल्ली

**२२६०. ढसढसीत** : धगधगीत; चांगले पेटलेले.

**२२६२. इंद्रियार्थ** : इंद्रियांचे अर्थ; इंद्रियांचे उपभोग्य पदार्थ.

**२२७३. गुळें दाटिलें कोरडे** : कोरड्या गुळाने भरलेले.

**२२७४. उदका** (पाण्याला) **परीमळ-पोतासांची** (सुगंधी कापराची; किंवा सुगंधाची व कापराची) **भाजणी** (किंचित् आच) **देइजे.**

**२२८४. आहाळवाहाळीं** : विपुलतेने; पुष्कळ. पहा : 'ज्या मज सहारुद्र वासिपे । ज्या मज मेणे मृत्यु ल्पे । तो मी एथ अहाळवाहळीं कांपे । ऐस तुवा केलें' (ज्ञा. ११–३५१, कुटे). 'जेहीं आपुला समोगकाळीं : परब्रह्म भोगिलें आहाळवाहाळीं (शिशु. ७४३).

**२२८९. घ्रणा इंद्रिएचां** = घ्राणेंद्रियाचा.

**२३०८. श्रींगारु-मेचुचे** : श्रृंगाराला आवडणारे. **मेचु**=आवड; प्रीति. पहा : 'तरि सत्त्वगुणाकडे । जे दैवे भोक्ता पडे । तें मधुरिं रसिं घडे । **मेचु** तया' (ज्ञा. १७–१२४).

**२३१०. कल्हीं** : कल्ही रंगाचे वस्त्र. 'कल्ला' हा एक प्रकारच्या घोड्याचा विशिष्ट रंग म्हणून सांगितलेला आहे. हा रंग म्हणजे जर्दमिश्रित लाल रंग होय. त्यावरून **कल्ही** = जर्दामिश्रित लाल रंगाचे वस्त्र. **कासवटें** : काळसर रंगाची वस्त्रे. कासई या शब्दाचा अर्थ 'काळ्या रंगाचे पातळ' असा 'महाराष्ट्र शब्दकोशा'त दिलेला आहे. त्यावरून, कासवट–काळसर रंगाचे वस्त्र, असा अर्थ करता येईल.

**२३१३. यातना-शरीर** : मृत्युनंतर दु:खभोगासाठी जीवाला जे शरीर धारण करावे लागते त्याला यातनाशरीर म्हणतात. 'प्रेतदेह' असेहि याला नाव आहे.

**१३१७. परीहांसैंनि मेदनीवरि** : पण सहज गमतीनेसुद्धा तो (नृपचक्रवर्ती) जमिनीवर पाय ठेवत नाही.

**२३२०. गोरि गातां** : **गोरि**—एक प्रकारचे लांब आवाजाने गाइले जाणारे गाणे. पहा : 'पारधीया गोरि गाता : हरीणु लुब्ध होय गीता : तव आगा घडे अवचीता : मागिली कडे' (उगी. ३७०).

**२१९५. चीत्रही वारिलें :** पहा : 'चित्रीची स्त्री न पाहावी (सिद्ध. आ. १०).

**२१९९. लाणी** . आश्रयस्थान, मर्यादा. पहा : 'सकळा जाणणेयासि **लाणी** । तिये जाणिवेची जे खाणि । तया ज्ञानियाची आणि । जेयात अग्नर म्हणिपे' (ज्ञा. ८–१००).

**२२०२. पुटिकाळी** ' काळे येरोळे. **पुटि**=येरोळे. पहा : 'हे कपराची कसवटी अमृत्याची माहावटी ना हे उकल्ली **पूटि** क्रोध–भूजगाची' (उगी. ७५५).

**२२०४. खाणौरी अनंगाचें :** मदनाचे मारेकरी, मदनाने आपल्या कडून पुढे पाठवलेले लुटारू किंवा दरोडेखोर (म्हणजे ते कटाक्ष). पहा : 'कि कामतत्वाची भारदोरी : बाधता पाचासरी ना तो उघडा **खानौरी : अनंगाचा**' (शिशु. २६३)

**२२०८. शर सांडी** . बाण जोडतो, सादी असा पाठ घेतला तर **शर सांदी** = बाण जोडतो (धनुष्यावर).

**२२१९. ओद** लहर, उत्कर्ष. चाडण्याच्या वहरामुळे मल्य पर्वतावरील कुमुदे प्रफुल्ल होतात. पहा 'अखिनीचेनि चाडें मल्याचलु भरे वोदें तेथ फुन्टेति कुमोदें तियें नावने बोलिजति' (नरुस्व. ५३८).

**२२२२. कांम कांडवेली**=मदनवेली.

**२२२४.** त्या (तया) स्वच्छ निर्दोष (चोखी) आणि सरळ (सतारी) अशा विकाराचिया वेली (आगोळीया वरील रूपक) फुलीं फुल्लीया. अर्थात्, ही फुले म्हणजेच आगेळियाच्या शेवरी शोभून दिसणारी नखे.

**२२५० पोडपवरीखी** सोळा वर्षे वयाची (नवीन स्त्री) तयार करतात

**२२५१. तांवां जाळीं** . ताव्याप्रमाण लाल ज्वालेत. पहा : 'चन्न त्यामीविण ते गगातिर **तांवा जाळि** जळताये रे' (स्मृस्थ. १९९)

**२२५७. सुपवती वाज :** वाज = खाट; पल्ग, सुपवती = अथरूण, गादी.

**२२६०. ढसढसीत** : धगधगीत; चागले पेटलेले.

**२२६२. इंद्रियार्थ** : इद्रियाचे अर्थ; इद्रियाचे उपभोग्य पदार्थ.

**२२७३. गुळें दाटिले कोरडे** : कोरडया गुळाने भरलेले.

**२२७४. उदका** ( पाण्याला ) **परीमळ-पोतासांची** ( सुगधी काप राची; किंवा सुगधाची व कापराची ) **भाजणी** ( किंचित् आच ) **देइजे.**

**२२८४. आहाळवाहाळीं** : विपुलतेने; पुष्कळ. पहा : 'ज्या मज सहाररुद्र वासिपे । ज्या मज भेण मृत्यु ल्पे । तो मी एथे **अहाळवाहळीं** कापे । ऐस तुवा केले' (ज्ञा. ११–३५१. कुटे). 'जेहीं आपुला सभोगकाळी : परब्रह्म भोगिले **आहाळवाहाळीं** ( शिशु. ७४३).

**२२८९. घ्रणा इंद्रिएचां** = घ्राणेंद्रियाचा.

**२३०८. श्रींघारु-मेचुचे** : श्रृगाराला आवडणारे. **मेचु**=आवड, प्रीति. पहा : 'तरि सत्त्वगुणाकडे । जै दैवे भोक्ता पडे । तैं मधुरिं रसिं घडे । **मेचु** तया' (ज्ञा. १७–१२४).

**२३१०. कल्हीं** : कल्ही रगाचे वस्त्र. 'कल्ला' हा एक प्रकारच्या घोड्याचा विशिष्ट रग म्हणून सागितलेला आहे. हा रग म्हणजे जर्दामिश्रित लाल रग होय. त्यावरून **कल्ही** = जर्दामिश्रित लाल रगाचे वस्त्र. **कासवटें** : काळसर रगाची वस्त्रे. कासई या शब्दाचा अर्थ 'काळया रगाचे पातळ' असा 'महाराष्ट्र शब्दकोशा'त दिलेला आहे. त्यावरून, कासवट–काळसर रगाचे वस्त्र, असा अर्थ करता येईल.

**२३१३. यातना-शरीर** : मृत्युनतर दु:खभोगासाठी जीवाला जे शरीर धारण करावे लागते त्याला यातनाशरीर म्हणतात. 'प्रेतदेह' असेहि याला नाव आहे.

**१३१७. परीहांसैंनि मेदनीवरी** : पण सहज गमतीनेसुद्धा तो (नृपचक्रवर्ती) जमिनीवर पाय ठेवत नाही.

**२३२०. गोरि गातां** : **गोरि**—एक प्रकारचे लाब आवाजाने गाइले जाणारे गाणे. पहा : 'पारधीया **गोरि** गाता : हरीणु लुब्ध होय गीता : तव आगा घडे अवचीता : मागिली कडे' (उगी. ३७०).

**२३३१. पांति भाजला कीं हीरवा :** कच्चा आहे की चांगला भाजून निघाला आहे हे पाहातात.

**२३३५. जैसा काग सुक्र :** मागे ओ. ६० वरील टीप पहा.

**२३३९. नाणें पढवी :** डेन्याच्या खाली काळाग्नि (काळाप्रमाणे सर्वांना नष्ट करणारा अग्नि) नाणें पढवी = आपले मूल्य दाखविलो; आपल्या सर्व सामर्थ्याने प्रज्वलित झालेला असतो.

**२३४७. स्रीयेचेनि इसाळें :** बायकोच्या अभिमानामुळे. इसाळ = ईर्ष्यालुत्व; अभिमान. पहा : 'आणि **इसाळु** जैसा घरा । कां दंदिया हातियरा । न विसंबे भाडारा । बद्धकु गा' (ज्ञा. १३–५०१)

**२३५१. थींगळ वीहीत** = धर्मसंवाद करतांना ठिगळ लावलेले वस्त्र असावे हेच शास्त्रात सागितलेले आहे. **नवें वस्त्र नीखेद**=निषिद्ध होय.

**२३५२. चौंमध्यें एक साधन :** भिक्षूने नेहमी भिक्षान्न काला करून त्याची गोडी येऊ न देता खावे, हा सामान्य नियम आहे. पण अशा रूक्षान्नाने त्याला एकदर आचारधर्माविषयीच जर त्रस=कंटाळा वाटायला लागला तर अपवाद म्हणून वेळी प्रसगी 'सी : वी : चुळ : चिमूट' या चार पदार्थांपैकी एखादा दुसरा घेण्याला परवानगी आहे. या चार पदार्थांना मिळून 'साधन चतुष्टय' असे म्हणतात. **सी**=भाजी; **वी**=मिरची; **चुळ**= ताक; आणि **चिमूट**=चिमटीभर मीठ.

**२३५४. मीनलेयां धर्मेंवीण :** धर्मनियमानुसार पाहता भिक्षान्नच खाल्ले पाहिजे. त्यावाचून ( म्ह० भिक्षा न मागता ) मीनलेया = मिळाले तर काही प्राप्त झाले तर, ते सेवन करणे हेंहि दूषण होय. भोजनाचे जे प्रमाण ठरले असेल ते मोडू देऊ नये.

**२३५६. अच्युतगोत्रेंसी :** पहा : 'तुम्ही **अच्युतगोत्रीय** की गा : तुम्हां परस्परें परमप्रीति होआवी' (सिद्. आ. १३६).

**२३६०. धर्मासि आधारु देयावा :** पहा : 'धर्मा धरु दीजे' (सिद्. आ. १९७)

२३६२. **अवबोधसांग्येंसी** : ज्ञानपूर्वक आणि ज्ञाततापूर्वक.

२३६३. पहा : 'परस्परें मथन कीजे : मग नूतन होए' (सिद्. आ. १४०).

२३६८. **वीजयवहळ** : उपभोग्य पदार्थांनी भरलेले.

२३६९. **नीर्वेदअनुतापाचेनि योगें** . मागे २१५५ व्या ओवी वरील टीप पहा.

२३८०. **एकांकीता** : एकाकिता, एकटेपणा; एकांत.

२३८१. **समुळीं उपडावा** : पहा : 'अहंतेचें मूळ सकटी उपडावें नाएका एन्हवी अंकुर निगति : मग शांतीचे रोप लावावें' (सिद्. आ. १७९)

२३८५. **प्रमाणुची व्यक्ती** : परमाणूपासून आपातत: तयार झालेली कोणतीहि आकृति परमाणू देखील तुकड्या तिकडे होणार नाही अशा हळुवारपणाने चालावे.

२३८६. **अधिकवृती** : सामान्यत आपला जो आहार किंवा जी चर्या ( धर्माचरण ) ठरली असेल त्यापेक्षा यत्किंचितहि अधिक वागू नये. आपल्या सामर्थ्यापेक्षा अधिक वर्तन करण्यातहि एक प्रकारचा अहंकारच असतो आणि तो परमेश्वरप्राप्तीला विघातक ठरतो.

२३८७. **माधुक्रिया** : माधुकरी. मधुकर = भुंगा ज्याप्रमाणे फुला-फुलावर जाऊन थोडे थोडे अन्न आणतो आणि त्यावरच राहतो त्याप्रमाणे घरोघरी भिक्षा मागून आणलेल्या अन्नावर साधकाने राहावे. पहा : 'माधुक्रिया वृती : वर्तावें इतीं' (उगी. ३४८).

२३८९. **उणें अंन्न मांगे** : नेहमीचे जे मान ठरले आहे त्यापेक्षा कमी अन्न मागतो ( म्हणजेच सामर्थ्यापेक्षा अधिक वृत्ति आचरतो ).

२३९०. **स्वनीष्ट वासना** : आपण स्वत: आपणाला अमुक पदार्थ पाहिजे अशी वासना केली तर ती स्वनिष्ठ वासना.

**२३९१. त्रसलेया** : रुक्षान्न वगैरे खाऊन जर त्याला 'त्रस'= कंटाळा आला, आपल्या धर्मक्रियेचा उबग आला तर—

**२३९३. सुर्नी**= कुत्री (जशी धावतात तशी). प्रथम उल्लेख— कोणताहि पदार्थ सेवन करण्याविषयी मनात निर्माण झालेली पहिली इच्छा— वासना. (ही मोडून काढली पाहिजे. तसे न केले तर—)

**२३९६.** पहा : 'नसो नेदीजे : त्रसला खाता जीवु विपया शरण जाइल' 'त्रसला खाता देशाचेया सेवटा जाउनि सर्वाधमत्व ब्राह्मणत्व स्वीकरील' ( सिद्ध. आ. १०६, १०७).

**२४००.** या ओवीत उल्लेखिलेले वचन वरच्या टीपेत दिलेले आहे.

**२४०२. प्रेत्नीं साह्य** : पहा . 'पुरुषप्रयत्नीं दैवाचे साह्य' (सिद्ध. आ. १०२); 'पुरुषु जेतुल जेतुल प्रयत्न करी तेतुल तेतुलें दैव साह्याते करी' (सिद्ध. आमा. ११७).

**२४०३. अप्राती-यांचीनि** : कर्मनाश करण्यासाठी 'अप्राप्ति'-विषयक दुःख केले पाहिजे. 'मला अजून परमेश्वर प्राप्त झाला नाही, त्याची मला आवड कशी लागेल आणि तो मला प्राप्त केव्हा होईल' अशा रीतीने दुःख करणे ही 'अप्राप्ति' होय. पहा : *'अप्राप्तिनिमित्तके दुःखें कर्मांचीया राशी नासति'* ( सिद्ध. आ. ७१ ).

**२४०४. इती**= यती = यतीने, साधकाने. ओ. २३८७ टीप पहा.

**२४०७ सवान**—सरळ, सारखे. स. समान=सवान = सारखे, सपाट.

**२४१०.** पहा : 'धाये तव खाइजे : पाहे तव निजीजे : तैसें नव्हे की *वाद : पश्चात पाहारी उठीजे : तो सारस्वत काळु : देवता हृदयासि ये* ( सिद्ध. आ. ११४ ).

**२४२०. हारीं**= वाजूला पाऊल न पडे.

**२४२५. मनुष्यमात्र होऊनि असावें** : केवळ मनुष्यपणा तेवढा असावा. बाकी काहीहि व्यवस्थित नसो. शरीर वाळलेले, वस्त्रे फाटकीं, बोलणे-चालणे वेड्यासारखे वगैरे. हेच 'मनुष्यमात्र' होऊन राहणे होय.

२४३१. **जीतांचि होआवें मूल्यवंत** . पहा : 'जीतेंनि मृताचा धर्मी वर्ताव' (सिद्ध. आ. ७४).

२४३३. **दंदिया** : (स. द्वंद्वी) द्वंद्व करणारा, योद्धा. पहा : 'आणि दृसाळु जैसा घरा। का दंदिया हातियरा। न विसरे भाडारा। नद्धकु गा' (ज्ञा. १३-५००) दंद (ओवी २४३८) = द्वंद्व, युद्ध. पहा : 'ना कुंड मडप वेदी। का उचित साधनसमृद्धी। आणि तेयासीचि तव विधि। दंदचि वीर' (ज्ञा. १६-३८२).

२४४२. **लेखीं लागणें** : लिहिण्यात जमा होतो, तोच मोजला जातो. (त्याचेच श्रेय मिळते.)

२४४४ **पावलया देहघातु** पहा : 'धड तुटलेयाही जीव परमेश्वरात न सोडावे : वासना न सडावी' (सिद्ध आ. ७५).

२४५१. **असतां आहाच : उखर :** आहाच = वरवर; पहा 'अग्नी ऐसें आहाच। तेजीं नावाचें आहे कवच। ते परत केलेया साच। तेज तें मी' (ज्ञा. ७-३५); 'आता आइयाचें जैसे लेणें। आगावरि आहाच वाणे। तैसे देह धरणे। उदास तेयाच' (ज्ञा. ९-४०८) **उखर** = रूक्ष, उदासीन. हा शब्द नरड जमीन, ज्यात कोणतेहि पीक येऊ शकत नाही अशा जमिनीसाठी वापरतात. पहा : 'का तेन क्षाणि उखरा। भेटि जालेया वीरा। मृगजळाचेया पुरा। रूप होये॥ (ज्ञा. १३-१०४७) साधकाने इतराच्या बरोबर वागताना **उखर नसावे**= नरड जमिनीप्रमाणे रूक्ष नसावे, उदासीन नसावे, तसेच **आहाच नसावे** म्हणजे केवळ वरवर वागू नये. त्याच्याशी आपलेपणाने वागावे. **आपेसा** (अपयश) पात्र होइजे.

२४५९. चक्रधरानी विरहिणीचे तीन दृष्टांत सांगितलेले आहेत. त्यापैकी येथे ज्रठविरही पुरुषाला लागू पडणारा तिसऱ्या विरहिणीचा दृष्टांत अभिप्रेत आहे. हा दृष्टांत पुढीलप्रमाणे. 'कव्हणि एकि ज्रट वीरहीणी असे : तीएसि चंदन तैसा चीखलु : अन्न तैसी माती : सागर तैसी धुळी' (दृष्टा. ८९)

२४६८. पहा २४४४ व्या ओवीवरील टीप.

२४६९. पहा : 'तू उमा टाकलासिचि पुरे : सिद्धीतें एथौनिचि नेइजैल की' (सिस्. आमा. ३०).

**२४७१ वीरावें** = वीरत्व, शौर्य. **पोटापासौनि** = मनापासून, अत करणपूर्वक. **आंगवावें** = स्वीकारावे, प्राप्त करून घ्यावे. तू आपल्या ठिकाणी निरक्तीचे शौर्य मनापासून धारण कर म्हणजे मी उत्तम प्रकारे साह्य करीन. २४६९ व्या ओवीवरील टीपेत चक्रधराचे वचन उद्धृत केलेले आहे ते पाहावे.

२४७२. **देशाचां सेवटीं स्थावरीं** = जाऊन स्थिर हो, तेथे राहा. पहा : 'देशाचा सेवटा : झाडाचा तळवटा . देउळाचा कोनगा ' इए तीन्हीं सेउनि असावे. ' ( सिस्. आमा. २१९)

२४७३. **सर्वदे वळें** ' पहा " चद्राचेनि **सर्वदे वळें** तेणें रीतु रायं वाइल ' तव हायें काल्वल तया तपोवनातु ' (उगी. ४२८) **सर्वदा**= ज्योतिषी, भविष्य सागणारा, त्याच्या बळावर = चागल्या मुहूर्ताच्या बळावर. **आगळें करणें** = चाल करणे. **दळ वांधणें** = चाल करून जाणे.

२४८०. **व्रम्हचर्या घोडयाचेनि न्यायें** हा न्याय असा . ' ब्रह्म चारी घोडे असति ' ते काइ गा मरत असति . नीरोध साहीलेया अधिक बळ : तुष्टि होए : पुष्टि होए " (दृपा. ७८)

२४८१ **तुरें सुडावणें**=तुरे वाजवणे पहा ' काकणाचा कळरवीं : ते धैर्यधडकु नीसाणु लावी रणभयासुरें **तुरें सुडावी** कळनेपुराचीं ' (उगी ४४४), ' मग चद्रसूर्या बुझावणी । करुनि अनाहताची **सुडावणी** । समानियेचे पाणीं । जिंतले वेगा ' (ज्ञा. १२–५४)

२४८४. **नीभांजांचीं**=नीभाडावी, निर्दलन करावी,

२४८७. **खेडें**=ल्हान खड्ग, बरछी पहा ' न धरि वोडणखाडे : नेघे भाला **खेडें** ' (उगी. ४५०). **मात्रेचें खेडें**=मात्रा=नियत्रण. पहा : '**स्वभाव मात्रें** ' (सिस्. असतिपरि). मात्रा=सयमन, नियत्रण हेच

खेडे=लहान खड्ग. ते **माथाटुनी**=शत्रूच्या माथ्यावर मारून. **माथाटणें** = माथ्यावर मारणे (किंवा, धारण करणे). 'धारण करणे' हा अर्थ घेतल्यास 'यमाचे शस्त्र धारण करून' असा अर्थ करावा लागेल

**२४९०. अनुसो** – अनुशोच. चतुर्विध दु:खापैकी एक.

**२५०६.** या ओवीपासून पुढे देवताचा व त्याच्या फळाचा क्षुद्रपणा स्पष्ट करून सांगितला आहे. देवताना परमेश्वराने सांगितलेले ज्ञान होत नाही, ते ज्ञान त्या ग्रहण देखील करू शकत नाहीत, हे दाखवण्यासाठी पुढे हंसावताराची कथा सांगितलेली आहे. २५०९ ते २५११ ओव्या पहा.

**२५१५. भातार-भक्ती** : भातारांची–भ्रताराची भक्ति=सेवा.

**२५१८.** 'तयाचें सुदर्य (सौंदर्य) पाहुनु (पाहता) आम्ही ठेंगणे' (लहान, खुजे). परमेश्वरावताराच्या सौंदर्यासमोर आमचे सौंदर्य अगदीच खुजे ठरते, हा भावार्थ.

**२५२२.** त्याच्या अगठयाच्या नखाबरोबरहि आमची तुलना नाही. श्रीकृष्णाच्या सौंदर्याचे हे श्रेष्ठपण ऐकून लक्ष्मीच्या अंत:करणात श्रीकृष्णा विषयी आत्यंतिक आवड निर्माण झाली (वेधु सचरला).

**२५२४.** स्त्रीया (स्त्रियाची) सिरोमणी, सर्व स्त्रियामध्ये श्रेष्ठ.

**२५२५.** ते तुमची कुमति (गर्व, आपल्या सौंदर्याचा तो तुमचा गर्व) जेणे हरिली.

**२५२७. बुधी आगळा** = बुद्धीने वेगळा, निराळाच. अलौकिक बुद्धिमान.

**२५३५. पैजा सारणें** = प्रतिज्ञा करणे. (स. प्रतिज्ञा. > प्रा पइण्णा > म. पैजा). प्रतिज्ञा सारणें, असाहि वाक्प्रचार आहे. ओ. २५३९ पाहा.

**२५३६. काळा नांगवे अडउं** = काळाला देखील अडवण्यासाठी सापडत नाही (नागवे). प्रत्यक्ष काळसुद्धा मला अडवू शकत नाही.

**२५३९. प्रतिज्ञा सारणें** = प्रतिज्ञा करणे. ओ. २५४१ पाहा.

**२५४३. पांजरणें**—आच्छादन घालणे, झाकणे. पट्टा • "**पांजरली** का वाहुटळी । करी वेगळ वेटाळी" (ज्ञा. १४–२२६), 'तिय पानावरि पान । **पांजरति**' (ज्ञा. १५–१८७).

**२५४८. काष्टें खाणें**—काष्टाच्या (लाकडाच्या) चितेत स्वत ला जाळून घेणे.

**२५४९. कौंतीयचेनि दुखें**—कुतीच्या दु खाने कोणत्या मायेच्या मोही 'रीगावे'. कुतीच्या दु खाला कोणतीचा जागा पुरविणार नाही.

**२५५३. भलतेउती** भले+तेउती=जे चागले असेल, योग्य असेल तिकडे. आवश्यक त्या सव ठिकाणी सुधी (शोध) करा. हाच शब्द 'भले तेउती—त' असा ज्ञानेश्वरीत आढळतो पाहा 'गेलेया **भलेतेउता** । उदकपणें पडुसुता । तरगाची का निस्चळता । न मोडे चि जेवि' (ज्ञा. १८–११६०); "जैसें चरण सेळियेच । का धावण वारेयाच । जळण आगिचें । **भलेतेउतें**' (ज्ञा. १६–२८६.)

**२५५७. लोकालोक पर्वत** सप्त महाद्वीपे (ओ. वरील टीप पहा) आणि सप्तसमुद्र (क्षार, इक्षुरसोद, सुरासमुद्र, घृतोद, क्षीरोद, दधिसमुद्र, आणि शुद्धोद) याना पोटात घेऊन मरु पर्वताच्या आसमतात सारा कोटी पन्नास लक्ष योजनावर असणारा वर्तुलाकार महापर्वत. याच्या आतील भागास **लोक**=प्रकाश व बाहेरच्या भागास म्ह० याच्या पलीकडे **आलोक** = अध कार असल्यामुळे याला 'लोकालोक' असे म्हणतात.

**२५५८. सुद्रसेन चक्र** सुदर्शन चक्र.

२५६०. 'अर्जुनाचेया आतुर डोळया तें तेज सविया न साहेचि.'

**२५६१. मोहो उछायेंसीं**=अत्यत उत्साहाने किंवा उत्सवपूर्वक.

**२५६७. मदसुदना** = मधुसूदना. मधु नावाच्या दैत्याला ठार मारणारा. **पवाडे-मल्ला** = अलौकिक पराक्रम व चमत्कार करून दाखवि ण्यामध्ये मल्ल = पराक्रमी पुरुष.

२५७१. मुगुट-पाट-वर्धनु—सार्वभौम; रत्नखचित मुगुट धारण करणारे. पहा : 'सकळै मुगुट पाटवर्धन। वनमाला विराजमान' (वच्छ. ३६१).

२५७२. आठाइतयां देवां (सर्वांगसुदर देवाना, किंवा, त्या देवामध्ये) तू आकृतीसार (शरीराकृतीचा, शरीर-सौंदर्याचा आदर्शच) आहेस. १६७२ व्या ओवीवरील टीप पहा.

२५७६. मठार्यां देवां = गार्विष्ठ ढोंगी देवाना तू मीसरगंड (=ज्याच्या गालावर पराक्रमदर्शक अशा आकडेबाज मिशा आहेत असा) आहेस.

२५७९. आठें आंगें सुढाळु : आठहि अंगानी डौलदार, उत्तम आकाराचा. (या आठहि अंगानी सुदर असलेल्याला 'आठाइत' असे विशेषण लावलात. ओ. २५७२ पहा.)

२५८१. मुरडीवां : 'परतलेल्या-पराभूत' देवाना तू खोंचकर (क्षोभकर; क्षोभ उत्पन्न करणारा, उत्तेजक असा) आहेस. पहा : 'नरवेया देवा दीक्षागुरू : नागरा देवा खोंवकरू . उदारा देवा सुधाकरू : तू कृष्णराया ॥ उमेठियां देवा निचनवा : आठाइतेयां देवा वचाळ दीवा । सिहाणेया देवा विगोवा : तू सर्वेश्वराया ॥ (शिशु. १५२-१५३)

२५८२. आरिसा देवांसि=आर्ष, खडबडीत, रूक्ष असे जे देव असतील त्याना तू आरिसा (= आर्ष>आरिस>आरिस = रूक्ष, खडबडीत असा) आहेस. क ख ग या तिन्ही पोथ्यातील 'आरिसा' पाठ याच अर्थाचा आहे. आरिसा आणि आरिसा ही दोन्ही आर्ष या शब्दाचीच रूपे आहेत.

२५८६. उगलमुगल : 'उग्र' या शब्दाच्या अभ्यासाने 'उग्रमुग्र' शब्द होऊन त्याचे अपभ्रष्ट रूप उगलमुगल झाले असावे असे वाटते. =अत्यंत उग्र.

२५९५. उलका-लोळु : उल्केचा लोळ.

२५९७. परीवळु : 'प्रबळ' या संस्कृत शब्दाचे अपभ्रष्ट रूप.

**२६०१.** 'वाकुडया देवा (वाकड्या देवाना) तू 'घाय–उजु' = सरळ घाव घालणारा आहेस, त्याना एकदम शिक्षा करणारा आहेस.

**२६०२. अलेखन :** इतराना न मोजणारे; त्याची पर्वा न करणारे. तोडरमल्ल : आपल्या पायात तोडर घालणारा मल्ल. पूर्वी वीर पुरुष पायात तोडर घालीत. या तोडरावर (तोडयावर) जिंकलेल्या शत्रूची चिन्हे कोरीत असत. पहा : '**तोडरीं** बाहुलीं काढती अनेगें : अगिका नावें' (नरुस्व. १७१); 'जेणें **तोडरीं** घातला काळु : आमोलेपणें' (नरुस्व. ३७३) जणु ते शत्रु आपल्या चरणाशी लोळत आहेत, हे त्यावरून दिसत असे.

**२६०५. अमोला**—पराक्रम. अशुभ देवाना तू पराक्रमी (शौर्याने जिंकणारा).

**२६०६. आचागळियां देवां**—अभद्र (अकल्याणकारक देवाना) तू त्रास (भीति) लाविला.

**२६०७. खरमरयां देवां** = तडाखा देणारे असे जे देव आहेत त्याच्याबरोबर लढाईत उभा राहिल्यानतर त्याना आपल्या अमोलेपणें = पराक्रमाने 'तू नागवेसि' (न+आगवसि) = त्याना तू सापडत नाहीस; त्याच्या स्वाधीन न होणारा असा तू आहेस.

**२६१०.** दर्पणाकडून जर सकळ कळानी युक्त असलेल्या चद्रमडळाची गणना केली जाईल – जर चद्रमडळ मोजले जाईल तर—

**२६१३. पांखांचीया तवणीं :** पखाच्या सामर्थ्याने.

**२६३७. देवपणाचा वंधु :** मला देवपणाचे बधन लागलेले आहे. देव (=देवता) *नित्यबद्ध असतात. अज्ञानादिकाची त्याची बधने कधीच* नाहीशी होऊ शकत नाहीत. त्यामुळे त्याना मुक्ति नाही. अर्थात्, म्हणून परमेश्वराचे सुख, ब्रह्मानद, त्याना प्राप्त होऊ शकत नाही.

**२६४३.** पहा : 'जैसा स्वभावो मायबापाचा। अपत्य बोले जर्‍हीं बोबडिया वाचा। तर्‍हीं अधिकाधिक तेयाचा। सतोखुचि आथि' (ज्ञा. १–६४); 'जैंवी लेकुरवाचे बोलणे। बोबडेंचि कवतीकवाणें। तें सन्मुख होउनि

शहाणे । आदर्कों ठाकती ॥ परिसौनि तयां शब्दांतें । मायबापां ये स्नेहाचें भरतें । तेवि माझिये बाळमतीतें । संत मानवती ' ( शाप्र. ५८, ५९ ).

२६५५. अविक्रीये ब्रह्म : शेषशायीला ' ब्रह्म ' असेहि विशेषण लावतात. कारण, ब्रह्माप्रमाणेच तो अविक्रीय आहे, म्हणजे त्याला लौकर विकार प्राप्त होत नाही. 'क्षीराब्धीं अविक्रियु ब्रह्म कीं :' ( सिसु. विमा. ८४).

२६५६. अष्टधा प्रकृती : देवतांच्या थोव्यामधील ' अष्टभैरव ' या अर्थानें हे शब्द येथे वापरलेले आहेत. मागे १६८२ व्या ओवीतील ' विश्वरुप मुख्य करुनि अष्टधा प्रकृती ' या चरणात सुद्धा याच अर्थानें हे शब्द आलेले आहेत. ( पंचभूतें + त्रिगुण यांनी मिळून तयार होणारी अष्टधा प्रकृति–तो अर्थ येथे नाही). प्रस्तुत ओवीत अष्टभैरवांच्या स्वभावाचे व कार्याचे वर्णन आलेले आहे.

२६५७. भैरव देवता अत्यंत अहंकारी आहेत. त्या सर्व एकदम क्रुद्ध झाल्या तर सृष्टीचा संहार करू शकतात ( पण असे कधी होत नाही, कारण, त्याचे एकमत कधीच होत नाही ) आणि नंतर स्वेच्छेने सृष्टीची रचनाहि करू शकतात. पहा : ' सृष्टिकर्ते ते : अहंकारीए ते : अभिमानीए ते ' ( सिसु, वि. २३ ). असे असले तरी त्याहि देवताच आहेत आणि म्हणून नित्यबद्धत्वामुळे त्यांनाहि परमेश्वराचे कैवल्यसुख माहीतहि नाही.

२६५८. विश्वरूप देवत : देवतांच्या थोव्यातील ' विश्व ' नामक देवता.

२६६०. पहा : ' जियचीय रोमरंध्रसाळे : हारपलीं ब्रह्मगोळकाचीं दिसाळें : ते शक्तीचे तरळैले डोळे : तें रूप पातां ' (उगी. ६५७); ' सकळ ब्रह्मांडीं एकीचि माया ' (सिसु, विमा. ११३)

२६६४. मोक्षेसीं उपमीलें जीएचें फळ : पहा : ' चैतन्यफळ मोक्षतुल्य : परि तेथ च्युति हा दोखु ' ( सिसु. वि. १२)

२६६६. जडवर्गु : जडा देवताचा समूह. मागे ८०८ ओवीवरील टीप पहा.

**२६६८.** हे ईश्वरस्वरूपीचे गुण आहेत. पहा : 'सौंदर्य : लावण्य : औदार्य : सौभाग्य : दया : मया : कृपा : करुणा : एवमादिक अनंत गुण बोलिजेति' (सिस्. महा. ८)

**२६७२. कन्हणा कन्हणी वेसन** : पहा : 'कव्हणा कव्हणी व्येसनु : कव्हणा कव्हणी व्येसनु : एथ जीव उद्धरीजेति हेचि व्येसनु' (सिस्. वि. ११८).

**२६७३. अवरें फळें०** हा श्रीचक्रपाणी अवताराचा निर्देश आहे. ते उभयदृश्यावतार होते. पण त्यांनी 'पर' आच्छादून 'अवर' प्रकट केले होते. म्हणून *त्यांच्याकडून* 'अवर' (देवताच्या विद्या वगैरे) दिले जात असे. **परदृस्यतें ब्रह्मपदा नेती** : श्रीगोविंदप्रभूंचा अवतार. पुढील ओवीच्या पूर्वार्धातहि त्याचाच उल्लेख आहे. गोविंदप्रभू हेहि उभयदृश्यावतार. *पण त्यानी अवर आच्छादून 'पर' प्रकट केले होते. म्हणून ते आच्छा*दनीचे परदृस्यावतार होत. आपल्या लीळानी ते जीवाना एकदम ब्रह्मपदाला नेत. (पहा : "कृमीते ब्रह्मा कीजे ऐसी श्रीप्रभूंची लीळा" सिस्. वि. २१३)

**२६७४.** श्रीगोविंदप्रभु हे वेडेपिसे असल्यामुळे ते ज्ञान किंवा प्रेम काहीच देत नसत, हे प्रसिद्धच आहे.

**२७०६. प्रवृत्ती वीखो जालासी** : प्रवृत्तीला वीखो=विषय होणे म्हणजे (परमेश्वराच्या) इच्छेचा विषय होणे. ज्याच्याविषयी परमेश्वराने काही आशा करावी, इच्छा बाळगावी असे होणे. अर्थात्, परमेश्वरी इच्छे प्रमाणे आचरण करणारा पुरुष.

**२७११. वीचार–शास्त्र** : ब्रह्मविद्या. ईश्वरप्राप्तीचा खरा मार्ग.

**२७१४. अष्टांगयोग** : यमो नियमश्चासन च प्राणायामस्ततः परम् ।
प्रत्याहारो धारणा च ध्यान सार्धं समाधिना ।
अष्टागान्याहुरेतानि योगिना योगसिद्धये ॥

म्ह० १ यम, २ नियम, ३ आसन, ४ प्राणायाम, ५ प्रत्याहार, ६ धारणा, ७ ध्यान, आणि ८ समाधि ही योगाची आठ आगे आहेत. यानी ईश्वर प्राप्त होत नाही.

२७१३. कृतयुगातील धर्म 'आत्मोपास्ति' ( मायेची उपासना ); त्रेता युगातील धर्म 'भक्ति' ( जीवदेवताची ), द्वापरयुगातील धर्म 'याग' (देवता प्रीत्यर्थ यजनयाजन ); आणि कलियुगातील धर्म 'तीर्थक्षेत्रव्रतदान.' (देवताप्रीत्यर्थ). या चार युगीच्या युगधर्मांनी देवताफळे मिळतात; पण परमेश्वर प्राप्त होत नाही.

२७१५. वज्रासन, ओडियाना बंध इत्यादि प्रकार योगमार्गातीलच होत २७१८ पासून तो २७२० पर्यंत योगमार्गातील निरनिराळ्या प्रक्रियांचा विशेषत कुंडलिनी, इडा, पिंगळा (या नाड्या) इत्यादिकांचे वर्णन आलेले आहे. या योगमार्गाच्या क्रिया आचरणारा श्रेष्ठ पुरुष ब्रह्मक्रिया जाणणाऱ्या कोमळ बोधवंताची (म्ह० नुकताच ज्याला बोध होऊन जो आचारधर्म पाळू लागलेला आहे त्याची) बरोबरी करू शकत नाही, हा भावार्थ.

**वज्रासन** : घेरण्डसंहितेत वज्रासन पुढीलप्रमाणे वर्णिले आहे. "जंघाभ्यां वज्रवत् कृत्वा गुदपार्श्वे पदावुभौ। वज्रासनं भवेदेतत् योगिनां सिद्धिदायकम्' (घेसं. २-१२). = दोन्ही मांड्या वज्राकार करून दोन्ही पाय गुदद्वाराच्या दोन्ही बाजूंना भिडवावे म्हणजे वज्रासन होते.

**ओडियाना बंध** : यालाच 'उड्डीयान' बंध असे नाव आहे. पहा : 'उदरे पश्चिमं तानं नाभिरूर्ध्वं तु कारयेत्। उड्डीयानं कुरुते यत् तद् विश्रांत महाखग ॥ उड्डीयानं त्वसौ बंधो मृत्युमातंगकेसरी ' (घेरंडसंहिता ३-१०) = नाडीच्या वरचा भाग पश्चिमद्वाराकडे पोटाच्या बरोबर संकोचित केल्याने हा बंध होतो. म्हणजे पोटाच्या मध्यभागातील गुह्यादि चक्राच्या ठिकाणी असलेल्या नाडीसमूहाला वर उचलल्याने हा बंध तयार होतो.

**षट्चक्रे** · १ **आधार चक्र** · गुदद्वाराच्या ठिकाणी; चतुर्दल मानले आहे. २ **स्वाधिष्ठान चक्र** : लिंगस्थानी. षट्दल. ३ **मणिपुरचक्र** · नाभिस्थानी. दहा दळांचे. ४ **अनाहत चक्र** · हृदयाच्या ठिकाणी. द्वादशदल कमलाप्रमाणे ५ **विशुद्ध चक्र** : कंठस्थानी. सोळा दळांचे ६ **आज्ञाचक्र** : भ्रूमध्यस्थानी द्विदल. या सर्वांच्या वर ब्रह्मरंध्राच्या ठिकाणी **सहस्रदल चक्र** मानलेले आहे

**नाड्या :** शरीरात अनेक नाड्या आहेत त्यातील ३ मुख्य (१) इडा, (२) पिंगळा, व (३) सुषुम्णा मूळाधारचक्रापासून निघणाऱ्या ह्या नाड्या. नाकाच्या उजव्या बाजूची नाडी 'पिंगळा', डाव्या बाजूची 'इडा', व मधली नाडी 'सुषुम्णा' ही होय.

**२७२५.** परमेश्वराचे ज्ञान कोणाला सांगावे आणि कोणाला सांगू नये यासंबंधीचे वर्णन २७२५ ते २७४५ या ओव्यात आले आहे. श्रीचक्रधर *स्वामींची यासंबंधीची वचने पुढीलप्रमाणे होत :* 'हा गा : हें तुमचें रहस्य की : मा आपुलें रहस्य तें आणिकाप्रति प्रकटिजे ना कीं' (सिसू. आ. १५५). 'अन्यकथनें जाए' (सिसू. आ. १५७). 'हे शास्त्र क्व्हणाप्रति न बोलावें' (सिसू. आमा. २७) इत्यादि. तथापि 'आर्ताप्रति बोलावें' (सिसू. आ. १९८) असेहि चक्रधरानी सांगितलेले आहे. याच विषयाचे विस्तृत स्पष्टीकरण या ओव्यात आढळेल.

**२७३५. लटकें श्रीजौनि :** लटके = खोटे. श्रीजौनि = निर्माण करून. मनःपूत खोटे बोलणारे.

**२७४१. खंति भोगिती** = वैषम्य बाळगतात.

**२७४३.** 'गूढ ब्रह्मविद्या अतरे'—असा अन्वय.

**२७५७. मुख सोडणें** : तोंड उघडणे; बोलणे.

**२७६५. इंद्रीं ठाए सांडिले :** इंद्रियानी आपापल्या जागा सोडल्या.

**२७७४. माझें ओखटें नेघौनि :** चक्रधराना अनुसरण्यापूर्वी नागदेव हे फार व्यसनी होते. त्यावेळी त्यानी अनेक ओखटी=वाईट कर्मे केली होती. *पण तिकडे लक्ष न देता स्वामींनी त्याचा स्वीकार केला.* हेच त्याचे 'हिता प्रवर्तणें' होय.

**२७७५. मातें पाठवीलें रीधपुरा :** नागदेवानी अनुसरण केल्यानंतर स्वामीनी त्याना लागलीच रिधपुर येथे श्रीगोविंद प्रभूंच्या सेवेला पाठविले. तिकडून आलेल्या पुरुषाना स्वामी नागदेवाची क्षेमवार्ता पुसत

तेव्हा त्याना कळले की तिकडे नागदेव आपल्यासाठी तळमळत आहे. जेव्हा त्याना नागदेवाचार्य मृत्युशय्येवर असल्याचे कळले तेव्हा अधिक अंत पाहणे योग्य नाही असे वाटून स्वामींनी त्याना आपल्याजवळ बोलावून घेतले. येताक्षणीच नागदेवाचार्यांनी 'गोसावीयातें देखिलें : दंडवतें घातलीं : श्रीचरणा लागले आणि दुखे करू लागले : सर्वज्ञें म्हणीतलें : उगे असा गा वानरेया': एथ क्षेम देया : हें तुम्हा उतावीळ जाल : मग उठिलें : गोसावी क्षेमालिंगन दीधलें : गोसावीयासि आसन : पुढा भटोबास बैसले : श्रीकरू पुढे ऐसे पुजौं लागले : सर्वज्ञ म्हणीतलें : उगे असा गा वानरेया : दु ख न करा . 'आता एथौनि तुमतें केधाही पाठविजे ना . म्हणौनि गोसावी पाठीवरि श्रीकरू घातला' (लीळाचरित्र, उत्त. २).

२७७८. संनिधानाची भास : मागील ओवीवरील टीप पहा : 'आता एथौनि तुमतें केधवाही पाठवीजे ना' हे स्वामींचे आश्वासन म्हणजेच 'संनिधानाची भाष' ( = वचन) होय. पहा : 'प्रेम देता केली : माझी संनिधानाची भाष केली : ते का हो जी साडिली : वेळु न लगता' (उमी. १४२).

२७७९. तुवां जळचरां लाविला वेधु : पहा : (लीळाचरित्र भाग ४, पा. १६). 'तीरीं श्रीकृष्णु'–ही लीळा. चक्रधरस्वामी मिरेगावाहून नाथुरा येथे जाताना रस्त्यात गोदातीरावर 'गोसावियाचीए श्रीमूर्तीची साइली उदकामाजि पडली : तेणें तळिचीं जळचरें त्ये वरि आलीं : गोसावी याची श्रीमूर्ति पाहातें असति..ऐसे गा ते वेधाचार्यें ॥' **पारीरुआं संचरीला आनंदु** (लीच., भा. ४, पा. १) 'मार्गीं वेधें भारद्वाजगमन' ही लीळा : '.. भारद्वाज मार्गी काटीयेवरि बैसला होता : मग गोसावी बीजे केलें : आणि उडौनि मागुता मार्गीं बैसला .पारीरुवे तरि : गोरुवें तरि माणुसें तरि याते देखति आणि पाठीं येवोंचि लागती ."

२७८०. व्यालसर्पातें उद्धरीलें : स्वामींनी उद्धरलेले व्याल म्हणजे आउसेचा 'डागरेश' नावाचा कुत्रा; आणि सर्प म्ह० एकाकी असताना वटेश्वरापुढील देवळात रात्री स्वामींनी निद्रा केली होती तेव्हा त्याच्या वक्षस्थळावर पडलेले दोन सर्प. (लीच. एकाक. लीळा ५९ पहा.)

२७८१. **रांकधणी** हा शब्द शिशुपाळवध काव्यात आलेला आहे. पहा 'दारुणे ससार दुकाळीं : परमानदाची **रांकधनि** केली : तया श्रीचक्रधराचा चरणकमळीं 'लुटत आस' (५) यातील 'रांकधणि' शब्दाचा अर्थ टीपकाराने पुढीलप्रमाणे दिला आहे. 'रकाचा अतिशयो तो रांक धणि = धवधनि' ' धवधणि शब्द शिशुपाळवधात अन्यत्र आलेला आहे. 'ऐसी देता उल्लनी ' अनुराग-रोपाची लावणी अनगु धवधनी सीपण खेळतु असे' (६७६). यातील 'धवधनी'चा अर्थ टीपकाराने 'सुकाळ' म्हणून दिलेला आहे यावरून, **रांकधणी**=रकाना, दरिद्री लोकाना प्राप्त होणारा सुकाळ, समृद्धि. उपरोक्त शिशुपाळवधातील ५ व्या ओवी वरूनहि दुकाळी=दुष्काळात **रांकधणी**-सुकाळ प्राप्त करून दिला, हाच अर्थ चागला निघतो.

२७८२. **वेधु लागला** : वर २७७९ वरील टीप पहा.

२७८३. **दुखदानी नव्हेसि**—दु खदायक नाहीस, मग वियोगाच्या शस्त्राने माझा घात का केला ?

२७८८. **मेलें जीववीलें** : उदा रावेर येथील वामन पेंढी नावाच्या ब्राह्मणाची पत्नी (लीच. एकाक ४०). पडकुळी येथील, सर्पदशाने मृत झालेल्या माळ्याला स्वामीनी ज्वित केले. (लीच. उत्त १०). काळगाव येथे राहणारी माळीण जिव्हारोगाने मृतप्राय झाली होती. तिच्या ज्भिवर आपल्या ताडातील विड्याची पिंक टाकायला लावून तिला ज्वित केले (लीच. उत्त ७९). श्रीचक्रधरचरित्र, पाने १२७–१२९ पहा.

२७९४. **मुनुस्यां युक्तां** ' युक्त (सर्वावयवानी परिपूर्ण) मनुष्य देह धारण करणाऱ्या अधिकारी जीवाना. **नागांबिका** पैठण येथील नागु नाई नावाची म्हातारी विरक्त बाई. हिच त्रिदोर नाहीसे करून स्वामींनी तिला एका कळिकेचे प्रेम दिले. (लीच. भाग २, पा. २–३) त्यानतर ही आपल्या आयुष्याच्या अखेरपर्यंत स्वामींच्या ज्वळ राहून त्यांची सेवा करीत होती. स्वामींच्या मृत्यूची खोटी बातमी ऐकून हिने गोदावरीत उडी घालून जीव दिला.

**२८११. असंनिधान–भीलांचा :** द्वारकानगरी समुद्रात बुडण्या पूर्वी सर्व यादवस्त्रियाना घेऊन अर्जुन द्वारकेबाहेर पडला त्यानंतर भिल्लाच्या टोळ्यानी त्या यादवस्त्रियांच्या समूहाला वेढा घातला आणि पळवून नेले ही आख्यायिका येथे अभिप्रेत आहे **असंनिधान**—( परमेश्वराचा वियोग ) हेच भिल्ल. त्याचा **वळसा**–वेढा.

**२८१४. श्रीमुखें म्हणसी पोरें :** श्रीचक्रधरस्वामी आपल्या शिष्याना उद्देशून बोलताना अनेकदा 'पोरें हो' असे संबोधन वापरीत. त्यांच्या सूत्रपाठातील पुढील वचनावरून देखील हे दिसून येईल पहा : 'पोरें हो : जैसे मासे तैसे तुम्ही :' 'पोरें हो : आता मरा तरी चाड' 'पोरें हो तथ काइ काही नेणिजे ऐसे असे' ( सिमू, नि २४६; २३३; २१५ ) इत्यादि पोर–पोरका; आईवडिलानी टाकलेला. चक्रधराने आपला वियोग देऊन जणु हे संबोधन 'साच केले' असा भाव.

**२८१७. वरखेपणा जाली सीराणी :** 'सीराणी' शब्द सामान्यतः इच्छा, थोर लाभ इत्यादि अर्थानी येतो येथे तो 'लाभाची हानि' या अर्थाने आहे. 'दुर्मिळता' असा त्याचा एक अर्थ आहे. तो 'अमूल्य' या अर्थाने नव्हे तर खरोखरच 'दुर्मिळ' 'न प्राप्त होणारा' अशा अर्थाने घ्यावा.

**२८२०. हीमवंती :** हा शब्द रुक्मिणी स्वयंवरा(नरेंद्र)च्या ४१६ व्या ओवीत आलेला आहे. '**हीमावतीयेचें** ( पाठभेदः **हीमवंतीचें** ) आटीलें हींव' यातील हीमावतीचा अर्थ मी 'हिमालयातील नदी' असा केला होता. पण त्याऐवजी हिवाळा, शीतकालाची अधिष्ठात्री देवता, असा अर्थ करणे योग्य होईल. शीतकालाला स्त्री कल्पून **हिमवंती** हे नाव ठेवलेले आहे ओवीच्या पूर्वार्धात 'ग्रीष्मा'चा म्ह० उन्हाळ्याचा उल्लेख असल्यामुळे 'हिमवती' या शब्दाने कवीला शीतकालच अभिप्रेत दिसतो

**२८२८. परिपूर्ण केली वयस्तंबनी :** वयस्तंबनी = वय, आयुष्य स्तंभन करणारी, रोखून धरणारी विद्या. त्यामुळे मनुष्याचे वय विद्यास्वीकाराच्या वेळी जेवढे असेल तेवढेच शेवटपर्यंत कायम राहते. ही वयस्तंबनी

विद्या चक्रधरस्वामींनी कांती नगरातील ' उधळिनाथा 'पासून स्वीकारली होती. या विद्यास्वीकारामुळे उधळिनाथाला असा लाभ झाला की त्याची ही विद्या अपूर्ण होती, तिला तुटखांद होती, ती स्वामींनी पूर्ण केली, अखंड केली. (लीळाचरित्र, एकांक, लीळा १० पहा.)

**२८२९. तनुसाधन** : देहविद्या : परमेश्वराला अनुसरल्यानंतर जे विकारप्रमादी होतात त्यांनी प्रायश्चित्त करून पूर्वापेक्षा दुप्पट निष्ठेने, तीव्रतेने आणि तळमळीने आचरण केले तर त्याना देहविद्या होते. यामुळे देह सुवर्णाप्रमाणे होतो. हा देह अच्छेद्य व अभेद्य असतो. (पहा : ' देहविद्ये देह प्रकाशे : ' सिसू, वि. ३८; ' हेमकाया होय : वज्रकाया होए ' सिसू वि. ४०). देहविद्येला किंवा तिच्या साधनेला 'तनुसाधन' म्हणतात.

**२८३०. वारया वेंघली** : वाऱ्यावर वेंघली = चढली, वाऱ्यावर उडून गेली.

**२८५२. देवराहाटी** : जीवाच्या क्रियांच्या स्थूल मानाने दोन राहाटी = मार्ग, आहेत. **कर्मराहाटी**–जीवदेवताविषयक केलेल्या कर्माची राहाटी. यामुळे देवताची फळे मिळतात. दुसरी राहाटी **देवराहाटी** = परमेश्वराच्या प्राप्तीसाठी केलेल्या परमेश्वरविषयक क्रियाचा मार्ग.

**२८५४. सनकादिक** : सनक आदिकरून विरक्त ऋषी. सनकादिक म्ह० सनक, सनंदन, सनातन आणि सनत्कुमार हे ऋषि. विष्णुच या चौघांच्या रुपाने अवतरला होता असे म्हणतात हे चारहि ऋषि लहान बाळाप्रमाणे दिसत.

**२८५९. नायो–नायोबा.** चक्रधरांचा एक शिष्य. ( चक्रधरचरित्र, पा. ८९–९० पहा.) ' हा एयीचा भवेर ' म्हणून स्वामी त्याच्याविषयी म्हणाले होते. इतका तो स्वामींच्या सेवेत तत्पर झालेला होता.

**२८६०. भोजराजा दामोदरा** : दामोदर म्हणजेच दाइंबा. याने स्वामींना एक वेळ भोजराजाची गोष्ट सांगितली म्हणून याला स्वामी 'भोजा' असे म्हणत. 'एथ अनुसरा' म्हणजे सर्वसंगपरित्याग करून आमचे सन्निधान

करा, असे याला स्वामींनी अनेकदा सांगितले होते. 'एथ अनुखरा ना : तरि ऐसेया अधोपरीचेया वृक्षा होइजैल.' (लीच. उत्त. ९३; ३४२ पहा).

**२८६१. द्रीढ-पुरखा जनार्दना :** जानोपाध्ये. चक्रधरस्वामींचा शिष्य. त्याच्या प्रयाणानंतर अनुसरलेला. भोजनाच्या वेळी याला दीड भाकर खाण्याला लागत असे म्हणून त्याला चक्रधर स्वामी विनोदाने दीड पुरुष (द्रीढ पुरुष = दीड भाकर खाणारा; अथवा आपल्या आचार धर्मात दृढ) म्हणत असत. त्यावरून त्याच्या दृढ आचाराचाहि ते बोध करीत. (लीच. भाग २, पा. २६ वरील 'द्रीढ पुरखु नामकरण' ही लीळा पहा.) अधिक माहितीसाठी श्रीचक्रधर चरित्र, पा. ९१–९२ पहा.

**२८६२. इंद्रादीका :** यातील इंद्र म्हणजे इंद्रभट नावाचा चक्रधराचा शिष्य. (श्रीचक्रधरचरित्र पा. ८४–८५ पहा). याजवर प्रसन्न होऊन स्वामींनी एकवेळ याला आपला 'फुटा' प्रसाद म्हणून दिला होता. (लीच. उत्त. १५ वी लीळा 'इंद्रभटा फुटा विधानपूर्वक प्रसाददान' ही पहा).

**२८६३. म्हाइयां ब्राह्मणां :** म्हाइया = म्हाइंभट. 'लीळाचरित्रा'चा सङ्कलनकार. सराळे (जि. अहमदनगर) येथील राहणारा. विस्तृत माहितीसाठी श्रीचक्रधर चरित्र. पा. ९६–९८ पहा )

**२८६७. रूपै :** रुपाइसा : म्हणजे महदाइसा (महदंबा) 'धवळे' म्हणणारी. नागदेवाचार्यांची चुलत बहीण. (श्रीचक्रधरचरित्र, पाने ७९–८१ पहा).

**२८६८. 'बाप बंधु जालासि'**—एक वेळ महादाइसा 'गोमतीए तीरीं : नीळेया गूढरा : राजेया गुजरा : कृष्णराया' अशा ओव्या गात होती. त्याच्या शेवटी 'बापु म्हणे कीं भाइया : माझेया साजणी' असे शब्द होते. ते ऐकून चक्रधर स्वामी म्हणाले 'बाइ : ऐसिया ओविया बापा भाउवासि गाइजति कीं' तेव्हा महदाइसा म्हणाली 'जी जी : गोसावीचि बापु : गोसावीचि भाऊ.' याच प्रसंगाचा उल्लेख प्रस्तुत ओवीत आहे. (लीच. उत्त. २७१ पहा).

२८६९. **साधाचा सोएरा** ' चारठाणे येथे राहणारी स्वामींची एक शिष्या. (श्रीचक्रधर चरित्र, पा. ८१ ते ८४ पहा). स्वामींवर अत्यंत श्रद्धा. एक वेळ स्वामींनी इतर देशात मनुष्यविक्रयाची असलेली पद्धति वर्णन केली. तेव्हा साधे 'काठाळली'= भ्याली, तिच्या अगावर काटा उभा राहिला. ते पाहून स्वामींनी म्हटलं ' 'ना भीया हो ' साधे हो ' **तुम्हांवरि वाजत वारा धरिजैल** ' (लीच. उत्त १४९). एक वेळ रिंगणीच्या फुलांनी साधेने स्वामींची पूजा केली. त्यावेळी संतुष्ट होऊन स्वामींनी '**श्रीकंठीची कंठमाळ**' तिला दिली. (लीच. उत्त. २८३)

२८७३. **आउसेचें कर्मक्षाळन** आउसा ' स्वामींची शिष्या. ही पूर्वी जोगीण होती. नंतर स्वामीजवळ सेवेसाठी आली. हिच्या ठिकाणचा स्त्रीपुरुषभेद नष्ट झाला होता. एक वेळ स्वामींनी वृद्धासंगम येथे असताना आपल्याकडे आलेल्या **मुनींना नग्न होऊन क्षेमालिंगन** देण्यास आउसेला सांगितले होते (पहा, लीच. उत्त. ४३४) ते *तिचे कर्मक्षाळण करण्या*साठी. तिच्या ठिकाणी स्त्रीपुरुष भेद नसल्यामुळे स्वामी तिला '**नायका**' म्हणून संबोधीत.

२९०६. **कानवायरु जालां** : 'कानवायर' पाषाणाप्रमाणे *दुसऱ्याला चिकटून राहून त्याच्या उद्धाराच्या आड आलो.* मागे ५७९ ओवीवरील टीप पहा.

२९२०. **सड्गुणांचिया भांडारा** . सड्गुण=षड्गुण. ' यश, श्री, वैराग्य, ज्ञान । ऐश्वर्य, औदार्य हे षड्गुण । नित्य वसती परिपूर्ण । तो *मी नारायण भगवान ।* ' *यात या सहा गुणांचा निर्देश आलेला आहे.*

२९२५. ' *लावण्य लक्ष्मी तुम्हाचि मुहावी केली* ' असा अन्वय.

२९४४. **सांख्या मुख्य करनि** ' सांख्य=कपिलमुनिप्रणीत एक दर्शन. यांनी दोन वस्तु मानल्या आहेत. (१) प्रकृति; (२) पुरुष. याच्यापासून *सर्व सृष्टिरचना होते. प्रकृति–पुरुषांत यांच्या दृष्टीने पूर्ण भेद आहे. प्रकृति* व पुरुष याशिवाय सांख्य आणखी कोणतेच तत्त्व मानीत नाहीत. अर्थात् ते ईश्वर मानीत नाहीत. असे हे द्वैती आणि निरीश्वरवादी तत्त्वदर्शन आहे.

**२९४५. अठरांही पुराणां :** 'ब्राह्म पाद्म वेष्णव च शेव भागवत तथा। तथान्यनारदीय च मार्कण्डेय च सप्तम। आग्नेयमष्टक प्रोक्त भविष्यन्नवम तथा। दशम ब्रह्मवैवर्त लिंगमेकादश तथा। वाराह द्वादशं प्रोक्त स्कान्द चात्र त्रयोदशं। चतुर्दश वामनं च कौर्म पञ्चदश तथा। मात्स्य च गारुड चैव ब्रह्माडाष्टादश तथा॥' यावरून अठरा पुराणाची नावे पुढीलप्रमाणे. १ ब्रह्म; २ पद्मपुराण; ३ वेष्णवपुराण; ४ शैवपुराण; ५ भागवत पुराण; ६ नारदपुराण; ७ मार्कण्डेयपुराण; ८ अग्निपुराण; ९ भविष्यपुराण; १० ब्रह्मवैवर्तपुराण; ११ लिंगपुराण; १२ वराहपुराण; १३ स्कन्दपुराण; १४ वामनपुराण; १५ कूर्म पुराण; १६ मत्स्यपुराण; १७ गरुडपुराण आणि ब्रह्माडपुराण.

**साहीं दरीसना :** सहा दर्शने पुढीलप्रमाणे. १ साख्य, २ योग, ३ न्याय, ४ वैशेषिक, ५ मीमासा, ६ वेदान्त.

**२९५३. जैसे खांडोवनीं :** राजसूय यज्ञात फार भोजन केल्यामुळे अग्नीला मान्द्य आले होते ( जाडय झाले होते ). ते नष्ट करण्यासाठी त्याने खाडववन भक्षण करण्यास मागितले आणि अर्जुनाने ते त्याला दिले अशी महाभारतातील कथा आहे.

**२९९५. आवोलणया श्रीमूर्ती :** श्रीगोविंदप्रभु एकदरीत फार बोलत नसत. म्हणून त्याना 'अबोलणी श्रीमूर्ति' असे म्हणत.

**२९९९. कर्मुनि :** क्रमुनि, आक्रमण करून.

# मूर्तिप्रकाश–शब्दकोश

## अ

अकळ – न,कळणारा ७८६.
अंगद – बाहूवर घालावयाचा अलंकार ६८१, ६८३.
अगोचरी – न दिसणारी २१७.
अघात – कोपरापासून मनगटापर्यंतचा हात ६४२; आघात ६७६.
अंकुरणें – अंकुर फुटणे, पालवी फुटणे १७४७.
अंगान्हण – अगारण, अगविक्षेप ५७०.
अंघ्रि – पाय ५७१.
अजरांमरू – अजरामर, अजर आणि अमर १४१.
अजानबाहु – गुडघ्यापर्यंत लांब हात असलेला ६४३.
अडदह – धाक २६००; शिशु. ३६३. ज्ञा. २–३३९.
अतीत – पलीकडे, वेगळे ३१०, ३६३, ६९८.
अतीत्व – पलीकडे असण्याचा धर्म ११८८.
अतीसेर्सी – विशेषत्वाने ३३३, ३४०.
अतुरपणे – आतुरतेने, त्वरेने २३३.
अदट – लोटले जाऊ न शकणारे, दृढ ६५७, २५८६, २६७६; ’टे – ८१.
अदृष्ट – पारमार्थिक ४५१, २७४२; अद्रीष्ट – १०३६.
अदेखणा – न पाहणारा ७०२.
अद्रीष्ट – १०३६; अदृष्ट पहा.
अद्वीत – (स. अद्वैत) सर्वत्र एकच एक असलेला ११, २६९०.
अधरती – अधःपातात रममाण होण्याचा धर्म १२२२.
अधस्त – खाली पडलेला, पतित, पापी ४८.
अधिकरण – मुख्य, आचार्य ३६.
अधीकार्या – अधिकारी ४९३.
अधीष्टा – अधिष्ठाता ७१४.
अधोमूळ – अधोगतीकडे ज्याचे तोंड आहे असा १२३४.
अध्यास – मनात चालू असलेले चिंतन ९४३, ११९४.
अनधीकार्ये – अपात्र २८०; अनाधिकारी – (अनधिकार्या–षष्ठी) १७६४; अनाधिकार्य – २५१०.

अन्मोदणें – १६८, ७३०; अनमोदणे पाहा.

अन्यथा – खोटा, चुकीचा ९२३, ९२४; °ज्ञान – खोटे ज्ञान, चुकीचे ज्ञान १२९, २९८; °ज्ञानी – ज्याचे ज्ञान चुकीचे आहे असे २७७.

अन्यवार्ता – ( ब्रह्मविद्या व परमेश्वर यावाचून) इतर गोष्टी १४१६.

अन्यशास्त्र – ( ब्रह्मविद्येव्यतिरिक्त ) इतर शास्त्र १४१३.

अन्याओ – अन्याय, अपराध १२५८.

अन्येत्र – इतर, दुसरे १६९.

अपत्र – अपान १७५८.

अपर – दुसरा १४१५

अपरांपर – सर्वांच्या पलीकडे असलेली ७८६.

अपरोक्ष – अपरोक्ष ज्ञान ४६६; °क्षा–प्रत्यक्ष दिसणाऱ्या १४६१.

अपीमान् – अपमान १३६.

अपेस – अपयश ६६२; आपेस – ४०७.

अप्रतिरूप – ज्यासारखा दुसरा कोणीच नाही असा ११.

अप्रमय – ( सं. अप्रमेय ) मोजला जाऊ न शकणारा ७९६.

अप्रमाण – ज्याला मोजण्यासाठी दुसरे कोणतेहि प्रमाण नाही असे ८००.

अप्र(प्रा)स्य – उपासतापास; कष्ट २४२६; स्मृस्य. १०६.

अप्रामाण्य–अविश्वसनीयता ८६२.

अबोलणी – फारशी न बोलणारी; ज्ञानदानासाठी तोंड न उघडणारी १८.

अभंग – भग न पावणारे ३९३.

अभयंकर – अभयदान देणारा हात; भिऊ नकोस असे आश्वासन देणारा हात ७६२.

अभीलाख – ( सं. अभिलाष ) इच्छा, वासना ५९६; °भीळाखी – कामुक, विपयाची हाव धरणारा ६५.

अभोगते – अभोक्ते २६९१.

अभ्यंतर – आतला भाग ७०४; °रीं – मनात, अंतःकरणात १२१३.

अमर – देव ४९६; °रावती – अमरपुरी २६६.

अमृत–कर – अमृताने भरलेले चंद्रकिरण २००.

अमेध्य – यज्ञात आहुति म्हणून अर्पण करण्याला अपात्र, घाणेरडे, अपवित्र ६०, २३३५.

अमोघ – परिणामकारक; हटकून यशस्वी होणारे ९, ६६५.
अमोड – मोडलेले, पराजित २५९१
अमोलिक – अमूल्य, ज्याची किंमत करता येत नाही असे ८०२.
अबर – वस्त्र ७०८
अम्रफळ – आंब्याचे फळ ३०८.
अयोग्यता – अपात्रता ८७४
अरळ – शेज, आच्छादन २२५६, २६७९. उगी १९३
अरिराय – शत्रूचा राजा ६५०
अरुढणे – आरूढ होणे, चढणे, बसणे ५००
अरुवार – नाजुक, मऊ ४४३; ५३५; ज्ञा. १८–१४१.
अर्जणे – मिळवणे, प्राप्त करणे, जोडणे १२८०
अर्थपुष्ट – सुदर अर्थाने पोसलेले ५०८.
अलंग – एक शस्त्र २४९३. सिसू. आ. ११
अलेखण – तुच्छ २६०२
अलोप्य – ज्याचा कधीहि लोप होऊ शकणार नाही असा ५९१
अलोहीत – किंचट लालसर रगाचे, किंचित् लाल ३८; आलोहीत – ५३५, ६५८, ७५९, ७६८.
अल्हाद – (स आल्हाद) आनद ८६; °णे – ३५७.

अवक्रीय – (स. अविक्रीय) ज्याला विकार होत नाही असा ५१९, ६०६.
अवगणी – आच्छादन, सोंग, वेष १५, ६०६, ८३६, १६२१.
अवगमणे – वाटणे २६१८.
अवगळा – मायास्वरूपातील एक स्थान १३९८.
अवग्रहण – (स अवघ्राण) हुगणे, वास घेणे ४९, ३०८, ६७८
अवचट – (स अवचित्) एकदम, अकस्मात्, सहज ५५.
अवजतन – आवाळ, हेळसाड, हयगय २११८
अवदशा – अवकळा २८०८.
अवधान – लक्ष, चित्त १४७, ७६५.
अवधारणे – ऐकणे ५६३, ७६५, नरुस्व. ३८, २०८, °रीं – ऐक ८१३, °रीतु – ऐकोत २११, ४७७
अवबोध – ज्ञान २३६२
अवस्था – तळमळ, विरहावस्था ८८६, °भुत – विरहावस्थेने देहभान विसरलेली २५१५
अवस्थान – वस्ती ५५७, °ने – वसतीच्या जागा ३४१.
अवस्वर – पूजावसर, वेळ, प्रसग ४३१, ४३८, २०७६, °रु – ४९७, ५६३; नरुस्व ७७

अवळ–सवळ – अवेळी सवेळी १७६०
अवज्ञा – आज्ञाभग २७३४
अविद्यात्मक – अविद्येने युक्त १२१७
अविधि – शास्त्रात न सागितलेला आचार, विधीचा अभाव ३६१, २७४६
अविहीत – न सागितलेले, निषिद्ध २३९६
अवेव – (स अवयव) शरीराचा एक भाग ५१०, ५१५, ६०२
अवेशणे – आवेश चढणे ९८१
अव्यक्त – निराकार ५२०
अव्यभिचारिणी – व्यभिचार न पावणारी, भ्रष्ट न होणारी (भक्ति) १४४१
अव्हेरणे – नाकारणे, त्याग करणे, तुच्छ समजून दूर लोटणे ७२
अशकती – अशक्त २४३०
अष्ट–दळकमळ – शरीरातील एक स्थान २९४९, 'महासिद्धी–योगाला प्राप्त होणाऱ्या आठ सिद्धि ४३३, 'भोग – आठ उपभोग्य वस्तु –सुगध, वनिता, वस्त्र, गीत, ताबूल, भोजन, शय्या व भुवन, १६६, २१९, ३८८, ४६४, ७३४
अस – अश ६८७
असक्षात – असख्यात, अनत, सख्येच्या–गणनेच्या पलीकडे असलेले ८००, २३४९
असत – वाईट ७००, ८७२.
असमसास – पुष्कळ शिशु ९५
असहाना – सहन न करणारा २४६७, 'साहाण – असह्य १०२५ शिशु. ५१४
असळग – अतिशय सलगी कर–ण्याला पात्र, सुगम, सोपा ८०१, १०७४, ११२२, ११८३ २६१६, उगी २८५, शिशु ६८३
असाहाण – १०२५, 'असहाना' पहा
असिवार – अश्वारूढ घोडेस्वार २६०१ ज्ञा ९–१७२
असोवे – सगळे २१५२
असीपत्र – या नावाचा नरक, तरवारीच्या धारेसारखा तीक्ष्ण २३१२
असेख – अशेष, सर्व ४७०
अस्वपात – अश्रुपात २०९८ उह पृ ४८–४८.
अस्वादु – आस्वादन करण्यासाठी, उपभोगण्यासाठी १५६
अहोर्नेसीं – ( स अहर्निशी ) रात्रदिवस २८५, ८४१
अहेव–चुडा – सौभाग्याचे लक्षण असलले ककण, बागडी २८३८.

अळकरणे – अळहृत करणे, भूपविणे, शाभिवत करणे, °रिली– ४६४, °रिले – ३५४, ३७२, ३९६, °रीली–अलकृत झाली ४४८.

अळिउळ – (स अलि+कुल) भुग्याचा समूह ७२३, °ळीउळ – १५०, वछा २१९, ज्ञा ११–२४५

अळुमाळ – थोडा, किंचित् १३९३, ३०३०, °माळु – ४५, नरुस्व २८८, ६२३

असतात) २८, °णा घालणे – नमविणे, पायाशी आणणे, अकित करणे २८, ५४५, ज्ञा १–२००

आकर्खणे – आकपणे ५३७, °र्खिती–(स) 'आर्कार्पिती,' ओढून घेतात, आकर्षून घेतात १५२

आकर्म–शक्ती – आक्रम शक्ति ६५०

आकारणे – मूर्त होणे, प्रगट होणे,

आकाळवीज – अकाळी पडलेली वीज २८१३

आर्खिती – १५२, 'आकर्खणे'

आंकोडा – वाकडी टोकें असलेलें शस्त्र २४९५.
आंगमेळु – आलिंगन २३३२.
आंगवण – पराक्रम, सामर्थ्य ५४५, ६५८, ६७३; उगी. २१४; नरस्व. ४४७.
आंगवणें – प्राप्त करणे, प्राप्त होणे २२३९ ज्ञा १२–१३८.
आंगसीक–अंगरखा, अंगातील वस्त्र १९३२, २९६७. उगी. १३२
आंगिठा – आगटी ३००७.
आंगुले – आगडे २०४९. शिशु.९१
आंगुळिया – बोट ५५४.
आगोठा – आगठा ६६२.
आचागळ – अभद्र, अमंगळ २६०६.
आटणें – नाहीसे होणे ६६९.
आटवळसा – गिरकी, भोंवरी १००७.
आटवी – ( स. अटवी. ) अरण्य ५९८.
आटाट – आटाआट, पराक्रम १००८.
आटोव – पीळदार, कसलेला ५८५; नरस्व. ३२३.
आटोप – अभिमान, गर्व, सामर्थ्य ५८५, ११०२, १७५१.
आठाइतीं – सर्वावयवानी सुंदर १६७२, १८०१, २५७२. शिशु. ४२५.
आठांगुळें – ( स. अष्टमागल्य ) व्हावयाचा राहिलेला गर्भाधान संस्कार. नंतर, स्त्री गर्भवती झाल्यावर, आठव्या महिन्यात साजरा करण्याचा विधि २०४७. शिशु. ९०.
आडा – गंध २०९९.
आडी – प्रतिबंध, अडथळा, अडथळ्याचा समूह; ज्ञा. ६–४६३
आण – शपथ २८९, ९८७.
आणी – आवड १५९, १६९, १७६. ज्ञा. ६–१०.
आणी – टोक २०२९.
आतणे – असणे, येणे ६४०, २०२२
आतुडणें – सापडणे १३८२; °तुडला–४५४.
आतौनि – घेऊन १७९२.
आत्मत्व – आत्मीयता १२०२.
आत्मरमण – आत्मस्वरूपात रममाण झालेला ७८९; आपल्याच स्वरूपात रममाण होण्याचा धर्म ९५४.
आत्मसंभावना – आपला मान ११२३.
आत्मेंनसी – आत्म्याशी २४४४.
आथिला – युक्त असलेला ३६८, ४१३; °ली–३९७, ५६०, ६७५; °लें–३७५, ३८६, ३९४, ४१७; °लें–६०८.

अळकरणे – अळकृत करणे, भूप-विणे, शोभिवत करणे, °रिली–४६४, °रिले – ३५४, ३७२, ३९६, °रीलो–अलवृत झालो ४४८.

अळिउळ – (स अलि+कुल) भुग्याचा समूह ७२३, °ळीउळ – १५०, वछा. २१९, ज्ञा ११–२४५

अळुमाळ – थोडा, किंचित् १३९३, ३०३०, °माळु – ४५, नरस्व २८८, ६२३

अक्षेपु – आक्षेप, शका १७५१

अक्षेवणे – औक्षण, ओवाळणे ४२८

आ

आइणी – शोभा, नैपुण्य ६०६

आइता – तयार, सिद्ध, सज्ज °ते – ३७० °ती–२३०९

आउक्ष – आयुष्य ६६३, १२५९

आओ – आव, महत्त्व, डौल, ऐट १०००, १५४१, °वो – ५६८, २१४४

आकण–पायातील दागिना, (यावर जित व्यक्तीची चिन्हे कोरलेली असतात) २८, °णा घालणें – नमविणे, पायाशी आणणे, अंकित करणे २८, ५४५, ज्ञा १–२००

आकर्खणे – आकर्षणे ५३७, °र्खिती–(स.) 'आकर्पिती,' ओढून घेतात, आकर्षून घेतात १५२

आकर्म-शक्ती – आत्रम शक्ति ६५०

आकारणे – मूर्त होणे, प्रगट होणे,

आकाळवीज – अकाळी पडलेली वीज २८१३

आखर्खिती – १५२, 'आकर्खणे' पहा

आखुडणे – सकोच पावणे १७५४.

आगम – तंत्रशास्त्र १९१, ४५४

आगळा – निराळा, वेगळा (१८३), ४२१, ४८०; °ळी – १७७

आगळीक – आधिक्य, निराळेपणा, विपुलता, °का – विपुलतेने १००३, २५१९

आगाध – गभीर ३०५, ३७६, °धोव – गहनता, गाभीर्य ५९०, २६१०

आघवा – सगळा, सर्व, °वें – सगळ ३४५

आघात – ६७६, 'अघात' पहा

आकोचला – आकुंचित झाला, नरमला ५४३

आकोडा – वाकडी टोके असलेले शस्त्र २४९५.
आंगमेळु – आलिंगन २३३२.
आंगवण – पराक्रम, सामर्थ्य ५४५, ६५८, ६७३; उगी. २१४; नरत्व ४४७.
आगवणे – प्राप्त करणे, प्राप्त होणे २२३९ ज्ञा. १२–१३८
आंगसीक–अगरखा, अंगातील वस्त्र १९३२, २९६७. उगी. १३२
आंगिठा – आगटी ३००७.
आंगुले – आगडे २०४९. शिशु ९१
आंगुळिया – बोट ५५४.
आगोठा – आगठा ६६२.
आचागळ – अभद्र, अमंगळ २६०६
आटणे – नाहीसे होणे ६६९
आटवळसा – गिरकी, भोवरी १००७
आटवी – ( सं. अटवी. ) अरण्य ५९८.
आटाट – आटाआट, पराक्रम १००८.
आटीव – पीळदार, कसलेला ५८५; नरत्व. ३२३.
आटोप – अभिमान, गर्व, सामर्थ्य ५८५, ११०२, १७५१.
आठाइतीं – सर्वावयवांनी सुंदर १६७२, १८०१, २५७२ शिशु. ४२५
आठांगुळें – ( स. अष्टमांगल्य ) व्हावयाचा राहिलेला गर्भाधान संस्कार. नंतर, स्त्री गर्भवती झाल्यावर, आठव्या महिन्यात साजरा करण्याचा विधि २०४७. शिशु ९०.
आडा – गंध २०९९.
आडी – प्रतिबंध, अडथळा, अडथळ्याचा समूह, ज्ञा. ६–४६३
आण – शपथ २८९, ९८७.
आणी – आवड १५९, १६९, १७६. ज्ञा ६–१०.
आणी – टोक २०२९.
आसणे – असणे, येणे ६४०, २०२२
आंतुडणे – सापडणे १३८२; °तुडला–४५४.
आतौनि – घेऊन १७९२.
आत्मत्व – आत्मीयता १२०२.
आत्मरमण – आत्मस्वरूपात रममाण झालेला ७८९; आपल्याच स्वरूपात रममाण होण्याचा धर्म ९५४.
आत्मसंभावना – आपला मान ११२३.
आत्मेनसी – आत्म्याशी २४४४.
आथिला – युक्त असलेला ३६८, ४१३; °ली–३९७, ५६०, ६७५; °ले–३७५, ३८६, ३९४, ४१७; °ले–६०८.

आदकणें – भिणे, निरुत्साह होणे २१५५.

आदरणें – स्वीकार करणे, एखादी गोष्ट करण्यास मनापासून तयार होणे ५९. ज्ञा. २–४४.

आदळ – झोंबी, झुंज १९१८.

आदि – मुख्य कारण ८९१; °कारण-मूळ कारण ७९९; °नाथ–४२९, ५१०; °पुरुख–२४१, ४२४; °पुरुखाची–४४०; °पुरुखाचे–४९८; °पुरखें–४६१; °पुरुषासी–४२९; °मळ–जीवाला आरंभी लागलेला मळ २०२९; °मेली –अर्धमेली २९६९; °मेले–अर्धमेले २४९७.

आंदोळणें – हलणे ८०४.

आधीनिक – आधुनिक, अलीकडच्या वस्तु ३०३१.

आनंद – , °घन–आनंदाने परिपूर्ण भरलेली ३४२, ७३२; °नीधान–आनंदाचे स्थान ६६६; °रती–ब्रह्मानंदाचा उपभोग ७४२, ७७५.

आनव – विशिष्ट देवता १९१५.

आनोज्ञा – ७६३; 'अनोज्ञा' पहा.

आंधुळी – अंधावस्था २८९२.

आपजवणे – मिळणे, येणे, मिळविणे ९७०; °जवे – ११५७; °जवेंल – १६५९; °जणें – २३५१.

आपणपें – आपणाला, स्वतःला ३४८, ७६९.

आपेंपर – आपला व दुसऱ्याचा, भिन्नभाव १५२९.

आपेस – अपयश ४०७; ज्ञा. २–८.

आपैतें – आपलेसे, वश २३९.

आपैसें – आपोआप, सहजच १६३, ७२७.

आफळणें – (सं. आस्फालनम्) ठोकणे, आपटणे २५०१.

आफावणे – बोलावणे २५४१; शिशु. ९२३.

आभरण – दागिना, अलंकार १८४३. ज्ञा ११–२३२.

आभार – ओझे, जबाबदारी, निरवणूक २८३७; उगी. १०७, १४६; °रीं– २९९१.

आभाळ – (सं. अभ्रालय) ढग ४०.

आमुलें – एक दागिना २०५१.

आमुलेपण – शौर्य १७५१; शिशु. ३५६.

आमोलेपण – शौर्य, पराक्रम १०९.

आंबुलेपणे – पराक्रम १०२२.

आयागमन – येणे आणि जाणे २६४, २२८६.

आयुक्ष – १२५९; 'आउक्ष' पहा.

आरद्र – (सं. आर्द्र) ओला १९७१.

विणारे, शुद्ध करणारे १२२७;

°उजीएड-उजेड १६७३; °जीयडें-उजेड १७२९; °जेरी – उजळपणा, स्वच्छता, प्रकाश, उत्कर्ष.

उज्त्रं(जरं)भणें – प्रोत्साहन देणे, उचंबळून सोडणे २०४३; °रंभली – ०२३; °ज्भंभीतो – प्रोत्साहन देणारी, उचंबळून सोडणारी ९६.

उजु – सरळ, समोर १५४५.

उजेडणें – शरीरातून बाहेर काढणे १९२८.

उंचमढ – ४७१, ४७२.

उटणें – घासून काढणे १८५९.

उटाळ – उथळें, इमारतीच्या खांबाखाली दिलेला दगड १८९०.

उठावणी – हल्ला, चढाई १०११.

उठावा – चालून जाणे, उचलणी १००६.

उतटणें – बाहेर काढून फेकणे ३००४. ज्ञा. ६–२६६

उतावेळ – उतावीळ २०७, ३६१, ४४४.

उत्तरखेठ – संग्रहालय, उतारपेठ ३९९.

उत्तरापथें – उत्तर दिशेला ३३५.

उत्पवन – उडणे २४७९.

उदय – ; उदो – उदय, उमलणे ५३५; °भास्कर – उगवलेला सूर्य २६४४; °भास्करू – १२०८; उदेभास्करू – (१) उदयाचलावरील सूर्य (२) एक प्रकारचा कापूर १२७.

उदार – औदार्य ४३३; °दार्य – ११३.

उदास – (१) अनासक्त, कोठेहि रममाण न होणारा ७३, ९३६; (२) अनुकूलहि नाहीत व प्रतिकूलहि नाहीत असा २७१.

उघाणें – (सं. उद्+हा) उचंबळून वाहणे, झळकणे, फाकणे, पसरणे; °धाये – झळकते ३१७; °धातया – झळकत असलेल्या ७५२; °द्धांत – पसरलेले, फाकलेले ६३९, १७७१; °द्धांती – ४५३.

उद्धरण – अविद्याबंधापासून मुक्ति ७९९.

उन्नत – उचंबळलेला, उत्कंठित २०९.

उन्मेख – (सं. उन्मेष) ज्ञान, स्फूर्ति, उत्कर्ष, बहर ९६, २३१, ५०३, १४८२. ज्ञा. १–१५

उपगुण – गौण गुण २१९७.

उपचारणें – उपचार होणे, रोग नाहीसा होणे १४८३.

उरहाटणे – उलटून लावणे, नष्ट करणे, उलथून जाणे ८६९, २९५६

उल्हासणे – आनंदित होणे, विकासणे ११३, ११६१

उवेढा (करणे) – वेढा उठवणे २८८७, उगी १०५, ज्ञा ११-३८२

उष्णकाळ – उन्हाळा ९१

उसंग – (स उत्संग) मांडी ८७, °गिए मांडीवर २०४८, °गीए –८७, °गीयें–१०४

उसंत – विश्रांति १२४४

उसीसें – उशी ४८५ दृपा ५३

## ऋ

ऋ(रु)षीकेश(शी) – (स हृषीकेश) इंद्रियांचा स्वामी, श्रीकृष्ण ५२, २४०, २५९ ४००, २६१६

## ए

एक –, यक–एक, काही १२६९, °वट–एकत्रित ६००, °काकवीर–अनकाकी एकटा युद्ध करणारा २६०३, °काकीता–एकांत, एकटेपणा २३८०

एती – २४४३, २४४६, 'इती' पहा

एर – इतर, दुसरा २३

एसणा – एवढा ५४५

एळा – वेलदोडा २२८०

एक्षकदम – यक्षकर्दम, एक सुगंधी उटी १७८१ शिशु २८८.

## ऐ

ऐतार – श्रेष्ठ ३१७ नरुस्व १५९

## ओ

ओखटें – वाईट २९८, ३१८, ३२०, ३२८, ३५९, वोखट–३१६, वोखटी–२६९

ओगर – भाताची मूद २१०२, °रू–वाढप २१०२

ओडज – रसपरिपाक २४१, वोडज –१३०९ उगी ८२४

ओ(वो)डवणे – पुढे करणे ओढवून आणणे, निर्माण करणे ३४५ २३६७

ओद – प्रवाह, ऊत २२२९ नरुस्व ५३८

ओप – चकाकी झळाळ २६६८

ओवरें – पडशाळा, वसतिस्थान १८४६

ओसादणे – कोमणे, निस्तेज होणे २८१०

ओ(वो)हरणे – लावणे, उतरणे ६०१, °ते–लोवते, उतरते २२२६, ऋव ९२

ओ(वो)ळ – प्रवाह, ओघ ३३८, १९४५.
ओ(वो)ळगणे – सेवा करणे ५३०, ६७५.
ओळणे – वळणे, एकीकडे चालून येणे, भरुन येणे ८५५, १९४५.
ओळवणे – वळवणे १८२७.

क

कखाइ(य) – (सं. कपाय) वाईट आचरण करणारे, अमंगळ, मलिनता, मळ, मलिन २७३७, २७४२; °खाय – २७३, ३२४, १०४८, २०९४
कगुल – (स. ककाल) हाडाचा सापळा २४७७
कटकें – स्वारी ६८५
कठुरपण – कठोरपण, [कडकपणा] ४४९.
कडगें – कडें २२३२. नग्स्व १५.
कडवसें –अधारे २५८ ज्ञा ७-१०९
कडीदोरा – कटदोरा, कमरेला बांधायचा दोरा २०५१
कणव –करुणा ४९२. ज्ञा. २–२०६
कण(न)वाळु – दयाळू २७६, १२४५.
कंद – साठा १५६.
कंदर्प – मदन ५८९.
कमोद – चंद्रनिवासी कमळ १७९७, १८२१; कुमोद – १९९.
करण – किरण ६८१. (पाठांतर)
करण – कार्य ९३६, ९५८.
कपंणे – भाजणे, पोळणे १७४९.
करावे – करवावे २७३०, करि – करवी, करवितात ४९४.
कर्णपुट – पुटाप्रमाणे खोल असलेले कान ५३.
कर्णीकर – कर्णिकार या नावाचे फूल ५२७.
कर्दम – चिखल ६१८.
कर्म – ; °चांडाळ – वाईट कर्मे करुन चाडाळाप्रमाणे अपवित्र झालेला ६१, १२३५; °जड – आपापल्या कामात व्याप्त असलेला १३२३; °फळ – जीवाने केलेल्या बऱ्यावाईट कर्मांचे फळ म्हणून प्राप्त होणारा देहादिकाचा भोग ५७; °सृष्टी – १४४८.
कलोळु – कल्लोल, उचंबळ १७२०.
कल्हें – जर्दामिश्रित लाल रंगाचे वस्त्र २३१०.
कवती(तु)क – कौतुक ४४७, ७६७.
कवळी – मिठी २२५१; शिशु• ८७९.
कवाड – दार ४८१.

कसवटा – कसोटी, पारखून पाह-ण्याचा दगड निकष ९८, ९८० ज्ञा ६–९६
कळक – (स कलव) डाग दोष
कळवडी – झोबाझोबी २३९४
कळा – (स कला) कुशलता ५६२, °वत – चद्र १२९०, १७५६ °वोद – रसिक, कलाकौशल्याचे ज्ञाते, मार्मिक १८१ २५६ ५७१, °ळेचा – कलावत चतुर २६७२, २६७५
कळावी – मनगटात घालण्याचा एक दागिना २२३२ शिशु १०१०
कहीं – कधी ३२२ ज्ञा २–८
काग – (स काक) कावळा
काढावा – माघार १००६
कटाळा – कटाळा शिसारी २२९७ ज्ञा १–१९७
काडबोटी – धनुष्यबाण १०२३
काडवेल – (स काडवल्लि) एक बारीक वेल, ज्ञानवल्ली २२२२, °ली – ६६८
काडारणे – कोरून तयार करणे ६१०, रिले – ३८७, रीव-कोरीव, नक्षीदार २२३
कातरी – कैंची कात्री ११२०
काती – टाकदार शस्त्र, कोयते २८९१ ना १७–९५
कातीउ – कातीव ६८६
कानवडा – तोड फिरवलेला, ओशाळा, पाठमोरा ना १८–१६७२
कानवायर – दगडाचा एक प्रकार ५०९ २६२८, °होणे – एखा-द्याच्या कल्याणाला आड येणे २९०६
कानाडी – वाणाने २१५३
कामविणें – प्रयत्नपूर्वक तयार करणे ३९०, °वला – ६८६, °वले – ४९९
कामाटी(ठी) – कार्य, काम २९९, १६२६ उगी ८२२
कामातुर – आपल्या इच्छा तृप्त करण्यासाठी अत्यत उत्सुक असणारा २
कामारी – काम करणारी किंकरी, सेविका दासी ४८२ २६६०
कामिया – कामुक २९३० उगी ३८९
कालण – कालवण, मिश्रण २५६
काव्यमुद्रा – २०९
कासणे – कमर कसणे चालून जाणे, हल्ला करणे १०९, २१२० ज्ञा १३–५४४
कासवट – काळसर रगाचे वस्त्र २३१०
कासी – (स काश) शेतात उगवणारे एक प्रकारचे गवत १७६१
कास्मीर – स्फटिक २५५९

कुहिजणें – कुजणे, खराब होणे. २७६४; ज्ञा. १७–१५३; शिशु. १०४.
कुळदेवता – कुळाची अधिष्ठात्री देवता ७६९.
कृडा – क्रीडा ९५३. वछा. ७२.
कृतघ्न – उपकार न आठवणारा, उपकाराची फेड अपकाराने करणारा ६३.
कृदात – (सं. कृतात) यम १३५, २९१, ६५३, ६८५; ज्ञा. ६–२५९
कें – कोठे २५४९
केउतो – कुणीकडे २७८७.
केणें – विक्रेय वस्तु, विक्रीचा माल १३७९, १५२०; गोप्रच. ५३.
केतु – ध्वज, निशाण ७१६.
केसनी – केवडी ६९२.
कैवल्य – मुक्ति, मोक्ष. ४८०, ५०९, ५११; ॰कदु – २६१, ३०५, ३२५, १७२१, १७२५, १७३९; ॰कमळ – १७३६; ॰गगा – ५५१; ॰नाय – २९१, २९७, ३२६, ४२८, ४३०, ४५५, ४७६, ४८४, ५३०; ॰नायक – ३३१, ३४८; दान – १०६, ३७०; ॰दानी – २८९, ४१८, ७५०; ॰द्रुमु – ४१३; ॰पती – ३७६, ४३१, ४८७, ६५०; ॰पद – ४५९, ४७२, ४९१, १७१५; ॰पाळ – ३०९, ३३८, ४२७, ८६४, १७२०; ॰प्राप्ती–४६९; ॰फळ – ३८९; ॰माल्ल – २५९; ॰मूर्ती – ३३६, १७२९; ॰रत्न – ३१२, १७३२; ॰सुख – ३१४; ॰स्वरूप – १७२८.
कोठार – सामग्री ठेवण्याची जागा, कोठीघर, आगर ३८६.
कोड – कौतुक ८७, २४८, १९५५; ॰डें – कौतुकाने ८७, २६०.
कोडीसवाणी – दीनवाणी २०५०.
कोंतीयवेनि – कुंतीच्या २५४९.
कोभंणे – कोंब येणे. १९८१. उगी ३
कोरडी – शरीर सुकवणे, सुकलेल्या शरीराचा सांगाडा १११४, ३००१. उगी. २००
कोरडा – ज्याचे अंत.करण द्रवत नाही असा २७६
कोरसी – तिरपी दृष्टि २१५३
कोवळीक – कोवळेपण ५२२.
कोहक – बीळ, गुहा २३७८, २९९३.
कोळिसा – अर्धवट जळलेला लाकडाचा तुकडा, कोळसा १२७१.

खोलती – मार्ग दाखविणारी दासी १७०३; ज्ञा. १३-४१७.

खोवणें – घालणे २१५०.

खोसें – अपमानित २४९४.

खोळ – आतील भाग, अंतरग, खोली, पिशवी १६१, ५३२.

ग

गजबज – खळबळ, अंतःकरणातील तळमळ २७६३.

गजस्कंद – हत्तीचा खांदा ११४०.

गडगर्जन – (गड = आढ्यता, गर्व + गर्जन) गर्वाने केलेली गर्जना, प्रचंड गर्जना करणारा १९४, २५७१.

गडदरा – खोल दरी २१९३.

गभस्ती – सूर्य ९२३.

गह – गहन, खोल; गहवती– गहनता—गांभीर्य २५२५.

गर्भसंभूति – गर्भसंभव, गर्भ पोटात राहणे २०४५. शिशु. ८९.

गर्व – ; °भोगणें–१९३; °गर्वाथिली –गर्वाने युक्त ६५६.

गवसणी – खोळ १०७५, ११६०, १६७९ उगी. २९६.

गवांदी – अन्नछत्र २५४; ज्ञा. १३ -२३०. उगी. १८५.

गंवार – बावळट १७९९.

गंहींवर – गव्हर, रहस्य, गूढ ज्ञान १६६४, २६३५; गहंवरीं – गव्हरातील, गुहेतील ५९५.

गळदंडा – गळघातील हार ७०९, २१००. गोप्रच. ११०.

गांजीव – गांडीव २५३४.

गाडु ढाळणें – स्नान घालणे ५०३.

गाभेवन – गर्भातील आतल्या भागातील पान ५२९; उगी. २२०; नरुस्व. ५८२; ज्ञा. १० – ७०.

गायकवाडु – संरक्षक २५९२.

गारा – चिखल, कलंक ८९४, २१२२.

गाऱ्हाणें – तक्रार ४००.

गांव (ऊ) – अंतर मोजण्याचे एक माप, ४ ते ९ मैलाचे अंतर २३२८; नरुस्व. ७३०, ८५५; गोप्रच. १; °घेणें – गावावर दरवडा २८८४.

गिवसणें – शोधणे १०९५, ११९१.

गुज – रहस्य १२६०.

गुढा – पताका, निशाण ५८८.

गुण – धनुष्याची दोरी २५४३.

गुदारा – (विषयाची) घाण, उकीरडा २४६७.

गुल्फ – पायाचा घोटा ५७०.

गूढ – गुप्त, झाकलेला, गहन ७१, ४५४.

गूळळो – गुळणा २२९४ दृपा ३९
गोठि–वेल्हाळ –गोष्टिवेल्हाळ, फार गोष्टी करणारा २२६
गोडिय – गोडी, मधुरता १७३८.
गोडीसा – गोड, मधुर १५७.
गोत्रकोल्हाळु – सर्व कुळामध्ये कोलाहल माजविणारा २५९९.
गोत्रीज – नात्याचा ७४९.
गोदळ – समूह २४१४.
गोमटी – चागली, सुदर ५७७
गोमती – गोदावरी नदी ४३५
गोमीसळा – एक पक्षी १७७३.
गोरा – एक खडा २६२३.
गोरी – गायनाचा एक प्रकार २३२०. उगी ३७०; ज्ञाप्र. ७२०; ज्ञा. १६–१२०.
गोल्हाट– छातीजवळील प्राणवायूचे स्थान २९५७
गोल्हाट – छातीची पोकळी २३०५
गोसावी – स्वामी ८३.
गौल्यता – गोडी, मधुरता २३४.
गौळ - गोठा, आश्रयस्थान, नगर ३८५.
ग्राहक - घेणारे, गिऱ्हाइक ९८

## घ

घड – समूह, घोस १०८, १६१
घण(न)वट – मजबूत, भारी, भरीव, ३९४, ५९९, ६५६. °पण – दृढता २२७; °नवटी – घनवटता २८२६; °णाओ – घट्टपणा, कठीणपणा १७३४.
घतणे – ठार मारणे; °तले – ठार मारले २९९.
घरटो – पाहारा १७४१ उगी. ११९; नरुस्व ७१७.
घराचार चाळणे – घर रिघणे ५१२.
घसरें – आवेशाने १९१२. उगी ४२५
घात – योग्य वेळ, पेरणीची वेळ १७५९
घायवारा – घाव, उडता वार १००९; उगी. १५६; दिशु. ४८२
घायाघाओ – घावावर घाव, अनेक घाव १५२१.
घालिजति – घातले जातात १२३५.
घुगट – बुरखा, वेश ८.
घुमरी – उत्कर्ष १७९२; ज्ञा १७ –२१३; °सो–उत्कर्षाने १७९२.
घ्रणा – ( सं घ्राण) वास, स्वास; °इंद्रिय–घ्राणेंद्रिय, नाक ४९, १११३
घेपवे – घेतला जातो, वध केला जातो ३२४, १०७९, १२९२.

घोरांदर – घोर, भयंकर, अत्यत घोर ४, २७४८; °घर २३३८. सव. ४१५.
घोस – गुच्छ, झुवका, घड, समूह १७४, ७५०; घोसाळ–घोसदार, भरीव, गुटगुटीत ४४३; शिशु ४१८; ज्ञा. १५–१८८; घोंसाळी–झुबकेदार १८७०.

## च

चक्रवर्ती – सम्राट १७६७.
चढावणी – आक्रमण १८७.
चतुरानन – चार तोडाचा देव; ब्रह्मदेव ७१९.
चतुर्विध – चार प्रकारचा ५७.
चंद्रकळा – चंद्राची कोर ५५६
चमतकरणे – आश्चर्यचकित होणे, चमत्कार वाटणे १८१.
चरकणें – पिळून काढणे १०२०.
चरणचारी – पायी जाणारे, पायावर उभे ४८४, २५५७.
चरीतार्थ – परिपूर्ण ३२०, ३५०.
चर्पट – चबरा, बडबड करणारा २५९७. नरस्व. ७४९.
चर्या – आचारधर्म, आचरण २३८, २२८०; °रीया–२८९०; °वत– आचरता पुरुष, धर्माचिरण करणारा २७५१. उगी. ४११.
चवकणे – चमकणे, आश्चर्यचकित होणे १७३५; °चवके–चमकते २०६२.
चवर – चमरी मृगाच्या शेपटीच्या केसापासून तयार केलेली चवरी ३९६; °धरोणी–चवरे ढाळणारी ७३७.
चवरा – उंच स्थान, ओटा ४९६.
चाउरो – अच्छादन, वस्त्र १३१२, २९२०. उगी. ७०६.
चाकोरा – मळलेली वाट २३.
चांग – उत्तम रीतीने ३९३.
चाचरी जाणें – बोबडी वळणे १८८९; उगी. ४४९.
चाड – इच्छा २२३,७४२; °डार्थी –इच्छा पुरवून घेऊ इच्छिणारे, सहेतुक भक्ति करणारे २७३.
चापेगोरें – सोनचाफ्याच्या फुलाप्रमाणे शुभ्र ४११.
चाळविणे – चलविचल निर्माण करणे, कामोद्‌भव करणे २२८.
चाळा –गालफड २४२२.
चीतकळीका – चित्तरूपी कळी ५८४.
चीतळ – चित्रमृग, अंगावर ठिपके असलेले आखूड शिंगाचे किंवा विनशिंगाचे हरीण ५९३.
चीदब्रह्म – माया १६०४.
चीपोळी – पिचकारी २२९४.
चीळसि – किळस २३६७.

## ज

जगदळ – जगाचे निर्दालन करणारा ६६०. शिशु. १५५.
जगबोळ –, विश्वसंहारक २५९१, २८११. शिशु. १०३९.
जंघा – मांडी. °युग ५९९.
जमदंड – यमदंड २५८३.
जवादि – कस्तुरी १७७९.
जळकेळि – जलक्रीडा १७३, ४०३, ६१८.
जळघोष – पाण्याचा आवाज १९४४.
जळधर – मेघ ६२५.
जांघोवा – मांडी. ५१५.
जाण – जाणता, ज्ञानी २४४; °तां – ज्ञानियाने ३४०; °राव – ज्ञानियाचा राजा ८२५; जाणी – जाणणारी, ज्ञानी १९८६; °णीव – ज्ञान, चेतना ११५, २५५, ७३४; °वर्णे – जाणीव करून देणे.
जाणणे–ओळखणे; °निजतो – माहीत होतात. ३७६; णौनि – जाणूनबुजून ८११.
जाणविणें – ओळख करून देणे १९१. सव. २४८.
जातिवीख – आदर्श उपभोग; °विखया – आदर्श विषयोपभोग घेणारा ९११.
जात्यंध – जन्मापासून आंधळा १७६५, २६३२
जानु – गुडघा ६००.
जांबुनद – सोने ५२६.
जावळा – जुळा २१९१, २२२८.
जाळ – ज्वाला १९६, २७९३.
जी(जि)वाळी – जिव्हार, अंतःकरण, मर्माचा भाग, आत्मा, हृदय १४२७, २२५३, २८३३.
जीणणे – जिंकणे २३८३, २४४९.
जीताय – जगत आहे २५४५.
जीवत्व – जीवाचे सुखदुःखग्राहकत्व १४६३.
जीवन – पाणी २०३.
जीवोद्धरण – जीवांचा उद्धार करणारा, परमेश्वर १९९३.
जीव्हार – अंतःकरण ६९०.
जीज्ञासा – माहीत करून घेण्याची इच्छा ३३५.
जुझणें – युद्ध करणे; °झौनि युद्ध करून २९३; °झार – झुजार, युद्ध करणारा, चांगला योद्धा २४७२; जुंझार – २१४२.
जैत्य – जय २५०१.
जोहर – (सं. जतुगृह) पेटलेले घर ७६, २८४०.
जोहार – नमस्कार, प्रणिपात ५६१. नहस्व. १२७; ज्ञा. ११–४८५. धपू. ७८–४.
ज्वरांकुश – ताप नाहीसे करणारे औषध १२६.

झ

झटे – ठेच २००१

झडपणी – झपाटण २३९१, नरुस्व ४०१

झळवणे – स्पश करणे, भरून यण ३०१, ८६५ °ळवे – १२०४, °ळवली – झळवलेली १२६० °ळवौनि – स्पश करून ४१९, ४३२, १७२७ नरुस्व ८२१ ज्ञा ७–७८ सव ४५२

झळाळणे – चमकण, तेज पुज दिसणे ४२६

झाक – पवित, ओळ १८६७ नरुस्व ७४७ शिशु ६०४

झाकवण – फसवण वचित करण, थाक्ला जाणे ८६६ १०७५ ज्ञा ६–९९

झाडणे – नाहीसा करणे ४४१

झुळबुका – झुबका १९३० शिशु ४०८ घपू ७०

झोंडु – फेपरे १९८९

झोला – गुच्छ ४३६

झोलीजति – चलले जातात १८३

ट

टकणे – टाकण प्राप्त होणे, टके – १३०२ नरुस्व ४५५

टका – निशाण १०१३ शिशु १०३१, नरुस्व ७८९

टाक – सुमारे एक तोळयाचे वजन ५७५

टाकणें – प्राप्त करून घेणे २१७१, °किती – ९१८ नरुस्व ४७६, उगी १६४, ज्ञा १८–८६७

टाकावळी – ( टाक+आवळी ) पायाच्या टाचा ५७६

टेव – ऐट, डौल २३६ ७१८, २०५७, ज्ञा १–४ उगी ४३९

टोप – रग, तेज, डौल °पेची २३०६

टोपी – टोपरे ४३८

टौळ – दिवा पणती २१०३

ठ

ठकारु – ऐट, पवित्रा ६२४ नरुस्व ७४१

ठाओ – स्थान, जागा २०९७

ठाकणे – थावणे ६९०

ठाण – आकृति, शरीराची ठवण ५१९ नरुस्व ३२५ ज्ञा ११ –२७०

ठाणवी – (ठाणदिवी) समई, दिव्याची लाकडी वैठक २१०३, २८०७ ज्ञा १८– १४९०

ठीकलग – रत्नजडित अलकार ५७२ नरुस्व १७१ वछा १७८

ठीकवणीया – रत्नपारखी, जोहरी १७७६; उगी. ५३१.

ठोसर – जाड, भरीव १३९४.

ड

डंब – दंभ, आढ्यता, गर्व १३८४, २१८३.

डवरणे – लेप देणे १७८१; ज्ञा ११–२१८. उगी. ४४०.

डहुळणें – हलणे, हलविणे १२०९.

डाजणे – डाचणे २४५९.

डीर – कोवळा कोंभ, कोवळे पान ५५४, २२२२. ज्ञा. १५–९४.

डीरंणे – अंकुरित होणे १९७८, उगी. ७९४.

डोल्हारा – पाळणा २६७८.

डोळस – डोळे उघडे ठेवून पाह-णारी, काळजीपूर्वक देखरेख करणारी, सुंदर डोळ्यांची १०७, १६५, २३१, ३७१, ५१०, ७२०; नरस्व. १९३, ४०४. वत्सा. ६४.

डोहळा – (सं. दोहद) इच्छा १५८; °ळे – ७४१ ज्ञा. १२–२२१.

डोळेलास – वशीकरण, दृष्टिबंधन, नेत्रदीपक १०८८, २५८०. नरस्व. ३०९; उगी. ३९

ढ

ढळतें – ढळणारे, डोलणारे ३६९.

ढळमळ – खालीवर, इकडून तिकडे आंदोलन पावणारी, डोलणारी १६१, १३९२.

ढाळणे – देणे, घालणे ७३४. ज्ञा. ६–४१३. नरस्व. ५७०.

ढुलणे – डोलणे ४८५; °लविणे डोलविणे १८२. उगी. ६९२.

ढेंकर – तृप्तीचा उद्गार ९३.

त

तक्ट – तबक, पत्रा, वर्ख, वेगड ६६९, २२०४. उगी. ५४८.

तनुसाधन – देहविद्या, २८२९.

तंम्रपुष्ट – नरकाचा एक प्रकार २३३०

तरंग – लाट ८०२.

तरणी – सूर्य ३३.

तरळणे – विस्तारणे, चंचल होणे, दिपून जाणे ९८०; °ळंजति – तरळतात २९४२; °ळंली – ६९४. शिशु. ९.

तराय – बहर, ऊर्जितावस्था, टव-टवी २१८, १६२९. उगी. २२.

तर्क – तर्कशास्त्र १९१.

तऱ्हीं – तरी ७३३.

तल्हात –तळहात; °ती – तळहा-ताने (पाय) चेपणारी २५१५; °तीचेनि–तळहातातील २६४४, ज्ञा ७–१४७; उगी. ११२.

तव – (स स्तव) मुळे १९३ ज्ञा. ७–१६ उगी १७.
तव – घेरी, भोवळ
तवक – जोर, धैर्य, आवेश ६५४. १०२१ ज्ञा. १२–४६; उगी ४४८ सव ३५८
तवण – सामर्थ्य २६१३.
तवणी – (स तपन) पीडा, जगवणूक, जिवतपणा १७१, २८१७, °नी – १२५, ७४३; ज्ञाप्र. २७; उगी ४.
तस्कर – चोर ९५५.
तळेवां – तळव्याला १७९५
तळोली – लहान तळे ६१९.
तातला – तापलेला, उन्हाने पोळलेला २२४८; °लयातें – तापलेल्याला–१५३; °तो – तापवाधा १०३९ ज्ञा ६–२४९,
तार – डोळचातील बुबुळ, तिरक्स ५६७, वछा २८५
तार – बाण २१५९
ताराण – तारुण्य, यौवन, सामर्थ्य २३०, उगी ३०८, वछा ३७९; शिशु ६७२.
ताभणे – न्याहाळून पाहणे २१५८
ताळमान – ठेवा वगैरे ४३८
तिगुणणे – एखादी गोष्ट तिसऱ्यादा किंवा तीन वेळ करणे, दोत तिसऱ्यादा नागरणे १७६१
तिडीक – ठिणगी ३०२९; °तीडोकी –तिडीक १३३०.
तिमणे – ओले होणें १३८९. शिशु. १९७ ज्ञा ९–१३६
तीख – तीक्ष्ण, तिखट ५६७; °ट– ६६९
तुक – तुलना ५७३. उगी ५४३
तुकणे – नम्र होणे, नमवणे ७१७, २९०४ ज्ञा १८–२८८
तुखार – (स तुषार) थेंब १४२७
तुडताळणे – दौत्य, मध्यस्थी ६७२; °ताळी – ७४६ उगी ६३५
तुरवणे – डोक्यावर धारण करणे °रवी – १४१२; °वीलीं – १३९० ज्ञा ११–२१५
तुळा-पुरुष – (स तुलापुरुष) पुरुषाच्या भारभार दान म्हणून दिलेले सानेनाण व जडजवाहीर ११३
तेजाथीला – ( तेज+आथिला ) तेज मपन्न १०७१, ११६०.
तेजोठपण - तेजस्वीपणा ५४१; त्वेजिठ – (स तेजिष्ट) तेजमपन्न २६०७
तेजणे – त्यजणे, त्याग करणे, सोडून देणे १२३४; °जुनि – त्यजुनि, सोडून २११ ज्ञा ८– २१४.

तैल्यपाक – (१) तेलात तळलेला पदार्थ (२) एक नरक २२६५.
तोख – (सं. तोष) आनंद, समाधान ८७.
तोडरमल्ल – शत्रूना आपल्या पायाच्या तोडरात घालणारा वीरपुरुष २६०३. शिशु. १०२३
तोवर – मोहर २११५. उगी. १९; शिशु. ८३७.
त्रस – कंटाळा, किळस १३६५; °सीत – त्रस्त, दु.खी १२२.
त्राण – बळ, सामर्थ्य २७२२.
त्रासु – भीति २९२
त्राहाटणे – डोळे मोठे करून पाहणे २१६२.
त्रीखावंत – (स. तृषावंत) तहान लागलेला, तहानलेला १५५, ६१९.
त्रीमिर – रात्र, अंधार १२७, ९१५.
त्रीयंच – (स. तिर्यंच) पशुपक्षी २५९, ८६३.
त्रीयंबक – त्र्यंवक, शंकर ४०२.
त्रीयसा – त्र्यंशा स्वरूपात ८०५.
त्रीष्णा – तृष्णा, तहान ५९५.
त्रुपीत – तृप्त, समाधान पावलेली ७७२.

## थ

थडी – काठ; °थ – काठावर ८०३; °डिया – काठावर १७४७.
थरीवरी – प्रत्येक थरावर (?) २६७९.
थारणे – राहणे, स्थिर होणे ८८५, १९९८. ज्ञा. १५–३५.
थोकणे – स्थिर होणे ६०२; शिशु. ५८; ज्ञा. १–१५८.
थोवा – थवा, समुदाय ५९६.

## द

दंदिया – युद्ध करणारा, दु.खाने पीडित, त्रस्त २४३३, २५९०. ज्ञा. १३–५००.
दबडघाओ – जोराचा धाव २१७२.
दया – द्या, देया ६४.
दरां – दऱ्यात, दरीमध्ये १००५.
दरीसन – दर्शन ७४, १९४.
दशन – दात १७३४.
दशावधान – दशावधानी, दहा गोष्टींकडे एकदम लक्ष ठेवणारा ६६८.
दसाक – (स. दशाग) कापूर, दहा सुगंधी द्रव्याचा धूप. २१००.
दसो – पदराचा धागा, पदराला भरलेले दोरे १९४८, २६४५.
दळ – सैन्य, समूह १०९, ५५६; °भार – सैन्याचा समूह ६७१.
दळवटणे – रगडून काढणे, चूर्ण करणे ९८, २३३.
दाटुगी – बळकट ६५७.

तव – (सं. स्तव) मुळे १९३. ज्ञा. ७–१६. उगी. १७.
तव – घेरी, भोवळ.
तवक – जोर, धैर्य, आवेश ६५४. १०२१. ज्ञा. १२–४६; उगी. ४४८. सव. ३५८.
तवण – सामर्थ्य २६१३.
तवणी – (स. तपन) पीडा, जगवणूक, जिवतपणा १७१, २८१७; ॱनी – १२५, ७४३; ज्ञाप्र. २७; उगी. ४.
तस्कर – चोर ९५५.
तळेवां – तळ्याला १७९५.
तळौली – लहान तळे ६१९.
तातला – तापलेला, उन्हाने पोळलेला २२४८; ॱलयातें – ताप, लेल्याला–१५१; ॱती – तापवाचा १०३९. ज्ञा ६–२४९,
तार – डोळ्यातील बुबुळ, तिरक्स ५६७; वछा २८५
तार – बाण २१५९.
ताराण – तारुण्य, यौवन, सामर्थ्य २३०; उगी ३०८; वछा ३७९; शिशु. ६७२.
ताभणे – न्याहाळून पाहणे २१५८
ताळमान – ठेका वगैरे ४३८.
तिगुणणें – एखादी गोष्ट तिसऱ्यादा किंवा तीन वेळ करणे, शेत तिसऱ्यादा नागरणे १७६१.
तिडीक – ठिणगी ३०२९; ॱतीडीकी –तिडीक १३३०.
तिमणे – ओले होणे १३८६. शिशु. १९७ ज्ञा ९–१३६
तीख – तीक्ष्ण, तिखट ५६७; ॱट– ६६९.
तुक – तुलना ५७३. उगी. ५४३.
तुकणे – नम्र होणे, नमवणे ७१७, २९०४ ज्ञा १८–२८८
तुखार – (म. तुपार) येंव १४२७.
तुडताळणें – दौत्य, मध्यस्थी ६७२; ॱताळी – ७४६. उगी. ६३५.
तुरवणे – डोक्यावर धारण करणे ॱरवी – १४१२; ॱवीली – १३९०. ज्ञा. ११–२१५.
तुळा–पुरुख – (स. तुलापुरुप) पुरुषाच्या भारभार दान म्हणून दिलेले सोनेनाणे व जडजवाहीर ११३.
तेजागीला – ( तेज+आथिला ) तेजःसपन्न १०७५, ११६०.
तेजौठपण – तेजस्वीपणा ५४१; त्येंजिठ – (सं तेजिष्ट) तेजःसपन्न २६०७
तेजणे – त्यजणे, त्याग करणे, सोडून देणे १२३४; ॱजुनि – त्यजुनि, सोडून २११. ज्ञा. ८–२१४.

तैल्यपाक – (१) तेलात तळलेला पदार्थ (२) एक नरक २२६५.
तोख – (सं. तोष) आनंद, समाधान ८७.
तोडरमल्ल – शत्रूंना आपल्या पायाच्या तोडरात घालणारा वीरपुरुष २६०३. शिशु. १०२३
तोवर – मोहर २११५. उगी. १९; शिशु. ८३७.
त्रस – कंटाळा, किळस १३६५; °सीत – त्रस्त, दुःखी १२२.
त्राण – बळ, सामर्थ्य २७२२.
त्रासु – भीति २९२.
त्राहाटणे – डोळे मोठे करून पाहणे २१६२.
त्रीखावंत – (सं. तृषावंत) तहान लागलेला, तहानलेला १५५, ६१९.
त्रीमिर – रात्र, अंधार १२७, ९१५.
त्रीयंच – (सं. तिर्यंच) पशुपक्षी २५१, ८६३.
त्रीयंबक – त्र्यंबक, शंकर ४०२.
त्रीयंसा – त्र्यंश स्वरूपात ८०५.
त्रीष्णा – तृष्णा, तहान ५९५.
त्रुपीत – तृप्त, समाधान पावलेली ७७२.

थ

थडी – काठ; °थ – काठावर ८०३; °ह्या – काठावर १७४७.
थरोथरी – प्रत्येक थरावर (?) २६७१.
थारणें – राहणे, स्थिर होणे ८८५, १११८. ज्ञा. १५–३५.
थोकणें – स्थिर होणे ६०२; शिशु. ५८; ज्ञा. १–१५८.
थोवा – थवा, समुदाय ५९६.

द

दंदिया – युद्ध करणारा, दुःखाने पीडित, त्रस्त २४३३, २५९०. ज्ञा. १३–५००.
दबडघाओ – जोराचा घाव २१७२.
दया – द्या, देया ६४.
दरां – दऱ्यात, दरीमध्ये १००५.
दरीसन – दर्शन ७४, १९४.
दशन – दात १७३४.
दशावधान – दशावधानी, दहा गोष्टींकडे एकदम लक्ष ठेवणारा ६६८.
दसांक – (सं. दशाग) कापूर, दहा सुगंधी द्रव्याचा धूप. २१००.
दसी – पदराचा धागा, पदराला भरलेले दोरे १९४८, २६४५.
दळ – सैन्य, समूह १०९, ५५६; °भार – सैन्याचा समूह ६७१.
दळवटणें – रगडून काढणे, चूर्ण करणे ९८, २३३.
दाटुगी – बळकट ६५७.

दांडो – पालखी २६७८. शिशु. ५०४.
दातार – दाता ३३९ ज्ञा. ११–५३५.
दातृत्व – दान देण्याचा धर्म १०६
दान-साळ – दानशाळा, जेथे दान दिले जाते अशी जागा ३९५.
दापाइता – निर्दलन करणारा ५८९
दापिया – दटावणाऱ्या २५८७.
दारसंका – दाराच्या चौकटीचा उभा भाग. ४८८.
दावणा – प्रदर्शनीय २१३४.
दावानळ – अरण्याला लागलेला अग्नि १०४९
दाहकत्व – जाळण्याचा धर्म उष्णता ११४५.
दीगगना – दिशा ह्याच स्त्रिया ४४६ वछा ३३.
दीगल – वर्छी, भाला २४९७; उगी. २४४.
दीवटी – लहान दिवा १९२, २४९.
दीवाळी – दीपावली, आनद, महोत्सव १६२८ ज्ञा. ४–५३.
दीप्याजन – प्रकाशित करणारे श्रेष्ठ अजन ९८५.
दीसवड – दररोज.
दीक्षागुरु – दीक्षा देणारा गुरु ६२५. ज्ञा. १८–१६२८.
दुखकेरू – दुःखरूपी कचरा १२४२; °खदानी – दुःख देणारे २८२! °खीस्त – दुःखी, दुःखित १२४१.
दुचीत – मन ठिकाणावर नसणे, चिंताक्रांत २७६६, ज्ञा. ९–२८; °श्चित – ५१६.
दुजेपण – भिन्नता, निराळेपणा ९०३
दुटी – वस्त्र ३०११. गोप्रच. ९७.
दुणणे – एकदा नागरल्यानतर पुन्हा नागरून काढणे, एखादी गोष्ट दुसऱ्यादा करणे; °णिजे –१७६१. दृपा. २८.
दुतिका – दूति, सेविका, निरोप नेणारी स्त्री ६७२.
दुपटी – दुपट्टा २४७६.
दुमन – दुर्मन, वाईट अतःकरणाचे २७४१.
दुरवार्त्ता – (स. दुर्वार्ता ) वाईट बातमी ५३.
दुरळ – दुष्ट २२६० गोप्रच. ७८.
दुर्ती – (स. दुति) वृती, रस, अर्क, सार, रहस्य, सुगध, पराग ६०४, °र्ती–२१०, ६०५.
दुहा – द्रोही, विरुद्ध आचरण करणारा ६७. सव; ४०७; ज्ञा १३–६९५.
दुश्चित – ५१६; 'दुचीत' पहा.

दूती – ४३७, ७७६, 'दुर्ती' पहा
दृष्टभूत – दृष्टीस पडलेला १८३३
देखणेपण – सूक्ष्म दृष्टीने पाहण्याचा गुणधर्म ३७१
देंटु – देठ २०२८
देटुगा – बलिठ १६६५, °गेपण-सामर्थ्य १८५८
देठीया – बलवान, गर्विष्ठ १०८९, २५५५
देठपागारु – बळसपन्न व रक्षणकर्ता २५८१
देवाग – विशेष प्रकारचे वस्त्र ७७३, घपू ५ ३९–३
देव्हडा – देहुडा, वाकडा २५८१
देशक – समूह ९४, ६७५, उगी १६
देशघडी होणे – देशादेशी भिक्षेस फिरणे ३२७ वछा ४१
देशवटा – देशोवडी, हद्दपारीची शिक्षा २८५१.
देशवळ – (१) सामान्य प्रतीची, खेडवळ (२) नरकाचा प्रकार २३१८, २६३१ ज्ञाप्र ३०९
देसी – देशी भाषा, मराठी २४६
देहायवळेया – दिवसाढवळ्या २८९० उगी ५२५
देहेंदीस – दिवसेदिवस २५४१
दैन्यवदन – (स दीनवदन) ज्याचा चेहरा अनुकंपनीय आहे असा २८२
दैवराहाटी – परमेश्वरप्राप्तीचा मार्ग २८५२
दैवसृष्टी – ब्रह्मादिक व त्याच्यावरील देवता ८७३
दैवहत – कमनशिबी, दुर्दैवी ४९, ६०
दैवी – अलौकिक लावण्य ३१७, ४५३
दोख – दोष ६२७, °ज–(स दोषज) दोषातून–अपराधातून निर्माण झालेला, जन्मदोषी ४७, °दर्सी–दोषदर्शी, दोष पाहणारा १०६९
दोद – पोट ६२८, दोंदील – (तुदिल) मोठ्या पोटाचा २२१, ५०६
दोसे–(स उद्देशे) साठी २०८, ४२४, ४७८, ६८०, १२०८, वछा १३३, १६१, ज्ञा १६–११२, ज्ञाप्र १९१
द्रावक – द्रव आणणारा १७८४
द्रोढावणे – दृढ होणे, पक्के होणे, स्थिर होणे, °वले – ३५७, °ढावया – दृढ होण्यासाठी ११६, °ढकरण – पुष्टिकारक, पाठपुरावा करणारे १३५२.
द्रुगंधी – (स दुर्गंधी) घाण, वाईट वास, किळस ४९
द्वेख – द्वेष २५२९

## ध

धडाडी – भीति, ताप, उष्णतेने होणारा थरकाप ११९, १२८८.
धणी – तृप्ति, संतोष ३९८.
धनजय – अर्जुन १३५.
धनरेखा – धनरेषा ६६४.
धरणें – राहणे, आटोक्यात येणे, धावणे २९२.
धरणे – आग्रह, तगादा, सत्याग्रह, ९१३.
धाखट – बळकट, दणकट ६१२.
धाडी – हल्ला १०१६; °धडकु – स्वारी करून भीति दाखविणारा २५८७.
धाडोळणे – धुडाळणे २५५०.
धापिसें – धोपडे, अर्बुज, रावट, हीन प्रतीचे २६६५; शिशु. ८६, २१९.
धारसा – खळाळ, जोराचा प्रवाह १०४८, २१६१; नरस्व. २२३; उगी. ५५; ज्ञा. ६-४७४
धारेतळ – धारेच्या खाली २१४५.
धाले – तृप्त झाले ७२२
धावणी – पाठलाग, उठावणी १००४; °करणें – चालून जाणे ११५.
धीगी - धिक्, धिक्कार २५५१.
धुधाणे – फुफाटणे, फूत्कार टाकणे; °धाते – धुंद झालेली २२०२.
धुपटणे – धूप जाळावयाचे भांडे, २१००.
धुमकस – गर्दीने १९१२; नरस्व. ४३.
धुमाडि – धुळवड १९१७; शिशु. २८४.
धुमुकुस – नृत्य १८४.
धुर – पुढारी, अग्रणी, मुख्य कर्ता पुरुष ५६०, ५६१; °रा २४७४.
धुर्जटी – शंकर १३१.
धुळकोट – भुईकोट किल्ला; शिशु. ४५२; उगी. १९४.
धूप – एक सुगंधी द्रव्य २४४.
धोकडे – खडबडीत २११४.
धोटा – पिचकारी २२९५.
ध्यान-परायण – ईश्वरचिंतनात तत्पर असलेला २८७.

## न

नट – वेश ८.
ननुष्टी – (न+अनुष्टी) आचरत नाही, पाळीत नाही ७०.
न पवीजे – पावला जात नाही ६०७.
नव-निधी – ६६६.
नवरत्न – नऊ रत्ने १८७, ४३०.

